**मृगवल्लभ**, कुंदा गवत.
**मृगवाहन**, वायु.
**मृगाविट्सदृश**, कांकडाचें झाड.
**मृगशिरस्**, मृगनक्षत्र.
**मृगशिरा**, | मृगनक्षत्र.
**मृगशीर्ष**, र्षा, |
**मृगहन्**, वाघ.
**मृगा**, महाबला.
**मृगांक**, चंद्र १ वायु २
**मृगांकमुकुटार्ह**, कस्तुरी.
**मृगाजिन**, कृष्णाजिन.
**मृगांडजा**, कस्तुरी.
**मृगांतक**, चिता.
**मृगाद्**, वाघ.
**मृगादन**, तरस १ लांडगा २ सिंह ३
**मृगादननिभानन**, तरस.
**मृगादनी**, थोरकांवडळ १ महाबला २ लघु-कांवडळ ३ गोडशेंदणी ४
**मृगाराति**, कुतरा.
**मृगारि**, सिंह १ वाघ २ कुतरा ३ रक्त-शेगवा ४
**मृगाविष्टदश**, तोरण.
**मृगाशन**, सिंह.
**मृगाक्षी**, थोरकांवडळ १ गोडशेंदणी २ धात्रिका ३ अमृतफला ४
**मृगी**, कस्तुरी १ पीतवर्णसितोदरा २ कवडी ३
**मृगेंद्र**, सिंह १ मोगरा २
**मृगेंद्राणी**, अडुळसा.
**मृगेर्वारु**, थोरइंद्रावणी १ गोडशेंदणी २ श्वेतहरिण ३
**मृगेक्षणा**, गोडशेंदणी.
**मृगेर्वारु**, हरिणभुक् १ श्वेतहरिण २
**मृजा**, मार्जन.
**मृड**, शिव.
**मृडंकण**, बालक.
**मृडीकु**, हरिण.

**मृणाल**, क, कमळदेंठी १ काळा वाळा २ कमळतंतु ३ पीतवाळा ४
**मृणालमूल**, कमळकंद.
**मृणालिन्**, लामज्जक १ उशीर २ कमळनाल ३ कमळ ४
**मृणालिनी**, कमळनाल.
**मृत**, तुरटी १ माती २
**मृत**, मृत्यु १ भस्म केलेला २ मेलेला ३
**मृतक**, प्रेत.
**मृतकल्पक**, मळित.
**मृतकांतक**, कोल्हा.
**मृतजीव**, तिलक.
**मृतजीवनी**, दुधी.
**मृतजीविन्**, दुधी.
**मृतंड**, सूर्य.
**मृतमत्त**, मृतकांतकशब्दपाहा.
**मृतांड**, सूर्य.
**मृतामद**, मोरचूत.
**मृतालक**, का, गोपीचंदन १ सोरटी माती २ तुरवनस्पति ३
**मृति**, मरण.
**मृतोद्भव**, समुद्र.
**मृत्**, मृत्तिका.
**मृत्कर**, कुंभार.
**मृत्कांस्य**, शराव.
**मृत्किरा**, मृत्तिकेंतील किडा.
**मृत्वालिनी**, चर्मघासा वनस्पति.
**मृत्ताल**, क, मृतालकशब्दपाहा.
**मृत्तिका**, तुरटी १ कंदगुळवेल २ फटकी ३ माती ४
**मृत्तिकालवण**, खारीमाती.
**मृत्तिकाक्षार**, मुळा.
**मृत्फली**, कोष्टवनस्पतीचाभेद.
**मृत्यु**, ज्वर १ मरण २ यम ३
**मृत्युंजय**, शिव.
**मृत्युनाशक**, पारा.
**मृत्युपुष्प**, लघुदेवनळ १ ऊंस २

**मृत्युपुष्पा**, केळ.
**मृत्युफला**, केळ.
**मृत्युबीज**, वेणु.
**मृत्युभृत्य**, रोग.
**मृत्युवंचन**, बिल्ववृक्ष १ डोमकावळा २ शिव ३
**मृत्युसूति**, खेंकडी.
**मृत्स्ना**, चांगली माती १ तुवरनस्पति २ तुरटी ३ गोपीचंदन ४ सोरटीमाती ५
**मृत्स्ना**, गोपीचंदन १ तुरटी २ चांगलीमाती ३ सोरटीमाती ४ तुवरनस्पति ५
**मृत्क्षार**, मुळा.
**मृदंकुर**, हिरवा पारवापक्षी.
**मृदंग**, वेणु १ शब्द २ वाद्यविशेष ३
**मृदंगफल**, फणस.
**मृदंगफलिनी**, कडुदोडकी.
**मृदंगवन**, कडुदोडकी.
**मृदर**, क्रीडाशील १ शीघ्रगामी २
**मृदा**, माती.
**मृदाकर**, वीज १ वज्र २
**मृदिन**, शुक्ररोग १ मर्दित २
**मृदिनी**, मृत्स्नाशब्दपाहा.
**मृदु**, थोरश्वेतजाई १ कोरफड २ रोगी ३ कोमळ ४
**मृदुकंटक**, श्वेतकोरांटा.
**मृदुकृष्णायस**, सिसें.
**मृदुगंधवाह**, थोडा वारा.
**मृदुगांथि**, ग्रंथि, परना गवत.
**मृदुगमना**, हंसी.
**मृदुगामिनी**, हंसी.
**मृदुचर्मिन्**, भूर्जवृक्ष.
**मृदुच्छद**, कुकुरबंध १ भूर्जपत्र २ लालझाडु ३ श्रीताड ४ लघुदेवनळ ५ गनअक्रोड ६
**मृदुच्छदा**, पिंडखर्जूरी १ मृषाशिर्षागवत २ खजूरी शिंदी ३ लघुखजूरी ४
**मृदुज्योतिस्**, उत्तम कामें.
**मृदुनाल**, श्रीताड.
**मृदुत्वक्**, भूर्जपत्र.
**मृदुदर्भ**, श्वेतदर्भ.
**मृदुदला**, खारिक.
**मृदुलक**, सोनें.
**मृदुपत्र**, कुळीची भाजी १ लघुदेवनळ २ भूर्जपत्र ३
**मृदुपत्री**, एकचील.
**मृदुपर्वक**, वेत १ थोरवेत २
**मृदुपर्वन्**, वेत.
**मृदुपुष्प**, क. शिरीष वृक्ष.
**मृदुपुष्पा**, सोनटका.
**मृदुफल**, नेवळी १ बेहेकळ २ मोहाचा नारळ ३ हाशावृक्ष ४ फालसा ५ भूयधामण ६
**मृदुबीज**, बेहेकळ.
**मृदुरेचनी**, भुईतरवड.
**मृदुल**, अंजीर १ पाणी २ कोमळ ३
**मृदुलता**, खारीक.
**मृदुलेडिक**, गागेरुवा.
**मृदुलामक**, ससा.
**मृदुलामवत**, ससा.
**मृदुवात**, थोडा वारा.
**मृदुसार**, पारोसा पिंपळ.
**मृदुत्पल**, नीलकमळ.
**मृद्वंग**, रानचाकवत १ कथील २
**मृद्वी**, का. काळें द्राक्ष.
**मृद्वीकासव**, द्राक्षासव.
**मृध**, युद्ध.
**मृन्मय**, पाषाण.
**मृषा**, अ० मिथ्यायाअर्थी.
**मृषाध्यायिन्**, बगळा.
**मृषार्थक**, खोटें भाषण.
**मृषालक**, आंबा.
**मृषोद्य**, खोटें बोलणारा.
**मृष्ट**, स्वच्छकेलेला १ धावित २ मार्जन ३
**मृष्टि**, स्पर्श १ मृष्टशब्दपाहा २
**मृष्टेरुक**, मिष्टान्नभक्षक.
**मृक्षण**, दुधावरची साय १ तेल २

**मेक**, बोकड.
**मेकलकन्या**, नर्मदानदी.
**मेखला**, पिठवण १ लहानडोंगर २ कटिभूषण ३
**मेखलापद**, कंबर.
**मेघ**, नागरमोथा १ तांदुळजा २ भद्रमोथ ३ वर्षाऋतु ४ मेघ ५ असुर ६
**मेघकफ**, गार.
**मेघकाल**, वर्षाऋतु.
**मेघचिंतक**, चातकपक्षी.
**मेघज**, मोठें मोतीं.
**मेघजीवक**, चातक.
**मेघजीवन**, चापपक्षी १ ताड २ चातकपक्षी ३
**मेघज्योतिस्**, } विद्युल्लता.
**मेघदीप**, }
**मेघद्वार**, आकाश.
**मेघनाद**, तांदुळजा १ मोर २ पळस ३ वरुण ४
**मेघनादानुलासिन्**, मोर.
**मेघनामन्**, तांदुळजा १ नागरमोथा २
**मेघनिर्घोष**, मेघगर्जना.
**मेघनीलक**, लघुतालीसपत्र.
**मेघपुष्प**, मोथ १ पिंडाभ्र २ पाणी ३ शृंगिका ४ जळवेत ५ थोरवेत ६ गार ७
**मेघप्रसव**, पाणी.
**मेघभाति**, वीज.
**मेघमोदिनी**, जांबूळ.
**मेघयोनि**, धूम्र.
**मेघरव**, मोर १ मेघगर्जना २
**मेघवर्णा**, भुईजांबूळ १ नदीजांबूळ २
**मेघवर्त्मन्**, आकाश.
**मेघवाहन**, शिव १ इंद्र २
**मेघसार**, चिनीकापुर.
**मेघसु[illegible]**, मोर.
**मेघस्कंद**, शरभ.
**मेघस्तनितसंभवा**, **मेघस्तनितोद्भव**, हांशावृक्ष.
**मेघाख्य**, नागरमोथ १ भद्रमोथ २
**मेघागम**, पर्जन्यकाळ.
**मेघागमप्रिय**, धारापकदंब.
**मेघांत**, शरदृतु.
**मेघानंद**, मोर १ बगळा २
**मेघानंदिन्**, बगळा १ मोर २
**मेघाभा**, भुईजांबूळ.
**मेघास्थि**, मेघकफशब्दपाहा.
**मेघाह्व**, अभ्रक १ वाळा २
**मेचक**, मोखावृक्ष १ पांढरीसाळ २ काळा सुरमा ३ मेघ ४ धूर ५ आंधार ६ नीलवर्ण ७ संचळ ८ बिडलोण ९ साळईचा डींक १० मोराचे पिसावरचे डोळे ११
**मेचकवर्ण**, काळेरंगांत तांबडा व पिवळा रंग मिळवून रंग होतो तो.
**मेचका**, तांनाचावेल १ गानकापक्षी २
**मेचकांजन**, काळा सुरमा.
**मेचकापगा**, यमुनानदी.
**मेटुला**, वृक्षविशेष.
**मेठ**, मेंढा १ हत्तीचा पाळन कर्ता.
**मेंठ**, ढ, मेठशब्दपाहा.
**मेंढ**, मेंढा १ तोनानकाई २.
**मेढिका**, लघुमेढशिंगी.
**मेढ़**, दुमा एडका १ लिंग २ शिश्न ३
**मेढ़वल्ली**, लघुमेढशिंगी.
**मेढ़शृंगी**, मेढशिंगी.
**मेतुल**, अंजीर.
**मेथि**, मेथी.
**मेथिका**, मेथी.
**मेथिनी**, मेथी.
**मेथी**, मेथी.
**मेद**, गंधीहिवर १ मेदधातु २ मांसल ३
**मेदक**, कादंबरीचे तळचा जाडा भाग मद्य वि० २
**मेदधातु**, मेद १ चीक २

मेदज, भूमिजगुगुळ.
मेदपुच्छ, दुमा एडका.
मेदभव, मेद.
मेदस्, मांसजन्यस्नेह.
मेदसमुद्भव, हाडें.
मेदस्समुद्भवा, वसा.
मेदस्समुद्भूता, मेद.
मेदसार, मेदा.
मेदस्कृत्, मांस.
मेदा, मेदा.
मेदिनी, थोरशिवण १ भूमि २ मेदा ३ एकसंख्या ४
मेदिनीद्रव, धूळ.
मेदुर, साळईचा डीक १ स्निग्ध २ मृदु ३
मेदुरा, काकोली.
मेदोगंड, गलरोग.
मेदोगला, मदमाल्य १ लाजाळूचा मेद २
मेदोग्रंथि, अंगावर आलेला ग्रंथि ज्यास बाळूक म्हणतात तो.
मेदोज, हाडें.
मेदोद्भवा, भाता, मेदा.
मेदोरोग, मेदोरोग.
मेदोरोहिणी, गलरोग.
मेदोर्बुद, ओष्ठरोग.
मेदोवह, शरीरांतर्गतजलवाहिनी नाडी.
मेदोवृद्धि, अंडवृद्धि १ शरीरस्थौल्य २
मेध, लाकूड १ यज्ञ २
मेधा, माळवी १ रोहिणी २ ज्ञान ३
मेधाकरी, शंखपुष्पी.
मेधाकृत्, कुरडु १ ब्राह्मी २
मेधाजनन, काळे शिरस.
मेधायु: स्मृतिदायिनी, ब्राह्मी.
मेधारुद्र, कालिदासकवि.
मेधावती, थोरमालकांगोणी.
मेधाविन्, मद्य १ पोपट २ पंडित ३ साळुंखी ४
मेधाविनी, साळोंखी.

मेंधिका, मेंहदी चावृक्ष.
मेधिर, पंडित.
मेंधी, मेंधिकाशब्दपाहा.
मेध्य, बोकड १ खैर २ जव ३ पवित्र ४
मेध्या, गोरोचन १ शंखपुष्पी २ विष्णुकांता ३ मुनि ४ श्वेतवेखंड ५ ब्राह्मी ६ श्वेतकेवडा ७ थोरशमी ८ लघुमालकांगोणी ९ शेली १० थोरमालकांगोणी ११ हर्तकी १२ वेखंड १३
मेनाद, मांजर १ बोकड २ मोर ३
मेय, मोजण्यास जें योग्य तें.
मेरु, पर्वत वि०
मेरुक, ऊद.
मेरुपादज, रुपें.
मेरुयंत्र, चाती.
मेल, क. समूह.
मेलकलवण, मृत्तिकालवण.
मेला, काळासुरमा १ शाई २
मेलानंद, )
मेलांधु, ) दौत.
मेलांबु, )
मेष, क, मेढा १ दुमा एडका २ जीवशाक ३ मेषराशि ४ औषधिद्रव्य ५
मेषकुसुम, टाकळा.
मेषपुष्पा, लघुमेढाशिंगी.
मेषलोचन, टाकळा.
मेषवल्ली, मेढाशिंगी.
मेषविषाणिका, मेढाशिंगी.
मेषशृंगी, मेढाशिंगी १ लघुमेढाशिंगी २
मेषा, लघुएलची.
मेषांड, इंद्र.
मेषांत्री, बोकडी १ पुंगळी २
मेषालु, बर्बरवनस्पति.
मेषाक्षय, टाकळा.
मेषाक्षिकुसुम, टाकळा.
मेषिका, मेढी.
मेषी, जटामांसी १ मेंढी २

**मेह**, अंजीर १ प्रमेह २ परमें ३ मेंढा ४ मूत्र ५
**मेहन**, शिश्न १ मुतणें २ मूत्र ३
**मेहनाग्निनी**, श्वेतगोकर्णी.
**मैत्र**, ब्राह्मण १ गुद २ अनुराधानक्षत्र ३ स्नेह ४
**मैत्री**, स्नेह १ आनुराधानक्षत्र.
**मैथुन**, मैथुन १ संघट्टन २ विवाह ३
**मैरेय**, आसव व सुरा एका पात्रांत घालून काढावें जें मद्य तें १ मद्य २ धान्यासव३ ऐक्षवमद्य ४
**मैला**, लघुनीळी १ थोरनीळी २
**मोघ**, निष्फळ १ त्यक्त २
**मोघपुष्पा**, वंध्या स्त्री.
**मोघा**, वावडिंग.
**मोच**, क, मोखावृक्ष १ शेगवा २ काळा शेगवा ३ मोचरस ४ केळें ५
**मोचनिर्यास**, मोचरस.
**मोचरस**, मोचरस.
**मोचस्राव**, स्राव, मोचरस.
**मोचस्रावी**, मोचरस.
**मोचा**, केळ १ साळईचा वृक्ष २ शेगवा ३ लघुनीळी ४ मोदा ५ सांवरी ६
**मोचाट**, चंदन १ केळें २ केळीचा गाभा३
**मोचास्राव**, मोचरस.
**मोचिका**, मत्स्यभेद.
**मोचिनी**, रिंगणी.
**मोचिलिंदा**, रांजणीचा भेद.
**मोटन**, वायु १ घर्षण २
**मोटा**, लघुचिकणा १ जयंती २ चुका ३
**मोण**, नक्रमक्षिका १ शुष्कफळ २
**मोथ**, नागरमोथ.
**मोद**, आंबा १ आनंद २ सुवास ३
**मोदक**, लाडु १ यवासशर्करा २
**मोदकी**, जिंगणी १ मोगरा २
**मोदनी**, श्वेतजुई १ बटमोगरा २
**मोदा**, अजमोद.
**मोदाख्य**, आंबा.
**मोदाढ्या**, अजमोद.
**मोदित**, आनंद १ हर्षित २
**मोदिनी**, अजमोद १ वेलमोगरी २ लघुश्वेतजुई ३ कस्तुरी ४
**मोरट**, क, शेण्यावेर १ उसांचें मूळ २ सातां दिवसांचे व्यालेले गायीचें दूध ३ नासलेलें दूध ४ जेष्ठजट ५
**मोरटा**, मोरवेल.
**मोरण**, नासलेलें दूध १ कोंवळें दूध २ चीक ३ कूर्चिका पिंड ४
**मोर्व**, मोरवेल.
**मोषक**, चोर.
**मोषयित्नु**, कोकिळ १ ब्राह्मण २
**मोह**, मूर्छा १ सन्निपात २ पीडा ३
**मोहकारिन्**, भेर्लीमाड.
**मोहदृष्टि**, मुसर.
**मोहन**, श्वेतधोत्रा १ काळा मोखावृक्ष २ मैथुन ३ चित्तभ्रम ४
**मोहनवल्ली**, मोहनवेल.
**मोहना**, त्रिपुरमालिनी वनस्पति.
**मोहिनी**, वटपत्री पाषाणभेद १ भांग २ मद्य ३ थोरमयाळ ४ राजगिरा ५ त्रिपुरा वनस्पति ६
**मोक्ष**, मोखावृक्ष १ मृत्यु २ मुक्तता ३
**मोक्षक**, मोखावृक्ष.
**मौकुलिन्**, डोमकावळा.
**मौक्तिक**, मोती १ साळी, भात २
**मौक्तिकतंदुल**, श्वेतजोंधळे.
**मौक्तिकप्रसवा**, मोत्याची शिंप.
**मौक्तिकमंदिर**, मोत्याची शिंप.
**मौक्तिकशुक्ति**, मोत्याची शिंप.
**मौक्तिकसंभव**, श्वेतसुरमा.
**मौक्तिकस्थान**, शिंप १ डुकर २ सर्प ३ शंख ४ मत्स्य ५ बेडूक ६ वेळू ७ हत्ती ८
**मौग्धिक**, पिंपरी.

**मौंजीतृण**, मोळ.
**मौंजपित्र**, मोळ.
**मौहिका**, लघुश्वेतपाडळ.
**मौद्गलि**, डोमकावळा.
**मौद्गीन**, मूग पिकतात ती भूमि.
**मौन**, अभाषण.
**मौरजिक**, वाजंत्री
**मौर्वी**, धनुष्याची दोरी.
**मौलि**, मस्तक १ केशपाश २
**मौलिभूषण**, पागोटें.
**मौली**, पृथ्वी १ एकसंख्या २
**मौषिक**, मूषक संबंधि.
**मौसली**, काळी मुसळी.
**मौहूर्त**, जोशी.
**मौहूर्तिक**, जोतिषी.
**मंकिल**, दावाग्नि.
**मंकुर**, आदर्श.
**मंकोल**, क, खड्.
**मंख**, गोसावी.
**मंगल**, कल्याण १ मंगलग्रह २ शुभदायक ३ प्राप्तद्रव्यसंरक्षण ४
**मंगलच्छदा**, **मंगलच्छाय**, लघुपिंपरी.
**मंगलपाठक**, बंदीजन.
**मंगलप्रदा**, थोरशमी १ हळद २
**मंगलस्वन**, शंख.
**मंगला**, नीलदूर्वा १ हळद २ त्रायमाण ३ वृद्धि ४ ऋद्धि ५ पार्वती ६
**मंगलागरु**, मंगलागरु.
**मंगलाचरण**, मंगलदायककर्म.
**मंगल्य**, शेंदूर १ पिंपळ २ त्रायमाण ३ बिल्व ४ नारळी ५ चंदन ६ रिठा ७ जलमोहा ८ सोनें ९ आंबट दहीं १० कवीठ ११ जीवक १२ मसुरा १३ मंगलस्तपत्र १४ सुंदर १५ पवित्र १६
**मंगल्यक**, मसुरा.
**मंगल्यकुसुमा**, शंखपुष्पी.
**मंगल्यनामधेया**, वनस्पतिविशेष.
**मंगल्यपुष्पी**, शंखपुष्पी.
**मंगल्या**, वेखंड १ गोरोचन २ थोरशमी ३ अगरुचंदन ४ बडिशोप ५ सुगंधरोहिसगवत ६ त्रायमाण ७ चिडादेवदार ८ हळद ९ ऋद्धि १० गोजिव्हावनस्पति ११ रोचनावनस्पति १२ वृद्धि १३ पांढरें वेखंड १४ रानउडीद १५ गव्हला १६ लघुहरणदोडी १७ तांबडी शंखपुष्पी १८ मसुरा १९ मल्लिकापुष्प २०
**मंगल्यागरु**, मंगलागरु.
**मंगिनी**, नौका.
**मंगुर**, मंगुरीमत्स्य.
**मंच**, क, पलंग.
**मंचकपत्री**, सुरपत्री.
**मंचकस्थायिन्**, मंचकाश्रय, ढेंकूण.
**मंचपत्री**, सुरपत्री.
**मंचमंडप**, लग्नादिकार्यास मंडप घालितात तो.
**मंचमूल**, वृद्धार्त्री.
**मंजर**, मोती १ मंजुरी २ तिलकवनस्पति ३
**मंजरी**, वेल १ तुळसी २ अशोक ३ मंजरशब्दपहा ४झाडाचा मोहोर ५
**मंजरीक**, कागळा.
**मंजा**, मोहोर १ शेळी २
**मंजि**, मंजरी.
**मंजिका**, वेश्या.
**मंजिफला**, केळ.
**मंजिमन्**, न० कांति.
**मंजिष्ठ**, मंजिष्ठा १ मंजीठ हिं० रनास का० रुबेटिंक्स ल० मादरहट् इं०
**मंजिष्ठमेह**, प्रमेहरोग.
**मंजिष्ठा**, मंजिष्ठ.
**मंजीर**, क, पादभूषण.
**मंजील**, नपुं १ रजकग्राम २
**मंजु**, मंजुळ १ सुंदर २
**मंजुगमना**, हंसी.
**मंजुघोष**, कबूतर १ होलापक्षी २
**मंजुघोषा**, अप्सराविशे०

**मंजुनाशी,** पार्वती १ इंद्राणी २ अतिसुंदरस्त्री ३
**मंजुपाठक,** पोपट.
**मंजुप्राण,** ब्रह्मदेव.
**मंजुमणि,** पुष्करराज.
**मंजुल,** तित्तिरपक्षी १ हरिणवि०२ मंजुळ३ सुंदर ४ शेवाळ ५ पाण्याचा पाट ६ निकुंज ७
**मंजुला,** मंजिष्ठ १ अंजीर २
**मंजुषा,** मंजिष्ठ १ पेटी २
**मंडूर,** लोहकीट १ मंडूररसायण २
**मंड,** गाळ १ एरंड २ बेडूक ३ पेज ४ दह्यावरची निवळ ५ अलंकार ६ मस्तक ७ तांदुळांत चवदापट पाणी घालून कढवून जो सिक्थरहित करावा तो ८
**मंडक,** मांडा १ मोठी पांढरी जाई २
**मंडन,** मधुमाधवी १ अलंकार २
**मंडप,** मधुमाधवी १ मांडव २
**मंडपवल्ल,** लघुघेवडा.
**मंडपारोह,** राजाळुं.
**मंडापिन्,** लघुघेवडा १ गोडपडवळी २ लघुमायफळ ३
**मंडमल्ल,** मल्लिनाग मृगवि०
**मंडयंत,** अलंकार.
**मंडयंती,** पत्नी.
**मंडरी,** भ्रमर.
**मंडल, क,** कुतरें १ कुष्ठरोग २ चंद्र व सूर्य यांचें बिंब३ गोळा ४ चक्र ५ शीतपित्त ६ नक्षत्र ७ आदर्श ८ उर्दर्द ९ कोठ १० रोग ११ अट्टेताळीस दिवसांचें १२ सर्पवि० १३ लाडू १४ चक्रव्यूह १५ मनुष्यादिकांचा समुदाय १६ धनुर्धरस्थिति १७
**मंडलच्छदा,** पांढरा पुनर्नवा.
**मंडलपत्रिका,** काळा शिसव १ तांबडा पुनर्नवा २
**मंडलशुक्कुभाक्,** अनारसे.
**मंडला,** कोरफड १ दूर्वा २
**मंडलाग्र,** तलवार.
**मंडलिन्,** गुळवेल १ वड २ काळी सरडा३ खोकड ४ मांजर ५ सर्पवि० ६ कुत्रा ७ सूर्य ८
**मंडहारक,** कलाल.
**मंडा,** मद्य १ आंवळी २
**मंडित,** अलंकृत.
**मंडुक,** खड्गमुष्टि.
**मंडूक,** बेडूक १ पुंडरीकवृक्ष २ दिंडा ३ ऋषि ४
**मंडूकपर्ण,** पिवळा टेंटू १ दिंडा २
**मंडूकपर्णी,** मंजिष्ठ १ सूर्यफूलवल्ली २ आदित्यकांता ३ ब्राह्मी ४ शालिपर्णी ५ अळें ६ कडुहल ७ टेंटू ८
**मंडूकमाता,** ब्राह्मी.
**मंडूका,** मंजिष्ठ.
**मंडूकी,** ब्राह्मी १ सूर्यफूलवल्ली २ भेकपर्णी३ बेडकी ४ जारिणी स्त्री ५
**मंडूर,** मंडूर रसायन १ लोहकीट २
**मंडोदक,** चित्रविचित्ररंग १ उत्साहादिवशीं भूमि किंवा भिंती रंगाविणें २
**मंत,** अपराध १ राजा २ मनुष्य ३ ज्ञान ४
**मंतु,** उपदेशकर्ता १ तपस्वी २
**मंत्र,** एकांतविचार १ देवतादिसाधनमंत्र २
**मंत्रगंडक,** बुद्धि.
**मंत्रजिव्ह,** अग्नि.
**मंत्रण, णा,** उपदेशकरणें.
**मंत्रदीधिति,** अग्नि.
**मंत्रपूतात्मन्,** गरुड.
**मंथ,** सातु, तूप, डाळिंब, गूळ, एकत्रकरून मर्दन करावें तो १ सातु, तूप, थंडपाणी, हे तीन पदार्थ एकत्र करावे तो २ साकर, द्राक्ष, उसांचा रस, हे तीन पदार्थ एकत्र करावे तो ३ मंथनदंड ४ सूर्य ५ नेत्ररोग, मर्दन ७ नेत्रविष्ठा ८ घुसळणें ९ कंपन १०

**मंथज**, लोणी.
**मंथन**, लघुऐरण १ नरवेल २ घुसळणें ३
**मंथनी**, दहिं घुसळण्याचें पात्र.
**मंथनोद्भव**, लोणी.
**मंथर**, लोणी १ हरिण २ मंथनदंड ३ वैशाखमास ४ कुसुंबा ५ क्रोध ६ दुर्ग ७ जडबुद्धि ८ मंदगामी ९ फळ १० प्रतिबंध ११ वक्र १२ मंदराचल १३
**मंथरु**, चवरीचा किंवा मनुष्याचा अंगाचा वारा लागतो तो.
**मंथसार**, लोणी.
**मंथा**, मेथी.
**मंथान**, थोरबाहावा १ रविमाथ्या २
**मंथानक**, मुरगें गवत.
**मंथोदधि**, क्षीरसमुद्र.
**मंथ्य**, सातु.
**मंद**, रोगी १ मंदमति २ मंदगामी ३ यम ४ शनि ५ हर्ता ६ कल्पांत ७
**मंदकांत**, कांतिहीन.
**मंदगंध**, सातवीण.
**मंदगंधा**, जवस १ मद्य २
**मंदगमना**, म्हैस.
**मंदट**, निंबतरु कल्पवृक्ष.
**मंदता**, आळस.
**मंदन**, स्तुति.
**मंदबुद्धि**, कफरोग १ मतिमंद २
**मंदर**, मंदराचल १ स्वर्गतरुवि० २ स्वर्गलोक ३ आदर्श ४ मुक्तासर ५ मूर्ख ६
**मंदरान्थ**, शिलाजित.
**मंदसान**, अग्नि.
**मंदा**, करंजवल्ली.
**मंदाक**, प्रशंसा १
**मंदाकिनी**, भागीरथी.
**मंदाग्नि**, जठराग्निमांद्य.
**मंदार**, कल्पवृक्ष १ कडुनिंब २ पांगारा ३ रुई ४
**मंदारफलिका**, काळा उंबर.
**मंदारु** धायटीचें फूल.
**मंदालक**, खडी.
**मंदास्य**, } लज्जा.
**मंदाक्ष**, }
**मंदिकुकुर**, मत्स्यविशेष.
**मंदिर**, घर १ देवालय २ नगर ३ सागर ४ गुडघ्याचा मागचा भाग ५ गंधर्वविशेष ६
**मंदिरपशु**, मांजर.
**मंदिरा**, अश्वशाला.
**मंदुरा**, वाजिशाळा १ चटई २
**मंदुराभूषण**, वानर निळ.
**मंदोष्ण**, कोमट.
**मंद्र**, मध्यमहर्ता १ गंभीरशब्द २ वाद्यवि० ३
**मंद्रपुष्प**, जासवंद.
**मंक्षग**, जंघात्राण.
**मंक्षु**, अ० शीघ्र १ अतिशय या अर्थी २
**म्रक्ष**, चौर्य.
**म्रक्षण**, मंक्षणशब्दपाहा १ तैलादिलेपन २
**म्लान**, रोगी १ श्रांत २ मलीन ३ कोमलेलें पुष्प ४
**म्लाना**, विटाळशी स्त्री.
**म्लुक्त**, मिश्रित.
**म्लेच्छ**, हिंगूळ १ तांबें २ यवन ३ अस्पष्ट व अपशब्द भाषण ४
**म्लेच्छकंद**, श्वेतलसूण.
**म्लेच्छदारुक**, चोपचिनी.
**म्लेच्छप्राना**, सब्जा.
**म्लेच्छभोजन**, गहूं.
**म्लेच्छमुख**, तांबें.
**म्लेच्छाश**, गहूं.
**म्लेच्छास्य**, तांबें.
**म्लेच्छित**, यवनीभाषा १ विरुद्धभाषण २

## य

**य**, यव १ वायु २ तेज ३ कीर्ति ४ यम ५ त्याग ६ संयोग ७ गमनशील ८
**यकृत**, काळजाजवळ उजवेकडे पोटांत रोग होतो तें.

**यकृदात्मिका**, झुरळ.
**यकृद्वैरी**, रक्तरोहिडा.
**यजत्**, यागकरणारा.
**यजंत**, यजत्शब्दपाहा.
**यजन**, यागकरणें.
**यजा**, काळीतुळस.
**यज्वनांपति**, चंद्र १ एकसंख्या २
**यतन**, प्रयत्न.
**यति**, अगस्ता १ संन्यासी २ उपरति ३ ४
**यतिन्**, संन्यासी.
**यतुका**, चाकवत.
**यथार्थ** सत्य.
**यथास्व**, यथायोग्य.
**यथेष्टचारिन्**, पक्षी.
**यदा**, अ० जेव्हांह्याअर्थी.
**यदि**, अ० जरयाअर्थी.
**यदृच्छा**, स्वतंत्रता.
**यम**, उंट १ कृतांत २ व्रत ३ प्रायश्चित्त ४ कावळा ५ आनंद ६ यमल ७ इंद्रियनिग्रह ८
**यमकालिंदी**, सूर्यस्त्री.
**यमकीट**, गांडवळ.
**यमदूनक**, कावळा.
**यमद्रुम**, सांवरी.
**यमप्रिय**, वटवृक्ष.
**यमरथ**, टोणगा.
**यमलच्छद**, कोरल १ कांचन २ आपटा ३
**यमलपत्रक**, कांचन १ आपटा २
**यमला**, उचकी.
**यमवाहन**, टोणगा.
**यमानी**, ओंवा.
**यमुना**, नदीवि०
**यमरुका**, घड्याळें व घंटा इ०
**ययीः**, मार्ग १ शिव २
**ययु**, अश्वमेधासयोग्य जो घोडा तो.
**यव**, इंद्रजव १ जव २ वेग ३
**यवक**, थोरगहूं १ साठेसाळीचे तांदूळ २ जवधान्य ३
**यवकंटक**, पित्तपापडा.
**यवकलश**, इंद्रजव १ रिंगणी २
**यवगोधूमसंभव**, कांजी.
**यवगंधाढ्यसाळी**, जाडेभात.
**यवचित्रा**, पिसोळा.
**यवज**, जवखार १ गहूं २ ओंवा ३ तवखीर ४
**यवतिक्ता**, शंखाहुली.
**यवन**, जातिवि० म्लेच्छ १ वेग २ जवर्गील अश्व ३
**यवनक**, थोरगहूं.
**यवनदेशज**, शिळारस.
**यवनप्रिय**, मिरीं.
**यवनाल**, जोंधळा १ जवधान्याचें तृण २
**यवनालज**, जवखार.
**यवनेष्ट**, मिरीं १ तांबडा कांदा २ वाटोळा तांबडा मुळा ३ खजूरीसिंदी ४ खजूर ५ तालीसपत्र ६ कडुनिंब ७ सिसें ८ तांबडी लसूण ९ पांढरी लसूण १० पांढरा कांदा ११
**यवनेष्टा**, मेंदी.
**यवपिष्ट**, जवाचें पीठ.
**यवप्रख्या**, क्षुद्ररोग.
**यवफल**, ला, वेळूचें बीं १ भरीववेळू २ कांदा ३ इंद्रजव ४ पांढराकुडा ५ वेळूचे कोंम ६
**यवलास**, जवखार.
**यवशर्करा**, तवराजसाकर.
**यवशाक**, गोडचाकवत १ कालशाक २ चिलाचाभेद ३
**यवशूक**, जं, जवखार.
**यवस्वेना**, तवराजसाकर.
**यवस**, गवत.
**यवसा**, ह्वा, ओंवा.
**यवसाह्वया**, ओंवा १ खुरासनी ओंवा २
**यवसुरा**, जवांचें मद्य.
**यवसौवीर**, जवांचें कांजी.

**यवक्षार**, जवखार.
**यवक्षोद**, जवांचें पीठ.
**यवागू**, घनसिक्था स्त्री० पातळभात. तांदुळांचे साहापट पाणी घालून करावा तो.
**यवाग्रज**, जवखार १ ओंवा २ कांजी ३
**यवान, क**, ओंवा.
**यवानिका**, ओंवा १ अजमोद २ खुरासनीओंवा ३
**यवानी**, ओंवा १ अजमोद २ किरमाणीओंवा ३
**यवापत्य**, जवखार.
**यवाम्लज**, यवसौवीर.
**यवाव्ह**, जवखार १ ओंवा २
**यवाव्हा**, जवखार १ धमासा २ ओंवा ३
**यवास, क**, धमासा १ रक्तधमासा २
**यवासकाथसंभूत**, तवराजसाकर.
**यवासा**, धमासा.
**यवोत्थ**, कांजी १ यवसौवीर २
**यवोद्भूता**, यवशर्करा.
**यव्य**, जेथें जव पिकतात ती भूमि १ शिजविलेले जव २ महिना ३
**यशस्**, कीर्ति १ कांति २ स्तुति ३
**यशस्करी**, मोठी व लघु हरणवेली १ शंखिनी २
**यशस्या**, ऋद्धि १ लघुहरणदोडी २
**यशस्विनी**, ऋद्धि १ शंखिनी २
**यशोद**, पारा.
**यष्टि**, जेष्ठीमध १ बाहु २ कोंपर व मनगट यांचा मध्यभाग ३ भारंग ४ काठी ५ कंठभूषण ६ लता ७ मोत्यांदिकांचासर ८
**यष्टिक**, टिटवी.
**यष्टिका**, जेष्ठीमध १ एकासराची माळा २ तळाव ३
**यष्टिपुष्प**, पुत्रजीववृक्ष.
**यष्टिमधु, क**, जेष्ठीमध.
**यष्टी**, ज्येष्ठीमध.
**यष्टीमधु**, ज्येष्टीमध.
**यष्टीलता**, भोंवरी.
**यष्ट्याव्ह**, जेष्ठीमध.
**यक्ष**, कुबेर १ इंद्रस्थान २ देवयोनिवि० ३
**यक्षकर्दम**, कापूर १ अगरु २ कंकोळ ३ कस्तूरी ४ केशर ५ अगरु ६ कस्तुरी ७ चंदन ८ कापूर ९
**यक्षतरु**, वड.
**यक्षधूप**, राळ १ थोरराळेचावृक्ष २
**यक्षवास**, वड.
**यक्षहस्त**, पांढराएरंड.
**यक्षामलक**, खजुरीचा जातीचा एक वृक्ष.
**यक्षावास**, वड.
**यक्षेक्षण**, कुबेराक्ष १ सागरगोटा २
**यक्ष्मन्**, क्षयरोग १ रोग २
**यक्ष्मघ्नी**, मनुका.
**यज**, ऋतु.
**यज्ञनेतृ**, मोठी सोमवल्ली.
**यज्ञपशु**, घोडा.
**यज्ञपादप**, बेहेकळ.
**यज्ञभूषण**, श्वेतदर्भ.
**यज्ञयोग्य**, उंबर.
**यज्ञलिंग**, विष्णु.
**यज्ञवल्ली**, मोठी सोमवल्ली.
**यज्ञवृक्ष**, बेहेकळ १ नंदीवड २
**यज्ञश्रेष्ठा**, मोठी सोमवल्ली.
**यज्ञसंस्तर**, श्वेतदर्भ.
**यज्ञसाधनी**, सोमवल्ली.
**यज्ञसार**, उंबर.
**यज्ञसूत्र**, जानवें.
**यज्ञस्थान**, यज्ञभूमि.
**यज्ञत्राता**, मोठी सोमवल्ली.
**यज्ञांग**, उंबर १ खैर २
**यज्ञांगा**, मोठी सोमवल्ली.
**यज्ञिक**, पळस.
**यज्ञिय**, उंबर १ द्वापारयुग २
**यज्ञोडुंबर**, उंबरवृक्ष.
**यज्ञोपवीत**, यज्ञसूत्रशब्दपाहा.

**यज्ञोपवीतिन्**, ब्राह्मण १ क्षत्रिय २ वैश्य ३
**या**, स्त्रीची योनि १ गमन २ रथ ३ प्राप्ति ४
**याग**, क्रतु.
**याचना**, याञ्चा.
**याज**, शिजविलेलें अन्न.
**याजक**, मनहत्ती १ ऋत्विज २
**यातुष**, तैत्तिरपक्षी.
**यातना**, तीव्रवेदना.
**यातयाम**, वृद्धपुरुष १ गतरस २
**यातु**, समय १ राक्षस २ पथिक ३
**यातुका**, मयूरशिखा.
**यातुघ्न**, महागुगुळ.
**यादस्**, जलजंतु.
**यादोनाथ**, समुद्र.
**यादोनिवासस्**, पाणी.
**यान**, वाहन १ प्रयाण २
**याप्ना**, केशांना चिकटी येते ती.
**याप्य**, दुःसाध्य.
**याम**, टोणगा १ प्रहर २ उपरति ३
**यामघोष**, कोंबडा.
**यामनादिन**, कोंबडें.
**यामवती**, रात्री.
**यामि**, भगिनी १ रात्र २ दक्षिणदिशा ३ सद्गुणी स्त्री ४ स्नुषा ५ कन्या ६
**यामिका**, रात्री.
**यामिनी**, रात्री.
**यामिनीचर**, गुगुळ १ घुबड २
**यामिनीपति**, चंद्र.
**यामीर**, चंद्र.
**यामीरा**, रात्री,
**यामुन**, काळा सुरमा.
**यामुनेय**, काळा सुरमा १ तांबडा सुरमा २
**यामुनेष्टक**, शिसें.
**याम्य**, चंदन.
**याम्यादिग्भवा**, तमालपत्री.
**याम्यद्रुम**, सांवरी.
**याम्या**, यामिका शब्द पाहा.
**याम्योद्भूत**, श्रीताड.
**याव**, लाख.
**यावक**, शिजविलेले जव १ लाख २ उडीद ३ कुलित्थ ४ सडीक तांदूळ ५
**यावन**, शिळारस १ धूप २
**यावनक**, तांबडा एरंड.
**यावनकल्क**, शिळारस.
**यावनाल**, जोंधळे १ रामबाणभेद जोंधळी २
**यावनालनिभा**, रामबाणभेदजोंधळी.
**यावनालसमसंभव**, गूळ.
**यावनालादिचूर्ण**, पीठ.
**यावनाली**, जोंधळीसाकर.
**यावनी**, रसाळकुंभ.
**यावनीय**, किरमाणीओंवा.
**यावशूक**, जवखार.
**यावस**, तृणसमूह.
**यावि**, शंखिनी.
**याव्य**, जवखार.
**यास**, धमासा १ तांबडा धमासा.
**यासक**, तांबडाधमासा.
**यासशर्करा**, यवासशर्करा.
**याज्ञवल्क्य**, ऋषिवि०
**याज्ञिक**, तांबडा खैर १ पिंपळ २ पळस ३ लांबपानाचा दर्भ ४
**याज्ञिक्य**, यज्ञकर्म.
**याज्ञिय**, ज्ञीय, वेहकळ १ उंबर २
**याज्ञियपत्रक**, पांढरा दर्भ.
**याज्ञेय**, श्वेतदर्भ.
**युक्तरसा**, रासना.
**युग**, ऋद्धि १ कृतादियुग २ युग्म ३ औषध ४
**युगंधर**, जोंधळे १ पर्वतवि० २
**युगपत्रक**, आपटा १ कोरल २ कांचनवृक्ष ३ टेंटू ४
**युगपत्रिका**, शिरसवृक्ष.
**युगल**, युग्म.
**युगलाक्ष**, नाभूळ

**युग्वल**, रोहिसगवत.
**युग्म**, द्वय.
**युग्मकंटका**, घोंटिबोर.
**युग्मपत्र**, कोरळ १ आपटा २ भूर्जपत्र ३ तांबडा कांचन ४ सातवीण ५
**युग्मपत्रिका**, शिरसवृक्ष.
**युग्मपर्ण**, सातवीण.
**युग्मफला**, उतरणी १ लघुमेढशिंगी २
**युग्या**, ऋद्धि १ वृद्धि २
**युज्**, युग्म १ पांचहात व पांचमुठी लांब प्रमाण २
**युनक**, शूर्पाग्र १ क्षमा २ पदर ३ अहेरकरतात तो ४
**युद्धसार**, अश्व.
**युध्म**, बाण १ धनुष्य २ शूर ३
**युयु**, घोडा.
**युयुक्षवर**, तरस.
**युवगंडादि**, अवगंड.
**युवती**, पिंवळी जुई १ स्त्री २ प्रौढकुमारिका ३
**युवतीष्टा**, पिंवळी जुई.
**युवन्**, सोळा वर्षांपासून तीस वर्षांपर्यंत पुरुष.
**यू**, मुगादिद्विदलधान्य शिजवून पाणी काढावें तीं.
**यूका**, उवा १ काळा उवर २
**यूकांड**, लिखा.
**यूकारी**, कळलावी.
**यूथ**, सजातीयसमुदाय.
**यूथनाथ**, हस्तिराज.
**यूथप**, कुरुडु १ देवकुरुडु २ श्रेष्ठहत्ती ३
**यूथपति**, हस्तिराज.
**यूथा**, पहाडमूळ.
**यूथिका**, पिंवळी जुई १ लघुश्वेतजुई २ मखमाल ३
**यूथिकापत्र**, थोरतालीसपत्र.
**यूथी**, पांढरी लहानजुई १ पिंवळी जुई २ नीलपुष्पी ३
**यूप**, क, पारसपिंपळ १ भेंडीवृक्ष २ स्तंभ ३
**यूपकुरंग**, शिरिकारी.
**यूपद्रु**, म, तांबडा खैर.
**यूपलक्ष्य**, पक्षी.
**यूष**, मुद्गरस १ मांसरस २ द्विदल धान्याच्या अष्टादशगुण पाणी घालून कढवून चतुर्थांश करावा तो ३
१ कृताख्ययूष ह्म० लवणस्नेह कट्वादि पदार्थेंकरून सिद्ध करावा तो. गुरु ॥
१ अकृताख्य यूष ह्म० लवणादिकांवांचून करावा तो. लघु ॥
षट्कटु अम्ल स्नेह इत्यादि घालून करावा तो.
**योग**, ध्यान १ उपाय २ संगति ३ द्रव्य ४ औषध ५ कपट ६ तर्कशास्त्री ७ वाहन ८ विष्कंभादियोगवि० ९ देह १०
**योगचर**, हनुमान्.
**योगज**, कृष्णागरु १ काष्ठागरु २
**योगनाविक**, मत्स्य वि०
**योगवाहिन**, सर्जाखार १ मधु २ वचनागादिक संस्कार विशेषेंकरून जाजा अनुपानाशीं योजिलें असतां अनुपानाचे गुण वाढवून अमृततुल्य होतात तें.
**योगवाही**, सर्जाखार १ मधु २ पारा ३ आर ४
**योगसारक**, नारिंग.
**योगिदंड**, थोरवेत.
**योगिरंग**, नारिंग.
**योगेश्वरी**, वांझकटोली १ नागदवणी २
**योगेष्ट**, शिसें.
**योग्य**, ऋद्धि १ वृद्धि २ वाहन ३ चंदन ४ चतुर ५ पक्कान्न ६
**योग्या**, गोरोचन १ वृद्धि २ ऋद्धि ३ औषधक्रिया ४
**योजन**, चार कोस प्रमाण.
**योजनगंधा**, मुंग्या.
**योजनपर्णी**, मंजिष्ठा.
**योजनवल्लिका**, स्त्री, मांजिष्ठ.

योनु, पवित्र १ परिमाण २
योनल, जोंधळे.
योनि, उपस्थ १ आदिकारण २
योनिकंद, स्त्रियांचे रोग.
योनिदेवता, पूर्वाफल्गुनी नक्षत्र.
योनिदोष, उपदंशरोग १ विटाळ २
योनिरंजन, योनिदोष शब्दपाहा.
योनिरोग, स्त्रियांचे रोग.
योनिशूलघ्नी, बाळंतशोप.
योनिसंवरण, गर्भरोग.
योन्यर्श, योनिकंदरोग.
योषा, स्त्री.
योषित्, स्त्री.
योषिता, स्त्री,
योषितांप्रिया, पद्मिनी १ नारिंगी २ कुंजक ३
योषित्प्रिया, हळद.
यौगिक, नारिंग.
यौतक, लग्नांत आंदण देतात तें.
यौतुक, यौतक.
यौवन, तरुणपणा.
यंत्र, पात्रवि० १ प्रतिबंध २ भूतादिनाशक यंत्र वि० ३
यंत्रक, चरक.
यंत्रण, पीडा १ बंधन २
यंत्रपेषणी, जातें.

र

र, राम १ अग्नि २ भूमि ३ धन ४ इंद्रिय ५ धनरोध ६ तीक्ष्ण ७
रकसा, क्षुद्ररोग.
रक्त, दुपारी १ केशर २ तांबडा शेगवा ३ तांबें ४ पद्मकाष्ठ ५ रक्तरुधिर ६ रक्तधातु ७ पतंग ८ रत्याबोळ ९ हिंगूळ १० शेंदूर ११ रक्तपुनर्नवा १२ पोंवळीं १३ मत्स्यभेद १४ अशोक १५ रक्तचंदन १६ तांबडा एरंड १७ रक्तकमळ १८ कुसुंभ १९ रक्तरोहिडा २० अनुरक्त २१ रक्तवर्ण २२

रक्तक, दुपारी.
रक्तकंगु, राळे.
रक्तकंटा, वेहेकळी.
रक्तकंदक, तांबडा कांदा १ तांबडें रताळुं २
रक्तकदली, तांबडीकेळ.
रक्तकरवीर, रक्तकणेर.
रक्तका, पाणआंवळी.
रक्तकांडा, पुनर्नवा.
रक्तकार्मुक, पेरेळ.
रक्तकाष्ठ, पतंग.
रक्तकुसुम, पांगारा १ धामणीचा वृक्ष २ रक्तकांचन ३
रक्तकुसुमा, डाळिंब.
रक्तकृमिजा, लाख.
रक्तकेसर, पांगारा.
रक्तखांडव, द्वीपांतरखजूरी.
रक्तगंधा, आसंद.
रक्तगंधिक, रत्याबोळ.
रक्तगर्भा, मेहेंदी.
रक्तगैरिक, सोनगेरू.
रक्तग्रंथि, रक्तलाजाळू.
रक्तग्रीव, कबूतर.
रक्ताग्र, रक्तरोहिडा.
रक्तचंदन, रक्तचंदन १ लालचंदन हिं० संडले सुर्ख. फार० संडलेअस्मर आ० टीरोकार्पीलिमम ल० रेदसांडर्सवुद इं० रतांजलि गु०
रक्तचित्र, रक्तचित्रक.
रक्तचिलिका, गोडचाकवत.
रक्तचूर्ण, क्र, कपिला १ शेंदूर २
रक्तजंतुक, गांडवळ, काडू.
रक्ततर, सोनगेरू.
रक्ततुंड, गांडवळ १ पोपट २ सारसपक्षी ३
रक्ततृण, तांबेटीगवत १ थोरशिंपीगवत २
रक्तदला, नालुका १ चिविल २
रक्तद्रुम, रक्तबिब्ळा.
रक्तधातु, सोनगेरू १ तांबेगेरू २

**रक्तनाडी**, दंतमूलरोग.
**रक्तनाल**, जीवशाक १ जीवंती २ कल्हार-कमळ ३
**रक्तनिर्यास**, रक्तबिवळा.
**रक्तनेत्र**, सारसपक्षी १ कबूतर २ पारवा ३
**रक्तनेत्रत्व**, रक्तविकाररोग.
**रक्तपत्र**, रक्तलाजाळू.
**रक्तपत्रा**, रक्तपुनर्नवा.
**रक्तपात्रिका**, रक्तपुनर्नवा १ लघुमुंगुसकांदा२
**रक्तपद्म**, रक्तकमळ.
**रक्तपर्ण**, रक्तपुनर्नवा.
**रक्तपल्लव**, अशोक.
**रक्तपा**, जळू.
**रक्तपाद**, हंस.
**रक्तपादी**, रक्तलाजाळू १ श्वेतलाजाळू २
**रक्तपायिनी**, जळू १ ढेकूण २
**रक्तपारद**, हिंगूळ.
**रक्तपाषाण**, गेरू.
**रक्तपिंड**, क, जासवंद १ रक्तराताळूं २
**रक्तपिंडालु**, रक्तराताळूं.
**रक्तपित्त**, रक्तपित्तरोग.
**रक्तपीटिकादर्शन**, रक्तविकाररोग.
**रक्तपीतफला**, गोडतोंडली.
**रक्तपुनर्नवा**, रक्तपुनर्नवा.
**रक्तपुष्प**, रक्तरोहिडा १ रक्तकणेर २ सुर-पुन्नाग ३ पित्तपापडा ४ दुपारी ५ सांव-री ६ रक्तकांचन ७ पुन्नाग ८ पळस ९ पांगारा १० तांबडा कोरांटा ११ जास-वंद १२ रक्तरुई १३
**रक्तपुष्पा**, रक्तपुनर्नवा १ सांवरी २ शेंद्री ३ डाळिंब ४ शेवंतागुलाब ५
**रक्तपुष्पिका**, मंजिष्ट १ भुईपाडळ २ रक्त शंखपुष्पी ३ कळलावी ४ शेंदी ५ सोना-मुखी ६ रक्तपुनर्नवा ७ रक्तपाडळ ८ सांवरी ९
**रक्तपुष्पी**, जासवंद १ उटकटारा २ कर-वीरणी ३ सोनामुखी ४ रक्तरुई ५ रक्त-पुनर्नवा ६ नागाळी ७
**रक्तपूरक**, आमसोल.
**रक्तपूर्वक**, रक्तआघाडा.
**रक्तप्रसव**, रक्तकोरांटा १ मुचकुंद २
**रक्तफल**, वड १ रक्तआघाडा २
**रक्तफला**, वड १ सोनुर्ली २ गोड तोंडली ३ वांगी ४
**रक्तबाष्प**, तांबडा माठ.
**रक्तबिंदु**, रक्तआघाडा.
**रक्तबिंदुच्छदा**, श्वेतरिंगणी १ पुत्रदात्री २
**रक्तबीज**, डाळिंब १ रक्तबिवळा २ रक्तकु-ळीथ ३ रिठा ४
**रक्तबीजक**, तरडा.
**रक्तबीजका**, तरटी.
**रक्तबीजा**, शेंदी.
**रक्तमंजर**, निंब.
**रक्तमंजरी**, परेळ.
**रक्तमंडलता**, रक्तविकाररोग.
**रक्तमंडलिका**, रक्तलाजाळू.
**रक्तमत्स्य**, विशेषमत्स्य.
**रक्तमरिच**, लालमिर्ची.
**रक्तमातृका**, रसधातू.
**रक्तमुख**, रोहितमत्स्य १ सांटसाळी २ पो-पट ३
**रक्तमूत्रता**, रक्तविकाररोग.
**रक्तमूर्द्धा**, सारसपक्षी.
**रक्तमूलक**, देवशिरसवृक्ष.
**रक्तमूला**, ली, रक्तलाजाळू १ लाजाळू २
**रक्तमृत**, गेरू.
**रक्तमेह**, प्रमेह.
**रक्तयष्टिका**, मंजिष्ट.
**रक्तयष्टी**, मंजिष्ट.
**रक्तरंगा**, मेहेंदी.
**रक्तरज**, शेंदूर.
**रक्तरस**, रक्तबिवळा.
**रक्तरसा**, रासना.
**रक्तराजी**, आहाळीव.

रक्तरेणु, शेंदूर १ पुन्नाग २
रक्तरैवतक, द्वीपांतरखजूरी.
रक्तल, आलनु.
रक्तला, मोरवेल १ लघुरक्तकावळी २
रक्तलोचन, कबूतर.
रक्तवटी, मसूरिका.
रक्तवर्ग, दाडिम १ किंशुक २ लक्षाबंधूक ३ निशाद्वय ४ कुसुंभ ५ मंजिष्ठ ६
रक्तवर्ण, केशर १ गोमेदमणि २ पोंवळीं ३ इंद्रगोप ४ कपिला ५
रक्तवर्त्म, कोंबडें.
रक्तवर्षाभू, रक्तपुनर्नवा.
रक्तवल्ली, मंजिष्ठ १ नलुका २
रक्तवस्तु, माणिक.
रक्तवात, वातरक्त.
रक्तवारिज, रक्तोत्पल.
रक्तवालुक, शेंदूर.
रक्तवास्तुक, गोडचाकवत.
रक्तविकार, रक्तविकाररोग.
रक्तवृंतक, पुनर्नवा.
रक्तशमन, कपिला.
रक्तशालि, तामसाळीचें भात.
रक्तशालुका, रक्तकमलकंद.
रक्तशाल्मली, सांवरी.
रक्तशिग्रु, कडुशेगवा १ रक्तशेगवा २
रक्तशिंबी, लालआबिच्या शेंगा.
रक्तशीर्षक, सारसपक्षिभेद.
रक्तशृंग, क, विष.
रक्तष्ठीवनता, रक्तविकाररोग.
रक्तष्ठीवी, सन्निपात.
रक्तसंकोचापिशुन, कुंकुम.
रक्तसंदंशिका, जळू.
रक्तसंदोहिनी, जळू.
रक्तसंध्यक, कल्हारकमळ १ रक्तोत्पल २
रक्तसरोरुह, तांबडें कमळ.
रक्तसर्षप, पा, मोहोऱ्या.
रक्तसंवरण, काळा सुरमा.

रक्तसहा, रक्तकोरांटा.
रक्तसार, रक्तसिसव १ साठेसाळी २ रक्तधातु ३ काकई ४ रक्तखैर ५ आम्लवेतस ६ तांबडा बिबळा ७ रक्तचंदन ८ डुकरकंद ९ पतंग १०
रक्तसू, रसधातु.
रक्तस्राव, पित्तरोग १ नेत्रसंधीचे रोग २
रक्तस्रुति, रक्तस्राव.
रक्तहर, बिबवा.
रक्ता, लाख १ उटकटारा २ मंजिष्ठ ३ लक्ष्मणकंद ४ वेखंड ५ रक्तगुंजा ६
रक्तांकुर, पोंवळीं.
रक्ताख्यातक, रक्तआघाडा.
रक्तांग, रक्तचंदन १ लघुऐरण २ नारिंग ३ पोंवळें ४ कपिला ५ ढेंकूण ६ शुंडारोचनी ७
रक्तांगी, मंजिष्ठ १ रक्तगुंजा २ नलुका ३
रक्तांतलोचन, कबूतर.
रक्ताधार, चर्म १ कातडी २
रक्तानन, हंस.
रक्तापहा, रत्नयाबोळ.
रक्ताब्जक, रक्तकमळ.
रक्ताभ, भा, इंद्रगोप १ जासवंद २
रक्तांभोज, रक्तकमळ.
रक्ताम्र, लाल रानआंबा.
रक्ताम्लातक, रक्तकोरांटा.
रक्ताम्लान, रक्तकोरांटा.
रक्तार्ति, रक्तदोष.
रक्तार्बुद, शुक्ररोग.
रक्तार्श, प्रांपऱ्याचे रोग.
रक्तालु, लालरताळुं १ राजाळूचा भेद २
रक्ताक्ष, क्षी, टोणगा १ म्हैस २
रक्तिका, पतंग १ जासवंद २ मोहोऱ्या ३ रक्तगुंजा ४
रक्तेक्षण, कबूतर.
रक्तेक्षु, रक्तऊंस.
रक्तैरंड, रक्तएरंड.

**रक्तैर्वारु**, लघुकांवडळ.
**रक्तोत्क्लिष्ट**, पांपण्याचा रोग.
**रक्तोत्पल**, चंद्रविकासी रक्तोत्पल १ गेरु २
**रक्तोत्पला**, कांटेसांवरी.
**रक्तोदर**, रोहितमत्स्य.
**रचना**, अवयवांचा एकीभावकरणें.
**रज**, रजोगुण १ धूलि २ पित्तपापडा ३ पुष्पांतील पराग ४ लोहकीट ५ स्त्रीपुष्प ६
**रजक**, परीट १ रंगारी २
**रजत**, रुपें १ सोनें २ शुभ्रवर्ण ३ हार ४
**रजतोपम**, रौप्यमाक्षी.
**रजनि**, चाकवत १ रात्रि २
**रजनी**, पापडी १ हळद २ रात्र ३ नीलिनी ४ दारुहळद ५ चाकवत ६
**रजनीपुष्प**, घाणेरा करंज.
**रजनीमुख**, प्रदोषकाळ.
**रजस्**, रजोगुण १ रेणु २ स्त्रीरज ३ पराग ४
**रजःप्रभ**, भासकाकभेद.
**रजःशोधनी**, फणी केश विंचरण्याची.
**रजस्वल**, पारा १ टोणगा २
**रजस्वला**, ह्मैस १ विटाळशी स्त्री २
**रजस्वर्ण**, पिवळा धोत्रा.
**रजोदुष्टा**, प्रौढस्त्री.
**रज्जु**, दोरी १ वेणी २
**रण**, दुमाएडका १ शब्द २ शब्दकरणें ३ युद्ध ४ कोण ५
**रणघंटासमाकृति**, धोरताग.
**रणपक्षी**, रणगीध.
**रणप्रीय**, रणगीध १ काळा कावळा २
**रणालंकरण**, कंकपक्षी.
**रत**, मैथुन १ गुह्य २ वर्म ३
**रति**, मदनस्त्री १ प्रीति २ सुरत ३ गुह्य ४
**रतिपति**, काम.
**रतिसाधन**, शिश्न.
**रत्ती**, रक्तगुंज.
**रत्न**, माणीक १ हिरा २ सोनें ३ पाच ४ मोतीं ५ सामान्यरत्ननाम ६ स्वजातिश्रेष्ठ ७
**रत्नगर्भ**, समुद्र.
**रत्नगर्भा**, भूमि.
**रत्नजाति**, श्वेत १ रक्त २ पीत ३ नील ४ ब्राह्मण ५ क्षत्रिय ६ वैश्य ७ शूद्र ८
**रत्ननायक**, माणीक.
**रत्नपत्रा**, जवस.
**रत्नमाणिक्य**, माणीक.
**रत्नमुख्य**, हिरा.
**रत्नराट्**, माणीक.
**रत्नसानु**, मेरुपर्वत.
**रत्नाकर**, समुद्र.
**रत्नि**, मुंडाहात.
**रथ**, वेत १ तिवस २ स्यंदन ३ अवयव ४
**रथकट्या**, रथांचा समूह.
**रथकार**, सुनार १ जातिविशेष २
**रथगुप्ति**, शस्त्रादिक ठेवण्यास रथास लोहादिमय जें आवरण असतें तीं.
**रथद्रु**, तिवस.
**रथवृक्ष**, वृद्धि.
**रथांग**, चक्रवाकपक्षी १ चाक २
**रथांगी**, ऋद्धि.
**रथावर्ना**, स्थलकमलिनी.
**रथिक**, रथाचा स्वामी.
**रथिका**, तिवस.
**रथिन**, रथिकशब्दपाहा.
**रथिन**, चक्रवाकपक्षी १ रथिकशब्दपाहा २
**रथ्य**, घोडा.
**रथ्या**, लाहान मार्ग १ रथसमूह २
**रद**, न, दांत.
**रदच्छद**, ओंठ.
**रदनच्छद**, ओंठ.
**रदनी**, हत्ती.
**रदायुध**, रानडुकर.
**रभस**, वेग १ हर्ष २
**रमण**, कढ्यानिंब १ टेंभूर्णी २ आंडीलबैल ३ नवरा ४

**रमणा**, स्त्री.
**रमणी**, स्त्री.
**रमणीय**, सुंदर.
**रमा**, प्रभा १ लक्ष्मी २
**रमाप्रिय**, दालचिनी.
**रम्य**, सोनचाफा १ सुंदर २ पटोलमूल ३
**रम्यक**, बकाणानिंब १ पटोलमूल २
**रम्यपुष्प**, सावरीचें पुष्प.
**रम्यफल**, कुचला.
**रम्या**, स्थलकमलिनी १ थोरकांवडळ २ थोरनीली ३ लक्ष्मणाकंद ४ रात्रि ५
**रय**, वेग.
**रलक**, कांबळें.
**रव**, टेंभुर्णी १ राळ २ शब्द ३
**रवण**, उंट १ शब्दशील २
**रवि**, रुई १ सूर्य २
**रविकर**, सूर्यकिरण.
**रविकांत**, सूर्यकांत.
**रविकीर्ण**, रुई.
**रविक्रांत**, सूर्यफूलवल्ली.
**रविजाप्रिय**, नीलरत्न.
**रविल्विट्**, ऊन.
**रविद्रुम**, रुई.
**रविनामक**, तांबें.
**रविप्रकाश**, ऊन.
**रविप्रिय**, तांबें १ रक्तकणेर २ रक्तोत्पल ३ सूर्यफूल ४ निळा माका ५
**रविप्रिया**, केर्नी १ सूर्यफूलवल्ली २
**रविप्रीता**, सूर्यफूलवल्ली.
**रविरत्नक**, माणीक.
**रविलोह**, तांबें.
**रविवल्लभ**, माका.
**रविवल्ली**, सूर्यफूलवल्ली १ ब्राह्मी २
**रविस्पर्शा**, लघुमेंढशिंगी.
**रविष्ट**, नारिंग.
**रवीष्टा**, सूर्यफूलवल्ली.
**रशना**, जिव्हा १ कंबरपट्टा २
**रश्मि**, किरण १ रज्जु २
**रश्मिजाल**, रुपें.
**रश्मिपति**, सूर्यफूल.
**रस**, पारा १ रसधातु २ सामान्य रस ३ कपिला ४ चपलधातु ५ जार ६ रसांजन ७ लकड्या पाषाणभेद ८ बोदार शृंग ९ शेंदूर १० कवडी ११ पाणी १२ उसाचा रस १३ रोग १४ विष १५ मांसद्रव १६ मधुरादिषड्रस १७ तेज १८ प्रीति १९ द्रव २० देह २१ शृंगारादि रस २२ रक्त्याबोळ २३ शुक्र २४ द्राक्ष २५ किराईत २६ राग २७ ध्वनि २८ राळ २९ धान्याचे कढवून कढण ह्मo पाणी काढावें तें ३० स्वाद ३१
**रसक**, कलखापरी.
**रसकेशर**, कापूर.
**रसगंध,क**, रक्त्याबोळ १ गंधक २ रसांजन ३
**रसगर्भ**, रसांजन १ हिंगूळ २
**रसघ्र**, टंकणखार.
**रसज**, रसांजन १ गूळ २ रक्तधातु ३
**रसजात**, रसांजन.
**रसदा**, श्वेतनिर्गुडी.
**रसदालिका**, रसाळऊंस.
**रसधातु**, पारा.
**रसन**, कलखापरी १ जीभ २ शब्द ३ स्वदन ४
**रसना**, रासना १ जीभ २
**रसनाथ**, पारा.
**रसनापद**, कंबरेची फळी.
**रसनिर्यास**, थोर राळेचा वृक्ष.
**रसनी**, रासना.
**रसनेंद्रिय**, जीभ.
**रसपाकज**, गूळ.
**रसफल**, नारेळ १ आंवळा २
**रसबंधकर**, सोमल.
**रसबंधनक**, चपळधातु.
**रसमैत्री**, मधुराम्ल १ लावणाम्ल २ कटुतिक्त ३ कटुलवण ४ तिक्तलवण ५

**रसराज**, पारा १ रसांजन २
**रसलोह**, पारा.
**रसवती**, पाकशाला.
**रसविरोध**, लवण १ मधुर २ कटुमधुर ३ तिक्तमधुर ४ सर्व रसाबरोबर कषाय ह्म० तुरटाम्ल ५
**रसवीर्यकृत्**, सोमल.
**रसवेधज**, सोनें.
**रसवेष्टक**, विशेषधूप.
**रसशोणितसंभव**, मांसधातु.
**रसशोधन**, टंकणखार.
**रससंभव**, रक्तधातु.
**रससू**, रसधातु.
**रसस्राव**, आम्लवेतस.
**रससाधनवरा**, कावळीचा भेद.
**रसज्ञा**, जीभ.
**रसा**, साळईचावृक्ष १ मध २ पहाडमूळ ३ रसाळ ४ भूमि ५ पारद ६ चर्म ७ रसना ८
**रसांगक**, विशेषधूप.
**रसाग्रज**, रसांजन.
**रसाढ्य**, रसांजन १ पारा २
**रसाख्या**, श्वेततुळस.
**रसांजन**, पितळेचें कीट १ दारुहळदीचा अष्टमांश काढाकरून त्यांत शेळीचें दूध समभागघालून कढवून शुष्ककरावें तें २
**रसातल**, पाताळ.
**रसाधिक**, टंकणखार.
**रसाम्ल**, साराम्ल १ चुका २ आमसोल ३ कांजीचाभेद ४ आम्लवेतस ५.
**रसाम्ला**, पलाशी.
**रसायन**, पत्र्याहरताळ १ रसायणें करावयाची विद्या जाणणें २
**रसायनऔषधें**, जीं औषधें शरीराची जरा व रोग यांनां दूर करितात तीं जशी गुळवेल. रुदंती. गुळ. हरीतकी.
**रसायनफला**, हर्तकी.
**रसायनवर**, श्वेतलसूण १ काकमाची २
**रसायनवरा**, कांगोणी १ लघुकावळी २
**रसायनश्रेष्ठ**, पारा.
**रसायनसमाश्रय**, दूध.
**रसायनी**, गुळवेल १ मांसरोहिणी २ थोर करंज ३ लघुकावळी ४ लघुकुहिरी ५ श्वेतनिशोत्तर ६ शंखपुष्पी ७ शरीरांतील नाडी ८ मंजिष्ट ९ कंदगुळवेल १०
**रसाल**, क, थोरगहूं १ आंबा २ कुंदागवत ३ पुंड्रेक्षु ४ आम्लवेतस ५ साराम्ल ६ मिश्रवर्णऊंस ७
**रसाला**, निश्रेणीगवत १ द्राक्षा २ दूध ३ मध ४ चातुर्जात ५ शर्करा ६ मिरीं ७ हे पदार्थ एकत्र मिळवून करितातती १ पुरणाची पोळी व घारगे याजबरोबर खावी २ शिखरिणी ३ श्रीखंड ४ साकर. चातुर्जात. मध. मिरीं. दहीं. एकत्र गाळून करावें ती. आज्य घालून करावी ती हीं. प्रस्थदहीं १ प्रस्थसाकर १ पळतूप २ पळमधु २ कर्षमिरीं २ कार्षसुंठ २ कर्ष एलचीदाणे. एकत्र करून-गाळावें ती.
**रसालिका**, सानला.
**रसाली**, रसाळ ऊंस.
**रसावेष्ट**, सरलाडीक १ विशेषधूप २
**रसाव्हा**, लघुशतावरी १ रास्ना २
**रसाष्टक**, महारसाष्टक. दरद १ पारद २ शंख्या ३ वैक्रांत ४ कांत ५ अभ्रक ६ माक्षिक ७ विमला ८
**रसाज्ञना**, वायु.
**रसिक**, थोरगहूं १ सारसपक्षी २
**रसिका**, रसधातु १ साळोंखी २
**रसित**, मेघगर्जना.
**रसेंद्र**, पारा.
**रसेंद्रवेधज**, सोनें.
**रसेंद्रसंज्ञात**, सोनें.
**रसेक्षु**, लालऊंस १ मिश्रवर्णऊंस २

**रसोत्तम**, रसांजन १ पारा २ हिरवेमूग ३
**रसोद्भव**, रसांजन १ हिंगुळ २
**रसोद्भूत**, रसांजन.
**रसोन**, क, श्वेतलसूण.
**रस्य**, मांसधातु १ तळचें पातळ दहीं २
**रस्या**, रासना.
**रहस**, एकांतस्थल.
**रहस्य**, एकांतस्थली झालेला विचारइत्यादिक.
**रक्तगंध**, क, श्वेतअळू १ गुगुल २
**रक्षणी**, त्रायमाण.
**रक्षा**, गोरोचन १ राख २ रक्षण ३
**रक्षापत्र**, भूर्जपत्र.
**रक्षाबीज**, रिठा.
**रक्षित**, रक्षणकेलेला.
**रक्षिताफल**, शिरस.
**रक्षोघ्न**, हिंग १ बिब्वा २ कांजी ३ शिरस ४
**रक्षोघ्नी**, श्वेतवेखंड १ वेखंड २
**रक्षोहा**, ब्रह्मगुगुळ.
**रक्षण**, राखणें.
**रा**, द्रव्य १ सोनें २
**राका**, पूर्णिमा.
**राग**, आळिता १ शेंदूर २ प्रीति ३
**रागखांडव**, गुळांब ॥ गूळ. हिरवेआंबे. तूप. सुंठ. एलची. हीं एकत्रकरून कढवून करावें तो १ साकर. मध. मधुरदहीं. एकत्रकरून गाळावें तो २
**रागद**, तरटा.
**रागदालि**, मसुरा.
**रागधृक्**, माणीक.
**रागपक्षी**, रणगीध.
**रागपुष्प**, दुपारीचें फूल.
**रागप्रसव**, रक्तकोरांटा.
**रागसारा**, मनसील.
**रागांगी**, मंजिष्ठ.
**रागाढ्या**, मंजिष्ठ.
**रागी**, अशोक.
**रागीतरु**, अशोक.
**रागीष्ठ**, थोररोहीस १ आस्वळ २
**राघव**, तिमिंगिल झ० तिमिंगिलास भक्षिणारा एक मोठा मत्स्य आहे.
**राजक**, कृष्णागरु १ चंदनीपोपट २ राजांचा समुदाय ३
**राजकन्या**, केविका.
**राजकदंबक**, राजकळंब.
**राजकर्कटी**, लघुकोहोळी १ तांबडा भोपळा २
**राजकसेरुक**, थोरकचरा १ नागरमोथ २ भद्रमोथ ३
**राजकार्श**, थोरराळेचावृक्ष.
**राजकाष्ठ**, पतंग.
**राजकृष्णा**, पापडी.
**राजकोल**, रायबोर.
**राजकोशातकी**, शिराळी, दोडकी १ मोठी घोसाळी २
**राजखर्जूरी**, राजपिंडखर्जूरी.
**राजगवी**, चवरीगाय.
**राजगिरागी**, राजगिरा १ मोठी जांबूळ २
**राजतरणी**, थोररानशेवंती.
**राजतरु**, लघुवाहवा १ थोरवाहवा २
**राजताल**, नारळ.
**राजधत्तूर**, पिवळा धोत्रा.
**राजधान्य**, रायभोगसाळी.
**राजधूर्त**, पिवळा धोत्रा.
**राजन्**, राजा १ चंद्र २ प्रभु ३ क्षत्रिय ४ यक्ष ५ इंद्र ६ नाकशिकणी ७
**राजनग**, राजगिरा.
**राजनामा**, कडुपडवळी.
**राजनिंबुक**, कागदी निंबू.
**राजनीलिका**, थोरनीली.
**राजन्य**, रांजणीवृक्ष १ रांजणीचा भेद २ क्षत्रिय ३
**राजन्यक**, क्षत्रियांचा समूह.
**राजन्यप्रवरोपमा**, कडुदूधभोपळा.
**राजन्यावर्तक**, राजावर्त.

**राजन्वान्**, ज्यादेशांत धर्मशील राजा आहे तो देश.
**राजपटोलिका**, गोडपडवळ.
**राजपत्नी**, पितळ.
**राजपर्णी**, चांदवेल.
**राजपलांडु**, रक्तकांदा.
**राजपक्षी**, चाष.
**राजपिंडा**, राजपिंडखर्जूरी.
**राजपीलु**, थोरपीलुवृक्ष.
**राजपुत्रक**, थोरआंबा १ इरसाल आंबा २ थोर-इरसाल आंबा ३
**राजपुत्रिका**, श्वेतजाई १ पितळ २
**राजपुत्री**, करवीरणी १ रेणुकबीज २ चिचुंदरी ३ जाई ४ कडुभोंपळा ५ रानमोगरी ६
**राजपुष्पी**, जाई १ रानमोगरी.
**राजपूज्य**, सोनें.
**राजप्रिय**, तांबडा कांदा १ तोदन २
**राजप्रिया**, करवीरणी.
**राजफल**, इरसाल आंबा १ रांजणी २ नींब ३
**राजफला**, रायजांबूळ.
**राजफल्गु**, काळा उंबर.
**राजबदर**, रायबोर.
**राजबला**, चांदवेल.
**राजबीजिन्**, राजवंशातझालेला.
**राजभार्या**, राजाची स्त्री.
**राजमान्य**, पटोल.
**राजमाष**, चवळ्या १ निळेउडीद २
**राजमेकी**, परवरें.
**राजयक्ष्मा**, क्षयरोग.
**राजयोग्य**, चंदन.
**राजराज**, कुबेर.
**राजराजिका**, काळें शिरस.
**राजरीति**, सोनपितळ.
**राजवल्लकी**, थोरघेवडा.
**राजवल्लभ**, रायबोर १ रांजणी २
**राजवल्ली**, थोरकारली.
**राजवंश्य**, राजवंशात झालेला.
**राजवान्**, राजसत्ताक देश.
**राजवृक्ष**, थोरबाहवा १ भूताकशी २ मुरें गवत ३ पापडी ४
**राजशाक**, चाकवत.
**राजशाकिनी**, राजगिरा.
**राजशिंबी**, श्वेतपावटे.
**राजशुक**, चंदनीपोपट.
**राजसदन**, राजाचें घर.
**राजसभा**, राजाची सभा.
**राजसर्षप**, काळी मोहरी १ काळें शिरस २
**राजसंज्ञक**, बारीक गहूं.
**राजसी**, श्वेततुळस.
**राजसूय**, यज्ञविशेष.
**राजसेवक**, बारीक गहूं.
**राजसैरेयक**, निळा कोरांटा.
**राजहर्षण**, पिंडीतगर.
**राजहंस**, राजहंस १ राजहंसवनस्पति २
**राजक्षव**, राजसर्षप १ दुधी २
**राजक्षवक**, काळें शिरस.
**राजक्षवका**, दुधी.
**राजाग्र**, राजगिरा.
**राजादन**, नी, चारोळी १ रांजणी २ खिरणी ३
**राजादनफल**, रांजण.
**राजाद्रि**, राजगिरा.
**राजान्न**, दीर्घांकुर रायभोगसाळी.
**राजाम्र**, इरसल आंबा.
**राजाम्रातक**, थोरआंबाडा.
**राजाम्ल**, आम्लवेतस.
**राजार्क**, थोररुई १ रक्तमंदार २
**राजार्ह**, अगरु १ कापूर २ रायभोगसाळी ३ कृष्णागरु ४
**राजार्हा**, जांबूळ.
**राजालावु**, दुधभोंपळा.
**राजावर्त**, राजवर्तमणिसुवर्णवर्ण.
**राजाव्हा**, रांजणी १ थोररुई रक्तमांदार २

**राजि**, पंक्ति.
**राजिका**, काळा उंबर १ मोहोरी २ काळी मोहरी ३ क्षुद्ररोग ४
**राजिकाफल**, श्वेतशिरस.
**राजिमत्फला**, गोडदोडकी १ मोठी घोसाळी.२
**राजिभ**, दुदुळसर्प.
**राजिल**, जळसर्प १ पटोल २
**राजिलफला**, टरकांकडी.
**राजी**, मोहरी १ वावची २ कडुपडवळी ३ कृशदीर्घाकारमत्स्य ४
**राजीफल**, कडुपडवळी.
**राजील**, मोहरी.
**राजीव**, रेखांकितमत्स्य १ कमळ २ पद्मवर्णमृग ३ रक्तकमळ ४
**राजेंद्र**, राजगिरा.
**राजेष्ट**, रक्तकांदा १ रायभोगसाळी २
**राजेष्टा**, राजपिंडखजूरी.
**राज्यांग**, राजा १ अमात्य २ मित्र ३ भनागार ४ देशभूमि ५ दुर्गमस्थान ६ सेना ७ हिंग्रंथिकसात अंगें राज्याचीं.
**राट्**, राजा.
**राटि**, वगळी.
**राड**, गेळ.
**राति**, वगळी.
**रात्रि**, दारुहळद १ रात्री २
**रात्रिचर**, राक्षस.
**रात्रिचर**, रात्रिचर शब्दपाहा.
**रात्रिजागर**, कावळोकपक्षी १ पुंवडें २ चाचड ३
**रात्रिजागरकर्ता**, कुतरें.
**रात्रिपुष्प**, लघुकमल.
**रात्रिपुष्पिका**, थोरश्वेतजाई.
**रात्रिराट्**, चंद्रमा.
**रात्रिवियोगी**, चक्रवाकपक्षी.
**रात्रिविश्लेषगामी**, चक्रवाक.
**राज्यंध**, दृष्टिरोग.
**राध**, वैशाख.
**राधा**, विशाखानक्षत्र.
**राद्धांत**, सिद्धांत.
**रांभ**, संन्यासादि व्रताचेठायीं ग्राह्य जो वेळूचा दंड तो.
**राम**, अशोक १ कोष्ट २ मृगवि० ३ पशुविशेष ४ तमालपत्र ५ नागवेल ६ वरुण ७ अश्व ८ सुंदर ९ शुभ्र १० कृष्णवर्ण ११ रामत्रय १२
**रामक**, पाणआघाडा.
**रामकांड**, रामबाण.
**रामकोशातकी**, मोठी श्वेतघोसाळी.
**रामठ**, पाणआघाडा १ हिंग २
**रामठानाडी**, डिकेमाली.
**रामठी**, डिकेमाली.
**रामण**, टेंभुर्णी १ कळ्यानिंब २
**रामणीयक**, सुंदर.
**रामतरणी**, शेवंती १ लघुरानशेवंती २
**रामदूतिका**, नागाळी.
**रामफल**, रामफळ.
**रामबाण**, मक्यासारखी अथवा कसईसारखी झाडें नद्यांत ढोंपरभर पाण्यांत होतात त्यांस बाजरी सारखीं कणसें येतात. तीं वाळवून तेलांत बुडवून पेटविलीं असतां मोठे चाकड्यासारखी जळतात त्याला रामबाण असें म्ह०
**रामभद्रा**, शिवण.
**रामवल्लभ**, कलमी दालचिनी.
**रामशर**, रामबाण.
**रामशीतला**, आरामशीतला.
**रामसेनक**, किराईत १ कायफळ २
**रामा**, श्वेतरिंगणी १ त्रायमाण २ कोरफड ३ गोरोचन ४ तमालपत्र ५ आरामशीतला ६ स्त्री ७ हिंग ८ नदी ९
**रामाप्रिय**, दालचिनी.
**रामालिंगनकाम**, रक्तकोरांटा.
**रामावक्षोजोपम**, चक्रवाकपक्षी.

**रामावामांघ्रियातकी**, अशोक.
**रामाह्वयफल**, रामफळ.
**रामास्तनोपम**, चक्रवाकपक्षी.
**रामेषु**, रामबाण.
**रामोदुंबरिकाफल**, अंजीर.
**राल**, राळ.
**रावण**, टेंभुरणी.
**राशि, शी**, ऋद्धि १ वृद्धि २ धान्यादिकाची रास ३ मेषादिक बारा राशी.
**राषभी**, कुहिली.
**राष्ट्र**, देश १ मरणादिकउपद्रव २
**राष्ट्रवृद्धिकरी**, सामान्यबोर.
**राष्ट्रिका**, डोरली.
**रासना**, लघुमुंगुसकांदा १ रास्ना २
**रासभ**, गाढव.
**रास्ना**, नागदवणी १ लघुमुंगुसवेल २ श्वेतरिंगणी ३ नावळीच्या मुळ्या ४नाई कों०
**राहु**, नवग्रहांतील एक ग्रह.
**राहुच्छत्र**, आलें १ मुंड २
**राहुरत्न**, गोमेदमणि.
**राहूच्छिष्ट**, लसूण.
**राहूत्सृट**, लसूण.
**राक्षस**, ब्रह्मराक्षस १ रोहिडाभेद २ साठसंवत्सरांतील ४९ वें संवत्सर ३
**राक्षसभोजन**, मांसधातु.
**राक्षसी**, मोरमांसी १ एकांगीमुग २
**राक्षसीकंद**, चंडाळकंद.
**राक्षा**, लाख.
**राज्ञी**, जाई १ थोरनीली २ पितळ ३ पट्टराणी ४ काळें शिरस ५ लघुनीली ६
**रिकवंच**, नागवेलीचे पानास उडदाचें पीठ लावून शिजवून वड्या कराव्या आणि वांग्याच्या भरता बरावरखाव्या त्या.
**रिक्तक**, रिकामा.
**रिक्थ**, द्रव्य.
**रिंखण**, } धर्मादिकांपासून चलन १ हाता-
**रिंगण**, } पायांनें बालकाचें गमन २
**रिंगणी**, रानमूग. कटाई हिं०
**रिटि**, महादेवाचा नंदी.
**रिठा**, रिठा. रिंगीवृक्ष कों० अरिठा गु०
**रिठाकरंज**, रिठा.
**रिपु**, गठोना १ शत्रु २
**रिबु**, रक्तएरंड.
**रिम**, गंधीहिंवर.
**रिरंसा**, स्त्रीसह क्रीडा करण्याची इच्छा.
**रिष्ट**, कल्याण १ अमंगल २ अशुभाभाव ३
**रिष्टि**, तरवार.
**रीढा**, अनादर.
**रीण**, स्रवलेला.
**रीति**, सोनपितळ १ पितळ २ पुष्पांजन ३ लोकाचार ४ प्रस्रवण ५.
**रीतिक, ज**, पुष्पांजन.
**रीतिकुसुम**, पुष्पांजन.
**रीतिपुष्प**, पुष्पांजन.
**रीतिहेतु**, जस्त.
**रीती**, पितळ.
**रु**, भय.
**रुक्**, कोष्ठ १ रोग २ कांति ३
**रुक्प्रतिक्रिया**, चिकित्सा.
**रुक्म**, सोनें १ नागकेशर २
**रुक्मकारक**, सोनार.
**रुक्मिणी**, पिसोळाभेद.
**रुगग्र**, वेग १ प्रकाश २
**रुग्ण**, रोगी.
**रुग्दाह**, सन्निपात.
**रुचक**, संचळ १ महाळुंग २ श्वेतएरंड ३ शिवाचंदनघर्षण ४ स्त्रीमदाभरण ५ मोहरी ६ मुक्ता ७
**रुचि**, गोरोचन १ प्रकाश २ स्पृहा ३ शोभा ४ किरण ५
**रुचिकर**, नारिंग.
**रुचिदेव**, संधान.
**रुचिप्रदा**, गोडतोंडली.
**रुचिफल**, अमृतफल.

रुचिर, रुपें १ मुळा २ काळा शेगवा ३ मनोरम ४
रुचिरफला, गोडतोंडली.
रुचिरा, गोरोचन.
रुचिष्य, निवळीच्या बिया १ संचळ २ धुसरजिरें ३
रुच्य, सुंदर.
रुच्यकंद, शहाजिरें १ साळीभात २ टरकांकडी ३ खारासुरण ४
रुजा, कोष्ठ १ रोग २ पीडा ३
रुजाकर, एरवणी.
रुजापह, धामणीचा वृक्ष.
रुट्, क्रोध.
रुंडक, अगरु.
रुणेयकफल, कारथफल.
रुत, पक्ष्यांचा शब्द.
रुदंतिका, नी, रुदंती.
रुदित, रडणें.
रुद्ध, वेढलेला.
रुद्र, महादेव.
रुद्रक, थोरबकुळ.
रुद्रज, पारा.
रुद्रजटा, ईश्वरी.
रुद्रदारु, तेल्यादेवदार.
रुद्रपत्नी, जवस.
रुद्रप्रिय, थोरबकुळी.
रुद्ररेतस्, पारा.
रुद्रलना, ईश्वरी.
रुद्रसंज्ञ, रुद्राक्ष.
रुद्रा, ईश्वरी.
रुद्राणी, ईश्वरी १ पार्वती २
रुद्राक्ष, रुद्राक्ष.
रुधिर, केशर १ रक्तधातु २ मंगलग्रह ३
रुबु, क, श्वेतएरंड १ रक्तएरंड २
रुबू, क, रक्तएरंड.
रुमा, क्षारसमुद्र.
रुमाभव, सांभरलोण.
रुयिका, रुई.
रुरु, रोहिष १ रोहें २
रुरुमाण, वायवरणा.
रुशती, अमंगल वचन.
रुष्कर, बिबवा.
रुहा, नीलदूर्वा १ मांसरोहिणी २ थोरदांती ३ श्वेतदूर्वा ४ लाजाळू ५
रूक्ष, धामणीचा वृक्ष १ नीरसपदार्थ २
रूक्षदधि, उद्धृतस्नेहदधि.
रूक्षदर्भ, थोरहरितदर्भ.
रूक्षपत्र, साहाडा.
रूक्षस्थूल, वन्या.
रूक्षा, लघुदंती.
रूढक, पिंपळमूळ.
रूढमलिका, अंकोली.
रूप, नेत्रविषय १ स्वभाव २ सौंदर्य ३ सदृश ४ लोक ५ पशु ६ ग्रंथवृत्ति ७ नाटक ८ आकार ९ श्लोक १०
रूपक, रुपें.
रूपपत्रिका, आरसी.
रूपशंख, शिख, कथील.
रूप्य, रुपें १ नाणें २ सुंदर ३
रूप्याध्यक्ष, रुप्याच्या कामावरचा कामदार.
रूप्योद्भव, रौप्यमाक्षी.
रूवुक, एरंडवृक्ष.
रूषित, गुंढाळलेला १ धुळीनें लिप्त २
रूक्ष, वायुरोग १ रुक्ष २
रेकी, कपिला.
रेखा, तळाथाच्या रेषा.
रेचक, जेपाळ १ तिलक २ कंकुष्ठ ३
रेचन, कंकुष्ठ १ अंकोल २ कपिला ३ पोटामध्यें अन्नादिकांचा चांगला पाक झाला असतां अथवा कांहीं कच्चें राहिलें असतां त्या अन्नादिकानां व मलमुत्रादिकानां पातळ करून त्यानां जें औषध अधोभागीं नेऊन ढाळ करितें तें जसें निशोतर ४

**रेचना**, कापिला.

**रेचनी**, कपिला १ अंकोली २ तिलकपुष्प ३ श्वेतनिशोत्तर ४ शुंडारोचनी ५

**रेचित**, अश्वगतिविशेष.

**रेणु**, वेणु १ पित्तपापडा २ रेणुकबीज ३ धूळ ४

**रेणुक**, वाटाणा.

**रेणुकदंबक**, धूळीकदंब.

**रेणुका**, रेणुकबीज.

**रेणुभूषित**, गाढव.

**रेणुमुष्टिका**, विषदोडी.

**रेणुसार**, कापूर.

**रेतजा**, वाळू.

**रेतमोचन**, मैथुन.

**रेतस्**, शुक्रधातु.

**रेप**, निंद्य,

**रेफ**, रवर्ण १ कुत्सित २ रेपशब्दपाहा ३

**रेवनक**, लघुद्वीपांतरखजुरी.

**रेवतिका**, वटपत्री पाषाणभेद.

**रेवती**, वटपत्री पाषाणभेद १ बालरोग २ रेवतीनक्षत्र ३

**रेवतीरमण**, बळराम.

**रेवा**, नदी.

**रेवन**, लघुबाहवा १ द्वीपांतरखजूरी २ लघुद्वीपांतरखजूरी ३

**रोक**, छिद्र,

**रोग**, कोष्ठ १ रोग २

**रोगपति**, ज्वर.

**रोगराज**, क्षयरोग.

**रोगशिला**, मनशीळ.

**रोगश्रेष्ठ**, ज्वर.

**रोगहारिन्**, वैद्य.

**रोगज्ञ**, वैद्य.

**रोगाधीश**, क्षयरोग.

**रोगाव्हय**, कोष्ठ.

**रोगासन**, ज्वर.

**रोगी**, रोगवान् १ अयोग्यवैद्य २

**रोचक**, महाळुंग १ रुचिकारक पदार्थ कोशिंबिरी इत्यादि २

**रोचन**, गोरोचन १ डाळिंब २ श्वेतशेगवा ३ करंज ४ गोडमहाळुंग ५ निंबू ६ ईडनिंबू ७ हिरवा कांदा ८ रक्तकांदा ९ थोरबाहवा १० रक्तरोहिडा ११ लघुईडनिंबू १२ काळी सावरी १३

**रोचनफल**, महाळुंग.

**रोचनफला**, कडुशेंदाड.

**रोचना**, काळी सावरी १ वंशलोचन २ गोरोचन ३ गोतमी ४ गोदावरी ५

**रोचनिका**, वंशलोचन.

**रोचनी**, चुका १ श्वेतनिशोत्तर २ कपिला ३ आवळी ४ नालिकेर ५ लघुदंती ६

**रोचिष**, प्रकाश.

**रोचिष्मन्**, अत्यंतकांतिमान.

**रोटिका**, रोटी.

**रोटी**, भाकरी पोळी. गोलयाचे शिजवून भाजतात ती.

**रोदन**, बालरोग १ नेत्रोदक २

**रोदनिका**, धमासा.

**रोदनी**, धमासा.

**रोदस्**, आकाश आणि पृथ्वी.

**रोदसी**, रोदस् शब्दपाहा.

**रोदिका**, लाजाळू.

**रोदिनी**, रक्तधमासा.

**रोध**, तीर.

**रोधस**, रोधशब्दपाहा.

**रोधा**, नदी.

**रोधिनी**, लाजाळू.

**रोधोवक्रा**, नदी.

**रोध्र**, क, लोध्र.

**रोध्रशूक**, लोध्र पुष्पाकारशूक शालिविशेष.

**रोप**, बाण.

**रोपण**, पारा १ भुयधामण २

**रोम**, क, तमाल पत्र १ सांबरभोत २ केश ३ सोग ४ बकाणनिंब ५

**रोमकर्ण**, ससा.
**रोमकंद**, श्वेतरताळूं.
**रोमकाख्य**, कांतलोह १ भूमिलवण २
**रोमकूप**, केशांचीं छिद्रें.
**रोमंथ**, पशूंचें चर्वण.
**रोमद्वीप**, कृमि.
**रोमन**, अंगावरचे केश.
**रोमफल**, नीव.
**रोमफला**, धेडशीं.
**रोमभूमि**, त्वचा १ चर्म २
**रोमलवण**, सांभरमीठ.
**रोमवल्ली**, कुहिली.
**रोमश**, कुंभीवृक्ष १ रानडुकर २ श्वेतरताळूं ३ तमालपत्र ४
**रोमशफल**, धेडशीं.
**रोमशमूलिका**, हळद.
**रोमशा**, कुरुहवृक्ष.
**रोमसा**, मांसरोहिणी.
**रोमहर्ष**, क, वायु १ बेहेडा २ रोमांचस्फुरण ३
**रोमहर्षण**, रोमांच.
**रोमाख्य**, सांभरमीठ.
**रोमांच**, रोमहर्षण शब्द पाहा.
**रोमांचिका**, रुदंती.
**रोमाणज**, केश.
**रोमानिक**, नीव.
**रोमालु**, कुहिली १ श्वेतरताळूं २
**रोष**, क्रोध.
**रोषण**, फालसा.
**रोषिणी**, लाजाळु.
**रोहणद्रुम**, मलयागर १ चंदन २
**रोहिकाप्रिय**, थोरकरंज.
**रोहिण**, वड १ लघुसुगंधरोहिस २ आंडील बैल ३ रक्तरोहिडा ४
**रोहिणी**, हर्तकी १ मंजिष्ठ २ थोरशिवण ३ कटुकी ४ रत्न ५ मांसरोहिणी ६ गाय ७ रजनी ८ बादांगुळ ९ चंद्रवल्लभ १० कायफळ ११ गंडमाळा रोग १२ रक्तरोहिडा १३ लोहितवर्णजलपक्षि वि० १४ रोहिणी नक्षत्र १५
**रोहित**, रक्तरोहिडा १ रक्तावयवमत्स्य २ शिवडा की० रोहू ३ रक्तवर्ण ४
**रोहितक**, रक्तरोहिडा.
**रोहिता**, मंजिष्ठ.
**रोहिताश्व**, अग्नि.
**रोहिष्**, रोहू १ रक्तरोहिडा २ थोरकरंज ३ वड ४
**रोहिष**, रोहिसगवत १ लघुरोहिसगवत २ रोहू ३ मत्स्यभेद ४
**रोहिसतृण**, लघुरोहिसतृण.
**रोहीतक**, रक्तरोहिडा.
**रौद्र**, रौद्ररस.
**रौद्रीजटा**, ईश्वरी.
**रौप्य**, रुपें.
**रौमक**, सांभरलोण.
**रौहिण**, रक्तचंदन.
**रौहिणेय**, पाचरत्न १ बुध २ बळराम ३
**रौहिष**, रोहिसतृण १ रोहू २
**रौक्ष्य**, रुक्षपणा.
**रंकु**, पाणकावळा १ जंडियारमृगवि० २
**रंग**, काथ १ कथील २ रक्तिमा ३ नृत्यभूमि ४ रण ५
**रंगकाष्ठ**, पतंग.
**रंगद**, काथ १ टंकणखार २
**रंगदालिका**, नागवेल.
**रंगदा**, फटकी.
**रंगदायक**, कंकुष्ठ.
**रंगदृढा**, फटकी.
**रंगनामक**, तेरडा.
**रंगनायक**, कंकुष्ठ.
**रंगपत्री**, लघुनीली.
**रंगपुष्पी**, जासवंद १ लघुनीली २
**रंगमाता**, लाख.
**रंगमातृका**, लाख.
**रंगलता**, सोनामुखी.

मु० सन्ना. फा० सेन्नेकोल्या. ल० सेन्नालीवस्र. इं०

सोमल, प्रा० उंदीरपाषाण. दे० समुलखार मु० मिर्गेमूरा. फा०

सोरटीमाती, प्रा० गोपीचंदन.

सोरा, प्रा० सुर्याखार. प्रा० वाजी. हिं० शोरा. फा० अक्कर. आ० पोट्टासिनैत्रास. ल० नैतरपालूतपीतर.

स्त्रियांच्याजाति व त्यांची लक्षणें.

१ पद्मिणी ॥ चंद्रमुखी. सुंदर शोभायमान. उंच आणि मांसलस्तन. षोडश वर्षाकृति. अंगमृदु. गौरवर्ण. मुखासुगंधि. अल्पाहार. चतुर. मर्यादशील. मृदुभाषिणी. विलासकुशला. देव व गुरू यांचे पुजन करणारी. ओंठ व नेत्र आरक्तवर्ण. उपस्थ षडंगुल. कमलगंधि. तळहात अतिमृदु. स्वल्प रति. यालक्षणें करून युक्त. ती.

१ शंखिनी ॥ मुखलांबट. रक्तवर्ण. ओंठ लांब. कृत्या. केशफार. विचित्रा. स्तन लांब. जलद चालणारी. आळशी. घोगरा शब्द. मांजरासारिखे डोळे. स्थूल. साहसबुद्धि. दुर्बुद्धि. फारखाणारी. मदजिव्हला. गर्दभासारिखी गति. उंच. रुक्षा. जघन व बाहु व ऊर व केश हे लांबट. आरक्तवर्णनखें. उपस्थ दाहा अंगुळें व क्षीरगंधि. यालक्षणें करून युक्त. ती.

१ चित्रिणी ॥ कमळासारिखें मुख. मृगनयना. षोडसवर्षाकृति. चंचल. क्षमाशील. चतुर. गायनकला जाणणारी. मंगलरूपा. उंचस्तनी. गजगामिनी. गायनाचेठायीं प्रीति. मर्यादशील. शुभ्रवर्ण. उत्तमबुद्धि. चित्रासदृश आकृति. मयूरस्वरा. मधुरवाणी. ओंठ रक्तवर्ण. नेत्र पीतवर्ण. हात व ऊर मांसल. उपस्थ आठ अंगुळे. व मांसगंधि. यालक्षणें करून युक्त ती.

१ हस्तिनी ॥ अतिस्थूलशरीर. मंदगमना. उग्रा. ठेंगणी. खांदे व मुख मोठें, केश पिंगटवर्ण. व निस्तेज. स्तन मोठे. ओंठ लांब. निर्लज्जा. फारभोजन व भोगकरणारी. कष्ट करणारी. गौरवर्ण. हस्तिमदासारिखा मुखासुगंध. यौवनमत्त. उग्रपदार्थ खाणारी. उपस्थ बारा अंगुळें. यालक्षणें करून युक्त. ती जास्त्रिया यालक्षणेंकरून युक्त असतात त्या क्रमेंकरून पद्मिणी व शंखिनी व चित्रिणी व हस्तिनी आहेत असें जाणावें.

स्वागीखार, प्रा० सुहागा. गु० हिं० बुरग फा० सोदेस बोरास. ल० बारोक्स. इं०

हस्ती, प्रा० हाथी. गु०

हरणाचें शिंग, प्रा० कोर्न्युवा. ल०

हरभरे, प्रा० चणे. कों० चणा. गु०

हरीक, प्रा० कोद्रु. कों० कोदरा. गु०

हर्तकी, प्रा० सुरवारीहिरडा. हरडे. हिं०

हळद, प्रा० हल्दी. हिं० रानहळद. वेडीहळद. कापूर हळद. कों० हलद. गु० चोराहळद. कारंजी. कुसुंबाचे रंगास घेतात ती. दे०

हळदिवावृक्ष. प्रा० पिवळे लांकूड असतें. तो. कों०

हाडसंधी. प्रा० हाडसांखळ. दे० तिधारीकांडवेल. कों० हारसिंगार. सिंगारहार. हिं०

हाताजोडी. प्रा० हताजोरी. हिं०

हाशावृक्ष. प्रा० कोंकणात प्रसिद्ध आहे.

हिंग. प्रा० हिं० अंगुझ. फा० आस्साफेटी देगिमिरेझिना. ल० आस्साफेटीदा. इं०

हिंगणबेट. प्रा० इंगुदी. उंडिंगण. दे०

हिंगूळ. प्रा० सिंगरफ. हिं०

हिराकस. प्रा० कासीसधातु. हिं०

हुरडा, प्रा० जोंधळ्याची कणसें भाजून चोळून दाणे काढितात तो.

हुळा, प्रा० ओला हरभरा भाजून चोळून. दाणे काढितात तो.

हेदवृक्ष. प्रा० साहोडा. सागाचा भेद.

## अडुळसा.

आटरूषःशीतवीर्योलघुर्हृद्यःकटुःस्मृतः ॥ तिक्तःस्वर्यःकासहं

ताकामलारक्तपित्तहा ॥ विवर्णताज्वरकफश्वासमेहक्षयापहः ॥

कुष्ठारुचितृषावांतिनाशकःपरिकीर्तितः ॥

अर्थ–अडुळसा–शीतवीर्य, लघु, हृद्य, तिखट, कडु, स्वर्य आहे, व खोकला, कावीळ, रक्तपित्त, विवर्णता, ज्वर, कफ, श्वास, मेह, क्षय, कुष्ठ, अरुचि तृषा, आणि वांति, यांचा नाश करितो.

## अम्लवेतस.

अम्लवेतस्तुतुवरश्चाम्लस्तिक्तःकटुःस्मृतः ॥ दीपनोष्णोलघूरूक्षःपथ्य

कृन्मलभेदकः ॥ लोहच्छागादिमांसानांद्रवकृद्रक्तपित्तनुत् ॥ चणका

म्लसमःस्वादेकफवातकफार्शनुत् ॥ गुल्ममूत्राश्मर्यरुचिश्रमतृट्हृद्

रुजापहः ॥ हिक्काशूलप्लीहहरोह्यजीर्णानाहवातनुत् ॥ उदावर्ताध्मा

नसिध्मकुष्ठवांतिविनाशकृत् ॥

**अर्थ**–अम्लवेतस– तुरट, आंबट, कडु, तिखट, अग्निदीपक, ऊष्ण, लघु, रूक्ष, पथ्यकारक, मळाचा भेदकरणारा असा आहे, व रक्त, बकरा इत्यादिकांच्या मांसाला द्रवविणारा, रक्तपित्तकारक, स्वादानें चण्याच्या आंबीसारिखा व कफवात, कफार्श, गुल्म, मूत्राश्मरी अरुचि, श्रम, तृषा, हृद्रोग, हिक्का, शूळ, प्लीहा, अजीर्ण, आनाहवायु, उदावर्त, आध्मान, कुष्ठ; आणि वांति यांचा नाश करितो.

## अक्रोड.

अक्षोटोमधुरःकिंचिदम्लःस्निग्धश्चशीतलः ॥ वीर्यवृद्धिकरश्चोष्णोरुचि

दःकफपित्तकृत् ॥ गुरुःप्रियोबलकरःकफकृन्मलबंधकृत् ॥ वातपित्तंक्षयं

वातंहृद्रोगंरक्तदोषकं ॥ रक्तवातंचदाहंचनाशयेदितिकीर्तितः ॥

अर्थ–अक्रोड–मधुर, किंचित् आंबट, स्निग्ध, शीतल, धातुवृद्धिकर, ऊष्ण, रुचिप्रद व कफपित्तकर, जड, प्रिय, बलकर, कफकर, मळबंधक, असा आहे; आणि वातपित्त, क्षय, वायु, हृद्रोग, रक्तदोष, रक्तवात, आणि दाह यांचा नाश करितो.

## अमृतवल्ली.

अमृतस्यचवल्लीसाहितकारीविषापहा ॥ किंचित्तिक्ताजराव्याधिहरी

कुष्ठामनाशिनी ॥ कामलव्रणशोफघ्नीऋषिभिःपरिकीर्तिता ॥

अर्थ—अमृतवल्ली—हितकारक, विषनाशक, किंचित् कडु, रसायन, अशी आहे, व कोड, आमदोष, कावीळ, वणशोथ यांचा नाश करिते.

## अमृतफळ.

अमृतस्यफलंधातुवर्धकंमधुरंगुरु ॥
रुच्यंचाम्लंवातहरंत्रिदोषस्यचशामकं ॥

अर्थ—अमृतफळ- नासपात उत्तरदेशीं प्रसिद्ध आहे. तें धातुवर्धक, मधुर, जड, रुचिकारक, आंबट आहे, व वायु; आणि त्रिदोष यांचा नाश करितें.

## अक्कलकरा.

अक्कल्करोष्णोवीर्येणबलकृत्कटुकोमतः ॥
प्रतिश्यायंचशोथंचवातंचैवविनाशयेत् ॥

अर्थ—अक्कलकरा- उष्णवीर्य, बलकर, तिखट आहे, व पडसें, सूज; आणि वायु यांचा नाश करितो.

## अमरुफळ, उत्तरदेशी प्रसिद्ध.

अमरोश्चफलंशीतंमलद्रवकरंमतं ॥ सरंदाहंरक्तपित्तंकामलांमूत्रकृच्छ्रकं ॥ मूत्राश्मरींचहंतीतिऋषिभिःपरिकीर्तितं ॥

अर्थ—अमरुफळ- उत्तरदेशीं प्रसिद्ध आहे. तें शीत, मळाला पातळकरणारें, रेचक असें आहे, व दाह, रक्तपित्त, कावीळ, मूत्रकृच्छ्र; आणि मूत्राश्मरी, यांचा नाश करितें.

## अलंकार.

अलंकाराधृताःसर्वेसौभाग्यायुःप्रदामताः ॥
पावित्र्यलक्ष्मीभोगानांकारकाःपरिकीर्तिताः ॥

अर्थ अलंकार- कोणतेही अलंकार धारण केले असतां; सौभाग्य, आयुष्य, यांतें देणारे व पवित्रता, लक्ष्मी; आणि भोग, यांला करणारे असे आहेत.

## सुवर्णाचे अलंकार.

सुवर्णालंकृतिधृतिःकल्याणसुहृदप्रदा ॥

अर्थ—सुवर्णाचे अलंकार धारण केले असतां; कल्याण व सुहृद यानां करणारे आहेत.

## रत्नाचे अलंकार.

रत्नालंकारविधृतिर्दैवतातुष्टिकारका ॥
मनसोल्हादिनीप्रोक्तासर्वलोकवशंकरी ॥

**अर्थ**–रत्नाचे अलंकार धारण केले असतां; दातांला तुष्टिकारक, मनाला आनंद देणारे; आणि सर्वलोकवशकारक आहेत.

## रत्नें, सुवर्ण, मोत्यें व पोंवळीं यांचे अलंकार.

रत्नादीनामलंकाराःशरीरानंददायकाः ॥
कांतिकल्याणलक्ष्मीदाऋपिभिःपरिकीर्तिताः ॥

**अर्थ**–रत्नें, सुवर्ण, मोत्ये; आणि पोंवळी. यांचे अलंकार शरीराला आनंद, कांति; आणि शोभा यानां करणारे आहेत.

## एकेरी मोत्यांची माळ.

मौक्तिकैकावलीलक्ष्मीकांतिदाचप्रकीर्तिता ॥

**अर्थ**–एकेरी मोत्यांची माळ लक्ष्मी व कांति यानां देते.

## मोत्यें व पद्मराग यांचे अलंकार.

मुक्तानांपद्मरागाणांधारणंदेवतुष्टिदं ॥

**अर्थ**–मोत्यें व पद्मराग यांचे अलंकार धारण केले असतां; देवतानां संतुष्ट करितात.

## मोत्यांचा हार.

मुक्तानांहारविधृतिर्दाहपित्तविनाशनी ॥
कांतिहर्षनेत्रसुखंददातीतिप्रकीर्तितं ॥

**अर्थ**–मोत्यांचा हार धारण केला असतां दाह. पित्त यांचा नाश करितो, व कांति हर्ष, नेत्रसुख यानां देतो.

## इंद्रनीलयुक्तमाळ.

इंद्रनीलयुतामालापापनिवर्हणीमता ॥
चित्तप्रसन्नतानेत्रोत्साहकरस्मामता ॥

**अर्थ**–इंद्रनीलयुक्त माळ पापनिनाशक आहे, व चित्तप्रसाद; आणि नेत्रोत्साह यानां करिते.

## सुवर्णयुक्तरुद्राक्षमाळ.

स्वर्णरुद्राक्षमालायाधारणंपापनाशनं ॥
मनोनंदकरंप्रोक्तमृपिभिःपरिकीर्तितं ॥

**अर्थ**–सोन्याने बांधलेली रुद्राक्षांची माळ धारण केली असतां; पापनाशक आहे; व मनाला आनंद देणारी आहे.

## स्वर्णयुक्तकमळाक्षमाळ.

स्वर्णयुक्तमळाक्षाणांधारणंमुक्तिकारकं ॥

अर्थ–सुवर्णानें बांधलेली कमळाक्षांची माळ धारण केली असतां; मुक्तिकारक आहे.

## सोन्याची कंठी.

सुवर्णमालिकायुष्याकांतिदादाहवातनुत् ॥
ग्रहपीडानाशकरीलोकानांवशकारिणी ॥

अर्थ–सोन्याची कंठी–आयुष्य, कांति यानां देणारी व दाह, वायु आणि ग्रहपीडा. यांचा नाश करिते; व वशकारक आहे.

## कानातील अलंकार.

कर्णभूषणकंहर्षप्रदंकामकरंतथा ॥
स्त्रीरंजनकरंचैवदोषाणांनाशकंपरं ॥

अर्थ–कानातील अलंकार- हर्षकारक, कामप्रद, स्त्रियांच्या चित्ताला आनंद देणारा आणि दोषनाशक असा आहे.

## नवरत्नांचा अलंकार.

धारणंनवरत्नानांग्रहसंतोषकारकं ॥
सर्वपीडाहरंचैवलोकानांप्रीतिवर्धनं ॥

अर्थ–नवरत्नांचा अलंकार–ग्रहाची प्रीति करणारा, संपूर्णपीडानाशक; आणि लोकाची प्रीति वाढविणारा असा आहे.

## सुवर्णाचें पवित्रक.

पवित्रकंसुवर्णस्यपुण्यवृद्धिकरंपरं ॥ इहलोकेपरेचैवभोगमुक्तिप्रदं स्मृतं ॥ आनंदकारकंचैवऋषिभिःपरिकीर्तितं ॥

अर्थ–सुवर्णाचें पवित्रक- पुण्यवृद्धिकारक, भुक्ति, मुक्ति; आणि आनंद याते देणारें असें आहे.

## नानारत्नयुक्तपादभूषण.

नानारत्नयुतंपादभूषणंवीर्यदंस्मृतं ॥
सौंदर्यकामजनकंग्रहपीडाहरंपरं ॥

अर्थ–नानारत्नयुक्त पादभूषण वीर्यप्रद, सौंदर्यकारक, कामोत्पत्तिकर, ग्रहपीडानाशक आहे.

## किंकिणीयुक्त कटिभूषण.

क्षुद्रघंटायुतंकट्या भूषणंपरिकीर्तितं ॥
वातपित्तेयथास्थानंरक्षयेदितिचस्मृतं ॥

अर्थ–घागऱ्या लाविलेलें कटिभूषण–वात व पित्त यांला स्थानीं संरक्षण करितें.

## अगस्त्या चार प्रकारचा.

चतुःप्रकारकश्चैवमुनिवृक्षउदाहृतः ॥ रूक्षःशीतोथमधुरोवा
तलश्चत्रिदोषहा ॥ विवर्णताकफहरःश्रमकासव्रणापहः ॥ पि
शाचपीडांपित्तंचजूर्तिंचातुर्थिकांहरेत् ॥

अर्थ–अगस्त्या चार प्रकारचा–तो रूक्ष, शीतळ, मधुर, वातळ, त्रिदोषनाशक असा आहे; व वैवर्ण्य, कफ, श्रम, खोकला, व्रण, पिशाचबाधा, पित्त आणि चातुर्थिक ज्वर यांचा नाश करितो.

## अगस्त्याचें पुष्प.

मुनिपुष्पंतुतुवरंतिक्तंकिंचिच्चशीतलं ॥ पाकेकटुश्चविज्ञेयंवा
तलंपरिकीर्तितं ॥ नक्तांध्यंचप्रतिश्यायंज्वरंचातुर्थिकंकफं ॥
पित्तंचनाशयतिनदिदनुक्तंमहर्षिभिः ॥

अर्थ–अगस्त्याचें फूल तुरट, कडु, किंचित् शीतळ, पाककाळीं तिखट, वातकारक, असें आहे; व रातांधळें, पडसें, चातुर्थिकज्वर, कफ आणि पित्त यांचा नाश करितें.

## अगस्त्याच्या शेंगा.

मुनिशिंबीसराप्रोक्ताबुद्धिदारुचिदालघु ॥ पाककालेतुमधुरा
तिक्ताचैवस्मृतिप्रदा ॥ त्रिदोषशूलकफहृत्पांडुरोगविषापनु
त् ॥ शोषगुल्महराप्रोक्तामापक्वा रूक्षापित्तला ॥

अर्थ–अगस्त्याच्या शेंगा सारक, बुद्धिप्रद, रुचिकारक, लघु, पाककाळीं मधुर, कडु, स्मृतिप्रद अशा आहेत; आणि त्रिदोष, शूळ, कफ, पांडुरोग, विष, शोष, गुल्म, यांचा नाश करितात. हिची भाजी रूक्ष व पित्तकारक आहे.

## अगस्त्याची पानें.

पर्णंतुमुनिवृक्षस्यकटुतिक्तंगुरुस्मृतं ॥ मधुरंकिंचिदुष्णंचस्वच्छंकृमि
कफापहं ॥ कंडूंविषंरक्तपित्तंनाशयेदितिकीर्तितं ॥

अर्थ–अगस्त्याची पानें तिखट, कडु, जड, मधुर, किंचित् उष्ण, स्वच्छ, अशीं आहेत, व कृमि, कफ, कंडु, विष, रक्तपित्त यांचा नाश करितात.

## अशोक.

अशोकोमधुरःशीतश्चास्थिसंधानकृन्मतः ॥ प्रियःसुगंधिःकृमिकृत्तुवरोष्णश्चातिकटुकः ॥ शरीरकांतिकृच्चैवस्त्रीणांसुच्छोकनाशनः ॥ ग्राही पित्तहरोदाहश्रमगुल्मोदरापहः ॥ शूलाध्मानविषंचार्शोव्रणंसर्वांतृषां तथा ॥ शोथापचीतृषांचैवनाशयेद्रक्तजांरुजं ॥

अर्थ–अशोक मधुर, शीत, अस्थीला सांधणारा, प्रिय, सुगंधि, कृमिकारक, तुरट, उष्ण, कटु, शरीराची कांति करणारा, स्त्रियांच्या शोकाचा नाशक, ग्राहक, पित्तहर व दाह, गुल्म, उदर, शूल, आध्मान, विष, अर्श, व्रण, संपूर्णतृषा, शोथ, अपची, तृषा, रक्तरोग यांचा नाश करितो.

## अतिविष ३ प्रकारचें.

त्रिप्रकारंचातिविषंकिंचिदुष्णंचातिकटुकं ॥ अग्निदीप्तिकरंग्राहित्रिदोषाणांचपाचकं ॥ कफपित्तज्वरामातिसारकासविषापहं ॥ यकृद्भ्रांतिंतृषां चैवकृमीनर्शांश्चपीनसं ॥ पित्तोदरंचातिसारंहर्षव्याधिहरंमतं ॥

अर्थ–अतिविष तीन प्रकारचें. किंचिदुष्ण, तीक्ष्ण, अग्निदीपक, ग्राहि, त्रिदोष पचविणारें. कफपित्तज्वर, आमातिसार, कास, विष, यकृत, भ्रांति, तृषा, कृमि, अर्श, पडसें, पित्तोदर, अतिसार व सर्वव्याधि यांचे नाशक आहे.

## अलिता.

अलितोष्णातिक्तकटुःस्यात्कफवातव्रणापहः ॥ व्यंगारुचिकंठरुजंव्रण दोषंचनाशयेत् ॥ अन्येगुणास्तुलाक्षावत्प्रोक्ताःपूर्वमहर्षिभिः ॥

अर्थ–अलिता उष्ण, कडु, आहे; व कफ, वायु, व्रण, वांग, अरुचि, कंठरोग, व्रण दोष यांचा नाश करितो. वरकडगुण लाखेसारिखेच आहेत.

## अफु.

जारणोमारणश्चैवधारणःसारणस्तथा ॥ आहिफेनश्चतुर्धोक्तोगुणास्तस्य ब्रवीमिते ॥ वृष्योबलकरोग्राहीसप्तधातुविशोषकः ॥ वातपित्तकृदानंदकारकोनेत्रमादकः ॥ वीर्यस्तंभकरस्तिक्तोमधुरश्चप्रकीर्तितः ॥ सन्निपातकृमिकफपांडुक्षयविनाशकः ॥ मेहादीन्श्वासकासंचप्लीहा न्धातुक्षयंतथा ॥ नाशयेदितिचप्रोक्तोविशेषस्तस्यकथ्यते ॥ श्वेतवर्णोजारणःस्याद्भुक्तमन्नंचजारयेत् ॥ मृतिप्रदःकृष्णवर्णोमारणस्तुप्र

कीर्तितः ॥ जरानाशकरःपीतोधारणःसप्रकीर्तितः ॥ चित्रवर्णःसार
णःस्यान्मलसारणकार्यतः ॥

**अर्थ**—अफु जारण, मारण, धारण, आणि सारण अशी चार प्रकारची आहे. ती वृष्य, बलकर, ग्राहिणी, सात धातूंचा शोषकरणारी, वातपित्तकर, आनंदकारक, मादक, वीर्यस्तंभकर, कडु, मधुर, अशी आहे; व सन्निपात, कृमि, कफ, पांडु, क्षय, मेह, दमा, खोकला, प्लीहा, धातुक्षय, यांचा नाश करित्ये. ही श्वेतवर्ण असत्ये. ती अन्नाला जिरवित्ये; तिला जारण ह्मणतात; व काळी असत्ये ती मृत्युकारक ह्मणून मारण ह्मणतात, जी पिवळी ती जरानाशकरणारी तिला धारण ह्मणतात; आणि चित्रवर्ण ती मळाचें सारण करित्ये; ह्मणून तिला सारण ह्मणतात.

## अळु साधारण.

अलुकंशीतलंचैवअग्निदीप्तिकरंतथा ॥ मलस्तंभकरंप्रोक्तंमधुरंतु
जडंमतं ॥ रूक्षंवृष्यंदुर्जरंचबलवृद्धिकरंपरं ॥ स्तन्यकृन्मलमूत्रा
णांकफवायोश्चवृद्धिकृत् ॥ रक्तपित्तंनाशयतिकंदोधातुविवर्धनः ॥

**अर्थ**—अळु साधारण—शीत, अग्निदीपक, मलस्तंभक, मधुर, जड, रूक्ष, वृष्य, दुर्जर, बलवर्धक, स्तनांतलि दूध वाढविणारें व मल, मूत्र, कफ; आणि वायु याना वाढविणारें आणि रक्तपित्तनाशक आहे; व याचा कंद धातुवर्धक आहे.

## गोड राजाळु.

मधुराजालुकंशीतंमधुरंवायुकारकं ॥ पाकेकटुचविज्ञेयंरुचि
दंदाहपित्तनुत् ॥ शोषतृट्कफनुत्प्रोक्तमस्यकंदस्तुशीतलः ॥
अग्निमांद्यंमलस्तंभकफकृत्पित्तनुत्परः ॥

**अर्थ**—गोड राजाळु- शीत, मधुर, वातकर, पाककाळीं तिखट, रुचिकर, असें आहे; आणि दाह, पित्त, शोष, तृषा व कफ यांचा नाश करितें. याचा कांदा थंड आहे; व अग्निमांद्य, मलस्तंभ आणि कफ यानां करणारा व पित्तनाशक आहे.

## लाल राजाळु.

रक्तराजालुकंकिंचिदुष्णंचाग्निप्रदीपकं ॥
कफवातहरंचैवऋषिभिःपरिकीर्तितं ॥

**अर्थ**—लाल राजाळु किंचित् उष्ण, अग्निदीपक, कफ व वायु यांचे नाशक आहे.

## राजाळुभेद अतुई.

राजालुभेदःसंप्रोक्तश्चातुईइतिनामतः ॥ मलावष्टंभकःस्निग्धोजडो
बलकरोमतः ॥ कफनाशकरश्चैवतैलेपक्वोरुचिप्रदः ॥

अर्थ–राजाळुभेद अतुई–मलस्तंभक, स्निग्ध, जड, बलकर, कफनाशक अशी आहे. तेलांत तळून भक्षण केली असतां; रुचिकारक अशी आहे.

## श्वेतअळु.

श्वेतालुकिंचित्कटुकमुष्णंवातकफापहं ॥

अर्थ–श्वेतअळु–किंचित् तिखट, ऊष्ण, आहे; आणि वायु व कफ यांचा नाश करितें.

## काळें अळु.

कृष्णालुकंतुमधुरंशीतवीर्यंश्रमापहं ॥
पित्तदाहहरंचैवऋषिभिःपरिकीर्तितं ॥

अर्थ–काळें अळु–मधुर,शीतवीर्य,श्रमनाशक, आहे;आणि पित्त व दाह यांचा नाश करितें.

## काळें रानअळु.

कृष्णंवनालुकंरुच्यंमहासिद्धिकरंपरं ॥
मुखजाड्यहरंप्रोक्तंमुनिभिस्तत्वदर्शिभिः ॥

अर्थ–काळें रानअळु– रुचिकर, महासिद्धिकर व मुखजाड्यनाशक आहे.

## रानअळु.

वनालुकंतृप्तिकरंत्रिदोषशमनंपरं ॥

अर्थ–रानअळु तृप्तिकर व त्रिदोषनाशक आहे.

## कासाळु खवरें.

कास्यालुकंकडुकरंमधुरंपथ्यकारकं ॥
दीपकंरुचिदंप्रोक्तंकफवातरुजापहं ॥

अर्थ–कासाळु. खाजकरणारें– गोड, पथ्यकारक, दीपक, रुचिप्रद, आहे; आणि कफवातरोगाचा नाश करितें.

## अगरु.

अगरुस्तुसुगंधिःस्यादुष्णस्तिक्तःकटुःस्मृतः ॥ स्निग्धोमंगलदो
रुच्योधूपयोग्यश्चापित्तलः ॥ तीक्ष्णोवातकफौहंतिकर्णनेत्ररुजाप
हः ॥ कुष्ठनाशकरःप्रोक्तोलेपेचोद्वर्तनेशुभः ॥

**अर्थ**–अगरु–सुगंधि, उष्ण, कटु, तिखट, स्निग्ध, मंगलकारक, रुच्य, धूपाविषयीं योग्य, पित्तकर, तीक्ष्ण, असा आहे; आणि वायु, कफ, कर्णरोग, कुष्ठ, यांचा नाशक आहे; व लेपाविषयीं किंवा आंगास लावण्याविषयीं उत्तम आहे.

## कृष्णागरु.

कृष्णागरुःकटुस्तिक्तश्चोष्णोलिपेतुशीतलः ॥ प्राशनेपित्तहृत्प्रोक्तःपौष्टिकश्चलघुःस्मृतः ॥ चूर्णंपित्तकरंप्रोक्तंकर्णरुङ्नेत्ररोगहा ॥ त्रिदोषदाहत्वग्दोषकफवातविनाशकृत् ॥

**अर्थ**–कृष्णागरु–तिखट, कडु, ऊष्ण, लेप केला असतां; पित्तनाशक, पौष्टिक, लघु असा आहे; आणि याचें चूर्ण पित्तकारक आहे, व कर्णरोग, नेत्ररोग, त्रिदोष, दाह, त्वग्दोष, कफ आणि वायु यांचा नाश करितो.

## दाहागरु.

दाहागरुःकिंचिदुष्णःसुगंधिःकटुकःस्मृतः ॥
केशवृद्धिकरःकांतिप्रदःकेशविशोधकः ॥

**अर्थ**–दाहागरु–किंचिदुष्ण, सुगंधि, तिखट, केशाची वृद्धिकरणारा, कांतिकारक आणि केशशोधक असा आहे.

## काष्ठागरु,

काष्ठागरुःकटुश्चोष्णोलिपेरूक्षःकफप्रणुत् ॥
मुखरुग्वांतिवातांश्चनाशयेदितिकीर्तितः ॥

**अर्थ**–काष्ठागरु–तिखट, ऊष्ण, लेपाविषयीं रूक्ष, कफनाशक असा आहे; आणि मुखरोग, वांति, वायु यांचा नाश करितो.

## स्वाद्वागरु.

स्वाद्वागरुस्तुतुवरश्चोष्णोनस्येमवातहा ॥

**अर्थ**–स्वाद्वागरु–तुरट, ऊष्ण. आहे; आणि नस्यानें वातनाश करितो.

## मांगल्यागरु.

मांगल्यागरुकःशीतःसुगंधिर्योगवाहकः ॥

**अर्थ**–मांगल्यागरु–शीतळ, सुगंध; आणि योगवाहक असा आहे.

## अर्कपुष्पी,( शिरदोडी.

अर्कपुष्पीचोष्णवीर्यावृष्याचमलस्तंभकृत् ॥
कृमिमेहश्वेतकुष्ठकफपित्तविकारनुत् ॥

अर्थ—अर्कपुष्पी, शिरदोडी—उष्णवीर्य, वृष्य, मलस्तंभक अशी आहे; आणि कृमि-मेह, श्वेतकुष्ठ, कफ आणि पित्तविकार यांचा नाश करित्ये.

## अर्गट, कंटकवृक्ष, एरवणी.

अर्गटस्तुवरःशीतवीर्योव्रणविशोधनः ॥ व्रणरोपणकश्चैवपुष्पमस्यमधुस्मृतं ॥ तिक्तंचज्वरपित्तघ्नंकफरक्तरुजापहं ॥

अर्थ—अर्गट, कंटकवृक्ष, एरवणी—शीतवीर्य, व्रणशोधक व व्रणरोपक असा आहे; आणि याचे फूल गोड व कडु आहे; व ज्वर, पित्त, कफ आणि रक्तरोग यांचा नाश करितो

## अम्लपर्णी.

अम्लपर्णीवातकफशूलस्यचविनाशिका ॥

अर्थ—अम्लपर्णी—वायु, कफ आणि शूल यांचा नाश करित्ये.

## अर्जुनसादडा.

अर्जुनस्तुवरश्चोष्णोमधुरःशीतलःस्मृतः ॥ कांतिदोबलकृच्चैवलघुर्व्रणविशोधकः ॥ अस्थिभंगास्थिसंहारिहितःकफविनाशकः ॥ पित्तश्रमतृपादाहमेहवातविनाशकः ॥ हृद्रोगंपांडुरोगंचविषबाधांक्षतक्षयं ॥ मेदोवृद्धिरक्तदोषंघर्मश्वासंक्षतंतथा ॥ भस्मरोगंनाशयतिइतिपूर्वैर्निरूपितं ॥

अर्थ—अर्जुनसादडा—तुरट, मधुर, शीतळ, कांतिकारक, बलकर, लघु, व्रणशोधक असा आहे; आणि अस्थिभंग, संधिभंग, कफ, पित्त, श्रम, तृषा, दाह, मेह, वायु, हृद्रोग, पांडुरोग, विषबाधा, क्षतक्षय, मेदवृद्धि, रक्तदोष, घाम, दमा, क्षत व भस्मरोग यांचा नाश करितो.

## अनुलेपन, उटी.

अनुलेपनकंबल्यंतेजःसौभाग्यदायकं ॥ त्वच्यंप्रीतिप्रदंप्रोक्तंतृण्मूर्छाश्रमनाशनं ॥ दौर्गंध्यवातहंप्रोक्तंपूर्वाचार्यैरिदंस्मृतं ॥

अर्थ—अनुलेपन-उटी—बलकर, सौभाग्य व तेज यांते देणारे, त्वचेला हितावह, प्रीतिकर असे आहे; आणि तृषा, मूर्छा, श्रम, दुर्गंध, आणि वायु यांचा नाश करितें.

## अजमोद.

अजमोदोरुचिकरोदीपकःकटुरूक्षकः॥ उष्णोविदाहीहृद्यश्चवृष्योबलकरोलघुः ॥ तिक्तोमलस्तंभकरोग्राहकःपाचकःस्मृतः॥ आध्मानशूलकफहृद्धातारोचकनाशनः॥ उदराणिकृमींश्चैववांतिंनेत्ररुजंजयेत्॥ वस्तिशूलंदंतरोगंगुल्मंशुक्ररुजंतथा ॥

अर्थ—अजमोदा—रुचिकर, दीपक, तिखट, रूक्ष, उष्ण, विदाहक, हृद्य, वृष्य, बलकर, लघु, कडु, मलस्तंभक, ग्राहक, पाचक, असा आहे; आणि आध्मान, शूल, कफ, वायु, अरुचि, उदरें, कृमि, वांति, नेत्ररोग, बस्तिशूल, दंतरोग, गुल्म आणि शुक्रदोष यांचा नाश करितो.

## आजवला, पांढरा व काळा.

आजवल्लःकटुश्चोष्णःशीतोदाहकरःप्रियः ॥ रूक्षोरुच्योदीपकःस्यात्पाकेलघुचपित्तलः ॥ तिक्तश्चमधुरश्चैवसुखप्रसवकारकः ॥ व्रण्योवातहरश्चैवकफनेत्ररुजापहः ॥ मूत्रकृच्छ्रारुचिविषकामलाकुंभकामलाः ॥ आनाहवातशूलाग्निमांद्यत्वग्विषरुक्कृमीन् ॥ रक्तदोषश्वासकासदद्रुहृत्पार्श्वरुग्ज्वरान् ॥ कंडुकुष्ठवमीश्चैवनाशयेदितिकीर्तितः ॥

अर्थ—आजवला—पांढरा व काळा—तिखट, उष्ण, शीत, दाहक, प्रिय, रूक्ष, रुच्य, दीपक, पाककाळीं लघु, पित्तकर, कडु, मधुर, सुखानें प्रसव करणारा, व्रणाविषई हितकर आणि वायु, कफ, नेत्ररोग, मूत्रकृच्छ्र, अरुचि, विषदोष, कावीळ, कुंभकावीळ, आनाह वायु, शूल, अग्निमांद्य, त्वग्रोग, विरोग, कृमि, रक्तदोष, दमा, खोकला, दद्रु, हृद्रोग, पार्श्वशूल, ज्वर, कंडु, कुष्ठ आणि वांति, यांचा नाश करितो.

## सुगंधआजवला.

सुगंधाजवलःप्रोक्तःकटुश्चोष्णश्चतृप्तिकृत् ॥ सुगंधःपित्तकृन्निद्राजनकोवांतिवातनुत् ॥ ग्रहबाधापार्श्वशूलकासश्वासकफान्जयेत् ॥ शोथंचांगस्यदौर्गंध्यंनाशयेदितिकीर्तितः ॥

अर्थ—सुगंधाजवला—तिखट, उष्ण, तृप्तिकर, सुगंध, पित्तकर, निद्रा, वांति, वातरोग, विष, ग्रहबाधा, पार्श्वशूल, खोकला, दमा, कफ, सूज, आणि आंगाचा दुर्गंध यांचा नाशक आहे.

## आगीदवणा, अग्निदमनी, धमासाभेद.

अग्निदमनकःप्रोक्तोरुच्यश्चोष्णोग्निदीपनः ॥ रूक्षःप्रियश्चसंप्रोक्तोवातगुल्मकफापहः ॥ प्लीहादिनाशकश्चैवऋषिभिःपरिकीर्तितः ॥

अर्थ—आगिदवणा, अग्निदमनी, धमासाभेद— हा रुचिकर, उष्ण, अग्निदीपक, रूक्ष, आणि वायु, गुल्म कफ, प्लीहा, यांचा नाशक आहे.

## आंबा कोवळा.

बालाम्रस्तुवरश्चोष्णःसुगंधिश्चाम्लकःस्मृतः ॥ क्षारस्ययोगाद्रु

विरोधाहीकर...स्त्रिदः ॥ पित्तवातकफास्त्रक्दोषाविबंधकरो...
कंठरुग्वातमेहघ्नयोनिदोषव्रणांतथा ॥ अतिसारंप्रमेहं च...
...ति: ॥

अर्थ— आंबा साधारण कोंवळा— तुरट, उष्ण, सुगंधि, आंबट, ... रुचकर, ग्राहक, रुक्ष, कांति, पित्त, वात कफ, रक्तदोष यानां उत्पन्न करणारा; आणि कंठरोग वातमेह, योनिदोष, व्रण अतिसार व प्रमेह यांचा नाशक आहे.

## बांठळलेला आंबा.

सबीजाम्रः पित्तकफशुक्रमांसबलप्रदः ॥
अन्येगुणास्तुबालाम्रइवप्रोक्ताश्चिकित्सकैः ॥

अर्थ— बांठळलेला आंबा— पित्त, कफ, शुक्र, मांस व बल यानां देणारा असा आहे. बाकीचे गुण बालाम्रासारिखे आहेत.

## झाडावर पिकलेला आंबा.

पक्काम्रोमधुरः शुक्रवर्धकः पौष्टिकः स्मृतः ॥ गुरुः कांतितृप्तिकरः किं
चिदम्लोरुचिप्रदः ॥ हृद्यो मांसबलानांच वर्धकः कफकारकः ॥ तुवर-
श्च तृषावातश्रमाणां नाशकः स्मृतः ॥ कृत्यापक्कः पित्तहंता गुणाश्चान्ये
तु पूर्ववत् ॥

अर्थ— झाडावर पिकलेला आंबा— मधुर, शुक्रवर्धक, जड व पुष्टिकारक, कांति व तृप्ति यांना करणारा, किंचित् आंबट रुचकर, प्रिय मांसवर्धक बलकर कफकारक, तुरट असा आहे; आणि तृषा वायु व श्रम यांचा नाशक आहे. आढीचा आंबा पित्तनाशक आहे बाकीचे गुण वरल्यासारखेच आहेत.

## कोंवळा हुरसाल आंबा.

राजाम्रकः सबालस्तु कट्वम्लः पित्तलोगुरुः ॥ दाहकोमधुरो ग्राहीरू
क्षो बुद्धिकफप्रदः ॥ तथा रक्तश्वासवातान्करोतीत्येवमीरितं ॥

अर्थ— हुरसाल कोंवळा आंबा— तिखट, आंबट, पित्तकर, जड दाहक, मधुर ग्राहक, रूक्ष, असा आहे; आणि बुद्धि, कफ, रक्त दमा व वायु यांना कोपवितो.

## बांठळलेला हुरसाल आंबा.

उक्तआम्रस्तुबन्द्धास्थिरम्लोरूक्षः कषायकः ॥ रक्तदोषत्रि
दोषाणां कोपनोन्येतु पूर्ववत् ॥

अर्थ— बांठळलेला हुरसाळ आंबा— आंबट, रूक्ष, तुरट असा आहे; आणि रक्तदोष, त्रिदोष यांना कोपविणारा आहे; बाकीचे गुण पूर्वीसारिखेच आहेत.

## आढींत पिकलेला इरसाल आंबा

पक्वांम्रोमधुरः शीतो गुरुर्बलकरो मतः ॥ स्वादुर्धातुपुष्टिकर स्त्रिदोषघ्नः कफप्रदः ॥ अग्निदीप्तिकरो वृष्यो मलस्तंभकरः प्रियः ॥ स्निग्धः कषायः सुखदः कांतिदः परिकीर्तितः ॥ धातुतृड्दाहशमनः पित्तश्वास श्रमापहः ॥ अरुचिघ्नः सवृक्षेच पक्वः किंचित्सरः स्मृतः ॥ किंचित्पित्तकरश्चान्ये गुणाः पूर्व वदीरिताः ॥

अर्थ- आढींत पिकलेला इरसाल आंबा- मधुर, शीतळ, जड, बलकर, गोड, धातुवर्धक, पुष्टिकर, त्रिदोषनाशक, कफकर, अग्निदीपक, वृष्य, मलस्तंभक, प्रिय, स्निग्ध, तुरट, सुखकारक, कांतिवर्धक, असा आहे; आणि वायु, तृषा, दाह, पित्त, श्वास श्रम अरुचि याचा नाश करितो. हा झाडावर पिकलेला- सारक किंचित् पित्तकर- असा आहे. वरकड गुण पूर्वी सारखेच आहेत.

## आम्ररस.

आम्रस्यतु रसः स्निग्धः सुगंधिर्बलकृद्गुरुः ॥ चित्तानंदस्तृप्तिकरः सरो धातुविवृद्धिकृत् ॥ कफकृद्रुचिदः प्रोक्तो वातघ्नः परिकीर्तितः ॥ सैवदुग्धेन संयुक्तः कांतिदः स्वादकृत्स्मृतः ॥ वृष्यश्चान्ये गुणाश्चोक्ता रसेन सदृशास्मृताः ॥

अर्थ- आंब्याचा रस- स्निग्ध, सुगंधि, बलकर, जड, चित्ताला आनंद देणारा, तृप्तिकारक, सारक धातुवर्धक, कफकर, व रुचिप्रद व वात नाशक असा आहे; आणि तो-च दुधाशीं काढून भक्षण केला तर कांतिकर, स्वाददायक, वृष्य असा आहे. वरकड गुण रसासारिखेच आहेत.

## चोखून खाल्लेल्या आंब्याचे गुण.

चोषिताम्रो बलंरुचि वीर्यवृद्धिकरः परः ॥ लघुताशीतताशीघ्र पाकता वातपित्तनुत् ॥ मलबंधकरश्चैव पूर्ववैद्यै रुदीरितः ॥

अर्थ- चोखून खाल्लेला आंबा- बलकर, रुचिप्रद, वीर्यवर्धक व लघुत्व, शीतत्व, शीघ्र, पाकित्व व वात पित्त यांचा नाशक आणि मलबंधक असा आहे.

## पिकलेला कापून खाल्लेला आंबा.

पक्वः स्याच्छस्त्रछिन्नाम्रोजाड्यमाधुर्यशीतकृत् ॥ रुचिकृच्चिरपाकंच धातुवृद्धिकरोतिसः ॥ बलकर्तावातपित्तनाशनः परिकीर्तितः ॥

अर्थ- पिकलेला कापून खाल्लेला आंबा- जडत्व, मधुरता, शीतत्व, रुचि, चिरपाक, धातुवृद्धि आणि बल यांना करणारा व वातपित्ताचा नाशक असा आहे.

## आंबोशी·

आम्रस्कामस्तुवरश्चाम्लः स्वादिष्टो भेदकः स्मृतः ॥
कफवातहरः प्रोक्तो वैद्यैः सूक्ष्मार्थदर्शिभिः ॥

अर्थ- आंबोशी- तुरट, आंबट, स्वादिष्ट, मलभेदक अशी आहे; व कफ आणि वात यांचा नाश करित्ये·

## आंब्याची पोळी·

आम्रस्य पोलिकारुच्या सराल घ्वीतृषावहा ॥
वातपित्तवमी नां च नाशिनी परिकीर्तिता ॥

अर्थ- आंब्याची पोळी- रुचिकर, सारक, लघु अशी आहे; व तृषा वायु पित्त, आणि वांति यांचा नाश करित्ये·

## आंब्याची कोय·

आम्रबीजंतु मधुरं किंचिदम्लं कषायकं ॥ वांत्य-
तीसारहृद्दाहनाशनंच बुधैर्मतं ॥

अर्थ- आंब्याची कोय- मधुर, किंचित आंबट, तुरट अशी आहे; व वांति, अतिसार हृदयाचा दाह यांचा नाश करित्ये·

## आंब्याच्या कोईचे तेल·

आम्रतैलं तुतुवरं स्वादु रुक्षं च तिक्तकं ॥
सुगंधि मुखरोगस्य नाशनं कफवातजुत् ॥

अर्थ- आंब्याच्या कोईचें तेल- तुरट, गोड, रुक्ष, कडु आणि सुगंधि असें आहे; व मुखरोग कफ आणि वायु यांचा नाशकरितें·

## आंब्याची अंतसाल·

आम्रांतस्त्वग्ग्राहिणीतु तुवरा दाहकारिणी ॥
पित्तमेहकफानांच नाशिनी योनि शुद्धिकृत् ॥

अर्थ- आंब्याची अंतसाल - ग्राहक तुरट व दाहकारक अशी आहे; व पित्त, प्रमेह कफ यांचा नाश व योनिशुद्धि करित्ये·

## आंब्याचें मूळ·

आम्रमूलं तुतुवरं ग्राहि शीतं रुचिप्रदं ॥
सुगंधि कफवातानां नाशनं परिकीर्तितं ॥

अर्थ- आंब्याचें मूळ- तुरट, ग्राहक, शीतळ, रुचि देणारें, सुगंधि व कफ आणि वायु याचा नाश करितें.

## आंब्याची कोंवळीं पानें.

आम्रच्छदस्तुवरो ग्राहको रुचिकारकः॥
वातपित्तकफान् हंती त्येवंच परिकीर्तितं॥

अर्थ- आंब्याचीं कोंवळीं पानें- तुरट, ग्राहक, रुचिकारक, आहेत; व वायु पित्त, आणि कफ यांचा नाश करितात.

## आंब्याचा मोहोर.

आम्रपुष्पं शीतलंस्याद्वातलं ग्राहकं मतं॥ अग्निदीप्तिकरं रुच्यं कफपित्तप्रमेहनुत्॥ प्रदरंचातिसारंच नाशयेदिति मे मतं॥

अर्थ- आंब्याचा मोहोर- शीतळ, ग्राहक, वातकर, अग्निदीपक, रुचिप्रद, असा आहे; आणि कफ, पित्त, प्रमेह, प्रदर आणि अतिसार यांचा नाशकरितो.

## आंबट आंब्याचा रस.

अम्लाम्रस्य रसश्चाति भक्षितो विषमज्वरं॥ अग्निमांद्यं रक्तरुजं बन्हू विट्कोदरं तथा॥ नेत्ररोगं जनयति त्यतो बहु न भक्षयेत्॥ कदाचिद्भक्षितेचाथ शुंठी जीरकसंचलं॥ भक्षयेत्तेन तस्याशु विकारो नाशमाप्नुयात्॥

अर्थ- आंबट आंब्याचा रस- तो अतिभक्षण केला असतां; विषमज्वर, अग्निमांद्य, रक्तविकार, मलबंध, उदर, नेत्ररोग, यांना उत्पन्न करितो; म्हणून अतिभक्षण करूं नये. कदाचित् भक्षण केला तर; सुंठ, जिरें यांचें चूर्ण सैंधव घालून भक्षण करावें; म्हणजे त्याचा विकार नाश पावतो.

## आंबोली रक्तकोरांट्याचा भेद.

रक्तस्यच कुरंटस्य भेद आंबोलिसंज्ञकः॥ सतिक्तोष्णः शरीरस्य वर्णसौंदर्यकारकः॥ वातं शोथं ज्वरं शूलमाध्मानं श्वासकासकं॥ मुखरोगं बस्तिरोगं नाशयेदिति कीर्तितं॥

अर्थ- रक्तकोरांट्याचा भेद-आंबोली ती- कडु, उष्ण, वर्णकर, सुंदरताकारक अशी आहे; आणि वायु, सूज, ज्वर, शूल, आध्मान, दमा, खोकला, मुखरोग, बस्तिरोग यांचा नाश करिते.

## अरामशीतला रामशाली.

ग्रामशालिश्च तिक्ता स्याच्छीता विस्फोटनाशिनी॥ व्रणानां रोपणी चैव पित्तशोषकफापहा॥ कफं दाहं रक्तरुजं नाशयेदिति कीर्तितं॥

अर्थ- आरामशीतला- रामशाली- कडु, शीतळ, विस्फोटनाशक, व्रणरोपक, अशी आहे; आणि, पित्त, शोष, कफ, कफदाह; आणि रक्तरोग यांचा नाश करिते.

## आकाशवेल.

आकाशवल्लिका किंचित्कटुका मधुरापि या॥ वृष्या जराव्याधिहंत्री ग्राहिका ग्निप्रदीपनी॥ तुवराश्लेष्मसदृशीतिक्ता नेत्ररुजापहा॥ कफामपित्तहंत्रीच ऋषिभिः परिकीर्तिता.॥

अर्थ- आकाशवेल- किंचित् तिखट, मधुर, प्रिय, वृष्य, जराव्याधिनाशक, ग्राहिणी, अग्निदीपक, तुरट, बुळबुळित, कडु, अन्नी आहे; आणि नेत्ररोग, कफ, आम व पित्त यांचा नाश करिते.

## पांढरा आघाडा.

श्वेतश्चापामार्गकस्तुतिक्तो ष्णोग्राहकः सरः॥ किंचित्कटुः कांतिकरो पाचको ग्निः प्रदीपनः॥ नस्येवांतौप्रशस्तः स्यात्कफकंडूदरापहः॥ दुर्नामानं रुक्तरुजंमेदोरुगुदरे तथा॥ वातसिध्मापचीदद्रुवांत्यामानां विनाशकः॥

अर्थ- पांढरा आघाडा- कडु, उष्ण, ग्राहक, सारक, किंचित् तिखट, कांतिकारक, पाचक, अग्निदीपक असा आहे; आणि नस्य, वांति, याविषयी प्रशस्त व कफ, कंडू, उदर अर्श, रक्तदोष, मेदरोग, उदर, वायु, शिबी, अपची, दद्रु, वांति आणि आम यांचा नाश करितो.

## रक्त आघाडा.

रक्तापामार्गकः किंचित् कटुकः शीतलः स्मृतः॥ मलावष्टंभवमिकृद्वात विष्टंभकारकः॥ रुक्षोव्रणंविषंवातं कफंकंडूंच नाशयेत्॥ बीजमस्य रसे पाके दुर्जरं स्वादुशीतलं॥ मलावष्टंभकं रुक्षं वांतिकृद्रक्तपित्तजित्॥ कासनाशकरं प्रोक्तं मुनिभिस्तत्त्वदर्शीभिः॥

अर्थ- तांबडा आघाडा- किंचित् तिखट, शीतळ, मळावष्टंभक, वांतिकर, वायु व विष्टंभ यांना करणारा, रुक्ष असा आहे; आणि व्रण, विष, वायु, कफ, कंडू यांचा नाश करितो. याचें बीं रसकाळीं व पाककाळीं दुर्जर, गोड, शीतळ, मलावष्टंभक, रुक्ष, वांतिकर, रक्तपित्तनाशक आहे; व खोकल्याचा नाश करितें.

## पाण आघाडा.

तोयापामार्गकश्चोक्तः कटुः शोथकफापहः॥
कासं वातंचशोषंच नाशयेदितिच स्मृतः॥

अर्थ- तोयापामार्ग- पाण आघाडा- तिखट आहे; व सूज, कफ, खोकला, वायु, शोष यांचा नाश करितो.

## अश्वगंधाः आसंधं.

अश्वगंधोज्वराव्याधिनाशकस्तुवरःस्मृतः ॥ धातुवृद्धिकरः किंचित्कटुको बलदःस्मृतः ॥ कांतिप्रदश्चसंप्रोक्तस्तथाचमधुगंधिकः ॥ शरीरपुष्टिकारीचवृष्यश्चोष्णोलघुःस्मृतः ॥ वातंक्षयंश्वासकासंव्रणंश्वेतंच कुष्टकं ॥ कफंहृषकृमी-शोथंतथाचैवक्षतक्षयं ॥ कंडूनाशयतीत्येवं पूर्वाचार्यैर्निरूपितं ॥

अर्थ- अश्वगंध, आसंध-रसायण, तुरट, धातुवृद्धिकर, किंचित् तिखट, बलकर, कांतिकारक, मधुगंध, शरीराला पुष्टि देणारा, वृष्य, उष्ण, लघु, असा आहे; व वातक्षय, दमा, खोकला, व्रण, श्वेतकुष्ठ, कफ, विष, कृमि, सूज, क्षतक्षय, कंडू यांचा नाश करितो.

## आंवळी.

आमलक्यस्थिसंधानकराशुक्रविवर्द्धिनी ॥ शीताकेश्या तृषापित्तमेदोरुक्कफनाशिनी ॥ घर्मनाशकरीप्रोक्ता प्राज्ञैर्वैद्यैर्विशेषतः ॥

अर्थ- आमलकी, आंवळी,- अस्थिचे संधान करणारी, शुक्रवर्धक, शीत, केश्य अशी आहे; आणि तृषा, पित्त, मेदरोग, कफ, घर्म यांचा नाश करिते.

## आंवळे.

आमलक्याः फलं किंचित्कटुकं स्वादुतिक्तकं ॥ अम्लंचतुवरं शीतं जराव्याधिविनाशकं ॥ वृष्यंकेश्यंसारकंच हितंचारुचिनाशकं ॥ रक्तपित्तं प्रमेहंच विषज्वरंवमितथा ॥ आध्मानंबद्धविट्कत्वं शोथंशोषंतृषांतथा ॥ रक्तस्यविकृतिंचैवत्रिदोषंचैवनाशयेत् ॥ आम्लत्वाद्धातहंप्रोक्तंमाधुर्याच्चैवशीततः ॥ पित्तनाशकरंचोक्तंरुक्षत्वाच्च कषायतः ॥ कफनाशकरं प्रोक्तं पूर्वैर्विद्याविशारदैः ॥

अर्थ- आमलकी फळे,- आंवळे, किंचित् तिखट, गोड, कडु, आंबट, तुरट, शीत, जरा व व्याधि यांचे नाशक, वृष्य केश्य, सारक, हित, अरुचिनाशक, असे आहेत; आणि रक्तपित्त, प्रमेह, विष, ज्वर, वांति, आध्मान, बद्धविटकता, सूज, शोष, वाहान, रक्तविकार, त्रिदोष यांचा नाश करितात, हे आंबट आहेत म्हणून वायूचा नाश करितात; व मधुर आणि शीत आहेत या करितां पित्ताचा नाश करितात; व रुक्ष आणि तुरट आहेत म्हणून कफाचा नाश करितात.

## आवळकाठी.

आमलस्यफलंशुष्कं तिक्तमम्लंकटुस्मृतं ॥ मधुरंतुवरंकेश्यं भग्नसंधान

कारकं ॥ धातुवृद्धिकरंनेत्र्यंलेपनात्कांतिकारकं ॥ पित्तकफंतृषां घर्मं मेदो रोगविषंतथा ॥ त्रिदोषंनाशयेत्येवं पूर्वाचार्यैर्निरूपितं ॥

अर्थ– शुष्कामलक, आंवळकाठी– कडु, आंबट, तिखट, मधुर, तुरट, केश्य भग्न, संधानकर, धातुवर्धक, नेत्र्य आहे; व आंगाला लाविली असतां; कांतिकारक आणि पित्त, कफ, तृषा, घर्म, मेद, विष, त्रिदोष, यांचा नाश करित्ये·

## आंवळीच्या झाडांतील सार·

आमलक्यास्तुवृक्षस्यमज्जातुतुवरामधु ॥
वमिकृद्वातपित्तघ्नी चान्येतु फलवद्गुणाः ॥

अर्थ– आमलकीमज्जा, झाडांतील सार, तुरट, मधुर, आहे; आणि वांतिकर व वात पित्त यांचा नाश करित्ये· वरकड गुण आंवळ्या सारिखे आहेत·

## काष्ठामलकी लघु आंवळी·

लघु धात्रीतुतुवरा मधुरा बलदा कटुः ॥ किंचिदम्लारुचिरक्तदोषघ्नी वाग्निमांद्यकं ॥ नाशयेच्छीतपित्तंच गुणाश्चान्येतु पूर्ववत् ॥

अर्थ– काष्ठामलकी, लघु आंवळी– तुरट, मधुर, बलदायक, तिखट, किंचित् आंबट अशी आहे; आणि अरुचि, रक्तदोष, अग्निमांद्य, शीतपित्त, यांचा नाश करित्ये· इतर गुण पूर्व आंवळी सारिखे जाणावे·

## पान आंवळे किंचित्काळसर तांबुसवर्ण·

पर्णामलकं मधुरं रुचिप्रदं गुरुश्चोष्णं ॥ विषत्रिदोषशमनं कफतृष्णापित्त वातंहृ प्रोक्तं ॥ सुनरांतदेव पक्कं कफपित्त करं विशेषतश्चोक्तं ॥

अर्थ– पान आंवळे– किंचित्काळसर, व तांबुसवर्ण असतात; ते मधुर, रुचिप्रद, गुरु, उष्ण आहेत; आणि विषदोष, त्रिदोष, कफ, तृषापित्त व वायु यांचा नाश करितात; व ते पिकले असतां; विशेषकरून कफ व पित्त यांला करणारे आहेत·

## राय आंवळे हरपररेवडी·

रायामलं तुवरं रुचिप्रदं प्रियंचाम्लं ॥ तिक्तं रुक्षं विशदं स्वादु स्कगंधि वातलंचोक्तं ॥ स्वादिष्ठं लघु चोक्तं कफपित्तहरंच वातपित्तघ्नं ॥ मूत्राश्मर्यं शं घ्न मृषिभिश्चोक्तंच पूर्वजैर्ग्रंथे ॥

अर्थ– राय आंवळे, हरपररेवडी– तुरट, रुचिकर, प्रिय, आंबट, कडु, रुक्ष, विशद, गोड, स्कगंध, वातकर, स्वादिष्ट, लघु असे आहेत; आणि कफपित्त, वातपित्त, मूत्राश्मरी अशी यांचा नाश करितात·

## भुय आवळी.

भूम्या मलकी तुवरा तिक्ताम्लाम धुरा गुरुः ॥ शीता रुचि प्रदा चोष्णा पित्तमे
ह कफा पहा ॥ दृष्टि दाह पांडु रोगं मेह मूत्र रुजं तथा ॥ तृषा कासं रक्त दोषं
पित्तं वातं क्षत क्षयं ॥ श्वासं हिक्कां नाशयति खेचं चोक्त महर्षिभिः ॥

अर्थ– भुय आंवळी – तुरट, कडु, आंबट मधुर जड, शीत, रुचिकर, उष्ण, अशी आहे; व पित्त, मेह, कफ, दृष्टि रोग, दाह, पांडुरोग, मेह, मूत्रकृच्छ्र, तृषा, खोकला, रक्तदोष, पित्त, वायु, क्षत क्षय, दमा, उचकी यांचा नाश करिते.

## आरी, कंटकवृक्ष.

आरि तिक्ता तु तुवरा कट्वी चोष्णा च सं स्मृता ॥ रसे पक्के तु चाम्ला स्याद्र
क्तस्य च विकोपनी ॥ वातकासपित्तरुजं नाशये दिति कीर्तिता ॥

अर्थ– आरी, कंटकवृक्ष – कडु, तुरट, तिखट, उष्ण, रस काळीं व पाक काळीं आंबट, रक्त कोपन, अशी आहे; आणि वात कास, पित्तरोग यांचा नाश करिते.

## आरुक अलुबुखार.

अरुको ग्राहि तुवरो लघुः शीतो गुरुः स्मृतः ॥ मलावष्टंभको ग्राही भेदी चो
ष्णः कफापहः ॥ पित्तलत्पाचकश्चाम्लो मधुरश्च मुखप्रियः ॥ मुखस्य च्छ
करश्चैव मेह गुल्मार्शनुत्परः ॥ रक्त वात रुजां हंता सपक्को मधुरो गुरुः ॥ कफ-
पित्तकरश्चोष्णो रुच्यो धातु विवर्धकः ॥ प्रियश्चैव तथा प्रोक्तो मेहार्श ज्वर वा-
तहा ॥

अर्थ– आरुक, अलुबुखार – ग्राहक, तुरट, लघु, शीत, जड, मल स्तंभक, ग्राही, भेदक, उष्ण, आणि कफ पित्त, यांचा नाश करणारा, पाचक, आंबट, मधुर, मुखप्रिय मुखाला स्वच्छ करणारा असा आहे; आणि मेह, गुल्म, अर्श, रक्त वात यांचा नाशक आहे. तो पिकला असतां; मधुर, जड, आहे; व कफ, पित्त यांना करणारा, उष्ण, रुच कर धातु वर्द्धक, प्रिय व मेह, अर्श, ज्वर, वायु यांचा नाश करितो.

## आकोलवृक्ष. अंकोल.

अंकोलस्तु वरस्तिक्तोरसशुद्धि करो लघुः ॥ किंचित्कटुः सरः स्निग्धस्ती
क्ष्णश्चोष्णश्च रुक्षकः ॥ रसोवांति करश्चास्य विष दोष कफापहः ॥ वात
शूल शोथ कृमि ग्रह पीडामपि नहा ॥ रक्त दोष विसर्पघ्नः श्वानाखु विष
नाशनः ॥ ओतो र्विषं कटी शूलमति सारंच नाशयेत् ॥ पिशाच पीडा
शमनो बीजं चास्य तु शीतलं ॥ धातु वृद्धि करं स्वादु चाग्निमांद्य करं गुरु ॥

रसेपाकेतुमधुरंबलकृत्कफकृत्सरं ॥ स्निग्धंवृष्यंचदाहघ्नंवातपित्तक्षयापहं ॥ रक्तदोषंकफंपित्तंविसर्पंचैवनाशयेत् ॥

अर्थ– अंकोल, आकोलीवृक्ष-तुरट, कटु, पारदशुद्धी करणारा, लघु, किंचित् तिखट, सारक, स्निग्ध, तीक्ष्ण, उष्ण रुक्ष, असा आहे. याचा रस वांतिकारक, विष, कफ, वातशूळ, कृमि, सूज, ग्रहपीडा, आम, पित्त, रक्तदोष, विसर्प आणि कुतरें, उंदीर व मांजर यांचें विष, कटिशूळ, अतिसार, पिशाचपीडा; यांचा नाश करितो, याचें बीज– शीतल, धातुवृद्धिकर, स्वादु, अग्निमांद्यकर, जड, आणि रसकाळीं व पाककाळीं मधुर बलकर, कफकर, सारक, स्निग्ध, वृष्य, असें आहे; आणि दाह, वायु, पित्त, क्षय, रक्तदोष, कफ, पित्त आणि विसर्प यांचा नाश करितें.

## आलें.

शृंगवेरंरसेपाकेशीतलंमधुरंलघु ॥ कटुकोष्णंचहृद्यंच भेदकंचाग्निदीपकं ॥ रुक्षंरुचिप्रदंवृष्यंपाचकंसारकंमतं ॥ कंठ्यमग्नेर्मांद्यहरंशोथारुचिकफापहं ॥ वातंकंठरुजंकासंश्वासमानाहवातकं ॥ मलबंधंवमिंशूलं नाशयेदितिकीर्तितं ॥ तस्यांकुरारसाभावात्कफवातकरामताः ॥ रक्तदोषस्यशमनास्तेवृद्धाः कफनाशकाः ॥ कांजिकासैंधवंचार्द्रंपाचकंचाग्निदीपनं ॥ मलबंधामवातानांकफवातविनाशकं ॥ केवलंलवणेनाथमिश्रितं चाग्निदीपनं ॥ रुच्यंप्रियंसरंप्रोक्तंशोथवानकफापहं ॥ भोजनात्पूर्वेनश्चात्तंकंठजिव्हाविशोधकं ॥ जंबीरसैंधवयुतंरुचिदंमुखशुद्धिकृत ॥ मूत्रकृच्छ्रंपांडुरोगंरक्तपित्तंव्रणंतथा ॥ मूर्छाश्रमंज्वरंदाहंपित्तंग्रीष्मेशरद्यपि नाशयेदितिचप्रोक्तंशेषाविश्वासमागुणाः ॥

अर्थ– आलें– रसकाळीं व पाककाळीं शीतळ, मधुर, लघु, तिखट, उष्ण, हृद्य, भेदक, अग्निदीपक, रुक्ष, रुचिकर, वृष्य, पाचक, सारक, कंठाला हितावह, असें आहे; आणि अग्निमांद्य, सूज, अरुची, कफ, वायु, कंठरोग, खोकला, दमा, आनाहवात, मलबंध, वांति आणि शूल यांचा नाश करितें; त्याचे अंकुरांत रस नाहीं म्हणून कफ व वायू यांला करितात; व रक्तदोषांचा नाश करितात. ते जून झाले म्हणजे कफनाशक आहेत; आणि कांजी, सैंधव, आलें, हीं एकत्र भक्षिलीं असतां; पाचक, अग्निदीपक मलबंध, आमवायु, यांचा नाश करितात. तें आलें केवळ लवणाशीं मिश्र भक्षण केलें असतां; अग्निदीपक, रुच्य, प्रिय, सारक आहे; व सूज वायू कफ यांचा नाश करितें. तें भोजनापूर्वीं भक्षण केलें असतां; कंठ व जिव्हा यांची शुद्धि करितें. व लिंबु, सैंधव

याशी भक्षण केलें असतां; मुखशुद्धि करितें, व मूत्रकृच्छ्र, पांडुरोग, रक्तपित्त, व्रण, मूत्राश्मरी, ज्वर, दाह, पित्त, यांचा शरत्काळीं व ग्रीष्मकाळीं नाश करितें.

## आम्रातक, आंबाडा.

आम्रातकोगुरुश्चोष्णस्तुवरोम्लोरुचिप्रदः ॥ सरः कंठ्यः पित्तकफरक्त-कारीचसंस्मृतः ॥ आमवातस्यवातस्यचामस्यच विनाशनः ॥ सपक्वस्तु वरःशीतोगुरुर्वृष्योबलंकरः ॥ मधुरस्तृप्तिकफकृत्स्निग्धोधातुविवर्धकः ॥ मलस्तंभकरोवातकफपित्तविनाशनः ॥ रक्तरुग्दाहक्षतरुक्क्षयनाशकरोमतः ॥ पर्णंतुकोमलंचास्यरुच्यंग्राह्यग्निदीपकं ॥

अर्थ- आम्रातक, आंबाडा,- गुरु, उष्ण, तुरट, आंबट, रुचिकारक, सारक, कंठाला हितावह, व पित्त कफ आणि रक्त यांना करणारा आहे; व आमवायु, आम यांचा नाश करितो. तो पिकला असतां; तुरट, शीत, जड, वृष्य, बलकर, मधुर, तृप्तिकर, कफकर, स्निग्ध, धातुवर्धक, मलस्तंभक आहे; आणि वायू कफ, पित्त, रक्तदोष, दाह, क्षतरोग, क्षय यांचा नाशक आहे. ह्याचें कोंवळें पान, रुचिकर, ग्राहक, व अग्निदीपक असें आहे.

## आम्रवृक्षफळ, कोकंब.

आम्लवृक्षफलंचामंतुवरंरुचिकारकं ॥ आम्लंचोष्णंचाग्निदीप्तिकरंपित्तकरंगुरु ॥ कफकृत्कटुकंस्निग्धंहृद्रोगविनाशनं ॥ व्रणंवातंचातिसारंनाशयेदितिकीर्तितं ॥ तत्पक्वंमधुरंरुच्यंग्राहकंकटुकंलघु ॥ उष्णं-चाम्लंचतुवरंरूक्षंचाग्निप्रदीपकं ॥ कफवाततृषामातिसारजिद्ग्रहणीहरं ॥ आमवातंरक्तदोषंपित्तंचार्शश्चशूलकं ॥ गुल्मंव्रणंकृमींश्चैव हृद्रोगंचैवनाशयेत् ॥ वातोदरहरंचैववृक्षस्यापिगुणाइमे ॥

अर्थ- आम्रवृक्षफळ, कोकंब- तें हिरवें फळ तुरट, रुचिकारक, आंबट, उष्ण, अग्निदीपक, पित्तकर, गुरु, कफकर, तिखट, असें आहे; आणि वातोदर, व्रण, वायु, अतिसार, यांचा नाश करितें. तें पिकलें असल्यानंतर मधुर, रुच्य, ग्राहक, तिखट, लघु, उष्ण, आंबट, तुरट, रूक्ष, अग्निदीपक, असें आहे; व कफ, वायु, तहान, आमातिसार, संग्रहणी, आमवात, रक्तदोष, पित्त, अर्श, शूल, गुल्म, व्रण, कृमि, हृद्रोग, आणि वातोदर, यांचा नाश करितें; व वृक्षाचे ही असेच गुण आहेत.

## अश्मंतक, आपटा.

अश्मंतकस्तुतुवरश्चाम्लःशीतश्च ग्राहकः ॥ वातपित्तकफान्मेहंदाहं तृष्णांविषंतथा ॥ वातिंपिशाचबाधांच गंडमालांव्रणंतथा ॥ विषमंच

ज्वरं कंठरोगं रक्तविकारकं ॥ गलगंडं चातिसारं नाशयेच्च फलं तथा ॥ तु
वरं शीतलं ग्राहि स्वादु रूक्षं गुरु स्मृतं ॥ दोषाणां द्रावकं चैव मलरोधकरं
तथा ॥ आध्मानकारकं चैव कफवातविनाशकं ॥

अर्थ– अश्मंतक, आपटा– तुरट, आंबट, शीतळ, ग्राहक असा आहे; आणि वात, पित्त, कफ, मेह, दाह, तृषा, विषरोग, वांति, पिशाचबाधा, गंडमाला, व्रण, विषमज्वर, कंठरोग, रक्तविकार, गलगंड, अतिसार यांचा नाश करितो. याच्या शेंगा तुरट, शीतळ, ग्राहक, स्वादु, रुक्ष, गुरु, दोषद्रावक, मलरोधक, आध्मानकारक, आहेत; व कफ, वायु यांचा नाश करितात.

## आलु, अलुक.

अलुकं तुरसे शीतं स्वादु चाम्लं च संस्मृतं ॥
वातपित्तहरं चैव ऋषिभिः परिकीर्तितं ॥

अर्थ– आलु, अलुक– रसकाळीं शीत, गोड, आंबट, असें आहे; आणि वायु, पित्त, यांचा नाश करितें.

## आहाळींव.

आहलीवं स्मृतं चोष्णं तिक्तं त्वग्दोषनाशनं ॥
वातं गुल्मं नाशयति त्येवं प्रोक्तं चिकित्सकैः ॥

अर्थ– आहाळींव, उष्ण, कडु असें आहे; त्वचेचा दोष वायु आणि गुल्म यांचा नाश करितें

## आंब, हरभऱ्यांची.

चणकाम्लं चाग्निदीप्तिकरं रुच्यं पदुस्मृतं ॥ अत्यम्लं शूलशमनं दंतह
र्षणकारकं ॥ अजीर्णं चाग्निमांद्यं च नाशयेदिति कीर्तितं ॥

अर्थ– आंब हरभऱ्यांची, चणकाम्ल,– अग्निदीपक रुच्य, खारट, अति आंबट, व दांतांना आंबविणारी असी आहे; व शूल, अजीर्ण, अग्निमांद्य, यांचा नाश करिते.

## लहान व मोठी कंवडळ.

लघ्वींद्रवारुणी प्रोक्ता पाके कट्वी च तिक्तका ॥ शीता सरोष्णवीर्या च [illegible]
चैव प्रकीर्तिता ॥ गुल्मपित्तोदरकफकृमिकुष्ठज्वरव्रणान् ॥ श्वासकास
ग्रंथिमेहमूढगर्भककामलाः ॥ प्लीहानं शूलरक्तगर्भं च गलगंडं विषं तथा
॥ आनाहवातमपचीं चामं दूष्योदरं तथा ॥ सर्वोदराणि पांडुं च नाशयेदि
ति कीर्तिता ॥ अन्येंद्रवारुणी कंठरुजं च श्लीपदं तथा ॥ नाशयेदिति

संप्रोक्ता गुणाश्चान्ये तु पूर्ववत् ॥ रसे वीर्ये च पाके च अधिका चोक्ता गुणैरियं ॥

**अर्थ**— इंद्रवारुणी, लाहान व मोठी कंवडळ. पाककाळीं तिखट, कडु, शीत, सारक, उष्णवीर्य, लघु अशी आहे; आणि गुल्म, पित्त, उदर, कफ, कृमि, कुष्ठ, ज्वर, व्रण, श्वास, कास, ग्रंथि, मेह, मूढगर्भ, कावीळ, प्लीहा, शुष्कगर्भ, गलगंड, विष, आनाहवायु, अपची, आमदोष, दुष्योदर, संपूर्ण उदरें, पांडुरोग यांचा नाश करिते. आणि मोठी इंद्रवारुणी कंठरोग, श्लीपद यांचा नाश करिते. व रसकाळीं आणि पाककाळीं गुणानीं लहान इंद्रवारुणीहून अधिक आहे.

## इंद्रजव, कुड्याचें बीं.

वत्सकस्य तु बीजं च कटु तिक्तं च शीतलं ॥ ग्राहकं पाचकं चोष्णं चाग्निदीप्तिकरं परं ॥ वातरक्तं कफं दाहं पित्तं नानाज्वरांस्तथा ॥ शूलमर्शं चातिसारं त्रिदोषं गुदकीलकं ॥ कुष्ठकृमिविसर्पामरक्तार्शास्त्ररुजा भ्रमान् ॥ श्रमं चैव निहंत्याशु पुष्पं चास्य तु शीतलं ॥ तुवरं लघु तिक्तं च वातलं चाग्निदीपकं ॥ रक्तरुक् कफकुष्ठातिसारपित्तकृमीन् जयेत् ॥

**अर्थ**— इंद्रजव, कुड्याचें बीज— तें तिखट, कडु, शीतळ, ग्राहक, पाचक, उष्ण, अग्निदीपक असें आहे; आणि वातरक्त, कफ, दाह, पित्त, अनेक प्रकारचे ज्वर, शूळ, अर्श, अतिसार, त्रिदोष, गुदकील, कुष्ठ, कृमि, विसर्प, आम, रक्तार्श, रक्तरोग, भ्रम, व श्रम यांचा नाश करितें; आणि कुड्याचीं फुलें, शीतळ, तुरट, लघु, कडु, वातकर, अग्निदीपक, रक्तदोष, कफ, कुष्ठ, अतिसार, पित्त आणि कृमि यांचा नाश करितें.

## ईश्वरी, रुद्रजटा.

ईश्वरी कटुकाश्वासकासहृद्रोगनाशिनी ॥
भूतबाधां राक्षसानां पीडां चैव विनाशयेत् ॥

**अर्थ**— ईश्वरी, रुद्रजटा— तिखट आहे; व दमा, खोकला, हृद्रोग, भूतबाधा, राक्षसांची पीडा, यांचा नाश करिते.

## उटकटारी, उतारी.

उत्कटारी च दाहोष्णा तिक्ता वृष्याप्युदाहृता ॥ मूत्रकृच्छ्रं पित्तवातं मेहं तृष्णां च हृद्रुजं ॥ विस्फोटकं नाशयति बीजमस्याश्च शीतलं ॥ वृष्यं तृप्तिकरं चैव मधुरं च प्रकीर्तितं ॥

अर्थ- उटकटाग उनाटी- रुचिदायक उष्ण कटू वृष्य अशी आहे. व मूत्रकृच्छ्र पित्त वायु मेह तृषा हृद्रोग विस्फोट यांचा नाश करितें हीचें बीज शीतळ वृष्य तृप्तिकर आणि मधुर असें आहे.

## उंबराचें झाड.

उदुंबरः शीतलः स्याद्गर्भसंधानकारकः॥ व्रणरोपणकृद्रूक्षो मधुरस्तुवरो गुरुः॥ अस्थिसंधानकृद्वर्ण्यो कफपित्तातिसारकान्॥ योनिरोगं नाशयति त्वक्चैवास्य शीतला॥ दुग्धदं तुवरं गर्भ्यं व्रणनाशकरं स्मृतं॥ कोमलं चास्य च फलं स्तंभकृत्तुवरं मतं॥ हितं चाग्नितृषापित्तकफरक्तरुजापहं॥ मध्यमं कोमलं स्यात्तु शीतलं तुवरं मतं॥ पित्ततृषामोहकरं रक्तस्रावि वमोहरं॥ प्रदरं संसर्गाद्हि एमपक्वं तुवरं मतं॥ रुच्यं चाम्लं दीपनं स्यात् मांसवृद्धिकरं मतं॥ रक्तरुक्कारकं चैव दोषलं च जडं मतं॥ तत्पक्वं च कषायं स्यान्मधुरं कृमिकारकं॥ जडं रुचिप्रदं चातिशीतलं कफकारकं॥ रक्तरुक्पित्तदाहक्षुत्तृषाश्रमप्रमेहहृत्॥ शोषमूर्छाहरं प्रोक्तं पूर्वैः स्वस्थानिघंटके॥

अर्थ- उंबर वृक्ष- उंबराचें झाड, शीतळ गर्भसंधानकारक व्रणरोपक रूक्ष मधुर तुरट गुरु अस्थिसंधानकारक वर्णकर असा आहे. व कफ पित्त अतिसार योनिरोग यांचा नाश करितो. व याची साल शीतळ दुग्धप्रद तुरट गर्भाला हितावह व व्रणनाशक आहे. याचें कोंवळें फळ स्तंभक तुरट हितकर आहे; व तृषा पित्त कफ रक्त विकार यांचा नाश करितें. मध्यम कोंवळें फळ- गोड शीतळ तुरट आहे; व पित्त तृषा मोह यांना करितें व रक्तस्राव वांति प्रदर यांचा नाश करितें; त्याचें जून फळ तुरट रुचिकर आंबट दीपन मांसवृद्धिकर रक्तदोषकारक दोषल व जड असें आहे; आणि पिकें फळ- तुरट मधुर कृमिकर जड रुचिकर अतिशीतळ कफकर असें आहे, व रक्तदोष पित्तदाह क्षुधा तृषा श्रम प्रमेह शोष मूर्छा यांचा नाश करितें.

## नदीउंबर.

नद्युंबरो गुणाः सर्वे सदृशास्तु स्मृता बुधैः॥
परंतु तस्माद्वीर्ये च रसे पाके त्वल्पका स्मृताः॥

अर्थ- नदीउंबर गुणांनी उंबरासारिखाच आहे. परंतु वीर्य व पाक यां विषयी अल्प॰

## काकोदुंबरिका. काळाउंब.

काकोदुंबरिका शीता तिक्ता स्यात्स्तंभका कटुः॥ तुवरा ग्राहिणी मोक्षाचें

द्रियाणांप्रसादका॥ त्वग्दोषकामलापित्तरक्तपित्तकफान्जयेत्॥ श्वे
तकुष्ठव्रणंपांडुरक्तरोगंचशोथकं दुर्नामाजंचोर्ध्वदोषंनाशयेदिति
कीर्तितं॥ फलमस्याःस्वादुशीतंतुवरंतृप्तिकारकं॥ गुरुधातुवृद्धिकरंपाके
चमधुरंस्मृतं॥ स्निग्धंमलस्तंभकरंपोष्टिकंग्राहिवातलं॥ कफरक्तवि
कारघ्नंतथादाहविषंजयेत्॥ अस्यास्तुत्वक्चातिसारनाशिकापरिकीर्तिता

अर्थ- काकोदुंबरिका गांठ्याउंबर किंवा काळाउंबर शीत कडु आंबट मलस्तंभक ति
खट तुरट ग्राहक इंद्रियप्रसादक अशी आहे, वत्वग्दोष, कावीळ, पित्त रक्तपित्त, कफ, श्वेतकु
ष्ठ व्रण पांडुरोग, रक्तदोष सूज अर्श ऊर्ध्वगतदोष यांचा नाश करिते. हीचें फळ गोड
तुरट शीतळ तृप्तिकारक. गुरु धातुवृद्धिकर पाककाळीं मधुर स्निग्ध मलस्तंभक पौष्टिक
ग्राहक, वातकर, व कफ रक्तविकार स्तनदाह विषदोष यांचा नाश करिते हीचीसाल अ
तिसार नाशक आहे.

## उंदिरकानी थोर.

आखुकर्णीद्विहत्स्कता शीतलामधुरस्मृता॥ रसबंधकरीत्यारसाय
न्यथशूलनुत॥ ज्वरकृमिव्रणांचाखुविषंचैवविनाशयेत॥

अर्थ- शूल, ज्वर, कृमि, व्रण, उंदिराचें विष, यांचा नाश करिते.

## लघु उंदिरकानी.

लघ्व्याखुकर्णीकटुकातिक्ताचोष्णाचशीतला॥ रसायनीसराज्ञेया
कषायाकफपित्तनुत॥ शूलज्वरकृमिग्रंथिमूत्रकृछ्रप्रमेहनुत॥ आ
नाहोदररुद्रोगविषपांडुभगंदरान्॥ कुष्ठानिनाशयेदेवंपूर्ववैद्यैर्निरु
पिता॥

अर्थ- लघुउंदिरकानी-तिखट कडु उष्ण शीतल रसायण सारक लघु तुरट अशी
आहे. व कफ पित्त शूल ज्वर कृमि ग्रंथिरोग मूत्रकृछ्र प्रमेह आनाह वगैरे यांचा नाश क
रिते.

## उंदिरमारी, उंदिरबिबवी, उंदिरबिगोळा.

मूषकारिस्तुकटुकानेत्र्याचाखुविषापहा॥
व्रणदोषंनेत्ररोगंनाशयेदितिचस्मृतं॥

अर्थ- उंदिरमारी-उंदिरबिबवी-उंदिरबिगोळा-तिखट नेत्रांना हितावह आहे व उंदराचें
विष व्रणदोष नेत्ररोग यांचा नाश करिते.

## श्वेतउपलसरी उपरसाळ उपटसळी.

श्वेतानुसारिवाशीतामधुरस्राकुलागुरुः॥ स्निग्धातिक्तासुगंधिश्चकुष्ठ

कंडूज्वरापहा॥देहदौर्गंध्याग्निमांद्यश्वासकासारुचिहरा॥आमत्रिदोषविषास्रद्रक्तरुक्प्रदरापहा॥कफातिसारतृड्दाहरक्तपित्तहरा परा॥
वातनाशकरीचोक्ताऋषिभिःसत्वदर्शिभिः॥

अर्थ- श्वेत उपळसरी- उपरसाळ, उपटसळी, शांवेल. ही शीतळ मधुर शुक्रकर जड स्निग्ध कडू सुगंधी अशी आहे. आणि कुष्ठ कंडू ज्वर देहाचा दुर्गंध अग्निमांद्य दाह खोंकला अरुची आमदोष त्रिदोष विष रक्तरोग प्रदर कफ अतिसार तृषा दाह रक्तपित्त आणि वायु यांचा नाश करितें.

## काळी उपलसरी.

कृष्णात्तुसारिवाशीतावृष्याचमधुरास्मृता॥
कफघ्नीचैवसंप्रोक्तागुणाश्चान्येतुपूर्ववत्॥

अर्थ- काळी उपळसरी शीतळ वृष्य मधुर कफनाशक आहे. बाकी गुणपांढऱ्या उपरसळी सारिखे आहेत.

## रानउडीद, माषपर्णी

माषपर्णी शुक्रवृद्धिकरावृष्याचतिक्तका॥बलदापोष्टिकाशीता रूक्षा कफकरीमता॥रक्तरुङ्नाशिनीग्राही त्रिदोषज्वरपित्तहा॥रक्तपित्तक्षयंकासंवातंशोषंचदाहकं॥वातपित्तंरक्तदोषंनाशयेदितिचस्मृतं॥

अर्थ- रानउडीद- माषपर्णी, शुक्रवृद्धिकर, वृष्य कडू बलदायक, पुष्टिकर शीत, रूक्ष कफकारक व ग्राहक अशी आहे; आणि रक्तदोष, त्रिदोष, ज्वर, पित्त, रक्तपित्त, क्षय, खोंकला, वायु, शोष, दाह, वातपित्त, रक्तरोग यांचा नाश करितें.

## उत्तरणी.

उत्तरिणीतुकटुकाशीतानेत्र्यालघुस्मृता॥उष्णास्निग्धासारकाच तुवराव्रणरोपणी॥कासव्रणकृमिश्वासज्वरपित्तप्रमेहकान्॥कफकुष्ठप्रलापांश्चवातंतंद्रांचदद्रुकं॥क्षयकासंमूत्रकृच्छ्रंयोनिरोगंचशोधकं॥नाशयेदितिसंप्रोक्तासुखप्रसवकारिणी॥शाकास्त्वस्याश्चोष्णावीर्यतिक्ताकृम्यर्शकुष्ठहृत्॥कफवातहरप्रोक्ताफलंत्वस्याःपटुःस्मृतं तिक्तमुष्णंचकटुकंलघुचाग्निप्रदीपकं॥पित्तकोपकरंचैवशिरोविषनाशनं॥

अर्थ- उत्तरिणी- तिखट, श्वेत, नेत्राला हितावह, लघु, उष्ण, स्निग्ध, सारक, तुरट, व्रणरोपण, खोंकला, व्रण, कृमि, दमा, ज्वर, पित्त, प्रमेह, कफ, कुष्ठ, प्रलाप, वायु, तंद्रा, दद्रु, क्ष

यकास, मूत्रकृच्छ्र, योनिरोग, सूज यांचा नाश करिते, व सुखानें प्रसव करणारी आहे. ही वीशाक-उष्णवीर्य व कडू आहे. व कृमी, अर्श, कुष्ठ, कफवात यांचा नाश करितें ही वें फळ खारट कडू उष्ण तिखट लघु अग्निदीपक पित्तकोपन विशद आणि विषनाशक आहे.

## उद्वर्तन उटणें.

उद्वर्तनंतु सुखदं चाग्निदीप्तिकरं परं ॥ त्वक्स्वच्छकरणं चैवह्यंगमार्दवकारकं ॥ त्वग्दोषपिटिकाकंडूव्यंगवातश्रमान् जयेत् ॥

अर्थ- उद्वर्तन उटणें- सुखकारक अग्निदीपक त्वचेला स्वच्छ करणारें अंगाला मृदु करणारें व त्वग्दोष पाटका, कंडू व्यंग वायू आणि श्रम यांचा नाश करितें.

## ऊंस साधारण.

इक्षुदंडोरसे पाके मधुरोवातनाशकः ॥ स्निग्धो गुरुर्मूत्रलश्च शीतो वृष्यो बलप्रदः ॥ कफपुष्टितृप्तिकृमिकांत्यानंदकरः सरः ॥ रक्तरुग्वातपित्तानां नाशनो मुनिभिः स्मृतः ॥ मूले चातिमधुः प्रोक्तो मध्येचमधुरः स्मृतः ॥ अग्रे पर्वसुक्षारः स्यान्न्यूनमाधुर्यदायकः ॥

अर्थ- ऊंस साधारण रसकाळीं व पाककाळीं मधुर, वातहर स्निग्ध गुरु मूत्रल-शीत वृष्य बलकर व कफ, पुष्टि तृप्ती कृमी कांती आणि आनंद यांना करणारा सारक असा आहे; रक्तदोष वायु व पित्त यांचा नाश करितो. ऊंसाचें मूळ अति मधुर, मध्य मधुर, शेंड्याला व पेरांत खारट किंचिन्न्यून व मधुर असा आहे.

## पांढरा ऊंस.

श्वेतेक्षुः कठिनश्चाग्निदीपकश्च गुरुः स्मृतः ॥ रुचिप्रदश्चाममूत्रकफमेदप्रमेहहृत्कान्त ॥ बलंचवर्धयत्येव पाके चोष्णो रसे मधुः ॥ अतिशीतः पोष्टिकश्च स्निग्धो वृष्यः सरः स्मृतः ॥ पित्तंदाहं श्रमं श्वासं रक्तपित्तंचनाशयेत् ॥

अर्थ- पांढरा ऊंस कठीण अग्निदीपक गुरु रुचिकर, व आमदोष मूत्र कफ मेद प्रमेह आणि बळ यांना वाढवितो; व पाककाळीं उष्ण रसाविषयीं मधुर अतिशीत पुष्टिकर स्निग्ध वृष्य सारक असा आहे; व पित्त दाह श्रम वायु रक्तपित्त यांचा नाश करितो.

## पुंड्रक चित्रवर्ण ऊंस.

पौंड्रकः श्चातिमधुरः शीतोरुक्षः कफप्रदः ॥ रसस्तृप्तिप्रदः प्रोक्तोदाहपित्तश्रमान् जयेत् ॥

अर्थ-पुंड्रक-चित्रवर्ण ऊंस-अतिमधुर, शीत, रुक्ष, कफकर, आहे. याचा रस तृप्तिकारक व दाह, पित्त, आणि श्रम, यांचा नाशक आहे,

## करंकशाली, रसाळ ऊंस.

करंकशालीमधुरोशीतलोरुचिकारकः ॥

मृदुर्वृष्यस्तेजबलवर्धनःपित्तदाहजित् ॥

अर्थ-करंकशाळी, रसाळ ऊंस- मधुर, शीतळ, रुचिकारक. मृदु, वृष्य आहे; व तेज, बल, याना वाढवितो; व पित्त, दाह यांचा नाश करितो.

## काळा ऊंस.

कृष्णेक्षुश्चमधुःपाकेमधुरोकटुकःप्रियः ॥

सरसोधातुवत्कृद्विदोषघ्नश्चसंस्मृतः ॥

अर्थ-काळा ऊंस-पाककाळीं मधुर, तिखट, प्रिय, सरस. धातुवर्धक, बलकर; आणि त्रिदोषनाशक आहे.

## तांवडा ऊंस

रक्तक्षुःशीतलःपाकिमधुरोमृदुवृष्यकः ॥ बलकांतिप्रदश्चैवधातुवृद्धिकरोगुरुः ॥ तुवरःपित्तदाहघ्नोवातविस्फोटनाशकः॥ मूत्राघातंमूत्रकृछ्रंरक्तदोषंचनाशयेत् ॥

अर्थ-तांबडा ऊंस शीतळ, पाककाळीं मधुर, मृदु, वृष्य, बलकर, कांति व धातुवर्धक, गुरु, तुरट, असा आहे; व पित्तदाह, वायु, विस्फोट, मूत्राघात, मूत्रकृछ्र, आणि रक्तदोष यांचा नाश करितो.

## दातानीं चाऊन खाल्लेला ऊंस.

चोपितेक्षुस्तुशीतःस्याद्वृष्यस्निग्धोरुचिप्रदः॥अविदाहीहर्षलःस्यात्प्रियःकिंचित्कफप्रदः॥ मूत्रशुद्धिकरःकांतिबलकृद्धातुवर्धकः॥ तृप्तिकरोरक्तदोषरक्तपित्तत्रिदोपहा॥अस्यप्रभावोमत्स्यंड्याःसमोमुनिभिरीरितः ॥

अर्थ-दातानीं चावून खाल्लेला ऊंस-वृष्य, स्निग्ध, रुचिप्रद, अविदाही, हर्षकर, प्रिय, किंचित्कफकारक, मूत्रशुद्धिकर, कांतिकर, बलकर, धातुवर्धक, तृप्तिकारक, असा आहे; व रक्तदोष, रक्तपित्त, त्रिदोष, यांचा नाश करितो, बाकी गुण खडीसाखरेसारखा आहे.

## चरकांत काढलेला उसाचा रस.

यंत्रनिष्पीडितश्चेक्षुरसोदाहविनाशकः ॥

मलस्तंभकरश्चाम्लोस्वादुःक्षारोगुरुःस्मृतः ॥

## एकवीरा.

एकवीरास्मृतातिक्ताचात्युष्णावातहास्मृता ॥
पक्षाघातंपृष्ठकटीशूलंचैवविनाशयेत् ॥

अर्थ–एकवीरा–कडु, अतिउष्ण, वातनाशक, अशी आहे; आणि पक्षघात, पृष्ठशूळ यांचा नाश करित्ये.

## एलान

आममेलानमम्लंस्यात्सरंचोष्णंगुरुस्मृतं ॥ वातघ्नंचैवसंप्रोक्तंपक्वंत च्छीतलंमधु ॥ बलकृद्वातपित्तघ्नमृषिभिःपरिकीर्तितं ॥

अर्थ–एलान–हिरवें फळ–आंबट, सारक, ऊष्ण, गुरु, वातनाशक आहे; व तें पिकलें असतां शीतळ, मधुर, बलकर, वातपित्तनाशक आहे.

## पांढरा सुतीं एरंड.

श्वेतोरुबूकःकटुकस्तीक्ष्णश्चोष्णोगुरुःस्मृतः ॥ मधुरस्तिक्तकोवृष्योगु रुःस्वादुःसरःस्मृतः ॥ वातोदावर्तकफहृज्ज्वरकासोदरापहः ॥ शोथ शूलकटीबस्तिशिरोरुङ्नाशनःस्मृतः ॥ श्वासानाहकुष्ठवध्मगुल्मप्ली हामपित्तहा ॥ प्रमेहोष्मावातरक्तमेदोंत्रावर्धनप्रणुत् ॥ अस्यभेदोबृ हच्छ्वेतोरसेपाकेगुणाधिकः ॥

अर्थ–पांढरा सुतींएरंड–तिखट, तीक्ष्ण, उष्ण, गुरु, मधुर, कडु, वृष्य, जड, स्वादु, सारक, असा आहे; व वायु, उदावर्त, कफ, ज्वर, खोकला, उदर, सूज, शूळ व कमर, बस्ति, मस्तक यांतील शूल, दमा, आनाहवायु, कोड, वध्मरोग, गुल्म, प्लीहा, आमपित्त, प्रमेह, ऊष्णता, वातरक्त, मेद व अंत्रवृद्धि यांचा नाश करितो. याचा भेद मोठा पांढरा एरंड रसकाळीं व पाककाळीं गुणानीं अधिक आहे.

## तांबडा सुतीं एरंड.

रक्तोरुबूकस्तुवरोरसेकटुर्लघुःस्मृतः ॥ तिक्तोवातकफश्वासकासकृम्य र्शवध्महा ॥ रक्तदोषंपांडुरुजभ्रांत्यरोचकनाशनः ॥ प्रायस्त्वन्येगुणा श्चास्यश्वेतवत्तसमीरिताः ॥ पर्णद्वयोस्तुसंप्रोक्तंवातपित्तस्यवर्धकं ॥ मूत्रकृच्छ्रंवातकफंकृमींश्चैवविनाशयेत् ॥ एतयोश्चांकुरोगुल्मबस्तिशू लकफकृमीन् ॥ वातंसप्तप्रकारंतुवृध्दिरोगंविनाशयेत् ॥ पुष्पंतुवात कफहृत्पित्तमूत्ररुजापहं ॥ रक्तपित्तंवर्धयातिफलमज्जाग्निदीपनी ॥ अ

त्युष्णाकटुकास्वादुपटुस्निग्धासरामता ॥ मलभेदकरालघ्वीगुल्म शूलकफापहा ॥ यकृद्वातोदरप्लीहावातार्शोनांविनाशिनी ॥

अर्थ—तांबडा मुर्नी एरंड—तुरट, रसकाळीं तिखट, लघु, कडु, असा आहे; व वायु, कफ, दमा, खोकला, कृमि, अर्श, वर्ध्मरोग, रक्तदोष, पांडुरोग, भ्रांति, अरुचि, यांचा नाश करितो; वरकड गुण पांढऱ्या एरंडाप्रमाणेंच आहेत; व या दोहोंचीं ही पानें वातपित्ताला वाढविणारीं, व मूत्रकृच्छ्र, वायु, कफ, कृमि, यांचा नाश करितात. याचे कोंवळे अंकुर गुल्म, बस्ति शूळ, कफ, कृमि, वायु सात प्रकारचा वृद्धिरोग, यांचा नाश करितात. याचें फूल वायु, कफ, पित्त, मूत्रकृच्छ्र, यांचा नाश करितें; व रक्तदोष, पित्त, यांना वाढवितें याचे बियांचे गोळे अग्निदीपक, अतिउष्ण, तिखट, गोड, खारट, स्निग्ध, सारक, मलभेदक, लघु, असे आहेत. व गुल्म, शूल, कफ, यकृत, वातोदर, प्लीहा, आणि वातार्श यांचा नाश करितात.

## एरंडतैल.

एरंडतैलंमधुरंसरंचोष्णंगुरुस्मृतं ॥ अरुच्यंचस्मृतंस्निग्धंतिक्तंव ध्मोदरापहं ॥ गुल्मवातकफांश्चैवशोथंचविषमंज्वरं ॥ कटिपृष्ठको ष्ठगुह्यशूलनाशकरंपरं ॥

अर्थ--एरंडाचें तेल—मधुर, सारक, उष्ण, गुरु, अरुचिकर, स्निग्ध, कडु, असें आहे. व वर्ध्म, उदर, गुल्म, वायु, कफ, सुज, विषमज्वर व कमर, पाठ, पोट, गुद, यांतिल शूल यांचा नाश करितें.

## एलची सूक्ष्मैला. इलाची.

त्रुटिस्तिक्ताचशीताचरसेकट्वीलघुस्मृता ॥ सुगंधिःपित्तलाचैवमु खमस्तकशोधिनी ॥ गर्भपातकरीरूक्षावातश्वासकफापहा ॥ का सार्शःक्षयविषरुक्बस्तिकंठरुजंहरेत् ॥ मूत्राश्मरींव्रणंकंडुंनाशयेदि तिकीर्तिता ॥

अर्थ—एलची. सूक्ष्मैला इलाची—कडु, शीतळ, रसकाळींतिखट, लघु, सुगंधि, पित्तकर, आहे; व मुख व मस्तक यांचें शोधन करणारी, गर्भपातकारक, रूक्ष, अशी आहे. व वायु, दमा, कफ, खोकला, अर्श, क्षय, विषदोष, बस्तिरोग, कंठरोग, मूत्रकृच्छ्र, अश्मरी, व्रण, आणि कंडु यांचा नाश करिते.

## एलदोडे (स्थूलैला.)

स्थूलैलाकटुकारूक्षारुचिकारीलघुस्मृता ॥ रसेपाकेचकटुकामुखशुद्धिकरीमता ॥ सुगंधिःपाचकाशीताचाग्निदीप्तिकरामता ॥ कफपित्तश्वासकंडूरक्तरुक्कासहृद्रुग्यथाः ॥ विषदोषतृषाबस्तिमुखमस्तकशूलनुत् ॥ वांतिनाशकरीप्रोक्ताऋषिभिस्तत्वदर्शिभिः ॥

**अर्थ**—एलदोडे स्थूलैला—तिखट, रूक्ष, रुचिकर, लघु, रसकाळीं व पाककाळीं तिखट, मुखशुद्धिकर, सुगंधि, पाचक, शीत, अग्निदीपन, अशी आहे; व कफ, पित्त, दमा, कंडु, रक्तरोग, खोकला, हृद्रोग, विषदोष, तृषा, व बस्ति, मुख, मस्तक यांचा शूल, वांति यांचा नाश करिते

## एकांगी मुरा. (मोरमांसी.)

एकांगीकटुकातिक्तातुवराशीतलामता ॥ लघुस्वादुसुगंधास्यादिंद्रियाणांचहर्षदा ॥ कफपित्तश्वासवातरक्तदोषविषापहा ॥ दाहभ्रमतृषामूर्छाज्वरकुष्ठविनाशिनी ॥ पिशाचराक्षसालक्ष्मीबाधानाशकरीमता ॥

**अर्थ**—एकांगीमुरा मोरमांसी—तिखट, कडु, तुरट, शीतळ, लघु, स्वादु, सुगंध, इंद्रियांना तृप्ति देणारी, अशी आहे; व कफ, पित्त, दमा, वातरक्त, रक्तदोष, विषदोष, दाह, भ्रम, तृषा, मूर्छा, ज्वर, कुष्ठ, पिशाच, राक्षस, यांची बाधा, अलक्ष्मी, यांचा नाश करिते.

## थोरऐरण (अग्निमंथ व टाकळा.)

अग्निमंथोबृहत्प्रोक्तःकटुश्चोष्णोमधुःस्मृतः ॥ तिक्तस्तुतुवरश्चाग्निदीपकोवातनाशनः ॥ प्रतिश्यायंकफंशोथमर्शश्चैवामवातकं ॥ मलरोधंचाग्निमांद्यंपांडुरोगंविषंतथा ॥ आमंचमेदोरोगंचनाशयेदितिकीर्तितः ॥

**अर्थ**—थोरऐरण, अग्निमंथ, टाकळा—तिखट, उष्ण, मधुर, कडु, तुरट, अग्निदीपक, असा आहे; व वायु, पडसें, कफ, सूज, अर्श, आमवात, मलरोध, अग्निमांद्य, पांडुरोग, विषदोष, आम, आणि मेदोरोग, यांचा नाश करितो.

### लघुऐरण (टाकळी. अग्निमंथ.)

लघ्वग्निमंथस्यगुणाःप्रोक्तावृध्याग्निमंथवत् ॥
विशेषाल्लेपनेचोपनाहेशोफेचकीर्तितः ॥

**अर्थ**—लघुऐरण टाकळी अग्निमंथ—याचे सर्व गुण थोर ऐरणी सारिखे आहेत; परंतु-विशेषें करून लेपन, पेंडबांधणें विषयीं हितकर आणि सूज याचा नाश करितो.

### तेजोमंथ ऐरणीचाभेद नरवेल.

तेजोमंथगुणाःप्रोक्ताश्चाग्निमंथसमाबुधैः ॥
विशेषाद्वातशोफेचप्रोक्तःपूर्वैश्चसूरिभिः ॥

**अर्थ**—तेजोमंथ, ऐरणीचा भेद, नरवेल, याचे गुण अग्निमंथासारिखेच आहेत. परंतु विशेषेंकरून वातशोफेचा नाश करितो.

### ऐरावती.

ऐरावतीरसेपाकेत्वम्लोष्णाचसुगंधिका ॥
वातंकासंश्वासरुजंनाशयेदितिकीर्तिता ॥

**अर्थ**—ऐरावति-रसकाळीं व पाककाळीं आंबट, उष्ण, सुगंध असी आहे. व वायु, खोकला दमा याचा नाश करित्ये.

### ओंवा (यवानी. अजवान.)

यवानीकटुकातिक्तारुच्याचोष्णाग्निदीपनी ॥ पाचनीपित्तलाती क्ष्णालघुहृद्याचसारका ॥ वृष्यावातार्शकफरुक्शूलाध्मानवमिकृमीन् ॥ शुक्रदोषोदरानाहहृद्रोगप्लीहगुल्मकान् ॥ द्वंद्वरोगामवातांश्चनाशयेदितिकीर्तिता ॥

**अर्थ**—ओंवा. यवानी: अजवान—तिखट, कडु, रुचिकर, उष्ण, अग्निदीपक, पाचक, पित्तकर, तीक्ष्ण, लघु, हृद्य, सारक, वृष्य, असा आहे. व वातार्श, कफ, शूल, आध्मान, वांति, कृमि, शुक्रदोष, उदर, आनाह, हृद्रोग, प्लीहा, गुल्म, द्वंद्वजरोग, आणि आमवात, यांचा नाश करितो.

### किरमाणी ओंवा. (चौहार. चोरओंवा. पारसीक यवानी.)

पारसीकयवानीतुतिक्तोष्णाकटुचोषणा ॥ अग्निदीप्तिकरीवृयाल

घ्वींचैवप्रकीर्तिता ॥ त्रिदोषाजीर्णकृमिनुच्छूलामस्यचनाशिनी ॥
विशेषात्तुगुणास्त्वन्येयवानीइवकीर्तिताः ॥

**अर्थ**–किरमाणी ओवा. चोहार. चोरओवा. पारसीकयवानी. कटु, उष्ण, तिखट, तीक्ष्णअग्निदीपक वृष्य, लघु, अशी आहे, व त्रिदोष, अजीर्ण, कृमि, शूल. आम. यांचा नाश करितो. बाकीचे गुणओव्या सारिखे आहेत.

## खुरासनीओवा. (खुरमाण.)

खुरासनीयवानीतुकटुरूक्षाचपाचका ॥ ग्राहकोष्णामादकाचगुर्वी
वातकरीमता ॥ कफनाशकरीप्रोक्तागुणास्त्वन्येयवानिवत् ॥

**अर्थ**–खुरासनी ओवा खुरमाण–तिखट, रूक्ष, पाचक, ग्राहक, उष्ण, मादक, गुरु, वातकारक कफनाशक. आहे. बाकीचे गुण यवानी सारिखे आहेत.

## अंजीर.

अंजीरःशीतलःस्वादुर्गुरुरक्तरुजाहरः ॥
दाहंवातंचपित्तंचनाशयेदितिकीर्तितः ॥

**अर्थ**–अंजीर. शीतळ, स्वादु, गुरु, आहे, आणि रक्तरोग, दाह, वायु, आणि पित्त यांचा नाश करितो.

## अन्नवर्ग.

भोजनंबलकृत्तृतिकारकंदेहधारकं ॥ उत्साहंचस्वरंकांतिंशुक्रधा
तुंकरोतिच ॥ बुध्धिधैर्यस्मृतीनांचकारकंसंप्रकीर्तितं ॥

**अर्थ**-आहार. जेवण (बलकर,) तृप्तिकारक, देहधारक आहे. व उत्साह, स्वर, कांति, शुक्रधातु बुध्धि, धैर्य, आणि स्मृति याना करिते.

## धुतलेल्या तांदळांचा वेळलेला भात.

धौतानामर्धपक्वानांकांडितानांचसर्वतः ॥ निःसारितजलानांचभक्तो
पथ्योग्निदीपनः ॥ तृप्तिकृन्मूत्रलःस्वच्छोलघुरुच्योष्णवीर्यकः ॥
कफवातहरश्चैवमुनिभिःपरीकीर्तितः ॥ अधौतानामहृतोदानांशी

तोऽरुच्योगुरुःस्मृतः ॥ शुक्रवृध्दिकरोवृष्योमधुरोग्राहितृप्तिदः ॥ क्षयरोगहरश्चैवहंताचकफवातयोः ॥

अर्थ- धुनलेल्या तांदळांचा वेळलेला भात—सडीक स्वच्छ तांदूळ घेऊन साफ धुवावे. आणि त्याचा अर्धकच्चा भात झाला ह्मणजे त्याची वेळून साफ पेज काढावी. तो भात. पथ्यकर, अग्निदीपन, तृप्तिकर, मूत्रल, स्वच्छ, लघु, रुचिप्रद, उष्णवीर्य व कफ, वात यांचा नाश करितो. धुनल्यावांचून व पेजकाढल्यावांचून तांदळांचा भात शीत, अरुचिकर, जड, शुक्रवर्धक, वृष्य, मधुर, ग्राही, तृप्तिदायक व क्षय, कफ, वायु, यांचा नाश करितो.

## भाजलेल्या तांदळाचा भात. (सोजी.)

भर्जितानांतंडुलानांभक्तोरुच्योलघुःस्मृतः॥ सुगंधिरुष्णःसंप्रोक्तो रेचकेवमनेतथा ॥ अस्थापनेचसंप्रोक्तोहितःकंठरुजापहः ॥ अरुचिंचकफंचैवनाशयेदितिकीर्तितः ॥ सचनूत्नजलेपक्तोलघुश्च पचतेक्षणात् ॥ जलेपर्युषितेपक्तोमूत्रलोमलकारकः ॥ रुक्षोमेदकफस्वेदक्लेददोषवर्धनः ॥ मांसस्नेहवसायाश्चवर्धकःपरिकीर्तितः॥

अर्थ—भाजलेल्या तांदळाचा भात. सोजी—रुचिकर, लघु, सुगंधि, उष्ण, व रेचक, वमन, व आस्थापन यांविषयीं श्रेष्ठ असा आहे- कंठरोग व अरुचि, कफ यांचा नाश करितो. तोच ताजापाण्यांत केला असतां लघु व लौकर पचन होतो. शिळ्या पाण्यांत केला असतां मूत्रल, मलकारक, रुक्ष, आहे. व मेद, कफ, स्वेद, क्लेददोष, मांस, स्नेह, वसा, यांना वाढवितो

## शाक, कंद, फळें, तेल, दूध, मांस, आंबट पदार्थ, व डाळी घालून केलेला भात.

शाककंदतैलफलदुग्धमांसैश्चदालिभिः ॥ अम्लैश्चयुक्तःपक्तोसौ बलतृप्तिकरःप्रियः ॥ धातुवृध्दिकरोवृष्योगुरुश्चैवकफप्रदः ॥

अर्थ—शाक, कंद, फळें, तेल, दूध, मांसरस, आंबट पदार्थ व डाळी घालून केलेला भात बलकर, तृप्तिदायक, धातुवर्धक, वृष्य, गुरु, आणि कफकर, असा आहे.

## धान्याम्ल घालून केलेला भात.

धान्याम्लेपाचितोभक्तोलघुश्चाग्निप्रदीपकः ॥ रुचिप्रदश्चसंप्रोक्तोवैद्यैःपाकविशारदैः ॥

**अर्थ**—धान्याम्ल घालून केलेला भात—लघु, अग्निदीपक, रुचिप्रद, असा आहे.

### मठ्ठा घातलेला भात.

भक्तोमथितयुक्तश्चस्वादुःशीतःप्रियःस्मृतः ॥ हृद्योग्निर्दीपकश्चैव पाचकःपौष्टिकःस्मृतः ॥ ग्रहण्यर्शामशूलानांनाशकःसंप्रकीर्तितः ॥ सचरात्रौभक्षितश्चेद्रुच्यस्तृप्तिकरःपरः ॥ दीपनोर्शश्रमाणांच नाशनःपरिकीर्तितः ॥

**अर्थ**—मठ्ठा घातलेला भात-स्वादु, शीत, प्रिय,हृद्य, अग्निदीपक, पाचक,पुष्टिकर, असा आहे. व ग्रहणी, अर्श, आमशूल,यांचा नाश करितो; तोरात्रीं भक्षण केला असता रुचिकर, तृप्तिकर, दीपन, असा आहे. व अर्श व श्रम यांचा नाश करितो.

### मुद्गयूपमिश्रित भात.

मुद्गयूपयुतोभक्तोशस्तोक्तश्चकफज्वरे ॥ शर्करामिश्रितश्चायंशीत पित्तज्वरेहितः ॥

**अर्थ**—मुद्गयूषमिश्रित भात—कफज्वरावर प्रशस्त आहे. व साकर घालून दिला असता शीत पित्त ज्वरावर हित कारक होतो.

### लाह्यांचा भात.

लाजाभक्तोलघुःशीतश्चाग्निर्दीतिकरोमधुः ॥ वृष्योनिद्राकरुचिकरः कफपित्तविनाशकः ॥ व्रणशोधनकारीस्याद्दापिभिःपरिकीर्तितः ॥

**अर्थ**—लाह्यांचा भात—लघु, शीत, अग्निदीपक, मधुर,वृष्य,निद्राकर,रुचिकर,असा आहे. व कफ, पित्त, यांचा नाश करितो. व व्रण शोधन आहे.

### जवांचाभात.(यावक.)

यावकोतिगुरुःस्वादुर्वृष्यःस्निग्धःप्रकीर्तितः ॥ गुल्मज्वरप्रतिश्यायकंटरुक्कासमेहहा ॥

**अर्थ**—जवांचा भात. यावक—गुरु, स्वादु, वृष्य, स्निग्ध, असा आहे. व गुल्म ज्वर, पडसें, कंटरोग, खोकला, आणि मेह, यांचा नाश करितो.

### खिचडी.(कृशरा.)

कृशरातृप्तिजननीगुरुर्वृष्याप्रियामता ॥

धातुवृद्धिकरीप्रोक्ताघृतयुक्ताचसर्वदा ॥

अर्थ—खिचडी. कृशरा—ही तुपाशीं भक्षण केली असतां तृप्ति जनक, गुरु, वृष्य, प्रिय धातुवर्धक, अशी आहे.

जोंधळ्यांचा भात.(कण्या. यौगंधर.)

यौगंधरोगुरुघनःकासश्वासप्रवृत्तिकृत् ॥

अर्थ—जोंधळ्यांचा भात(कण्या. यौगंधर—गुरु, घन, असा आहे. व खोकला, दमा, यानां करणारा आहे.

हरकांचा भात.

कोद्रुभक्तोरुचिकरोमधुरस्तुप्रमेहहा ॥

मूत्रदोषतृषाछर्दिकफवातामदाहनुत् ॥

अर्थ—हरकांचा भात—रुचिकर व मधुर, आहे, आणि प्रमेह, मूत्रदोष, तृषा, छर्दि कफ, वात, आम, आणि दाह, यांचा नाश करितो.

सांव्यांचा भात.

श्यामाकभक्तोरुचिदोलघुरुक्षश्चदीपनः ॥

बलवातकरोमेहगलरुङ्मूत्रकृच्छ्रहा ॥

अर्थ—सांव्यांचा भात—रुचिकर, लघु, रुक्ष, दीपन, बलकर, वातकर, असा आहे. व मेह, गलरोग, आणि मूत्रकृच्छ, यांचा नाश करितो.

नीवारान्न. देवभात.

नीवारभक्तोरुचिदोलघुर्दीपनकृद्गुरुः ॥

वातकारीयकृत्श्वासप्लीहामव्रणनाशनः ॥

अर्थ—नीवारान्न. देवभात—रुचिकर, लघु, दीपन, जड, वातकर, असें आहे, आणि यकृत, दमा, प्लीहा, आमदोष, आणि व्रण, यांचा नाश करितें.

कुलित्थान्न.

कुलित्थान्नंतुमधुरंतुवरंरुक्षमुष्णकं ॥ लघुतृप्तिकरंपाकेकटुकंच। ग्निदीपकं ॥ कफवातकृमिश्वासनाशनंपरिकीर्तितं ॥

अर्थ—कुलित्थान्न—मधुर, तुरट, रुक्ष, उष्ण, लघु, तृप्तिकर, पाककाळीं तिखट, अग्निदीपक, असें आहे. व कफ, वायु, कृमि, दमा, यांचा नाश करितें.

### माषान्न.

माषान्नंदुर्जरंप्रोक्तंमांसवृद्धिकरंगुरु ॥
वातनाशकरंवृष्यंमुनिभिःपरिकीर्तितं ॥

**अर्थ**—माषान्न—दुर्जर, मांसवर्धक, गुरु, वातनाशक, वृष्य, असें आहे.

### शिंबान्न. (उकडलेल्या शेंगा.)

शिंबान्नंमधुरंरूक्षंवातपित्तप्रकोपनं ॥

**अर्थ**—शिंबान्न (उकडलेल्या शेंगा)—मधुर, रूक्ष, व वात, पित्त, यांचा कोप करितात.

### वैदलान्न. डाळीचें अन्न.

वैदलान्नंरुचिकरंगुरुद्रव्यगुणैःसमं ॥

**अर्थ**—वैदलान्न. डाळीचेंअन्न—रुचिकर, गुरु, असें आहे. वरकड गुण द्रव्या सारिखे-आहेत.

### आढक्यन्न. तुरीचें अन्न.

आढक्यन्नंविशेषेणगुरुःपित्तकफापहं ॥

**अर्थ**—आढक्यन्न. (तुरीचेंअन्न)—विशेष जड व पित्त, कफ, याचें नाशक आहे.

### मत्स्यौदन.

मत्स्यौदनंकफकरंत्रिदोषकरणंतथा ॥
अग्निमांद्यकरंप्रोक्तंचतुरैर्मत्स्यभक्षकैः ॥

**अर्थ**—मत्स्यौदन—कफकर, त्रिदोषकारक, व अग्निमांद्यकर, असें आहे.

### शाकांचे ओदन.

शाकान्नंलेखनंचोष्णंरूक्षंवैदोषद्रावकं ॥

**अर्थ**—शाकान्न—लेखन, उष्ण, रूक्ष, आणि दोषांला द्रविवणारें आहे.

### मांसोदन.

मांसोदनंधातुवृद्धिकरंस्निग्धंगुरुस्मृतं ॥

**अर्थ**—मांसोदन—धातुवर्धक, स्निग्ध, आणि गुरु असें आहे.

### फलान्न फळांचें अन्न.

फलान्नंस्याद्रुचिकरंगुरुःफलसमंगुणैः ॥

**अर्थ—** फलान्न ( फळांचें अन्न ) रुचिकर व गुरु आहे. बाकीचे गुण फळाप्रमाणें जाणावे.

## मांस, शाक, वसा, तैल, घृत, मज्जा व फळें एकत्र करून केलेलें अन्न.

मांसशाकवसातैलघृतमज्जाफलैर्युतं ॥
बलतृप्तिकरंधातुवर्धकंचगुरुप्रियं ॥

**अर्थ—** मांस, शाक, वसा, तेल, तूप, मज्जा आणि फळें यांणीं युक्त अन्न बलकर, तृप्तिदायक, धातुवर्धक, गुरु आणि प्रिय असें आहे.

## उडीद, तीळ, दूध, मूग हे एकत्र करून केलेला भात.

माषैर्मुद्गैस्तिलैर्दुग्धैर्मिश्रितंचौदनंस्मृतं ॥
बल्यंतृप्तिकरंधातुवर्धकंपरिकीर्तितं ॥

**अर्थ—** उडीद, मुग, तीळ, दूध हे पदार्थ एकत्र करून केलेलें अन्न बलकर, तृप्तिदायक आणि धातुवर्धक असें आहे.

## साठेतांदळांचें व साधारण साळीचें अन्न.

षष्टिकानांचशालीनामोदनंदीपनंमतं ॥ बल्यंनेत्र्यंपाचनंच
त्रिदोषशमनंमतं ॥ क्षयरोगंविषंचैवनाशयेदितिकीर्तितं ॥

**अर्थ—** साठेतांदळांचें व साधारण साळीचें अन्न दीपन, बलकर, नेत्र्य, पाचन, त्रिदोषनाशक आहे, व क्षयरोग, विष यांचा नाश करितें.

## नवान्न (नवें अन्न).

नवान्नंमधुरंस्निग्धंकफवृद्धिकरंगुरु ॥
मलावष्टंभकंवातरक्तपित्तविनाशकं ॥

**अर्थ—** नवान्न ( नवें अन्न ) मधुर, स्निग्ध, कफवर्धक, गुरु, मलस्तंभक असें आहे व वात, रक्त आणि पित्त यांचा नाश करितें.

## उष्णान्न.

अन्नमुष्णंदीपकंस्यात्लघुभ्रमकरंमतं ॥ मदात्ययंरक्तपित्तंप्रमेहंवातरोगकं ॥ करोतीतिचसंप्रोक्तंकासंश्वासंक्रमींस्तथा ॥ आध्मानंगुल्मरोगंच

जाड्यंहिक्कांचनाशयेत् ॥ क्षतकासंनाशयतीत्येवमुक्तंभिषग्वरैः ॥

**अर्थ—** उष्णान्न अग्निदीपक, लघु, श्रमकारक असें आहे व मदात्यय, रक्तपित्त, प्रमेह, वातरोग यांना उत्पन्न करितें आणि खोकला, दमा, कृमि, आध्मान, गुल्मरोग, अंगजाड्य, उचकी, क्षतकास यांचा नाश करितें.

## शीतान्न (निवालेलें अन्न).

शीतान्नंशीतलंप्रोक्तंलालास्रावकरंपरं ॥ अग्निमांद्यंमलस्तंभंश्वासंवातंच कारयेत् ॥ मेहमूर्च्छाभ्रमच्छर्दिरक्तपित्तमदात्ययान् ॥ नाशयेदितिसंप्रोक्तं सुज्ञैर्वैद्यविशारदैः ॥

**अर्थ—** शीतान्न (निवालेलें अन्न) शीतल, लालास्रावक, अग्निमांद्य, मलस्तंभ, दमा, वायु यांना करितें व मेह, मूर्च्छा, भ्रम, वांति, रक्तपित्त, मदात्यय यांचा नाश करितें.

## अत्युष्ण अन्न.

अत्युष्णमोदनंप्रोक्तंबलनाशकरंबुधैः ॥
गुणाश्चान्येबुधैःप्रोक्ताउष्णान्नसदृशाअपि ॥

**अर्थ—** अतिऊष्ण अन्न बलनाशक आहे, वरकड गुण ताज्या अन्नासारिखे आहेत.

## अतिशीत व शुष्क अन्न.

अतिशीतंचातिशुष्कमन्नंदुर्जरकंमतं ॥

**अर्थ—** अतिशीत व शुष्क अन्न अतिदुर्जर आहे.

## क्लिन्नान्न ह्म० पातळ अन्न.

दुष्टवाग्नियुतान्नंचदुर्जरंसंप्रकीर्तितं ॥
क्लिन्नमन्नसमुद्दिष्टमृषिभिर्ग्लानिकारकं ॥

**अर्थ—** क्लिन्नान्न (पातळ अन्न) दुर्जर व ग्लानिकारक असें आहे.

## अतिद्रवान्न (फार पातळ अन्न).

अन्नंचातिद्रवंकासमेहश्वासाग्निमांद्यहं ॥ बलवर्णप्रतिश्यायहरं त्वग्रौक्ष्यकारकं ॥ मलस्यचैववातस्यरोधकंपरिकीर्तितं ॥

**अर्थ—** अतिद्रवान्न (फार पातळ अन्न) खोकला, मेह, दमा, अग्निमांद्य, बल, वर्ण, पडसें यांचा नाश करितें व त्वचेला रुक्षता देतें आणि मलरोधक, वातकर असें आहे.

## स्निग्धान्न.

स्निग्धान्नंरुचिदंप्रोक्तमालस्यस्यचकारकं ॥ लालास्त्रावकरंचैव हृद्गौरवकरंपरं ॥ बलासंसचयकरंपूर्वैर्वैद्यैर्निवेदितं ॥

**अर्थ—** स्निग्धान्न रुचिकर, आलस्यकारक, लालास्त्रावकर, हृदयगौरवकारक, कफसंचयकारक आहे.

## अभीष्टान्न (आवडतें अन्न).

अभीष्टान्नंहर्षरुचीबलोत्साहकरंपरं ॥ मनःप्रसन्नकरणंपुष्टिदंच प्रकीर्तितं ॥ अनिष्टान्नंचोक्तगुणनाशकंपरिकीर्तितं ॥

**अर्थ—** अभीष्टान्न ( आवडतें अन्न ) हर्ष, रुचि, उत्साह, मनाला प्रसन्नता, पुष्टि यांना उत्पन्न करितें, व न आवडणारें अन्न वर सांगितलेल्या गुणांचा नाश करितें.

## भूतौदन.

तिललाजादधियवहरिद्रायुक्तमोदनं ॥
भूतौदनंतुसंप्रोक्तंगुणाःसर्वेपदार्थवत् ॥

**अर्थ—** भूतौदन तिळ, लाह्या, दहीं, यव, हळद हीं एकत्र करून करावें तें व याचे गुण त्यांतील पदार्थांसारिखे आहेत.

## भाताची कृति.

जलेचतुर्दशगुणेतंडुलानांचतुःपलं ॥ विपचेत्स्त्रावयेन्मंडंसभक्तोमधुरोलघुः ॥ तंडुलानांदशगुणेतथापंचगुणेजले ॥ सिध्दोभक्तोभवेत्किंचित्जडोबहुजलेकृतः ॥ तथातथालघुतरो भवेदितिविनिश्चितं ॥

**अर्थ—** तांदुळाचे चौदापट पाणी घालून पेज काढून भात करावा तो लघु व मधुर होतो, किंवा तांदुळाचे दशपट अथवा पांचपट पाणी घालून करावा तो किंचित् जड होतो. तात्पर्य जसजसें पाणी अधिक घालून करावा तसतसा हलका होतो, असें जाणावें.

## बैठा भात.

भक्तंस्यात्द्विगुणेजलेसुपाचिताःस्थूलाश्चतेतंडुलास्तेचेत्सूक्ष्मतरास्तदाचसुधियासार्धैकभागेजले ॥ तेचेत्स्थूलतरास्तथासमधिकेनीरेचसंपाचितास्तद्भक्तंविदुषाविलोक्यचधियाकार्यंच लोकप्रियं ॥

अर्थ— तांदुळांचे दुप्पट पाणी घालून युक्तीनें पेज काढिल्यावांचून करावा तो वैठा भात, ही गोष्ट सामान्य जाड तांदुळांची आहे. फार बारीक असल्यास पाणी दिढी घालावें, जसजसे तांदुळ जाडे असतील तसतसें पाणी अधिक ठेवावें व जसे बारीक अस कमी करावें, आंबेमोहोर, जिरेसाळ इत्यादिकांस दीडपटच पाणी घालावें.

## यवागू (पातळ भात).

यवागूःषड्गुणेतोयेसंसिद्धाविरलद्रवा ॥ यवागूर्ग्राहिणीतृष्णा
ज्वरघ्नीवस्तिशोधनी ॥ पित्तश्लेष्मज्वरेदेयामध्यान्हेसाप्रकीर्ति
ता ॥ वातज्वरेपराण्हेसागोधूमजलनिर्मिता ॥

अर्थ— तांदुळाचे साहापट पाणी घालून पात्रावर राही तों शिजवून दाट करावी ती यवागू ग्राहिणी आहे व तृष्णा, ज्वर यांची नाशक, बस्तिशोधनी अशी आहे ही पित्त-ज्वर, श्लेष्मज्वर यांवर मध्यान्हीं द्यावी, वातज्वराला अपराण्हीं द्यावी. ही गव्हा-दिकांचीहि होते.

## कृसरायवागू.

तिलतंदुलमाषाणामथवातिलतंदुलान् ॥ षड्गुणेचजलेदत्वासा
धनीयायवागुका ॥ साजडादुर्जराबल्यामदपुष्टिप्रदामता ॥ कफ
पित्तमलस्तंभशुक्रकृद्वातनाशिनी ॥

अर्थ— तिळ, तांदुळ, उडीद किंवा तिळ, तांदुळ, याच्या साहापट पाणी घालून पातळ भात सिद्ध करावा त्याचे नांव कृसरायवागू. ती जड, दुर्जर, बलकारक, मद, कफ, पित्त, मलस्तंभ व शुक्र यांना करणारी, आणि वातनाशक अशी आहे.

## विलेपी (आटवल).

चतुर्गुणजलेसिद्धाविलेपीचनसिक्थका ॥ विलेपीदीपनीवृष्याहृद्याग्राहिणी
ग्राहिणीलघुः ॥ व्रणाक्षिरोगिणांपथ्यातर्पणीतृट्ज्वरापहा ॥ आमशूलहरा
स्वादुर्दीपनीरुचिपुष्टिकृत ॥

अर्थ— तांदुळ भरडून त्याचे चौपट पाणी घालून यवागूपेक्षा कांहीं घणसर करावी ती अग्निदीपक, वृष्य, प्रिय, ग्राहक, लघु आहे व व्रण, नेत्ररोगी यांना पथ्यकारक व तृप्तिकारक; तृषा, ज्वर यांची नाशक; आमशूल हरण करणारी; गोड, दीपनी, रुचिकारक, पुष्टि देणारी अशी आहे.

## भाजून भरडलेल्या तांदुळांचें आटवल.

कृताचषड्गुणेजलेविलेपीभ्रष्टतंदुलैः ॥

साचाग्निदीपनीलघ्वीहितामूर्छाज्वरापहा ॥

**अर्थ—** साहापट पाण्यांत भाजलेले तांदुळ घालून, ही पूर्वी सांगितलेल्या विलेपीसारिखीच करावी, ती अग्निदीपक, हितावह व लघु आहे. आणि ज्वर, मूर्छा यांचा नाश करिते.

## पेया (पेज).

पेयासिक्थान्विनातोयेचतुर्दशगुणेकृता ॥ पेयाकुक्षिगदक्लानिज्वरस्तंभा
निसारजित् ॥ रुच्यग्निकृल्लघुर्दोषमलस्वेदानुगामिनी ॥ हितावहापाचनी
चपिपासानाशनीपरा ॥ क्षुधाग्लानिश्रमहराप्रोक्तापाकविशारदैः ॥

**अर्थ—** तांदुळांचे चौदापट पाणी घालून वाटीनें प्यावयासारखी उतरून घ्यावी ती कुक्षिरोग, ग्लानि, ज्वर, शरीरस्तंभ, अतिसार यांची नाशक व रुचिकर, अग्निदीपक, लघु, दोष, मल, स्वेद यांचें मार्गानें गमन करविणारी, शरीराला हितावह, पाचक, तृषा नाश करणारी. व क्षुधा, ग्लानि, श्रम यांची नाशक असें पाकवेत्त्यांनीं सांगितलें आहे.

## साळींच्या लाह्यांची पेया.

पूर्ववच्चकृतालाजपेयालघ्वीस्मृतायतः ॥ गुणैःप्रशस्ताविज्ञेयापू
र्वोक्तायागुणाधिका ॥ त्रिकटुसैंधवैलाभिर्युक्तातिगुणदामता ॥

**अर्थ—** पूर्वपेयेसारिखी केलेली लाह्यांची पेया लघु, पूर्वपेयेपेक्षां अतिप्रशस्त आहे. आतां यवागू, विलेपी व पेया यांत सुंठ, मिरीं, पिंपळी, सैंधव आणि एलची यांचें चूर्ण घालून घेतलें असतां विशेष गुण होतो.

## सामान्यमंड (शिथांवांचून पेज).

तंडुलानांसिक्थहीनापेयाचाग्निप्रदीपनी ॥ ग्राहिणीलघुशीताचपा
चनीवानलोमनी ॥ धातूनांचैवनाडीनांमृदुत्वस्वेदकृन्मता ॥ तृ
षाश्रमाश्मरीपित्तानीसारकफदोषहा ॥

**अर्थ—** तांदुळाचे चवदापट पाणी घालून शिथांवांचून जी पेज काढितात ती अग्निदीपक, ग्राहक, लघु, शीत, पाचक, वायूचें अनुलोमन करणारी व धातु आणि नाडी यांना मृदुत्व देणारी, स्वेदकर अशी आहे, व ताहान, श्रम, अश्मरी, पित्तातिसार, आणि कफदोष यांचा नाश करिते.

## वाट्यमंड (यवमंड).

वाट्यमंडोयवैर्भ्रष्टैर्मुनिभिःपरिकीर्तितः ॥ वाट्यमंडोलघुर्ग्राहीशू
लानाहत्रिदोषनुत् ॥ नवज्वरेपिपथ्योयंपटोलमगधान्वितः ॥

**अर्थ—** भाजलेल्या यवांचा पूर्ववत् मंड करावा तो वाट्यमंड. हा लघु व ग्राहक आहे,

आणि शूल, आनाह, त्रिदोष यांचा नाश करितो, व हा कडुपडवळ व पिंपळी, यांचें चूर्ण घालून दिला असतां, नवज्वरावर पथ्यकारक आहे.

## भाजलेल्या तांदुळांचा अष्टगुण मंड.

भ्रष्टैर्यवैस्तंदुलैश्चचतुर्दशगुणेजले ॥ हिंगुसैंधवथधनिकात्रिक टुसंयुतः ॥ पक्केनस्याद्विलेपीचगृहीनासिक्थकैर्विना ॥ ज्ञेयःसोष्ट गुणोमंडोज्वरदोषत्रयापहः ॥ रक्तक्षुद्वर्धनःप्राणप्रदोबस्तिविशोधनः ॥

**अर्थ**– किंचित भाजलेले तांदूळ, आणि मूग हे समान घेऊन आंत चौदापट पाणी घालून शिजवावे. त्यांत शिजतेवेळीं हिंग, सैंधव, धणे, सुंठ, मिरीं, पिंपळी हे पदार्थ घालून नंतर वरची पेज शितकण न पडतां ओतून घ्यावी त्याला अष्टगुण मंड ह्मणतात. हा ज्वर व त्रिदोष यांचा नाशक व रक्त, क्षुधा, यांना वाढविणारा, बलकर, बस्तिशोधक असा आहे.

## साळींचे लाह्यांचा मंड.

शालिलाजकृतोमंडोलघुर्ग्राहीप्रियस्तथा ॥ पाचनोदीपनश्चापिवि रेकेतुसुखावहः ॥ वायोर्मार्गेणनेताचविश्वापिप्पलिसंयुतः ॥

**अर्थ**– हा साळी लाह्यांचा मंड लघु, ग्राहक, प्रिय, पाचक, अग्निदीपक व ज्यास रेच झाले त्यास हितावह, आणि आंत सुंठ, पिंपळी यांचें चूर्ण घातल्यास वायूला यथामार्गानें नेणारा आहे.

## गोधूममंड.

मंडोगोधूमजोवापिशीघ्रपाकोचउष्णकः ॥
ग्राहकोमधुरश्चैवमभवेत्पित्तनाशनः ॥

**अर्थ**– गव्हांचा मंड शीघ्रपाकी, उष्ण, ग्राहक, मधुर, आणि पित्तनाशक आहे.

## जोंधळ्यांचा मंड.

आग्नालकृतोमंडोग्राहकोमूत्रलस्तथा ॥
वातश्लेष्मकरश्चापिभवेत्पित्तस्यनाशनः ॥

**अर्थ**–जोंधळ्यांचा मंड ग्राहक, मूत्रल, वात व कफ यांला करणारा व पित्तनाशक आहे.

## क्षुद्रधान्यमंड.

तृणधान्यकृतोमंडोवातकृत्सउदाहृतः ॥

**अर्थ**– तृणधान्याचा मंड फार वातकारक आहे असें जाणावें.

## कोद्रूचा मंड.

कोद्रवाणांकृतोमंडोमूर्छाग्लानिकरःस्मृतः ॥

अर्थ— हरकांचा मंड मूर्छा व ग्लानि यांना तात्काळ करणारा आहे.

## सर्वद्विधान्ययूष.

यूषःकृतोद्विदलानामष्टादशगुणेंभसि ॥ सएवत्रिकटूयुक्तःसर्पिःसैंधवसंयुतः ॥ भवेदगुरुतरश्चैवकृतमित्येवतंविदुः ॥ स्निग्धैर्द्रव्यैर्विनासिद्धमकृतंतुलघुंवदेत् ॥ फलाम्लधान्यतक्रैश्चकृतागुरुतरामताः ॥ वातघ्नारुचिदाःप्रोक्ताः पूर्वपाकविशारदः ॥

अर्थ— ज्या धान्याचा यूष करावयाचा त्याचें अठरापट पाणी घालून कढवावें आणि वरचें काट काढून घ्यावें, त्यास यूष म्हणतात. त्यामध्यें सुंठ, मिरें, पिंपळी, सैंधव व तूप हीं घालून कढवावा त्याचें नांव कृत, तो गुरु होतो व पदार्थ घातल्यावांचून करावा तो अकृत, तो लघु आहे व फलाम्ल, धान्याम्ल, ताक हीं पृथक् घालून करावा तो उत्तरोत्तर गुरुतर, वातघ्न, रुचिकर असा होतो.

## मुद्गयूष.

मौद्गोयूषोदीपनश्चहृद्यःशीतोग्निदीपनः ॥ रक्तपित्तंकफस्तृष्णा ज्वरोदाहस्तथाव्रणः ॥ शिरोरुक्जायतेयेषांतेषामुक्तोहितावहः ॥

अर्थ— मुगांचा यूष दीपन, हृद्य, शीत, अग्निदीपक व रक्तपित्त, कफ, तृष्णा, ज्वर, दाह, व्रण, मस्तकरोग, ज्यांस आहेत त्यांस हितावह. हा सर्व यूषांत उत्तम आहे.

## दुसरे प्रकारचा मुद्गयूष.

अर्धाढकजलेमुद्गद्विपलेप्रक्षिपेत्ततः ॥ पादावशेषउत्तार्यमुद्गान्दर्व्याविघाटयेत् ॥ वस्त्रपूतंतु ततगृह्यतस्मिन्दाडिमसंभवां ॥ त्वचंसैंधवधान्याकपिप्पलीनागरजस्तथा ॥ विश्वाजरणयोःशाणप्रमाणंचूर्णमावपेत् ॥ तद्यूषसेवनात्सद्यःपित्तश्लेष्मगदान्जयेत् ॥

अर्थ— अर्धाढक जलांत दोन पलें मूग घालून चतुर्थांश राही तों कढवावा, आणि त्यांतील मूग पळीनें चेंदून नंतर वस्त्रानें गाळावा, आणि त्यांत डाळिंबसाल, सैंधव, धने पिंपळी, सुंठ, जिरें या प्रत्येक द्रव्याचें चूर्ण शाणप्रमाण घालून घ्यावा. तो पित्तरोग, कफरोग यांचा नाश करितो.

## पंचामृत यूष.

कुलित्थमुद्गाढकिमाषकाणांनिष्पावयुक्तश्चकृतोहियूषः ॥ संदीपनःपाचनधातुवृद्धिकरोलघुःस्यादरुचिप्रणाशकृत् ॥ ज्वरंबलासंक्षयमंगमर्दक्षीयेतपंचामृतयूषकोयं ॥

**अर्थ—** पंचामृत यूष हा कुळिथ, मूग, तुरीची डाळ, उडीद, पावटे याणीं केलेला अग्निदीपक, पाचक, धातुवृद्धिकर, लघु असा आहे व अरुचि, ज्वर, पडसें, क्षय, अंगमर्द यांचा नाशक आहे.

## रानमुगांचा यूष.

आरण्यमुद्गयूषस्तुवृष्योधातुविवर्धनः ॥
रक्तपित्तज्वरसंतापपित्तकृच्छ्रादिनाशनः ॥

**अर्थ—** रानमुगांचा यूष वृष्य, धातुवृद्धिकर आहे व रक्तपित्त, ज्वर, संताप, पित्त मूत्रकृच्छ्र यांचा नाश करितो.

## कुलित्थयूष.

कुलित्थयूषोवीर्योष्णोमधुरोग्निप्रदीपनः ॥ कषायोगुल्मकफहृद्वा
य्वर्शश्वासकासहा ॥ वातानुलोमनस्तूनीमेहमेदविनाशनः ॥

**अर्थ—** कुळिथांचा यूष उष्णवीर्य, मधुर, अग्निदीपक, तुरट आहे, व गुल्म, कफ, वायु, अर्श, दमा, खोकला, तूनी, प्रतूनी, मेह, मेद यांचा नाशक आणि वायूचें अनुलोमन, करणारा असा आहे.

## नवांगयूष.

शुष्कामलकमूलकविश्वाककैधुपिप्पलीमुद्गैः ॥
तंडुलकुलित्थनीरैर्नवभिर्यूषस्तुपित्तकफहारी ॥

**अर्थ—** आंवळकाठी, मुळे, सुंठ, बोरें, पिंपळी, मूग, तांदुळ, कुळीथ आणि पाणी या नऊ पदार्थांनीं सिद्ध केलेला यूष पित्त व कफ यांचा नाश करितो.

## पंचमुष्टिकयूष.

बदरकुलित्थमुद्गमूलकयवमुष्टिमात्रकाग्राह्याः ॥ तेषामष्टगुणेंभसिसि
द्धोयूषस्तुपित्तकफवाते ॥ क्षयगुल्मकासशूलश्वासज्वररोगिषुप्रशस्ततरः ॥

**अर्थ—** बोरें, कुळीथ, मूग, मुळे, यव हे पांच पदार्थ एक एक मूठ घेऊन त्यांच्या चौपट पाण्यांत यूष सिद्ध करावा. तो कफ, वायु, क्षय, गुल्म, खोकला, शूल, दमा, ज्वर यांवर प्रशस्त आहे.

## शूकधान्ययूष.

तिक्तंपटोलंभागैकंद्विभागःपिचुमंदकः ॥ शूकधान्यंत्रिभागंस्यादे
षांयूषःप्रदीपनः ॥ हृद्यःकुष्ठज्वरवमीपित्तघ्नःकफमेदहा ॥

**अर्थ—** कडू पडवळ एकभाग, कडू निंब दोन भाग, शूकधान्य तीन भाग, पाणीं

केलेला यूष अग्निदीपक, हृदयास हितकर, कुष्ट, ज्वर, ओकारी, पित्त, कफ, मेद यांचा नाशक आहे.

## मुळ्याचा यूष.

मूलकयूषोहरतिलालास्रावंगलग्रहंजूर्ति ॥
मेदारोचकपीनसकासकफव्याधिनाशनश्चापि ॥

**अर्थ**– मुळ्याचा यूष लाळ गळते त्याचा व गळा धरतो याचा नाशक, ज्वर, मेद, अरुचि, पडसें, खोकला, कफव्याधि यांचा नाशक आहे.

## दाडिमामलकयूष.

दाडिमामलकाभ्यांतुमुद्गयूषःसुसाधितः ॥
पित्तवातहरःपथ्योलघुरग्निप्रदःसरः ॥

**अर्थ**– दाळिंब, आंवळे व मूग, यांचा यूष केला असतां तो पित्तवायूचा नाश करितो. व पथ्यकारक, लघु, अग्निप्रद, सारक असा आहे.

## मसूर व तुरी यांचा यूष.

मसूरयूषःसंग्राहीबृंहीस्वादुःप्रमेहजित् ॥ तथाकषायोमधुरश्चयूषोविशोषणो वातहरोढकीनां ॥ पित्तापहःश्लेष्महरोज्वरांतकृत्कृमीन्निहन्यात्गुददारकोयं ॥

**अर्थ**– मसूरयूष संग्राही, वृद्धिकर, मधुर, प्रमेहनाशक असा आहे. तुरीचा यूष तुरट, मधुर, शोषक, वातनाशक, पित्तनाशक, कफ, ज्वर, जंतु यांचा नाशक व गुददारक असा आहे.

## खलयूष.

चित्रकबिल्वकपित्थककृष्णाजाजीसुकृष्णमरिचानां ॥
सिद्धःखलयूषोयंहृद्यःकफवातनाशकृत्प्रोक्तः ॥

**अर्थ**– चित्रकमूळ, बेलफळ, कवठ, पिंपळी, जिरें, मिरें हे पदार्थ एकत्र करून यूष करावा तो खलयूष. हा हृद्य व कफ, वात, वांति यांचा नाशक आहे.

## मसूरादियूष.

मसूरामुद्गगोधूमकुलित्थानांससैंधवः ॥ यूषस्तुपित्तकफकृत्वर्तनेवातना शनः ॥ सैवद्राक्षादाडिमाभ्यांसाधितोतिरुचिप्रदः ॥ अग्निदीप्तिकरोहृद्य स्तिक्तःपाकेचवातहा ॥

**अर्थ**–मसुरा, मूग, गहूं, कुळीथ हीं मिश्र करून त्यांचा सैंधवयुक्त यूष पित्त व कफ यांना करणारा, वातनाशक आहे. तोच यूष द्राक्ष, दाळिंब घालून सिद्ध केल्यास फार रुचि देणारा, अग्निदीपक, हृदयास हितकर, पाककाळीं तिखट, वातनाशक आहे.

## माषयूष.

माषयूषोगुरुर्वृष्यईषत्पवनपित्तकृत् ॥
अनल्पकंकफंकुर्वन्मलंकोष्ठेविवर्धयेत् ॥

**अर्थ–** माषयूष गुरु, वृष्य, किंचित् वायु व पित्त यांना करणारा व कफाला फार कोपिवणारा आणि कोठ्यात मलवृद्धि करणारा असा आहे.

## लवणोदकयूष.

लवणोदकयूषस्तुत्वंगेशस्ततरोमतः ॥

**अर्थ–** मिठाचे पाण्याचा यूष अगावर प्रशस्ततर आहे.

## निष्पावयूष.

यूषोनिष्पावजःस्तन्यंभृशमुत्पादयेत्स्तने ॥
श्लेष्माणंदृष्टिरोगंचनाशयेत्समुपासितः ॥

**अर्थ–** पावट्यांचा यूष स्तनामध्ये दूध उत्पन्न करितो व कफ, नेत्ररोग यांचा नाश करितो.

## मुद्गामलकयूष.

मुद्गामलकयूषस्तुभेदनःकफपित्तजित् ॥
तृट्दाहदमनःशीतोमूर्छाभ्रममदापहः ॥

**अर्थ–** मूग आणि आवळे यांचा यूष मळाचा भेद करणारा, कफ, पित्त, तृषा, दाह, भ्रम, मद यांचा नाशक आणि शीत आहे.

## चणकयूष.

चणकैर्विहितोयूषोनुष्णस्तुवरकोलघुः ॥ रक्तपित्तप्रतिश्यायकास पित्तकफापहः ॥ तिक्तःश्वासहरश्चैवत्रिदोषघ्नःप्रकीर्तितः ॥

**अर्थ–** चण्यांचा यूष शीत, तुरट, लघु, तिक्त आहे, आणि रक्तपित्त, पडसें, खोकला, पित्त, कफ, श्वास, त्रिदोष यांचा नाशक आहे.

## दध्यादियूष.

दध्यम्ललवणस्नेहतिलमाषैःसुसाधितः ॥
यूषस्तुकाम्लिकाछर्दिकफवातहरःप्रियः ॥

**अर्थ–** दहीं, अम्ल, लवण, स्नेह, तिळ, उडीद, यांचा यूष करावा तो काम्लिका, वांति, कफ, वात यांचा नाशक आहे.

## कांचनसूप.

बस्याद्विदलधान्यस्यसूपःकर्तव्यनांगनः ॥ तधान्यंकृष्णशिरसस्तैलेनोद्वर्ते येत्तनः ॥ उष्णशुष्कादिनिष्काश्यवग्धीनांशुद्धदालिकां ॥ शीतोदकेन मंदाग्नौपचेत्सूपःसकांचनः ॥ सलघुःकफपित्तघ्नोकासश्वासनिकृंतनः ॥

अर्थ– कांचन या नांवाचें प्रसिद्ध जें वरण तें ज्या द्विदल धान्याचें करावयाचें असेल धान्य काळ्या शिरसाचें तेल लावून उन्हांत सुकवावें, त्याची सोलींव डाळ काढून नें थंड पाण्यांत मंदाग्नीवर शिजवून वरण करावें तो कांचनसूप. तो लघु आहे व कफ, , कास, श्वास यांचा नाश करितो.

## भाजलेल्या द्विदलांचें वरण.

शमीधान्यस्यभ्राष्टस्यदालिंकृत्वासुनिस्तुषां ॥ पक्त्वोदकेसुसिद्धासा वराल्पमिनिचक्षते ॥ कुरुतेनमलस्तंभंसतुषंकुरुतेजरां ॥

अर्थ– भाजलेल्या द्विदल धान्याचें वरण. ज्या द्विदल धान्याचें वरण करावयाचें तें धा- किंचित् भाजून त्याची सडीक डाळ करावी, आणि त्या डाळींत पाणी घालून शिज- वरण करावें तें मलावरोध करित नाहीं. जर असड्ये डाळीचें वरण केलें तर तें जरा ल्प करितें.

## सामान्य वरणाची कृति.

गृहीत्वाद्विदलंधान्यंपेषिण्यामुविपेषयेत् ॥ तच्चूर्णंसतुषेक्षिप्त्वानिशादधिघृ तानिच ॥ तथैवपिहितंस्थाप्यपश्चाद्दालींविनिर्हरेत् ॥ चतुर्गुणोदकेपक्त्वा तस्मिन्लगमठसैंधवे ॥साज्यांहरिद्रांक्षिप्त्वायनूक्रियतेनदूराल्पकं ॥ रुचिकृद्दी पनंपक्तृस्निग्धंपथ्यंबलप्रदं ॥ कफवातामयान्हंतितद्विनाभोजनंवृथा ॥

अर्थ– ज्या द्विदल धान्याचें वरण करावयाचें तें धान्य भरडून डोळ करून त्याला किं- त् तूप, हळद, दहीं चोपडून कांहीं वेळ दडपून ठेवावा. नंतर उन्हांत वाळवून काढून ची सडीक डाळ करावी आणि चौपट पाणी घालून शिजवावी व शिजतेवेळीं मीठ, , हिंग, हळद हे पदार्थ नेमस्त घालून फार पातळ व फार. जाड नव्हे अशा बेताचें ग करावें तें रुचिकर, पाचक, अग्निदीपक, स्निग्ध, पथ्य, बलप्रद असें आहे व कफरोग, रोग यांचें नाशक, किंबहुना यावांचून भोजन व्यर्थ आहे.

## मकुष्टसूप.

मकुष्टसूपोल्पबलःपाचनोदीपनोलघुः ॥
चक्षुष्योबृंहणोवृष्यःपित्तश्लेष्मास्त्ररोगनुत् ॥

**अर्थ**– मठाचें वरण बलकर, पाचन, दीपन, लघु, नेत्रांला हितकारक, धातुवर्धक, वृष्य, असें आहे व पित्त, कफ, रक्तविकार यांचा नाश करितें.

## मसूरसूप.

मसूरसूपःसंग्राहीशीतलोमधुरोलघुः ॥
कफपित्तास्रजिद्वर्ण्योविषमज्वरनाशनः ॥

**अर्थ**–मसुरांचें वरण ग्राहक, शीत, मधुर, लघु असें आहे. आणि कफ, पित्त, रक्तविकार. विषमज्वर यांचें नाशक आणि शरीराचा वर्ण चांगला करणारें असें आहे.

## राजमाषसूप (चवळ्या).

राजमाषभवःसूपःस्वादूरूक्षःकषायकः ॥
ग्राहीगुरुर्वातकरःस्तन्यकृद्रुचिकारकः ॥

**अर्थ**– चवळ्याचें वरण गोड, रूक्ष, तुरट, संग्राही, जड असें आहे. आणि वायु स्तनांत दुग्ध, रुचि यांना उत्पन्न करितें.

## निष्पावसूप (पावटे).

निष्पावसूपःपित्तास्रमूत्रस्तन्यानिलप्रदः ॥
विदाह्युष्णोगुरुःशोफककफहृच्छुक्रलःस्मृतः ॥

**अर्थ**– पावट्याचें वरण रक्तपित्त, मूत्र, स्तनांत दुग्ध, वायु, यांना करितें आणि विदाही उष्ण, जड असा आहे व कफ, सूज यांचा नाशक आणि वीर्याची वृद्धि करणारा असा आहे

## कुलित्थसूप.

कुलित्थसूपोवातघ्नःकटुःपाकेकषायकः ॥ कफाविरोधीशुक्राम्लक रोग्माश्वासकासनुत् ॥ शुक्राश्मरीहरःपित्तकारकःकथितोनृभिः ॥

**अर्थ**– कुळथांचें वरण वातनाशक, कडु, पाककालीं तुरट असें आहे. आणि कफ शुक्र, रक्तपित्त यांस करितें व उष्ण, श्वास, कास, मुतखडा यांचा नाश करितें.

## मुगांचें वरण.

मुद्गसूपोलघुर्ग्राहीकफपित्तहरोहिमः ॥ स्वादुर्नेत्र्योनिलहरःकुल्माषःशुक्रवर्धनः ॥ रक्तपित्तज्वरहरस्तुवरस्तृविकारकः ॥ सन्निपातज्वरहरोग्लानेर्नाशकरःस्मृतः ॥

**अर्थ**– मुगांचें वरण लघु, ग्राही, कफपित्तनाशक, शीत, स्वादु, नेत्रांला हितकर, वा

ाक असें आहे व त्या मुगांच्या घुगऱ्यांला कुल्माष म्हणतात. त्या शुक्रवर्धक, रक्तपित्त व नाशक, तुरट, तृप्तिकारक आहेत व सन्निपातज्वर व ग्लानि यांचा नाश करितात.

## उडिदांचें वरण.

माषसूपश्चकुल्माषःस्निग्धोवृष्योनिलापहः ॥ उष्णःसंतर्पणोबल्यः
सुस्वादूरुचिकारकः ॥ धातुवृद्धिकरश्चासौकफपित्तकरोगुरुः ॥
भर्जितैरपिमाषैस्तुकृतःसूपोजडःस्मृतः ॥

**अर्थ—** उडदांचें वरण व त्यांच्या घुगऱ्या स्निग्ध, वृष्य, वातनाशक, उष्ण, तृप्तिकारक, य, गोड, रुचिकर, धातुवृद्धिकारक, कफ, पित्त यांना करणारें जड असें आहे आणि जलेल्या उडदांचें वरणही जड आहे.

## आढकी (तुरी).

सूपश्चाढकिजोवातकरःश्लेष्महरोहिमः ॥
रूक्षःकषायोरुचिकृत्सोष्णोदोषत्रयप्रणुत् ॥

**अर्थ—** तुरींचें वरण वातकर, कफनाशक थंड, रूक्ष, तुरट, रुचिकर असें आहे. ांत घालून भक्षिल्यास त्रिदोषनाशक आहे.

## चणकसूप.

चाणकःसूपआख्यातोरोचनःपाचनःपरः ॥
बलासपित्तनुद्वक्त्ररोगरक्तजित्स्यात्किंचिदनिलः ॥

**अर्थ—** हरभऱ्यांच्या डाळीचें वरण रुचिकर, पाचक, कफ, पित्त यांचें नाशक, वक्त्र-रक्तविकारनाशक, किंचित् वातुळ असें आहे.

## कलायसूप (वाटाणे).

कलायसूपःकथितोलघुर्ग्राहीसुशीतलः ॥ रूक्षोमेध्यःपाककाले
स्वादुरक्तदपित्तनुत् ॥ अरोचकहरश्चासौकफनाशकरोमतः ॥

**अर्थ—** वाटाण्याचें वरण लघु, ग्राही, शीतल, रूक्ष, मेधाकर, पाककालीं गोड असें हे आणि रक्तकर, पित्त, अरुचि, कफ यांचें नाशक आहे.

## त्रिपुटकलाय (लांखसूप).

त्रिपुटानांकलायानांसूपःस्वादुश्चवातलः ॥
आध्मानशूलजनकःपित्तास्रारुचिवांतिहा ॥

**अर्थ—** लांखांचें वरण गोड, वात, आध्मान, शूल यांना करणारें, आणि पित्तरक्त, रुचि, वांति यांचा नाश करितें.

## दोन तीन प्रकारच्या डाळींचें वरण.

सूपश्चानेकदालीनांगुरुर्बल्यःकफप्रदः ॥
पाकेतुमधुरःशुक्रकारकोरुचिवातहा ॥

**अर्थ**– अनेक द्विदल डाळींचें वरण जड व बल, कफ यांतें करणारें, पाककाल मधुर, वीर्यवर्धक असें आहे व अरुचि, वायु यांचें नाशक आहे.

## भरड्याचें वरण.

सतुषाणांतुदालीनांसूपोज्वरहरोगुरुः ॥
आध्मानकृत्क्षयकफारुचिहृत्संप्रकीर्तितः ॥

**अर्थ**– डाळीच्या भरड्याचें वरण ज्वरनाशक, जड, उदर फुगविणारें असें आहे क्षय, कफ, अरुचि यांचें नाशक आहे.

## कुल्माप ह्म० घुगऱ्या त्यांची कृति.

यस्यधान्यस्यकुल्माषास्तद्धान्यंहिंगुसैंधवैः ॥ युक्तंजलेनसंपाच्यंयथासम्यक्नपाचितं ॥ तेकुल्माषागुणैर्धान्यसदृशाःपरिकीर्तिताः ॥ सामान्यतो गुणाह्यस्यवातलामलभेदकाः ॥ रुक्षाश्चगुरवोज्ञेयाःकफमेदबलप्रदाः ॥ पुष्ट्यग्निमांद्यदाश्चैवऋषिभिःपरिकीर्तिताः ॥

**अर्थ**– ज्या धान्याचे कुल्माप करावयाचे तें धान्य, आंत हिंग, सैंधव, घा[illegible] अर्धे उमले तोंपर्यंत शिजवावें त्याला कुल्माप ह्मणतात. ते कुल्माप ज्या धान्याचे करा[illegible] धान्यासारिखे गुण होतात. आतां कुल्मापमात्राचे सामान्यगुण वातल, मलभेदक, रु[illegible] गुरु असे आहेत व कफ, मेद, बल, पुष्टि आणि अग्निमांद्य यांना करितात.

## कढी.

नात्यम्लंनमधुरंतकंसैंधवेननथायुतं ॥ पिष्टंमरीचंचाणक्यंनिक्षिप्यसुनिधायच ॥ ततस्थाल्यांघृतंवाथतैलंतप्त्वाचानिक्षिपेत् ॥ तस्मिन्निशांरामठंच पश्चात्स्थालींपिधायच ॥ तक्रार्धंनिक्षिपेत्तस्यांपिधायचपुनःक्षिपेत् ॥ बुद्बुदोत्पत्तिपर्यंतंपक्वासाकथिकाभिधा ॥ कथिकापाचनीरुच्यालध्वीव वन्हिप्रदीपिनी ॥ कफानिलविबंधघ्नीकिंचित्पित्तप्रकोपिनी ॥

**अर्थ**– ताकाची कढी करण्याची कृति. ताक फार आंबट व फार गोड नव्हे असें घे[illegible] त्यांत मीठ व मिरपूड, चण्याचें पीठ हे पदार्थ नेमस्त घालून कालवून ठेवावें. नंतर ए[illegible] थालींत योग्य तूप किंवा तेल घालून ती चुलीवर ठेवावी. तूप चांगलें तापलें ह्मणजे त्[illegible] हिंग, हळद हीं घालून पळभर वर झांकण ठेवावें. नंतर तें ताक चांगलें ढवळून [illegible] त्यांत ओतून पुनः वर क्षणभर झांकण ठेवून मग सगळें ओतावें आणि पळीनें ढव[illegible]

ढवळीत मंदाग्नीवर बुडबुडे येत तोंपर्यंत कढवावें. त्याला कढी ह्मणतात. ती पाचन, रुचिकर, लघु, अग्निदीपक, व कफ, वायु, मलावष्टंभ यांची नाशक व किंचित् पित्तकारक अशी आहे.

## पंचकोलादिकथिका.

शुंठीमरीचानियवानिचव्यंसपिप्पलीपिप्पलिमूलचित्रकं ॥ ससैंधवंदाडिमत्वक्समेतंधान्यंसहिंगुजरणद्वयंच ॥ हरीतकीद्यामलकीचतेषांचूर्णंसुपिष्टंचणकोद्भवंच ॥ साध्याविनिक्षिप्यसुतक्रमध्येसापंचकोलाकथिकाचपूर्ववत् ॥ श्वासाग्निकृद्वातकफप्रणाशिनीहृद्यामशूलानिलगुल्मकासजित् ॥

**अर्थ**— पंचकोलादि कथिका. सुंठ, मिरीं, ओंवा, चवक, पिंपळी, पिंपळीमूळ, चित्रक, सैंधव, डाळिंबाची साल, धने, हिंग, जिरें, शाहाजिरें, हरडा, आंवळकठी यांचें चूर्ण व हरभऱ्यांचें पीठ हीं नेमस्त ताकांत घालून कालवून तें पूर्ववत् फोडणीस टाकून कढी करावी, ती पंचकोलादि कथिका. ही श्वासकर व अग्निदीपक, हृद्य व वायु, कफ, आमातिसार, शूल, वातगुल्म, खोकला यांची नाशक आणि प्रिय अशी आहे.

## ताकाचें सांभारें.

यस्ययस्यफलैर्युक्तापूर्ववच्चप्रसाधिता ॥ कथिकातात्फलगुणारुचिकृत्पाचनीमता ॥ अग्निदीप्तिकरावातकफश्रमहरापरा ॥

**अर्थ**— कथिका. ताकाचें सांभारें कोणतेही फळाच्या फोडी घालून पूर्ववत् कढीसारखेंच करावें तें जे फळाचे गुण असतात तसे गुण करितें. आणि रुचिकर, पाचक, अग्निप्रदीप्त करणारें आणि वायु, कफ, श्रम यांतें नाश करणारें असें होतें.

## रागखांडव ह्म० मुरांबा.

आममाम्रंत्वचाहीनंद्विस्त्रिर्वाखंडितंततः ॥ भ्राष्टमाज्येमनाक्तत्तंखंडपाकेथयुक्तितः ॥ सुपक्वंचसमुत्तार्यमरीचैलेंदुवासितं ॥ स्थापितंस्निग्धमृद्भांडेरागखांडवसंज्ञितः ॥ पुष्टिदोबलदःपित्तवातास्त्रारुचिनाशनः ॥ स्निग्धोगुरुस्तर्पणश्चसुस्वादूरागखांडवः ॥

**अर्थ**— रागखांडव मुरांबा. हिरवा आंबा सोलून त्याचे तुकडे करावे, आणि ते तुपांत किंचित् भाजून साखरेच्या पंकांत टाकून कांहीं वेळ तसेच चुलीवर असूं द्यावे, नंतर त्यांत मिरीं, एलची, कापूर यांचें चूर्ण नेमस्त घालून चांगल्या मातीचे भांड्यांत ठेवावे, त्याचें नांव रागखांडव, तो पौष्टिक, बलप्रद आहे व पित्तवायु, रक्तविकार, अरुचि यांचा नाश करितो आणि स्निग्ध, गुरु, तृप्तिजनक, स्वादिष्ट आहे. याप्रकारें आवळे, माहाळुंग इत्यादिकांचा रागखांडव करावा, तो गुळाच्याहि पंकांत होतो.

## दुसऱ्याप्रकारचा रागखांडव.

बालाम्रस्यत्वचंक्षिप्त्वासूक्ष्मखंडानिकारयेत् ॥ गुडेक्षिप्त्वाकरेणा
द्यंविश्वाचूर्णसतैलकं ॥ निक्षिप्यभांडेतद्रक्ष्यंनाम्नातद्रागखांडवं ॥

**अर्थ**–दुसरे प्रकारचा रागखांडव. हिरवा आंबा सोलून त्याच्या फोडी बारीक कराव्या आणि गुळांत घोळून हातानें मर्दाव्या नंतर त्यांत तेल, सुंठीची पूड घालून भांड्यांत ठेवाव्या त्यालाही रागखांडव ह्मणतात.

## सामान्यराग.

सितारुचकसिंधूत्थैःसवृक्षाम्लपरूषकैः ॥ जंबूफलरसैर्युक्तोरागोगाजिक
साधितः ॥ खांडवोमधुराम्लादिरससंयोगसंभवः ॥ दीपनोबृंहणोरुच्यस्नी
ह्णोहृद्यःश्रमापहः ॥ रुचिकृच्छुक्रजनकोस्निक्तःक्षारश्चसंम्मतः ॥ मुखाजि
व्हाशुद्धिकरोरक्तपित्तविवर्धनः ॥ जडःकफकरःकुष्टकोपनोम्लोह्यवृष्यकृ
त् ॥ आध्मानकृच्चनेत्राणामहितोमेदरोगहा ॥ तृष्णामूर्छाभ्रमच्छर्दिकार
कोल्पश्चभक्षयेत् ॥

**अर्थ**– साखर, सैंधव, माहाळुंगाच्या फोडी, चिंचेचें पाणी, फाल्साच्या फोडी, जांभळीचे फळांचा रस, मोहोऱ्या वाटलेल्या हीं सर्व एकत्र करावीं, त्याचें नांव राग. तो दीपन, बृंहण, रुचिकर, तिखट, हृद्य, श्रम घालविणारा, रुचिकर, शुक्र वाढविणारा, कडु व खारट, आहे आणि मुख, जिव्हा यांची शुद्धि करणारा, रक्त पित्ताला वाढविणारा व जड, कफकारक, कुष्टकोपन, आंबट, अवृष्य, पोट फुगविणारा, नेत्रांना अहित, मेदरोगनाशक व तृष्णा, मूर्छा, भ्रम, ओकारी यांना करणारा. हा थोडा भक्षण करावा.

## खांडव.

चिंचांकपित्थंवृक्षाम्लंमातुलिंगंचदाडिमं ॥ एषामन्यतरस्यापिचिकीर्षा
खांडवंप्रति ॥ ततगृहीत्वाविनिक्षिप्यतम्मिन्मैंधवशर्करे ॥ गुडंवाहिंगुस
हितंदृषदाचसुपेषयेत् ॥ गुणास्तस्यतुसर्वेपिकथितारक्तरागवत् ॥

**अर्थ**– चिंच, कवठ, आंबसोल, महाळुंग, डाळिंब यांतून ज्याचा खांडव करावयाचा असेल तें घेऊन त्यांत मिरीं, सैंधव, हिंग, गूळ किंवा साखर हीं घालून वाटून चटणी करावी, तो खांडव. त्याचे गुण पूर्वी रागाचे सांगितले आहेत त्याप्रमाणें जाणावे.

## आम्रलेह (रायतें).

तरुणाम्रंवर्जयित्वामर्दयेत्गुडशर्करे ॥ सैंधवंमरिचंहिंगुभर्जितंतत्र

निक्षिपेत् ॥ रुचिकृच्चाम्रलेहोयंमधुरस्तृप्तिकारकः ॥ हृद्यःस्निग्धो गुरुश्चोक्तःपाकविद्याविशारदैः ॥

**अर्थ**– आंबा भाजून कुसकुरावा आणि त्यांत साखर किंवा गूळ घालून त्यांत सैंधव, मिरीं, भाजलेला हिंग हीं नेमस्त घालावीं आणि कालवून नेमस्त करावा तो रुचिकारक, मधुर, तृप्ति देणारा, प्रिय, स्निग्ध, गुरु असा आहे. याला आम्रलेह म्हणतात.

## मज्जिकाशिखरिणी.

सितसितंदधिमध्वाज्यंमरीचैलादिसंस्कृतं ॥ नागकेसरत्वक्पत्रतमालार्द्रक चूर्णकं ॥ कर्पूरवासितेभांडेलघुहस्तेनघर्षयेत् ॥ ऐक्यतांसमनुप्राप्तेसिद्धा स्यान्मज्जिकाभिधा ॥रसालाशुक्रकृत्बल्यारोचनावातपित्तजित् ॥ गुरुः स्निग्धाप्रतिश्यायंविशेषेणविनाशयेत ॥ पुष्टिदाकांतिकृत्वृष्याकफकृच्छ्र विनाशिनी ॥

**अर्थ**– मज्जिकाशिखरिणी. साखर, घट्ट दहीं, मध, तूप, मिरीं, एलची, नागकेशर, दालचिनी, तमालपत्र, आलें किसलेलें यांचें चूर्ण एकत्र करून कर्पूरवासित निष्कलंक भांड्यांत घालून हळूहळू एकरूप होई तोंपर्यंत हातानें घांसावें. याला मज्जिकाशिखरि-णी म्हणतात, ती शुक्रकारक, मधुर, बलकारक, रुचिकर, वातपित्तनाशक, स्निग्ध, गुरु, प्रतिश्यायनाशक, पुष्टिकर, कांतिकारक, वृष्य, कफकर, श्रमनाशक अशी आहे.

## रसालाशिखरिणी (श्रीखंड).

वस्त्रेबध्वाथगलितंदधिद्विप्रस्थमानकं ॥ तस्मिन्घृतंमाक्षिकंचप्रत्येकंचप लंपलं ॥ निक्षिप्यशर्करांतस्मिन्मानिकाद्वितयंतथा ॥ नागकेसरमेलात्व क्पत्रंतमालसंज्ञकं ॥ अर्धकर्षंक्षिपेद्विश्वामरिचद्विपलंतथा ॥ सर्वमेकी कृतंतत्तुभांडेकर्पूरवासिते॥गृहीत्वाचैववस्त्रेणमुखंबध्वाथगालयेत्॥ हस्ते नालोडयत्तेनसारसालाभिधास्मृता ॥ गुणैस्तुल्यामज्जिकायाःशिखरि ण्याःस्मृताबुधैः ॥ अनीवनार्पितेभांडेमृन्मयेनिक्षिपेत्ततः ॥स्थलेचशीतले स्थाप्यायावत्शीतत्वमाप्नुयात् ॥ इयंवासवनोप्रोक्तागुणैर्लघ्वीस्मृताबुधैः ॥

**अर्थ**–दहीं फडक्यांत बांधून पाणी निथळून गेलेलें असें घट्ट दोन प्रस्थ ह्मणजे १२८ तोळे असेल तर त्यांत मध, तूप चार चार तोळे व साखर दोन मानिका ह्मणजे ६४ तोळे व दालचिनी, नाकेशर, एलची, तमालपत्र हीं अर्ध अर्ध तोळा व मिर्यें, सुंठ हीं दोन दोन तोळे याप्रमाणें सर्व पदार्थ घालून तें दहीं कर्पूरवासितभांड्याचे तोंडावर पांढरें स्वच्छ फडकें बांधून त्यावर हळू हळू घासावें. त्याला रसालाशिखरिणी ह्मणतात. हिचे गुण म-

ज्जिकाशिखरिणीसारिखे होतात, असें जाणावें. ती रसाला शिखरिणी फार तापवून लाल झालेल्या मातीच्या भांड्यांत घालून तें भांडें थंड होईपर्यंत ओल्या जाग्यावर नेऊन ठेवावें. तिचें नांव वासवती. ती फार हलकी आहे.

## फलवृष्याशिखरिणी.

मधुरायाश्चाम्लिकायामज्जाग्राह्याचानिस्तुषा ॥ तस्यामेलांसितांचंद्रं
मरीचानियथारुचि ॥ निक्षिप्यहस्तेनालोड्यघृतेनसंप्रेविनिक्षिपेत् ॥
फलवृष्याशिखरिणीहृद्यावृष्यासरागुरुः

अर्थ— गोड चिंचेचा जाड बलक करून त्यांत साखर, एलची, मिरीं, कापूर यांची पूड नेमस्त घालून हातानें कालवावें आणि तुपाची फोडणी द्यावी, तिचें नांव फलवृष्या शिखरिणी. ती हृद्य, वृष्या, सारक, गुरु अशी होते.

## दुधाची खीर.

दुग्धाष्टमांशभागेनतंदुलान्घृतसंस्कृतान् ॥ शुद्धेर्धपक्वे दुग्धेतुक्षिप्त्वासिद्धाहिक्षी
रिका ॥ पायसंशर्करायुक्तघृतप्रक्षेपणाद्भवेत् ॥ सागुर्व्यातुकृतबल्यामलाव
ष्टंभकातथा ॥ अरुचिमेदवृद्धिंचकफमग्निश्चमंदतां ॥ कुर्याचरक्तपित्तंहिवा
तपित्तंचनाशयेत् ॥ केचिदस्यांकुंकुमेलांक्षिप्त्वाकुर्वंतिपायसं ॥

अर्थ— दुधाचे अष्टमांश तांदूळ घेऊन त्यांना तुपाचा हात चोळावा. आणि दूध घालून पळीनें वाढतां येई इतकें पातळ शिजवावें. आणि त्यांत तूप व साखर घालावी, त्याला क्षीर ह्मणतात. हींत कोणी विलाची व केशर घालितात. ती जड, धातुवर्धक, बलकारक, मलावष्टंभक, आहे व अरुचि, मेदोवृद्धि, कफ, अग्निमांद्य, यांना करणारी व रसायनी अशी आहे व रक्तपित्त, वातपित्त यांचा नाश करिते.

## नारळाची खीर.

नारिकेलंतनूकृत्यछिन्नंपयसिगोःपचेत् ॥ सितागव्याज्यसंयुक्तंतत्पचेन्मृदु
वन्हिना ॥ नारिकेलोद्भवाक्षीरीस्निग्धाशीतातिपुष्टिदा ॥ गुर्वीसुमधुरावृष्या
रक्तपित्तानिलापहा ॥

अर्थ— चांगला आगरी रसाचा नारळ आणून बारीक किसून गाईचे दुधांत वाटावा आणि तें दूध फार पातळ व फार घणसर न होई असें मंदाग्नीवर शिजवावें आणि त्यांत साखर, तूप नेमस्त घालून पुनः क्षणभर कढवून उतरावें, तिला नारळाची खीर ह्मणतात. ही शीतळ, स्निग्ध, गुरु, पुष्टिकारक, मधुर, धातुवर्धक अशी आहे व वायु, रक्त, पित्त यांचा नाश करिते.

## गव्हांची खीर.

गोधूमपायसाबल्याकफमेदकरागुरुः ॥
शीतलापित्तशमनीवातकृन्शुक्रवर्धनी ॥

अर्थ– पूर्वी गहूं चांगले सडून त्यांची पूर्वी सांगितल्याप्रमाणें खीर करावी. ती बल, कफ, मेद यांना करणारी व गुरु, शीतल, पित्तनाशक, वातकर आणि धातुवर्धक अशी आहे.

## पंचसाराख्यपानक.

काश्मरीमधुखर्जूरमृद्वीकाफालसाफलं ॥ तेषांजलंगृहीत्वातुएकीकृत्यक्षिपेद्‌मून् ॥ चातुर्जातंदुमरिचशर्करार्द्रकादिकान् ॥ वस्त्रेणगालयित्वातत्पंचसाराख्यपानकं ॥ गुरुवृष्यंधातुकरंपित्ततृट्श्रमदाहनुत् ॥

अर्थ– शिवन, मोह, खजूर, द्राक्षें व फालशाचीं फळें यांचें पाणी करून चातुर्जात, कापुर, मिरीं, साखर, आलें हे पदार्थ नेमस्त लावून गाळावें. त्याचें नांव पंचसाराख्यपानक. हें गुरु, वृष्य, धातुकर असें आहे व पित्त, तृषा, श्रम, दाह यांचा नाश करितें.

## द्राक्षांचें पानक.

द्राक्षायाःपानकंमूर्छारक्तपित्ततृषापहं ॥ श्रमदाहग्लानिहरमथफालसपानकं ॥ बदरीफलपानंचहृद्यंचमलरोधकृत् ॥

अर्थ– पूर्वी सांगितल्यासारप्रमाणें तयार केलेलें द्राक्षांचें पानक मूर्छा, रक्तपित्त, तृषा, श्रम, दाह, ग्लानि यांचा नाश करितें, व फालसाचें व बोरांचें पन्हें हृद्य, मळावरोधक आहे.

## दुसरेप्रकारचें पन्हें.

खर्जूरीफालसाद्राक्षाटेंभुर्णीकोलदाडिमी ॥ आसांफलरसश्चेक्षुरसेंदुमारिचंगुडं ॥ चातुर्जातंचयोग्यंहिनिक्षिपेत्तद्रसेभिषक् ॥एतद्धिपानकंयोग्यंहृद्यंतृप्तिकरंगुरु॥विष्टंभिमूत्रलंचैवग्लानिश्रमतृषाहरं ॥ तत्तत्फलैस्तुसदृशागुणशेषाइनीरितं ॥

अर्थ– खजूर, फालसा, द्राक्ष, टेंभुर्णी, बोर, डाळिंब यांच्या फळांचा रस व उसाचा रस, गूळ, चातुर्जात, कापूर, मिर्यें हे पदार्थ यथायोग्य घालावे त्यालाही पन्हें ह्मणतात. तें हृद्य, तृप्तिकर, गुरु, विष्टंभि, मूत्रल आहे आणि ग्लानि, श्रम, तृषा यांतें नाश करितें. हें पन्हें ज्या ज्या फळांचें करावें त्या त्या फळांप्रमाणें गुण जाणावे.

## पानक ह्मणजे पन्हें.

फालसाम्लिकद्राक्षादिपक्कानिचफलानिवै ॥ गृहीत्वातज्जलंकार्यंतास्मि

न्आर्द्रकचंद्रकौ ॥ चातुर्जातंमरीचानिशर्करांचयथारुचि ॥ क्षिप्त्वावस्त्रेगालितंस्यात्पानकंतच्चमूत्रलं ॥ हृद्यंतृप्तिकरंपित्तश्रमतृट्ग्लानिछर्दिहृत् ॥ वातंदाहंमदंमोहंनाशयेत्तत्त्रिधास्मृतं ॥ अम्लंचमधुरंचैवतद्गुणाःस्युर्यथाफले ॥

**अर्थ—** फाळसाफळें, चिंच, द्राक्षे इत्यादि फळांचें पाणी करून त्यांत साखर, मिरीं, आलें, कापूर, चातुर्जात हे पदार्थ यथायोग्य घालून कालवून फडक्यानें गाळावें. तें पानक ह्मणतात. हें मूत्रल, हृद्य, तृप्तिकारक व पित्त, श्रम, तृषा, ग्लानि, वांति, वायु, दाह, मद, मोह यांचा नाश करितें. हें आंबट व गोड अशा भेदानें दोन प्रकारचें आहे आणि ह्या पन्ह्यांत ज्या ज्या फळाचा रस असेल त्या त्या फळाचे गुण होतात असें जाणावें.

## प्रमोदाख्य सट्टक.

सांद्रेदध्निमरीचंपिप्पलिशुंठीलवंगकर्पूरं ॥ एषांचूर्णसार्कशर्करयामर्द्यशुद्धवस्त्रेण ॥ गालयित्वाक्षिपेत्तस्मिन्पक्वदाडिमबीजकं ॥ प्रमोदसट्टकंह्येतत्वर्धमानगुणैःसमं ॥

**अर्थ—** घट्ट दह्यांत मिरीं, पिंपळी, सुंठ, लवंग, कापूर यांचें चूर्ण व साखर हीं घालून घोटावें आणि फडक्यानें गाळून त्यांत पिकल्या डाळिंबाचे दाणे घालावे त्याला प्रमोदाख्य सट्टक ह्मणतात. त्याचे गुणही वर्धमानसट्टकासारिखेच आहेत.

## वर्धमानसट्टक.

सांद्रंदधिगृहीत्वातुकिंचिन्मस्त्वाचमंथयेत् ॥ शर्करांमरिचंशुंठीपिप्पलीजीरचूर्णकं ॥ निक्षिप्यचयथायोग्यंहस्तेनालोडयेत्ततः ॥ वस्त्रेणगालयेत्तस्मिन्पक्वदाडिमबीजकं ॥ निक्षिप्यसिद्धमेतत्तुसट्टकंवर्धमानकं ॥ गुरुदीप्तिकरंरुच्यंबलदंतृप्तिकारकं ॥ कंठेहितंचपित्तंचश्रमंग्लानिंनृपांजयेत् ॥

**अर्थ—** सायीसुद्धां घट्ट दहीं घुसळून त्यांत साखर व सुंठ, मिरीं, पिंपळी, जिरें यांची पूड नेमस्त घालून भांड्यांत घोटावें आणि फडक्यानें गाळून त्यांत पिकल्या डाळिंबाचे दाणे घालावे त्याचें नांव वर्धमानसट्टक. तें जड, अग्निदीपक, रुच्य, बलप्रद, तृप्तिकारक, कंठाला हितावह आहे आणि वायु, पित्त, श्रम, ग्लानि यांचा नाश करितें.

## सामसट्टक.

दधिवीचींविनिष्काश्यतस्मिन्विश्वामरीचयोः ॥ कृष्णाचित्रकयोश्चूर्णंक्षिप्त्वाभांडेसुघोलयेत् ॥ वस्त्रपूतेततस्तस्मिन्बीजंदाडिमजंक्षिपेत् ॥ सोमसट्टकनामासौवर्धमानगुणैःसमः ॥

**अर्थ**—सोमसट्टक. दह्यांची वरची साई काढून टाकून मग त्या दह्यांत सुंठ, मिरीं, पिंपळी, चित्रक यांचें चूर्ण घालून भांड्यांत घोटावें. नंतर फडक्यानें गाळून त्यांत पिकलेल्या डाळिंबाचे दाणे घालावे. तो सोमसट्टक गुणांनीं वर्धमानसट्टकासारिखा आहे.

## वांग्यादिकांचें भरित.

वृंताकंभर्जयित्वातुत्वङ्निष्काश्यात्प्रयत्नतः ॥ हस्तेनसूक्ष्मंसंमर्द्यसैंधवंचाग्निरामठं ॥ बृहदार्द्रमरीचंचतथाकुस्तुंबरींक्षिपेत् ॥ सूक्ष्मीकृतंश्रीफलंचदधिवानिंतिडीफलं ॥ क्षिप्त्वाहस्तेनसंमर्द्यधूनेनप्रेविनिक्षिपेत् ॥ एवंसर्वफलानांचकंदानांचभरित्रकं ॥ कार्यंतत्तद्गुणकरंप्रोक्तंपाकविशारदैः ॥

**अर्थ**— वांग्यांचें भरित. वांगीं अग्नीवर भाजून त्यांचे वरची साल काढून टाकावी आणि तीं कुसकरावीं त्यांत मीठ, चित्रक, हिंग, ओली मिरची, ओली कोथिंबीर, आणि नारळाचा कीस व दहीं किंवा चिंच घालून हातानें कालवावें आणि फोडणी द्यावी, याचें नांव भरित. याप्रमाणें सर्व फळांचें व सर्व कंदांचे भरित करावें. त्याचे गुण त्या त्या फळासारिखे व त्या त्या कंदासारिखे जाणावे.

## कूष्मांडवटक (सांडगे).

कूष्मांडकर्तयित्वास्यजलंनिष्काश्ययत्नतः॥ कुस्तुंबुरुनिशामाषचूर्णसातिलसैंधवं ॥ निक्षिप्यवटकाःकार्याआतपेशोषयेत्ततः ॥ रुचिदावातहंतारस्तिलतैलेसुपाचिताः ॥ कर्कट्यालाब्वादीनांतुकार्याश्चैवंविशारदैः ॥

**अर्थ**— कोहाळा बारीक चिरून त्याचें पाणी काढून नंतर धने, हळद, तिळ, मीठ, उडदांचें भरड पीठ हीं यथायोग्य घालून पोफळाएवढे गोळे करावे आणि उन्हांत वाळवावे त्यांचें नांव कूष्मांडवटक, हे तेलांत तळून द्यावे, हे रुचिकर व वातनाशक आहेत. याच प्रमाणें कांकडी, भोंपळा इत्यादिकांचे सांडगे करावे.

## कूष्मांडवटक.

कूष्मांडकफलंगृह्यकर्तयित्वाप्रयत्नतः ॥ तस्माज्जलंचनिष्काश्यतस्मिन् चूर्णंविनिक्षिपेत् ॥ चणकानांमाषकानांधान्यानांमरिचस्यच ॥ निशायारामठस्यापिलवणंचयथारुचि ॥ कोलप्रमाणावटकाःकूष्मांडस्येतिसंज्ञिताः तेसौरभेयेप्रक्षिप्यारुचिदावातहारकाः ॥

**अर्थ**— कोहोळा किसून त्यांतील पाणी निथळून त्यांत हरभरे, उडीद यांचें भरड पीठ;

धने, मिरच्या, हळद, हिंग मीठ हीं यथायोग्य घालून बोराएवढ्या गोळ्या कराव्या आणि उन्हांत वाळवाव्या. ह्या सांभाऱ्यांत घालितात. यांचें नाव वडश्वंडें. हीं रुचिकर, वातनाशक आहेत.

## मिरगुंडें.

आढकीमाषचणकतंदुलानांतुपिष्टके ॥ हिंगुलवणधान्याकान्क्षिप्त्वातो येनमेलयेत् ॥ संमर्द्यचततःपश्चात्गृहीत्वैकंमरीचकं ॥ तद्गर्भभूतांगुटिकां कृत्वोष्णेनविशोषयेत् ॥ मरीचगर्भसंज्ञेयंगुटिकाघृतपाचिता ॥ वातगुल्मह राहृद्यारुचिदासाचभाक्षिता ॥

अर्थ– तुरीची डाळ, उडीद, चणे, तांदूळ इत्यादिकांचे पिठांत हिंग, मीठ, ओली कोथिंबीर हीं घालून पाण्यानें कालवून चांगलें मळावें आणि त्या पिठांत एकेक मिरीं घालून हरभऱ्याएवढ्या गोळ्या कराव्या, आणि उन्हांत वाळवाव्या. त्यांना मिरगुंडें ह्मणतात. तीं तुपांत तळून खाल्लीं असतां वायु, गुल्म यांचा नाश करितात. तीं हृद्य व रुचिकारक आहेत.

## सूरणवटक.

सूरणंखंडशःकृत्वास्वेदयित्वाचपेषयेत ॥ तस्मिंश्चलवणंहिंगुजीरकंवामरीचकं ॥ निक्षिप्यवटकान्कृत्वाघृतेनप्रेचपाचयेत ॥ रुच दादीपनाःप्रोक्तावातदुर्नामनाशनाः ॥

अर्थ– सुरणाच्या बारीक फोडी करून शिजवाव्या आणि वाटून त्यांत मीठ, हिंग, किंवा जिरें, मिरें हीं नेमस्त घालून वड्या कराव्या आणि त्या तुपांत तळाव्या. त्या रुचिकर, दीपन आहेत आणि वायु, अर्श यांचा नाश करितात.

## तांदुळांचे पापड.

तंडुलानांरुचिकराबल्याधातुविवर्धकाः ॥
कफवातहरावृष्यापाचकालघवःसराः ॥

अर्थ– तांदुळाचे पापड रुचिकर, बलकर, धातुवर्धक व कफ, आणि वात, यांचा नाश करणार, वृष्य, पाचक, लघु, सारक असे आहेत.

## उडदांचे पापड.

धूमसीमाषजांहिंगुहरिद्रालवणैर्युतां ॥ जीरकस्वर्जिकाभ्यांचमरीचेनजले

नच ॥ आलोडयलोष्ठंकृत्वातुद्विदिनंस्थापयेत्तथा॥ पश्चात्दृषदिनिष्कुट्य तनूकृत्यचवेल्लिताः ॥ पर्पटास्तेसदंगारभ्रष्टाःपरमरोचनाः॥दीपनाःपाचना रुक्षगुरवःकिंचिदीरिताः ॥ माषजाःपर्पटाबल्यारोचनाःपाचनाःसराः॥गुर वोरक्तपित्ताग्निकफदाबहुवर्चसः ॥ चणकानांगुणैर्युक्ताःपर्पटाश्चणकोद्भ वाः ॥ स्नेहेविर्भर्जितास्तेतुभवेयुर्मध्यमागुणैः ॥

अर्थ– उडदांचे डाळीचें पीठ, हिंग, हळद, मीठ, जिरें, पापडखार, मिऱ्यें हे पदार्थ घालून पाण्यांत गोळा होई तोंपर्यंत भिजवावें, आणि एक दोन दिवस तसेंच ठेवून नंतर दगडावर ठेंचून पराकाष्ठेचें मऊ करावें. त्याची लहान लहान लाटून पातळ पापडी करावी. त्यांचें नांव पापड. ते भाजून सेवन केले असतां अत्यंत रुचिकारक, दीपन, पाचन, रुक्ष, किंचित् जड आहेत. उडदांचे पापड बलकर, रुचिकर, पाचक, सारक व जड, आहेत व रक्तपित्त, अग्नि, कफ व मळ यांना वाढविणारे आहेत आणि चण्यांचे पापड चण्यांचा गुणांसारिखे आहेत. हे सर्व प्रकारचे पापड तेलांत तळून सेवन केले असतां गुणानें मध्यम होतात.

## मुगांचे पापड.

मुद्गजाःपर्पटाःपथ्याज्वराक्षिश्रवणामये ॥
अरोचकछिदःस्निग्धालघवोदोषनाशनाः ॥

अर्थ– मुगांचे पापडांची कृति उडिदांचे पापडांप्रमाणें जाणावी. हे पथ्यकारक, ज्वर, नेत्ररोग, कर्णरोग, अरुचि यांचे नाशक व स्निग्ध, लघु, दोषनाशक आहेत.

## सांड्या, चिकवड्या, कुरवंड्या.

धौतास्तुतंदुलाःशुष्काःकृत्वापिष्टंविनिर्हरेत् ॥ तस्मिन्मरीचलवणेनिक्षिपे द्रामठंतथा॥ उदकेसुविपक्वंतत्गृहीत्वातस्यपर्पटाः ॥ कर्तव्याःसांडिकाभि ख्याःपक्त्वातैलेघृतेपिवा॥भक्षितावलदाहृद्याःकफवातविदारणाः॥कृतास्त स्यैववटिकाःशुष्काश्चिक्कवटिसंज्ञिताः॥ घृतेतैलेविपक्वाःस्युर्गुणैःपूर्वादिताय था ॥पक्वंतदेवपिष्टंहिकाष्टयंत्रेविनिक्षिपेत् ॥ मर्दितंतेनयंत्रेणपतंत्यंगुलिस न्निभाः ॥ शुष्कीकृत्वाभक्षितास्तेरुचिदाःपीनसापहाः ॥ त्रिदोषशमनाश्चैव कुरवंडयाइतिस्मृताः ॥

अर्थ– सांड्या. तांदूळ धुऊन चांगले वाळवून दळून पीठ करावें आणि त्यांत मिरीं, मीठ, हिंग हे पदार्थ घालून त्यांची उकड करावी; त्या उकडीचे पापड करावे, त्यांना

सांड्या म्हणतात. ह्या तेलांत किंवा तुपांत तळून खाल्ल्या असतां बलकर, प्रिय आहेत व कफ, वात यांचा नाश करितात.

त्याच उकडीच्या वड्या करून वाळवाव्या, त्यांला चिकवड्या म्हणतात. ह्या तळून सेवन केल्या असतां गुण सांड्यांसारिखे आहेत.

वर सांगितलेली उकड, सांड्यानामक लांकडाचें शेवग्यासारिखें यंत्र आहे त्यांत घालून दाबून बोटाएवढे जाडे लांबट तुकडे पडतात ते वाळवून, तळून भक्षण केले असतां रुचिकर व पडसें, त्रिदोष यांचा नाश करितात. ह्यांचें नांव कुरवड्या. ह्या गव्हांच्याही होतात.

## उडदांचे वडे.

लवणमरिचहिंगुशृंगबेरैःसमुपचितोवरमाषजःसुपक्वः ॥ अनिसुरभिघृते थवासुतैलेविशतिमुखेवटकःसुपुण्यभाजां ॥ पवनारुचिदैन्यजयेभटकःक्षयकार्दितकंपमरुत्कटकः ॥ रसनानलरंगधरोनटकःकफपित्तविकारकरो वटकः ॥ दधिमध्येकृतश्चेत्स्यात्सएववटकःशुभः ॥ स्त्रीप्रसंगेहितोबल्यःपुंसांधातुविवर्धकः ॥ वातपीडांजयेद्रक्तपित्तश्लेष्मकरोह्यसौ ॥

**अर्थ**— उडदांची डाळ पाण्यांत भिजत घालून वाटावी आणि त्यांत मीठ, मिऱ्यें, हिंग, आलें हे पदार्थ घालून त्या वाटलेल्या डाळीचे वडे करावे. ते तुपांत किंवा तेलांत तळावे. ते वडे पुण्यवानाला नेहमीं मिळतात. हे वायु, अरुचि, दुर्बलपणा, क्षय, आर्दितवायु यांचे नाशक व कफ, पित्तविकार यांना करणारे असे होतात.

तीच डाळ वाटून दह्यांत कालवून वडे करून तळावे. ते सेवन केले असतां उत्तम होतात व स्त्रीप्रसंगीं पुरुषास हितावह, बलकारक, धातुवर्धक, वातनाशक आणि रक्तपित्त व कफ यांना करणारे असे आहेत.

## मुगांचे वडे.

मौद्गोवटोगुरूरुच्योवातपित्तास्रदोमनः ॥ श्लेष्मलःपुष्टिबलकृत्शुक्लोबलदोल्पतृट् ॥ मुद्गानांवटकाम्लकेमज्जितालघवोहिमाः ॥ संस्कारजप्रभावेनात्रिदोषशमनाहिताः ॥

**अर्थ**— मुगांचे वडे जड, रुचिकर आहेत व वात, रक्तपित्त, कफ यांना करणारे आणि पुष्टि, धातुवृद्धि, बळ यांना देणारे व अल्पतृषाकारक असे आहेत.

तेच ऊन असतांच पुढें सांगितल्याप्रमाणें ताकांत हिंगादिक घालून त्यांत सोडावे. ते लघु, शीत, संस्कारप्रभावानें त्रिदोषशामक, हितकारक असे होतात.

## कांजिकवटक (कांजिवडे).

मंथनीनूतनाधार्याकटुतैलेनलेपिता ॥ निर्मलेनांबुनापूर्यतस्यांचूर्णीविनिः

क्षिपेत् ॥ राजिकाजीरलवणंहिंगुशुंठीनिशाकृतं ॥ निःक्षिपेद्वटकांस्तत्रभांड स्यास्यंचमुद्रयेत् ॥ ततोदिनत्रयादूर्ध्वमम्लाःस्युर्वटकाध्रुवं ॥ कांजिकवट कोरुच्योवातहरःश्लेष्मकारकःशीतः ॥दाहंशूलमजीर्णंहरंतेनेत्रामयेष्वहिताः ॥

अर्थ– मातीचा कोरा डेरा घेऊन त्याला हिंगादिकांचा धूप देऊन, आंतून मोहोऱ्यां-चें तेल लावून त्यांत निर्मळ स्वच्छ पाणी घालून त्यांत मोहोऱ्या, जिरें, मीठ, हिंग, सुंठ व हळद यां-चें चूर्ण व उडदाचे केलेले ताजे वडे घालून त्या मडक्याच्या तोंडास घट्ट दादरा बांधून तसेच तीन दिवस ठेवावे. ते आंबट झाल्यावर काढून सेवन करावे. ते रुचिकर, वातहारक, श्लेष्मकारक, शीत आहेत, आणि दाह, शूल, अजीर्ण यांचे नाशक आणि नेत्ररोगाला अप-थ्य असे आहेत.

## तत्रवटक ध्वांसी (पुष्पवटी).

बाल्हीकचूर्णयुतनिर्मलतक्रपूर्णकुंभेयथोचितपटूत्तमराजिकाढ्ये ॥ पूर्वोपि दिष्टकृतितासुकृताश्चयस्मात्सिद्धाश्चतक्रकवटाहदिनोषिताःस्युः ॥ हृद्यालघुरुचिकराःकफकारकाश्चपित्तप्रदाःशुक्रकृतोतिपौष्टिकाः ॥ वातापहारक्तविवर्धनाश्चध्वांसीतिनाम्नाप्रथिताश्चलोके ॥

अर्थ– उडदांची डाळ धुवून वाळवून तिचें चांगलें पीठ करावें त्याचे पूर्वप्रमाणें वडे करून तेलांत किंवा तुपांत तळून ऊन असतांच हिंग, मीठ, मोहऱ्या लावलेल्या ताकांत सो डून कोऱ्या मातीचे मडक्यांत घालून झांकून ठेवावे. ते एक दिवस गेल्यावर दुसरे दिवशीं मृदु झाल्यावर सेवन करावे. ते प्रिय, लघु, रुचिकर, कफकारक, शुक्र वाढविणारे, पित्तकर पौष्टिक, वातनाशक, रक्ताला वाढविणारे असे आहेत, हे लोकांमध्यें ध्वांसी या नांवानें प्रसिद्ध आहेत.

## खंडितवटी (पातवड्या).

चणकानांपिष्टकेचसाम्येनजलमिश्रिते ॥ लवणंहिंगुमरिचंधान्यंचसहरिद्रकं ॥ चूर्णंश्रीफलजंक्षिप्त्वालोडयित्वापचेत्ततः॥ मंदाग्नौविधृतेभांडेयावत्त त्सांद्रतांव्रजेत्॥भांडादुध्धृत्यपश्चात्तदाज्याक्तेपीठकेलिपेत्॥ वस्त्रस्तस्यच तूस्मात्तैलेवाथघृतेपचेत्॥शुक्रंवोर्यंबलंकांतिकंपुष्टिंरुचिंतथा॥कुर्वंति नाम्नावस्त्रस्ताःकथिताःखंडिताभिधाः ॥ मलस्तंभकरागुर्व्योवातपित्तालनाशनाः ॥

अर्थ–चण्याचे पिठांत समान पाणी व मिरीं, मीठ, हिंग, धणे, हळद, किसलेला ना-रळ घालून कालवावें; आणि भांड्यांत घालून मंदाग्नीवर युक्तीनें शिजवून घण झालें

णजे खालीं उतरून तूप लावलेल्या पाटावर उपसून काढावें. नंतर हळूहळू तळहातानें थापटून भाकरीसारिखे करावे, आणि अगदीं निवून थंड झाले असतां त्याच्या सुरीनें चौकोनी थापऱ्या कापून तुपांत किंवा तेलांत तळाव्या. त्या शुक्रधातु, वीर्य, बल, कफ, कांति, पुष्टि यांना वाढवितात व गुरु, रुचिकर व पित्त, रक्तदोष, वायु यांचा नाश करितात.

## चण्याचीं भजीं.

चणकानांहिपृमस्यांनिशाधान्याकरामठाः॥लवणंमरिचंजीरंमकत्रपरिमर्द येत्॥जलेननस्यवटिकालघ्व्यः कार्याःप्रयत्नतः॥उपस्करंचलवणंतक्रेनि क्षिप्ययत्नतः॥ वस्त्रोघृतेपाचिताश्चतस्मिन्तक्रेविनिक्षिपेत्॥तास्तुशुक्ररुचि स्थौल्यकांतिदावातनाशनाः॥ कफपित्तक्षयकरालघ्व्योमृदवोबलप्रदाः॥

**अर्थ**—चण्याच्या पिठांत हळद, धने, हिंग, मीठ, मिरें, जिरें हे पदार्थ घालून तें पीठ पाण्याशीं चांगलें मळावें आणि त्याच्या लहान लहान चकल्या कराव्या. त्या तुपांत तळून वेसवार, मीठ घातलेल्या ताकांत कढत असतांना तीं सोडाव्या. त्या शुक्र, रुचि, स्थूलता, कांति यांना देणाऱ्या व वात, कफ, पित्त यांचा नाश करणाऱ्या आणि लघु, मृदु, बल देणाऱ्याअशा आहेत.

## शिजवलेलीं व तळलेलीं कडबोळीं.

माषाणांधूमसीहिंगुलवणार्द्रकसंयुता ॥ जलेननिविडंमर्द्यकार्याःपृथुलव र्तयः ॥ तासांचवर्तुलंकृत्वाजलेसंस्वेदयेत्ततः ॥ गृण्हीयाद्वेष्टनीनाम्नाशुक्र लाबलकारिणी ॥ गुर्वीकफकरीपाकेमधुरापित्तकोपनी ॥ मार्गस्थानांहि तकरीवातनाशकरीस्मृता॥पाचिताचघृतेसैवकचवल्लीतिविश्रुता ॥गुरुर्वृ ष्यापुष्टिकरीबलदातृप्तिकारिका ॥ पित्ततेजःकफानांचकारिणीवातनाशिनी॥

**अर्थ**– उडदाचें पीठ, हिंग, मीठ, बारीक केलेलें आलें हे सर्व पदार्थ पाण्यांत एकत्र घट्ट मळून व नंतर त्याच्या लठ वाती करून त्याचीं वर्तुळें करावीं आणि वाफेवर शिजवावीं. त्याचें नांव वेष्टनी. त्या शुक्रकर, बलकारक, जड, कफकर, पाककालीं मधुर अशा आहेत आणि पित्ताला कोपवणाऱ्या मार्गस्थास हितावह, वातनाशक अशीं आहेत. तींच तुपामध्यें तळलीं असतां त्याचें नांव कचवल्ली. ही जड, वृष्य, पुष्टिकारक, बलदेणारी, तृप्तिकारक आणि पित्त, तेज, कफ यांना करणारी, वातनाशक अशी आहे.

## माषपिंड्या (उंड्या).

माषपिष्टेजीरकंचलवणांहिंगुचार्द्रकं ॥ यथायोग्यंमेलयित्वाजलेनापिविम

दर्येत् ॥ तस्यलंबाकृतीःकार्यागुटिकाःशोभनाकृतीः ॥ दोलायंत्रेणमंदाग्नौ पाचिनाश्चघृतेपुनः ॥ पाचनीयाश्चताःसर्वाबल्याःशुक्रविवर्धनाः ॥ पुष्टिदागुरवश्चैववातारोचकनाशनाः ॥ अर्दितघ्नाश्चविज्ञेयाएवंमुद्गभवाअपि ॥ लघ्वयोल्पबलदाःप्रोक्तानाम्नामाषंडर्योमताः ॥

अर्थ– उडदांच्या पिठास जिरें, मीठ, हिंग आलें हे पदार्थ नेमस्त वाटून लावावे व पात सुकसुकें मळून त्याचीं मुटकळीं करावीं व तीं भांड्याच्या तोंडावर फडकें बांधून न पाणी घालून वाफेवर मंदाग्नीनें शिजवावीं. तीं तेलांत किंवा तुपांत तळावीं किंवा च्या सुरीनें कापक्या काढून तळाव्या. या माषंडऱ्या बलकर, शुक्रवर्धक, पुष्टिप्रद, गुरु, ा आहेत व वायु, अरुचि आणि अर्दितवायु यांचा नाश करितात.

## पातवड्या (अळवड्या).

मरीचादिनयंधान्यंशुष्कंश्रीफलवाल्हिके ॥ जीरकंत्वकूद्वयंचार्द्रकुस्तुंबुरुलवंगकं ॥ एतानितैलेपक्त्वाचतस्यचूर्णससैंधवं ॥ पिष्टेनिक्षिप्यचाणक्येजलेनाद्रंतुकारयेत् ॥ लेपनेयोग्यकंकृत्वानागवल्लयल्वकेदले ॥ तुंब्याःपत्रेथवालिप्त्वानिविडंतस्यचोपरि ॥ पर्णद्वितीयंलिप्त्वैवअंगुलीपरिमाणके ॥ वनेजातेततोवेष्ट्यवर्तिकाजलसंयुते ॥ मुखेवस्त्रेणसंयुक्तेनिक्षिपेचततोपरि ॥ अपरंसजलंपात्रंनिक्षिप्यसुविपाचयेत् ॥ मंदाग्नौचततोधृत्यखंडाअंगुलिसंनिभाः ॥ कृत्वातैलेघृतेवापिपक्वारुचिबलप्रदाः ॥ शुक्रस्थौल्याग्निमतिदाकांतिदावातनाशनाः ॥ कफपित्तहरानूनंवटिकाःपात्रिकाभिधाः ॥

अर्थ-- धणे, मिरच्या, मिऱ्यें, सुकें खोबरें, हिंग, जिरें, किंचित दालचिनी, कबाबचिनी, वंग, ओली कोथिंबीर हीं सर्व तेलात युक्तीनें तळून कुटून बुकी करावी. नंतर बुकी व मीठ ण्याच्या पिठांत घालून तें पीठ पाण्यानें नेमस्त कालवावें आणि अळूं, नागवेल किंवा पिळी इत्यादिकांचे पानांवर त्या पिठाचा लेप करावा. नंतर दुसरें पान लावावें. पुनः लेप वा. असें करितां करितां बोटा इतकें जाड झालें ह्मणजे त्याची गुंडाळून वळकटी करावी आणि विस्तीर्ण भांड्यांत पाणी घालून तोंडावर फडकें बांधून त्यावरती वळकटी वून वर पाणी घालून झांकण ठेवून मंदाग्नीवर शिजवावें आणि वळकट्या बाहेर काढून ठाले आंगुळभर जाड असे सुरीनें तुकडे करून तेलात किंवा तुपांत तळावे. त्या अतिरुचिर, व बल, शुक्र, स्थौल्य, अग्नी, कांति, बुद्धी, यांतें देणाऱ्या व वात, पित्त, कफ यांचा ाश करणाऱ्या आहेत.

## मोहनभोग (लापशी).

त्रिंशत्कर्षघृतंतप्त्वातस्मिन्गोधूमचूर्णकं ॥ निस्तुषंघृतमानेनक्षिप्त्वादर्व्या

विचालयेत् ॥ गृहीत्वाचसमंदुग्धमल्पमल्पंविनिक्षिपेत् ॥ तिष्ठेतालोडयन् तावद्यावत्स्रस्ताज्यदर्शनं॥पक्वेततःक्षिपेत्तस्मिन्शर्करांसममानतः ॥ एलालवंगमरिचचूर्णंक्षिप्त्वाविलोडयेत्॥ क्षणेनचततोत्तार्यसिद्धोयंभोगमोहनः बल्योवृष्योगुरुःस्निग्धःकफकृद्धातुवर्धनः।रसेपाकेचमधुरोवातपित्तविनाशनः॥

अर्थ– मोहनभोग. शेरभर तूप चांगलें कढवून त्यांत बारीक गव्हांचा रवा तुपाचे समान घालून किंचित् पळीनें ढवळावा आणि तुपाचे समान दूध घेऊन थोडें थोडें शिंपावें आणि चाळवीत राहावें, असें करितां करितां दूध त्याचे आंगीं जिरून बाहेर तूप दिसे तोंपर्यंत शिजवावें. नंतर साखर रव्याचे समान घालावी आणि एलची, लवंगा, मिऱ्ये यांचें चूर्ण नेमस्त घालून चांगलें चाळवून क्षणभर तसेंच ठेवून नंतर उतरावें, त्याला मोहनभोग ह्मणतात. तो बलकर, वृष्य, गुरु, स्निग्ध, कफकर, धातुवर्धक व रसकाळीं व पाककाळीं मधुर आणि वायु, पित्त यांचा नाशक आहे.

## मोहनभोग (मैसी लापशी).

गोधूमपिष्टितासाम्येनघृतंन्यस्यसुभर्जयेत् ॥ शर्करांपिष्टमानेनसमांतप्तजलेन्यसेत् ॥ लोडयित्वाततोवस्त्रपूतांपिष्टेविनिक्षिपेत् ॥ मंदाग्नौविपचेत्तावत्जलंपीत्वाघृतंक्षरेत्॥शुष्कश्रीफलचूर्णमेलाशुंठीमरीचनिर्बीजाः॥ केनकिफलखंडांश्चक्षिप्त्वादर्व्याविचालयेत्कुशलः॥ पक्वाचरक्तवर्णानिसिद्धोयंभोगमोहनः ॥ शीतकालेतुभोक्तृणांपरःप्रोक्तःसुखावहः ।

अर्थ--गव्हांच्या रव्यांत समान तूप घालून भाजावा, आणि रव्याचे समान साखर आधण आलेल्या पाण्यांत घालून ढवळून तें पाणी गाळून त्या रव्यांत घालावें, आणि खालीं नेमस्त अग्नि लावून तें पाणी आंगीं जिरून बाहेर तूप दिसे तोंपर्यंत शिजवावा, आणि त्यांत सुकें किसलेलें खोबरें व एलची, सुंठ, मिरीं, बेदाणा, खारकांचे तुकडे हीं घालून पळीनें चाळवून चाळवून तांबडा रवा झाला ह्मणजे उतरावा. तो शीतकाळीं भक्षिण्यास फार हितावह आहे

## चंद्रहासा (लापशी).

तप्तेघृतेनसाम्येनासितगोधूमचूर्णकं ॥ क्षिप्त्वादर्व्यासुनिर्वर्त्यतत्समांक्षीरशर्करां ॥ गालितांशुद्धवस्त्रेण तस्मिन्चूर्णेविनिक्षिपेत् ॥ मंदाग्नौविपचेत्तावत् क्षीरंपीत्वाघृतंक्षरेत् ॥ पश्चाच्चंद्रमरीचैलाचूर्णंक्षिप्त्वाविलोडयेत् ॥ उत्तार्यभक्षितोवृष्यःकफकृत्धातुकृत्गुरुः ॥ पित्तवातानिहंताचचंद्रहासाभिधस्त्वयं ॥

अर्थ–चंद्रहासालापशी. तापलेल्या तुपांत त्याचे समान चांगला शुभ्र गव्हांचा रवा घा-

ून परतावा आणि तुपाचे व रव्याचे समान दूध, साखर हीं एकत्र मिळवून गाळून त्या रव्यांत गाळून दूध आंगीं मुरून बाहेर तूप दिसूं लागे तोंपर्यंत मंदाग्नीवर शिजवावा, नंतर त्यांत कापूर, मिर्यें, एलची यांचें चूर्ण नेमस्त घालून ढवळून खालीं उतरावा, तो भक्षिल्यास वृष्य, बलप्रद, धातुकर, जड, कफकारक, व पित्त, वायु यांचा नाशक आहे.

## घृतपूर (घिवर).

गोधूमचूर्णंसूक्ष्मंचस्वच्छंतस्मिन्घृतंक्षिपेत् ॥ यावत्तत्पिंडतांगच्छेत्पश्चात्दुग्धेविमर्दयेत् ॥ फेलयित्वाद्रवीभूतेनतःपात्रेघृतंन्यसेत् ॥ सशब्देसुघृतेनत्रेतस्यधारामपासृजेत् ॥ यावच्चव्याप्यतत्पात्रंप्रसरेत्घृतपूरकः ॥ यत्किंचित्ताम्रतांयातिखंडपंकेनिमज्जयेत् ॥ सवृष्योगुरुहृद्यश्चबलकृत्धातुवर्धनः ॥ कफासृङ्मांसलकरोवातपित्तक्षयंहरेत् ॥

अर्थ- बारीक स्वच्छ असा गव्हाचा रवा घेऊन त्यांत मुटकळें होईपर्यंत तूप घालून सारखें करून नंतर दूध घालून मोठे रुंद भांड्यांत खूब फेसून पातळ करावें आणि घिवरपात्रांत तूप घालून चुलीवर ठेवून सळसळूं लागलें म्हणजे त्यांत त्या पिठाची बारीक व सारखी धार पात्रभर घिवर पसरे तोंपर्यंत धरावी, नंतर तो किंचित् लाल झाला म्हणजे साखरेचे पंकांत दोहों बाजूंनें बुडवावा, तो गुरु, वृष्य, हृद्य, बलकारक, धातुवर्धक, आहे व कफ, रक्त, पुष्टि, यांना करणारा आणि वायु, पित्त, क्षय यांचा नाश करितो.

## नारळाचे घिवर.

नारिकेलफलंचार्द्रंसूक्ष्मंयत्नेनकर्तयेत् ॥ सूक्ष्मगोधूमचूर्णंतुशर्करामिश्रितेन्यसेत् ॥ दुग्धसंमर्द्यप्राग्वच्चकारयेत्घृतपूरकं ॥

अर्थ- गव्हांच्या रव्यांत साखर, किसलेला ओला नारळ आणि दूध हीं घालून परातेंत चांगला फेसून त्याचे वर सांगितल्या प्रमाणें घिवर करावे.

## तांदुळांचे घिवर.

अर्धविपक्वपयसितंडुलजंवस्त्रगालितंचूर्णं ॥ संमर्द्यशर्करयादुग्धेनाप्यापिपूरकःप्राग्वत् ॥ साध्यःसुधियायत्नादुक्तश्चायंचशालिघृतपूरः ॥

अर्थ- दूध निमे आटवून त्यांत धुतलेल्या चांगल्या तांदुळांचें वस्त्रांत गाळलेलें पीठ व साखर हीं घालून परातेंत फेसून त्याचे घिवर करावे. ते शालिघृतपूर.

## खव्याचे घिवर.

दुग्धंबहुशःपक्त्वातस्मादुत्तार्यपिष्टिकांसकणां ॥ शर्करयासंमिश्रांमंदे

म्नौसाधयेत्तुघृतेचाल्पे ॥ प्राग्वत्सुधियायत्नात्नाम्नाचायंचदुग्धघृतपूरः ॥

अर्थ– दुधाचा खवा करावा आणि त्यांत साखर घालून फेंसावा. नंतर त्याचे घिवर करून मंदाग्नीवर थोडक्या तुपांत युक्तीनें भाजावे. त्याचें नांव दुग्धघृतपूर.

## कचऱ्याचे घिवर.

उच्छोषयित्वापयसश्चूर्णैपिष्टंकसेरवं ॥ मशर्करंविनिक्षिप्यमर्दयेद्
टकांस्तथा ॥ कृत्वाघृतेसुविपचेत्कसेरुघृतपूरकाः ॥

अर्थ– दुधाचे खव्यांत कचऱ्याचें पीठ व साखर घालून मळून वड्यासारिखे करून तुपांत फार युक्तीनें तळावे. ते कसेरुघृतपूर.

## आंब्याच्या रसाचे घिवर.

पक्काम्ररसदरसेघृतेनविपचेन्मंदानलेयत्ननोयावत्स्यात्सुघनस्तथापुनरयंपाच्यः
सितापंकके ॥ संजातेसुघनेततःपृथुतरेविस्तीर्णपात्रेतुतंसंलिप्तेत्तुयथांगुलं
घनतरंतंखंडशःकर्तयेत् ॥ सोयंचाम्ररसोद्भवोघृतपुरोहृद्योगुरुर्दीपकोरुच्यःपि
त्तमरुत्प्रणाशनकरोबल्योतिवृष्योभवेत् ॥ एवंचान्यपदार्थजोघृतपुरस्तत्तद्गु
णैरन्वितोभीमेनप्रियभोजनेनचपुराकृष्णार्थमुत्पादितः ॥

अर्थ– आम्ररसजघृतपूर. पिकले आंब्याचा रस तुपांत घालून मंदाग्नीवर शिजवून जाड खवा करून साखरेचे पाकांत घालून चांगला चाळवावा, आणि उतरून पाटावर आंगुळजाड लिंपून थंड जाहल्यावर चौकोनी वड्या कापाव्या. त्याचे नांव आम्रघृतपूर. असेच शिंगाडे, मखाणे इत्यादिकांचे घिवर करावे. परंतु या आम्ररसाच्या घिवराचे गुण हृद्य, गुरु, दीपक, रुच्य, वातपित्तनाशक, बलकर आणि अतिवृष्य आहेत. बाकी इतर धान्याचे घिवराचे गुण त्या धान्याचे गुणांप्रमाणें जाणावे.

## अपूप (घारगे).

गोधूमसूक्ष्मपिष्टंगुडेनयुक्तंजलेनसंमृदितं ॥ तद्गोल्योवर्तुलानिभाघृतेविपक्का
भवंतिचापूपाः ॥ बल्याहृद्यारुचिदागुरवोवृष्याश्चतुष्टिदाःप्रोक्ताः ॥ पित्तानि
लशमनकरामधुराःप्रोक्ताश्चसूरिभिःकुशलैः ॥

अर्थ– गव्हांचा चांगला बारीक रवा घेऊन त्यांत गूळ घालून पाण्याशीं मळावा, आणि त्याचे वाटोळे तळहाताएवढे अपूप करावे आणि तुपांत तळावे. ते बलकारक,

प्रिय, रुचिकर, जड, वृष्य, पुष्टि करणारे आणि वात, पित्त यांचा नाश करणारे, असें पूर्वाचार्यांनीं सांगितलें आहे.

## शालिपूप (अनारसे).

प्रक्षाल्यतंडुलांस्त्रिःशोषयित्वाचपेषयेत्॥तत्पिष्टंचघृतेनाशर्करांचिचाल्यगुडोदकैः॥मर्दयित्वाचवटकान्कृत्वातिलैस्तबीजकैः॥एकतोगोलयित्वाचतान्घृतेनपचेत्ततः॥शालिपूपास्तुतेसिद्धाःशीतावृष्यारुचिप्रदाः॥स्निग्धाशीसारशमनानाम्नानारससंज्ञिताः॥

अर्थ– तांदूळ तीन वेळां धुऊन वाळवावे, आणि त्याचें पीठ करून त्यात मोहन व गूळ घालून मळावें आणि त्याचे वडे करून ते एक बाजूनें खसखस लावून तुपांत तळावे, ते शीत, वृष्य, रुचि देणारे व स्निग्ध, अर्शासारनाशक असे आहेत. यांना अनारसे ह्मणतात.

## गुळपोळी.

गोधूमचूर्णंक्षिप्राज्यंजलेनार्द्रंविमर्दयेत्॥ मृदोम्नस्मात्संगृह्यतुल्यांक्रमुकपीलुना॥ कृत्वापर्पटकांतस्यशर्कराचूर्णगर्भितां॥गुटिंबध्वापिधायास्यंवेल्लयेत्पूर्णपीटके॥ पर्पटेनसमांकृत्वाघृतेमृदुविपचेत्ततः॥ सागुडागोगुरुर्वृष्याशुक्लावातापित्तनुत्॥ एतादृशीगुडस्यापिभवतीतिमुनिश्चितं॥

अर्थ– गव्हांच्या रव्यांत मोहन घालून पाण्यानें भिजवून मळून मऊ करावा आणि सुपारीएवढी गोळी घेऊन तिची लहान पापडी करून आंत वाटलेल्या साखरेचें पुरण समस्त घालून तोंड मिळवून पुनः युक्तीनें गोळी करून पोळपाटावर लाटून पापडाएवढी जाहाल्यावर तुपांत तळावी, ती गुरु, वृष्य, वीर्यवृद्धिकर, वातपित्त यांचा नाश करिते. याप्रकारें गुळाच्याही गुळाच्या होतात असें जाणावें.

## दधिपूपक.

तंडुलानांसमितानुदध्नासंमर्द्यकारयेत्॥वटकान्वतुलाकारान्घृतेपक्त्वाचेततः॥मज्जयेच्छर्करापंकेतेवृष्याधातुवर्धकाः॥ रुचिदावातपित्तघ्नाग्निमांद्यकफपुष्टिदाः॥

अर्थ– सुंदर तांदुळांचें पीठ दहीं घालून मळावें, त्याचे वडे करून तुपांत तळावे आणि साखरेच्या पंकांत बुडवावे, ते वृष्य, धातुवर्धक, रुचिकर, वायु, पित्त यांचे नाशक आणि अग्निमांद्य, कफ, पुष्टि यांना देणारे असे आहेत.

## संयाव (करंजा).

गोधूमानांसुक्ष्मपिष्टंघृतभ्राष्टंसितायुतं ॥ तस्मिन्चूर्णंक्षिपेदेलालवंगंमरिचानिच ॥ नारिकेलंसकर्पूरंचारोबीजानिमिश्रयेत्॥ दुग्धेनधूमसींमर्द्यतस्याः पर्पटिकासुच॥ तत्पूरणंतुनिक्षिप्यकुर्यान्मुद्रांदृढांसुधीः ॥ सर्पिषिप्रचुरेतांतुपचेन्निपुणयुक्तितः ॥ पश्चाच्चशर्करापाकेनिक्षिप्यचसमुद्दरेत् ॥ प्रकारज्ञैः प्रकारोयंसंयावइतिकीर्तितः ॥ धातुवृद्धिकरोवृष्योहृद्यश्चमधुरोगुरुः ॥ सारकोभग्नसंधानकारकःपित्तवातहृत् ॥

**अर्थ**– संयाव–गुह्यक–करंजा. गव्हांचा रवा तुपांत भाजून त्यांत साखर, एला, लवंग, मिरीं, बारीक किसलेला नारळ भाजून, कापूर, चारोळ्या हे पदार्थ एकत्र करून ठेवावा. नंतर दुसरा चांगला बारीक गव्हांचा रवा घेऊन दुधानें भिजवून चांगला मळावा आणि त्याच्या सुमारें टीचभर लांब पापड्या लाटून त्यांत त्या रव्याचें पुरण भरून कानवल्यासारिखें तोंड मिळवून मुरड घालावी आणि तुपांत तळून साखरेच्या पाकांत बुडवाव्या. त्यांना संयाव ह्मणतात. ते धातुवर्धक, वृष्य, हृद्य, मधुर, गुरु, सारक, मोडलेल्या हाडांना सांधणारे व वायु व पित्त यांचा नाश करितात.

## कुंडलिका (जिलबी).

गोधूमप्रस्थद्वितयस्यकृत्वासूक्ष्माःकणाःप्रस्थमिताःसुनिस्तुषाः॥ दुग्धेनक्लिन्नास्तुतथैवभांडेयावत्स्यदम्लत्वमुपयुगेपत् ॥ उद्धृत्यदुग्धेनद्रवंसुघृष्यसच्छिद्रपात्रेणचश्रीफलस्य ॥ धारांघृतेकुंडलिकाकृतिंसृजनपचेत्ततोद्धृत्यसुशर्करायाः ॥ पाकेनिमज्जनामाहुःसर्वेकुंडलिकाभिधां ॥ साशुक्लाहृद्यवृष्याइंद्रियाणांसुतृप्तिदा ॥पुष्टिकांतिकरीबल्याद्वितीयास्याकृतिर्मता ॥युक्तं घृतेनगोधूमपिष्टमार्द्रंतदंभसा ॥ पिंडिकामस्यनिक्षिप्यायावदम्लत्वमाप्नुयुः॥उद्धृत्यपयसार्द्रंततयुक्त्यापूर्वोक्तयापचेत् ॥

**अर्थ**– दोन प्रस्थ गहूं असले तर त्यांचा एक प्रस्थ चांगला शुभ्र रवा करावा, आणि दुधानें भिजवून आंबट होई तोंपर्यंत तसाच दाबून ठेवावा, नंतर पुनः दूध घालून परातींत फेंसून सछिद्र नारिकेर पात्रांत घालून तापलेल्या तुपांत बांगडीसारिखी वाटोळी धार मोडून तळावी, नंतर बाहेर काढून साखरेचे पाकांत बुडवावी, तिला कुंडलिका ह्मणतात. ती धातुवृद्धिकर, वृष्य, हृद्य, इंद्रियाला तृप्तिकारक व पुष्टि, कांति, बल यांला देणारी आहे. दुसरा प्रकार. गव्हांचे रव्यांत मुटकळें होई इतकें मोहन घालून पाण्यानें भिजवून आंबट होई पर्यंत दाबून ठेवावा, नंतर दूध घालून चांगला फेंसून वर सांगितल्या प्रमाणें जिलब्या कराव्या.

## कुंडलिनी (जिलबी). दुसरी रीत.

नूतनंघटमानीयतस्यांतःकुशलोजनः॥प्रस्थार्धपरिमाणेनदध्नालिप्तेनलेपयेत्॥ द्विप्रस्थांसमितांतत्रदध्यम्लंप्रस्थसंमितं॥घृतमर्धशरावंचघोलयित्वाघटेक्षिपेत्॥ आतपेस्थापयेत्तावद्यावद्यातितदम्लतां ॥ ततस्तत्प्रक्षिपेत्पात्रेसच्छिद्रेभाजनंतु तत् ॥ परिभ्राम्यपरिभ्राम्यतस्तंतप्तेघृतेक्षिपेत् ॥ पुनःपुनस्तदावृत्याविदध्या न्मंडलाकृतिं ॥ तांसुपक्वांघृतात्रीत्वासितापाकेतनुद्रवे ॥ कर्पूरादिसुगंधे चमज्जयित्वोध्धरेत्ततः ॥ एषाकुंडलिनीनाम्नापुष्टिकांतिबलप्रदा ॥ धातुवृ द्धिकरीवृष्यारुच्याचेंद्रियतर्पणी ॥

**अर्थ**—कोरें मडकें घेऊन त्यास आंतले बाजूनें अच्छेर दह्यांचा लेप करावा आणि गव्हांचा रवा दोन शेर व दहीं शेरभर आणि तूप अर्धशराव घालून, कालवून मडक्यांत घालून उन्हांत आंबट होई तोंपर्यंत ठेवावा. नंतर पातळ करून सच्छिद्र पात्रांत घालून तुपाचे तापते कढईत वाटोळी फिरवून फिरवून धार पाडावी म्हणजे वाटोळी जिलबी होते. ती चांगली पक्व झाली म्हणजे कर्पूरवासित साखरेचे पाकांत बुडवावी आणि काढून घ्यावी, ती कांति, बल यांना देणारी, धातुवर्धक, वृष्य, रुच्य, इंद्रियांना तृप्त करणारी अशी आहे.

## इंदुरसा (अपूप).

षष्टिकानांचशालीनांपिष्टंत्र्यंशंचशर्करां॥किंचिद्दध्नाचसंमर्द्यद्वितीयेदिवसेत तः॥ वर्तुलान्वटकान्कृत्वाघृतेपक्त्वाप्रयत्नतः॥ तेतिशीनाश्चहृद्याश्चबलपु ष्टिकरामताः॥ कफवातप्रहर्तारोनाम्नाचेंदुरसाभिधाः॥

**अर्थ**—साठेसाळीचें पीठ, आंत तिसरा हिस्सा साखर व किंचित् दहीं घालून पुष्कळ मळून एक दिवस ठेवावें. नंतर दुसरे दिवशीं त्याचे वडे करावे. ते तुपांत तळून भक्षण केले असतां फार थंड, प्रिय, बल, पुष्टि यांना करणारे आणि कफ, वात यांचे नाशक आहेत. यांस इंदुरसा असें म्हणतात.

## बिंदुमोदक (बुंदीचे लाडू).

चणकानांसूक्ष्मपिष्टंषोडशांशंचशालिजं॥स्नेहनार्थेघृतंदेयंयावत्पिंडत्वमाप्नु यात्॥ पश्चाज्जलेनसंप्लाव्ययावस्यादतनुद्रवं॥ अनेकच्छिद्रभांडात्तुघृतेत

न्नेनुपातयेत् ॥ पश्चान्निष्कासयेद्यत्नाद्भांडेपाविततेन्यसेत् ॥ कर्पूरैलादियु क्तंनुशर्करापंकमावपेत् ॥ दर्व्यासंचाल्यबहुशःसत्यूष्णेचाविबंधयेत् ॥ लड्डुकान्बिल्वतुल्यांस्तुतेवृष्याधातुवर्धकाः ॥ शीतलालघवोरूक्षामधु रास्तृप्तिकारकाः ॥ त्रिदोषघ्नाःस्मृताःपूर्वैश्चापूर्वाबिंदुमोदकाः॥

**अर्थ**– चुण्यांचें काजळासारिखें पीठ घेऊन त्यांत तांदुळांची पिठी सोळावा हिसा घालून मुटकळे होईपर्यंत मोहन घालून मळावें. नंतर पाणी घालून पातळ करावें, आणि बारीक छिद्रांच्या झाऱ्यांत घालून तुपांत जोंधळ्याएवढ्या कळ्या पाडून तळून काढाव्या, नंतर मोठ्या परातींत घालून साखरेचा पंक वर ओतून व कापूर, एलची यांची पूड घालून पळीनें सारख्या चाळवाव्या आणि ऊन असतांच त्यांचे बेलफळाएवढे लाडू बांधावे. ते लघु, वृष्य, धातुवर्धक, तृप्तिकर, शीतळ, रूक्ष, मधुर आहेत व पित्त, कफ, वायु यांचे नाशक आहेत.

## मूग व उडीद यांचे लाडू.

मुद्गानांवाथमाषाणांस्थूलंपिष्टंसमाहरेत् ॥ तत्समानेघृतेपक्त्वाकिंचिदारक्त तांगते ॥ मध्येमध्येतुदुग्धस्यसेकंकिंचित्प्रकारयेत् ॥ कणाकारेचसं जातेततउत्तार्यमेलयेत् ॥ द्विगुणांशर्करामेलांपिस्तंबादामकंतथा ॥ म रिचंदेवकुसुमंयत्किंचिच्चघृतंक्षिपेत्॥बध्नीयाल्लड्डुकांस्तस्यतेशीतालघ वःस्मृताः॥ वातपित्तप्रशमनामाषाणांगुरवोमताः ॥ उष्णाःस्निग्धाश्चवृ ष्याश्चतृप्तिदावातनाशनाः ॥ एवंरीत्याप्रकर्तव्याश्चणकानांचतद्गुणाः ॥

**अर्थ**–मुगांचे किंवा उडदांचे सडीक डाळीचें मध्यम बारीक पीठ घेऊन, त्याचे समान तूप घालून मंदाग्नीवर पळीनें ढवळीत असावें. किंचित् लाल होऊं लागलें म्हणजे मध्यें मध्यें दूध शिंपावें, असें करितां करितां दाणा पडला म्हणजे खालीं उतरून त्यांत दुप्पट साखर, एलची, पिस्ते, बदाम, लवंग, थोडें तूप, घालून त्याचे लाडू बांधावे. ते मुगांचे लाडू शीत, लघु, वातपित्तनाशक. आणि उडदाचे लाडू जड, उष्ण, स्निग्ध, वृष्य, तृप्तिकारक, वातनाशक आहेत. याच रीतीनें बेसनाचे वगैरे केल्यास त्या त्या धान्याचे गुणा- प्रमाणें गुण जाणावे.

## चुर्मा व दहित्रा.

गोधूमचूर्णंनिक्षिप्यवसुभागेनवैघृतं ॥ पाणिभ्यांवर्षयेत्पश्चात्जलेनार्द्रांविम र्दयेत् ॥ यावन्मुष्टिकतांयायादथमुष्टीघृतेपचेत् ॥ पक्वानांचूर्णकंकृ

त्वानस्मिन्बादामशर्करे॥ पोस्तबीजमरीचैलाचूर्णंक्षिप्त्वाघृतेनच॥ वर्तुला लड्डुकाःकार्याःप्रोक्तास्तेचूर्णकाभिधाः॥अपरोविधिःसुदृष्टोगोधूमानांवि चूर्णकेनसमं॥ सूक्ष्मंपिष्टंयोज्यंतस्याष्टांशेनगोघृतंदेयं॥ पयसार्द्रंविमर्द्या थपूरिकास्तस्यकारयेत्॥ घृतेपक्त्वाविगृह्यैषांचूर्णंहस्तेनकारयेत्॥ ततः कणान्शर्करयाघृतनिर्बीजसंयुतान्॥ बदामखर्जूरफलसूक्ष्माःश्रीफल खंडकाः॥मरीचैलादयःपिष्ट्वाचूर्णंनिक्षिप्यलड्डुकाः॥ पूर्वोक्तागुरवःस्नि ग्धाःसारकाःशीतलामताः॥ अग्निमांद्यंकफंवीर्यंकृत्वापित्तंनुदंत्युत॥

अर्थ– गव्हांचे रव्यांत रव्याचे अष्टमांश मोहन घालून हातानें चोळावा, आणि पाणी घालून मुटकळे होईतका मळून त्याचीं मुटकळीं तुपांत तळावीं, नंतर काढून कुटून चुरा करून त्यांत साखर, बदाम, खसखस, मिरें, एलचीदाणे यांचें चूर्ण व तूप घालून लाडू करावे. यांचें नांव चुर्में लाडू. दुसरा प्रकार. गव्हांची सपिटी, व रवा हीं समभाग एकत्र मिळवून अष्टमांश मोहन घालून मळावा व आंत दूध घालून पुनः बळकट मळून त्याच्या लाहानशा जाड्या पुऱ्या करून लाल होऊं न देतां तळून त्यांचा हातानें कुसकरून चुरा करावा आणि तो चाळून त्याचा पुर्कानें खाली दाणा पाडून त्यांत साखर, तूप, बदाम, बेदाणा, खारका, नारळाच्या फोडी; मिरें, एलची यांची पूड नेमस्त घालून लाडू बांधावे. यांला दहिंचा लाडू म्हणतात. हे व वर लिहिलेले लाडू स्निग्ध, गुरु, सारक, शीतळ आहेत व कफ, शुक्र, अग्निमांद्य यांला करणारे व पित्त यांचा नाश करणारे आहेत.

## मास्यांचे लाडू.

मत्स्योर्ध्वास्थीनिनिर्हृत्यकृत्वाखंडानितक्रतः॥ प्रक्षाल्यकंटकान्हृत्यपुनस्त क्रेणमर्दयेत्॥ तक्रेणैकत्वमापन्नंवस्त्रेणचविशोधयेत्॥ सुपक्वाःपद्मकं दास्तुमर्द्यकल्कंतुकारयेत्॥ दृषदाचपुनःपिष्ट्वासूक्ष्मसूत्राणिकारयेत्॥ खंडानिपक्त्वासुघृतेसितापंकेनघोलयेत्॥ कृताहिलड्डुकाबल्यागुरवः कफकारकाः॥ वृष्यावातनुदःकिंचित्प्रदिष्टाःपित्तकोपनाः॥ एवमेवसु पक्वस्यमांसस्यान्यस्यलड्डुकाः॥विनिर्मितागुणंकुर्युस्तत्तन्मांसेनसन्निभं॥

अर्थ– मास्यांचे वरचीं खवळें काढून त्यांचे तुकडे करावे आणि ताकानें धुवावे, नंतर त्यांतील कांटे काढून पुनः ताकांत चुरडून एकरूप जाहाल्यावर वस्त्रानें गाळून तें व शिजविलेले कमळाचे कांदे आंत घालून मर्दन करून कल्क करावा आणि तो पाट्यावर वाटून त्याच्या शेवखंडासारिख्या लांबट वळ्या करून तुपांत तळाव्या आणि साखरेचे पंकांत घोळवून त्यांचे लाडू करावे. ते बल्य, गुरु, कफकर, वृष्य, किंचित् पित्तकोपक व वायुनाशक आहेत, याप्रमाणें शिजलेले अन्य मांसाचे लाडू करावे. त्या लाडवांचे गुण त्या त्या मांसासारिखे मानावे.

## दधिलड्डुक (दहिंलाडू).

निर्जलंदधिसंगृह्यवस्त्रेबध्वाचशोषयेत् ॥ तत्समानंतंडुलानांपिष्टंकिंचि च्चसैंधवं ॥ निक्षिप्यमर्दनंकृत्वानस्यबध्वाथलड्डुकान् ॥ घृतेसंपाच्यय त्नेनशर्करापंकआवपेत् ॥ तेबल्यारुचिदावृष्याधातुवृद्धिकराःप्रियाः ॥ वातपित्ततृषादाहनाशनादधिलड्डुकाः ॥

**अर्थ**—दही फडक्यांत बांधून पाणी सर्व निथळून घालवावें आणि त्यांत तांदुळांचें पीठ समान मेळवून त्यांत किंचित सैंधव घालून मर्दन करावें, आणि नंतर पोफळाएवढ्या गोळ्या करून तुपांत तळून साखरेचे पंकांत घोळवाव्या. त्या बल्य, रुचिकर, वृष्य, धातुवर्धक, प्रिय अशा आहेत व वायु, पित्त, तृषा, दाह यांचा नाश करितात. यांला दधिलड्डुक ह्मणतात.

## बीजमोदक (बियांचे लाडू).

भूमुद्गकूष्मांडकादिबीजानिनिस्तुषाणिवै ॥ घृतेकिंचिद्भर्जयित्वाशर्करा पंकआवपेत् ॥ संघोल्यलड्डुकान्कृत्वाभक्ष्यांस्तेगुरवोमताः ॥ वृष्याः शीताःस्थौल्यकराःकफशुक्रबलप्रदाः ॥ वातपित्तहरावर्ण्यारक्तदोषहराः स्मृताः ॥ बीजलड्डुकनाम्नावैप्रसिद्धामधुराःस्मृताः ॥

**अर्थ**—भुयमूग, कोहळा, भोंपळा इत्यादिकांच्या बिया सोलून त्या तुपावर किंचित् भाजाव्या आणि त्या साखरेच्या पाकांत घालून त्यांचे लाडू करावे, ते भक्षण केले असतां गुरु, वृष्य, शीतळ आहेत. व स्थूलता, कफ, शुक्र, बल यातें देणारे व वायु, पित्त, रक्तदोष, यांचा नाश करितात. यांना बीजलाडू ह्मणतात. हे अतिगोड होतात.

## शालूक लड्डुक (कमळकंदांचे लाडू).

पद्मकंदान्स्थिरत्वचश्चगृहीत्वाचैवपाचयेत्॥ युक्तितस्तस्यपिष्टंचकृत्वासूत्राणि कारयेत् ॥ घृतेनानिर्विनिष्पच्यशर्करापंकआवपेत् ॥ घोलयित्वाचतेषां तुलड्डुकान्कारयेत्सुधीः ॥ तेरूक्षादुर्जराःकिंचित्तुवराःशूलहारकाः ॥ मलावष्टंभकाःशीताःश्लेष्मपित्तविनाशकाः ॥ कसेरुशीघ्रकूष्मांडशृंगाटक मलाक्षकैः ॥ एवंकदलकार्द्रादिलड्डुकान्द्रव्यवत्गुणाः ॥

**अर्थ**— कमळाच्या कांद्यावरची साल चाकूनें काढून तो शिजवावा, आणि त्याचें युक्तीनें

पीठ करून त्याचीं शेवखंडें करून तळावीं आणि साखरेचे पंकांत घोळून त्याचे लाडू बांधावे. ते रूक्ष, दुर्जर, किंचित् तुरट, मलावष्टंभक, शूलनाशक आहेत व शीत, कफ, पित्त यांचे नाशक. याप्रमाणें सुरण, शिंगाडे, कचरा, कमलाक्ष, कोहळा, आलें, केळें यांचे लाडू करावे आणि ज्यांचे लाडू करावे त्यांसारिखे गुण जाणावे.

## घडीची पोळी.

कुर्यात्संमिनयातावत्तन्वींपर्पटिकांततः ॥ तस्याश्चोर्ध्वंघृतंदेयंद्विगुणांका रयेत्ततः ॥ अनेनैवविधानेनपुनःकार्याचतुर्गुणा ॥ पुनश्चवेल्यतन्वींनां भर्जयेत्पूर्ववत्ततः ॥ बहुपत्रापोलिकासागुणास्तस्यास्तुमंडवत् ॥

**अर्थ**— गव्हांचे सपीठास अष्टमांश मोहन घालून पाण्यानें ठीक भिजवून चांगलें मळून त्यातील पोफळाएवढा गोळा घेऊन त्याची पातळ रुंद पापडी लाटून तीवर पातळ तूप लावून घडी करावी, पुनः त्यावर तूप लावून पुनः घडी करून युक्तीनें सारखी लाटून पातळ करावी, आणि तव्यावर भाजावी. तिचें नांव घडीची पोळी. हिचे गुण मांड्यासारिखे आहेत.

## पांढरी पोळी.

कुर्यात्संमिनयातीवतन्वींपर्पटिकांततः ॥ स्वेदयेत्तप्रकेनांतुपोलिकां जगदुर्बुधाः ॥ तांस्वादेल्लप्सिकायुक्तांस्युस्तस्यामंडवत्गुणाः ॥ गो धूमपोलिकाबल्याकफकृद्वाननुत्गुरुः ॥शुक्लामधुरापाकेपित्तघ्नी बृंहणीसरा ॥

**अर्थ**— गव्हाचे सपीठांत किंवा रव्यांत अष्टमांश मोहन घालून पाण्यानें भिजवून मळावा, त्याचा लिंबाएवढा गोळा घेऊन पोळपाटावर लाटून पातळ पोळी करून तव्यावर भाजावी, तिचें नांव पोळी. ती लापसीसीं भक्षण केली असतां तिचे गुण मांड्यासारिखे आहेत. गव्हाची पोळी बलकर, कफकारक, वातनाशक, जड, धातुवर्धक, पाककालीं मधुर, पित्तनाशक, बृंहण, सारक अशी आहे.

## पूरणगर्भपोलिका (पुरणपोळी).

गोधूमानांसितेसूक्ष्मेपिष्टेष्टांशंघृतंक्षिपेत् ॥ किंचिदुदकमासिच्यशुष्कंशु ष्कंविमर्दयेत् ॥ गृहीत्वातुगुटिंतस्मात्समांनिकुर्षपीलुना ॥ तलहस्तेनस दृशांपर्पटींकारयेत्ततः ॥हरिमंथकपूर्णस्यगुटींतस्यांनिधायच ॥ मुखंपिधा

यपिठकेवर्द्धयेद्वैल्यसूक्ष्मिकां ॥ पर्णेनसमतांयातांभर्जेदायसमत्रके ॥ सापूर्णगर्भानिर्दिष्टालघ्वीस्वाद्वीसुशीतला ॥ अग्निमांद्यकरीप्रोक्ताक्षयस्य सुविनाशिनी ॥

**अर्थ**— गव्हांची चांगली सफेत सपिठी काढून तींत अष्टमांश मोहन घालून पाण्यानें भिजवून सुखी सुखी मळावी, आणि तिची सुमारें लिंबाएवढी गोळी घेऊन तिची तळहाताएवढी पापडी करून, तींत चण्यांचें पूरण घालून तोंड मिळवून वाटोळा गोळा करून पोळपाटावर लाटावी, आणि पानाइतकी पातळ लाटून तव्यावर भाजावी. ती लघु, स्वादु, शीतल व अग्निमांद्यकर आणि क्षयरोगनाशक आहे.

## पुरण.

चतुर्गुणेजलेदालींचणकानांविपाचयेत् ॥ ततोजलंचनिःशेषंशोषयित्वा चयत्नतः ॥ सार्धभागोगुडोदेयश्चोष्णायांशर्करापिवा ॥ पाषाणपट्टिका यांचपेषयेत्तत्तुपूरणं ॥

**अर्थ**— सढळ चण्यांची डाळ घेऊन चौपट पाण्यांत घालून शिजवावी. नंतर वेळून निःशेष पाणी काढून टाकून तींत दिढी साखर किंवा गुळ गरम आहे तोंच मिळवावा, आणि पाहिजे तसतशी पाट्यावर बारीक वाटावी, त्याला पुरण म्हणतात.

## सांकुरी (सांजेपोळी.)

गोधूमानांसूक्ष्मचूर्णाद्द्विगुणंचजलेपचेत् ॥ मंदाग्निनातउत्धृत्यसार्धमानेन शर्करां ॥ गुडंवादिवकुसुमैलाचूर्णंचादिनिक्षिपेत् ॥ दर्व्याचैकत्वमापाद्य सम्मितांचसुशोधितां ॥ मोहनंक्षिप्यसंमर्द्यपर्पटींतत्यकारयेत् ॥ तस्यांत त्पूरणंन्यस्यवेल्लयेद्यसुविस्तृतां ॥ कृत्वाविभर्जयेत्पश्चात्तैलेवाथघृतेपचेत् ॥

**अर्थ**— गव्हांचे रव्यात दुप्पट पाणी घालून मंदाग्नीवर शिजवावा, मग खालीं उतरून त्यांत दिढी साखर किंवा सवाईच्या मानानें गूळ व लवंगा, एलची यांची पूड घालावी व पळीनें चांगला घाटून सांजा करून ठेवावा, नंतर गव्हांची सपिटी मृदकळें होईपर्यंत अष्टमांश मोहन घालून चाळून पाण्याशीं खूब मळावी, व त्यांतून गोळी घेऊन तिची पापडी करून तींत त्या तयार केलेल्या सांज्याचें पुरण घालून पोळी लाटून तव्यावर भाजावी, किंवा तुपांत अथवा तेलांत तळावी. ही सांजेपोळी.

## अंगारककर्कटी (रोटगे).

शुष्कगोधूमचूर्णंतुसांबुगाढंविमर्दयेत् ॥ विधायवटकाकारान्निर्धूमेऽग्नौशनैःपचेत् ॥ अंगारकर्कटीह्येषाबृंहणीशुक्रलालघुः ॥ दीपनीकफहृद्बल्या पीनसश्वासकासजित् ॥

अर्थ– गव्हांचा रवा, सपीठ किंवा कणीक घेऊन मुटकळें होईपर्यंत मोहन घालून पाण्याशीं चांगली मळावी, नंतर त्याचे वटकाकार जाड, मध्यें खोलगट असे वडे करून निर्धूम अग्नीवर सावकाश भाजावे, यांचें नांव अंगार म्हणजे अंगारकर्कटी. ही पौष्टिक, धातुवर्धक, लघु, दीपन, कफनाशक, बलकर आहे व पीनस, श्वास, खोकला, यांचा नाश करिते.

## रोटी (भाकरी).

शुष्कगोधूमचूर्णानांनेत्र्येवचसुवर्धिना ॥ पोलिकानप्रकेभ्राष्ट्रवाभूयोंगारेष्वर्नयेत् ॥ सिद्धेषारोटिकाप्रोक्तागुणानस्याःप्रचक्ष्महे ॥ रोटिकाबलकृद्रुच्याबृंहणीधातुवर्धिनी ॥ वातघ्नीकफकृद्गुर्वीदीप्ताग्नीनांप्रपूजिता ॥

अर्थ– गव्हांची कणीक पाणी घालून मळावी आणि तिची भाकरी करून तव्यावर भाजून पुनः निखाऱ्यावर परतून भाजावी म्हणजे चांगली फुगते. ती बल्य, रुचिकर, पौष्टिक, धातुवर्धक, कफकारक, गुरु व वायुनाशक आहे. ही रोटी ज्याचा जठराग्नि प्रदीप्त आहे त्याणें भक्षावी.

## हस्तपूरीका (हातपुरी).

उदकेनर्विमिश्र्यसमिनांघृनमासिच्यकरेणमर्दयेत् ॥ ननएवसुपूरिकांविधायकृत्वानिर्धूमसुशुष्कगोमयेऽग्नौ ॥ प्रभंजिनासाकफहृद्बलप्रदाहृद्रोगवातं शमयेद्विभाक्षिता ॥

अर्थ– गव्हांची कणीक मोहन घालून पाणी घालून मळावी आणि तिच्या हातानीं चापट्या जाड्या अशा पुऱ्या करून सुक्या गोवऱ्यांच्या निखाऱ्यांवर भाजाव्या. त्या बल्य, कफ, हृद्रोग, वायु यांचा नाश करितात.

## माषरोटिका.

चूर्णयच्छुष्कमाषाणांचमसीसाभिधीयते ॥ चमसीरचितारोटीकथ्यते

बल्लभद्रिका ॥ रूक्षोष्णावातलावल्यादीप्राग्नीनांप्रपूजिता ॥ माषाणां दालिकातोयेस्थापितात्यक्तकंचुका ॥ आतपेशोषितायंत्रेपिष्टासाधूमसीस्मृता ॥ धूमसीरचितासैवप्रोक्तागर्गरिकाबुधैः ॥ गर्गरीकफपित्तघ्नी किंचिद्वातकरीस्मृता ॥ .

**अर्थ–** उडीद वाळलेले दळून पीठ करावें, त्याचें नांव चमसी, त्या चमसीची भाकरी भाजावी, तिचें नांव बलभद्रिका. ती रूक्ष, उष्ण, वातल, बल्य अशी आहे. दुसरा प्रकार–उडदाची डाळ पाण्यांत भिजवून वरचें साल काढून टाकून उन्हानें वाळवून दळून पीठ करावें त्याचें नांव धूमसी. त्या धूमसीची भाकरी करावी. ती किंचित् वातकर, कफ, पित्त यांची नाशक आहे. या रोटीचें नांव गर्गरीरि आहे.

## वेटवी (रोटी).

माषदालिचोदकेनआर्द्रानिष्काश्यनत्वचः॥आतपशोष्यनिष्पेष्यपिष्टंपक्त्वा चविन्यसेत् ॥ संमितायाःसुपर्पटचांपूरणंतद्विनिक्षिपेत् ॥ घनांभास्करिकां भर्ज्यसोद्दिष्टावेटवीतिच ॥ बल्यावृष्यारुचिकरागुर्वीसोष्णासुतृप्तिदा ॥ पुष्टिदाधातुकर्त्रीचमूत्रविड्भेदिनीमता ॥स्तनेदुग्धकरीमेदश्लेष्मपित्तविवर्धिनी ॥ गुदकीलार्दितश्वासवातान्हन्यात्समशूलकान् ॥

**अर्थ–** उडदांची डाळ पाण्यांत भिजवून वरचें साल काढून उन्हांत वाळवावी; आणि बारीक पिठी करावी. आणि कणकीचे पापडींत त्याचें पुरण घालून जाड भाकरीसारिखी करून तव्यावर भाजावी. ती बल्य, वृष्य, रुचिकर, गुरु, उष्ण, तृप्तिकर, पौष्टिक, धातुवर्धक, मळमूत्राचा भेद करणारी व स्तनांत दुग्ध, मेद, पित्त, कफ यांला करणारी व गुदकील, अर्दितवायु, श्वास, परिणामशूल आणि वायु यांचा नाश करिते.

## साखरपाण्याच्या वड्या.

गोधूमक्षूमसर्पिषा [illegible] निप्रस्थिचभर्जयेत् ॥ सार्धभागसितांस्कपंकेचैलादिवासिते ॥ संमिश्र्य [illegible]त्तत्सर्वंवट्टयित्वापुनःपुनः ॥ घनीभूतेतुतत्सर्वंलिप्ते स्थात्रेतुविस्तृतं ॥ खंड्याच्छुरिकयासम्यकूवट्यःसुचतुरस्रकाः ॥ शर्करार सवट्यस्तागुणैस्तुल्यास्तुपूर्ववत् ॥

**अर्थ–** गव्हांचा रवा घेऊन त्यांचे समान तूप घालून भाजावा आणि त्याचे दिढी साखरेचा पंक करून त्यांत भाजलेला रवा ओतावा. त्यांत एलचीदाणे घालून पुनः घांटून घांटून वड्या व्हावयाजोगा जाड जाहाला म्हणजे रुंद भांड्यांत पाहिजे

तितका नेमस्त जाड लिंपून निवाल्यावर चतुष्कोण वड्या सुरीनें कापून काढाव्या, त्यांस साखरपारा म्हणतात, त्यांचे गुण पत्रवड्यांसारिखे जाणावे.

## कागदी वड्या.

गोधूमधूमसींप्रस्थांघृतेप्रस्थेचभर्जयेत् ॥ सार्धभागासितापक्कपंकैलादिसुवासिते ॥ संमिश्र्यपश्चात्तत्सर्वंविस्तीर्णामत्रकोपरि ॥ पत्रेलिंपेच्चतत्सर्वंपश्चादूर्ध्वंपिधानकं ॥ दत्वानिधायचांगारेपक्त्वासम्यक्तुनत्ततः ॥ उत्तार्यतस्यवटिकाःकृत्वाच्छुरिकयानुताः ॥ स्निग्धाःकिंचित्पित्तकराःकफदारुचिदामताः ॥ मलस्तंभकरागुर्व्योवातहावटिकामताः ॥

*अर्थ*— शेरभर तुपांत शेरभर गव्हांचा रवा चांगला सावकाश भाजावा आणि रव्याचे दिढी साखरेची कची चांचणी करून तींत तो रवा व एलची, लवंग इत्यादि घालून ढवळून परातेंत कागदावर थापून केवळ निखाऱ्यांवर ठेवून त्यावर दुसरी परात झांकण घालावी. नंतर युक्तीनें शिजवून उतरून त्याच्या सुरीनें वड्या कापाव्या. त्या स्निग्ध, पित्तकर, कफकर, रुचिकर, मलावष्टंभक, गुरु, वातनाशक अशा आहेत.

## फेनिका (फेणी).

मार्जितानांतंडुलानांसूक्ष्मंपिष्टंचकारयेत् ॥ जलेनगोलकंकृत्वास्थाप्यःसोन्हिद्वितीयके ॥ दिवसेतुद्रवींकृत्वाघृतमृष्टेपलाशके ॥ पत्रेलिप्त्वातत्सदृशंवनंतानिसुभांडके ॥ वस्त्रेणाच्छादितमुखंसजलेचैलकोपरि ॥ निधाय चापरंपात्रंन्यस्यतस्मिन्पचेत्सुधीः ॥ उद्धृत्यपर्णान्निर्हृत्यपश्चादुष्णेविशोषयेत् ॥ घृतेपुनःसुपक्त्वासावृष्यालघ्वीतुवातनुत् ॥

*अर्थ*— तांदूळ धुऊन वाळवावे आणि त्यांचें बारीक पीठ करून पाण्यानें भिजवून एक रात्र ठेवून दुसरे दिवशीं सकाळीं पुनः आंत पाणी घालून मध्यम प्रतीचें पातळ करून त्याचा तूप लावलेल्या पळसाचे किंवा वडाचे पानावर कागदा इतका जाड लेप करावा, आणि एका भांड्यांत पाणी घालून तोंडास फडक्याचा दादरा बांधून त्याजवर उताणीं पानें ठेवून वर दुसरें झांकण पाण्याचें भाडें ठेवून उकडून शिजवून काढाव्या. त्या पानापासून युक्तीनें सोडवून काढून उन्हांत सुकवून तुपात किंवा तेलांत तळाव्या. त्या वृष्य, लघु, वातनाशक अशा आहेत.

## तंतुफेनिका (तारफेणी).

गोधूमानांधूमसींचाकिंचिल्लवणसंयुतां ॥ जलेनबहुशोमर्द्यकुत्वकुत्वपुनः

पुनः ॥ हस्तेनावर्तितंचैव घृतमन्यदमत्रके ॥ स्थाप्यंपश्चात्तु भूमस्याःसूक्ष्म सूत्राणिकारयेत् ॥ हस्तेघृतंलापयित्वायथासूक्ष्मंभवेत्तुतत् ॥ तथाकृत्वा चहस्तेनुवेष्टचसूत्राणितानितु ॥ पश्चात्किंचिद्दिस्तृतंतत्कृत्वातप्तेघृतेपचेत् ॥ तृणानांमुष्टिनावर्त्यस्यात्कोशातकिजालवत् ॥ वृष्याधातुकरीवातश्लेष्म जित्तारफेनिका ॥

अर्थ—गव्हांचा रवा किंचित् मीठ घालून पाण्यानें भिजवून कुटून कुटून मळून तार येईप- र्यंत मऊ करून ठेवावा. नंतर चांगलें थिजलेलें तूप घेऊन परातींत घालून लोण्यासारखें होई- पर्यंत परातींत फेसून ठेवावें. नंतर मऊ केलेल्या रव्याची गोळी घेऊन तीहि पाटावर दोहों हातांनीं चोळून दोहों बाजूंनीं बारीक सुतें पाडावीं आणि फेसलेलें तूप हातास लावून तीं सुतें एकेजागीं घेऊन चौंगे करून त्यावर तूप लावून जाळ्यासारिखे फेरे घालून युक्तीनें ताणून तुपांत तळावे. तळतेवेळीं चोयांच्या जुडीनें हलवावें म्हणजे त्याच्या दोडक्याच्या शिऱ्यासारिख्या तारफेण्या होतात. त्या वृष्य,धातुकर आहेत व वायु, कफ यांचा नाश करितात.

## घावन (आयते).

त्रिवारंकंडितानांचतंडुलानांचपिष्टकं ॥ अष्टमांशघृतेनाशुसंमर्द्यतदनंतरं ॥ जलेनचद्रवीकुर्याद्घावचघनधारया ॥ पतिप्यतिनतश्चुल्ल्यांचाश्मपात्रेप्र तापिते ॥ किंचित्घृतंलापयित्वापश्चात्पिष्टंप्रसारयेत् ॥ यवप्रमाणंपश्चा त्तज्जातेसच्छिद्रकेततः ॥ पिधानंचोपरिन्यस्यपक्वेनिष्कासयेत्ततः ॥ दु ग्धशर्करयाभक्ष्याघावनाःशालिवत्गुणाः ॥

अर्थ— तीनदां सडलेल्या तांदुळाचें काजळासारिखें बारीक पीठ करून त्यांत अष्ट- मांश मोहन घालून हातांनीं चोळून पाणी घालून कालवून फार पातळ करावें. नंतर चुलीवर तवा ठेवून खालीं थोडा जाळ लावावा. तवा तापला म्हणजे त्यावर तुपाचा बोळा फिरवून पातळ केलेलें पीठ वर ओतून छिद्रें पडूं लागल्यावर झांपण ठेवावें. पक्क झाला म्हणजे युक्तीनें काढून चौघडी करून ठेवावा. आणि दूधसाखरेशीं भक्षण करा- वा. त्याचे साळीसारिखे गुण आहेत.

## शष्कुली, करंज्या, कानवले किंवा मोदक.

सुधौतानांतंडुलानांपिष्टंसूक्ष्मंविधायच ॥ तत्प्रमाणंतत्रजलंस्थाप्यंचुल्ल्यां तुतत्पचेत् ॥ अल्पमल्पंविकीर्याथमेलयित्वाघनंपचेत् ॥ घनीभूतेततो

न्यार्यतरपर्पख्यांसुयुक्तितः ॥ पूरणंचविधायाथसिताश्रीफलजंतथा ॥ त्रिवृप्रांतामर्धचंद्रसमानांकारयेत्सुधीः ॥ एवंशष्कुलयःकार्याःपाच्याःस्वेदनमत्रके ॥ एवंचमोदकाःकार्यास्तेवृष्यागुरवोमताः ॥ वातपित्तप्रशमनामलावष्टंभकारकाः ॥ कफदागुरवःप्रोक्तास्तथातृप्तिकरामताः ॥

अर्थ— बारीक शुभ्र तांदूळ चांगले तीनदां धुऊन, कोरडे करून, दळून बारीक पीठ करावें. आणि चुलीवर पाणी ठेवावें, त्याला आधण आल्यानंतर ज्या मापानें जितकें पाणी घातलें असेल त्या मापानें तितकेंच त्यांत पीठ घालून सारखें चाळवून चाळवून घट्ट होईपर्यंत शिजवावें, त्याचें नांव उकड. त्या उकडीच्या पातळ पापड्या चांगल्या पानासारख्या करून त्यांत गूळ व खोबऱ्याचें पुरण घालून दुडून नखानें मुरड घालून अर्धचंद्राकार कानवलें करावे, आणि करड्यांत किंवा दांथर घातलेल्या भांड्यांत शिजवावे. याप्रमाणेंच तांदुळाची उकड काढून तिचे मोदक करून कानवल्यासारिखे शिजवावे, हे मोदक व कानवले वृष्य, गुरू, वातपित्तनाशक, मलस्तंभकारक, कफकर, जड आणि तृप्तिकारक, असे आहेत.

## शिविका (शेवया).

गोधूमचूर्णंनिस्तुषंकंदुग्धेनसहमर्दयेत् ॥ तंतुयोग्यंभवेत्तावत्दृषदोपरिकुट्टयेत् ॥ हस्तेनतस्यसूत्रेणसमाःकृत्वासुतंतवः ॥ शुष्कीकृतास्तुशिविकायदेच्छाभक्षणंभवेत् ॥ उदकेनाविपक्त्वाचदुग्धेशर्करयायुते ॥ क्षिप्त्वाशिना स्तृप्तिकराबलदागुरवोग्रहाः ॥ रुचिरास्थिसुसंधानकर्त्र्यःपित्तानिलापहाः ॥

अर्थ— गव्हांचा फुलऱ्या दुधांत मळून तार येई तोंपर्यंत कुटावा आणि त्याचे हातानें सुतासारिखे तंतु करावे अथवा पाटावर करावे. ते वाळवून ठेवावे आणि भक्षायाच्या वेळेस पाण्यांत शिजवून दूध साखरेंत घालून त्याबरोबर खाव्या, त्या शेवया तृप्तिकर, बल्य, गुरू, ग्राही, रुचिकर, हाड सांधणाऱ्या व पित्त, वायु यांचा नाशकरणाऱ्या अशा आहेत.

## श्वेतपूरिका (पांढऱ्या पुऱ्या).

गोधूमसत्वेचघृतंयावत्पिंडत्वमाप्नुयात् ॥ तावद्दत्वाजलेनाथमर्दनीयंप्रयत्नतः ॥ तस्यवैपूरिकाःकार्याघृतेपाच्याश्चताःस्मृताः ॥ शर्करासहिताजाड्यादुर्जराधातुवर्धकाः ॥ स्निग्धाश्चगुरवःपित्तवातनाशकरामताः ॥

अर्थ— गव्हांचे रव्यांत मुटकळें होईपर्यंत तूप घालून सारखा चोळून पाण्याशीं खूब

मळावा आणि त्याच्या पुऱ्या करून तुपांत तळाव्या आणि साखरेसीं भक्षण कराव्या. त्या दुर्जर, धातुवर्धक, स्निग्ध, जड आहेत आणि पित्त, वात यांचा नाश करितात.

## चिरोटे.

गोधूमधूमसीं चाल्पघृतेनाक्तां जलेनच ॥ मर्दयित्वा तु तस्याश्च ग्राह्यं पूगप्रमाणकं ॥ गोलकं च गृहीत्वा तु वेल्य कुर्याच्च पोलिकां ॥ द्वितीयां च तृतीयां च कृत्वा स्थाप्या तथोपरि ॥ एकां गृहीत्वा तस्यां तु घृतं दत्वा द्वितीयकां ॥ तस्याश्चोपरि संस्थाप्य एवं स्थाप्या तृतीयका ॥ तस्योपरि घृतं दत्वा पटीकार्या त्रिरंगुला ॥ ते घृते पाचिता नाम्ना चिरोटेइति विश्रुताः ॥ ते तु शर्करया चाढ्या वृष्या बल्यास्तु शुक्रलाः ॥ गुरवः पित्तवातघ्नाश्चोक्ताः पाकविशारदैः ॥

**अर्थ**– गव्हांचा रवा थोडें मोहन घालून चोळावा, नंतर पाणी घालून मळून कुटून कुटून मऊ करावा, आणि त्याच्या कागदाप्रमाणें पातळ पोळ्या कराव्या, आणि त्यांतील एका पोळीवर तूप लावून वर दुसरी पोळी घालावी, पुनः तूप लावून वर तिसरी पोळी घालून नंतर दुडून सुमारें तीन आंगळें रुंदीची पटी करून तिचे सुरीनें दोन दोन आंगळें तुकडे पाडावे, ते पुनः पातळ लाटून चौकोनी करून तुपांत तळून साखरेबरोबर खावे. ते वृष्य, बल्य, धातुवर्धक, गुरु व पित्त, वायु यांचे नाशक असे आहेत.

## खाजा.

गोधूमानां शुद्धचूर्णं जलं क्षिप्त्वा सुगोलकं ॥ पाषाणेन सुकुट्याथ मृदु कृत्वा च विन्यसेत् ॥ आर्द्रीकृतां स्तु त्रिदिनं तंडुलांश्चैः प्रमार्जयेत् ॥ विशोष्य वस्त्रे गततः शुष्काणां पिष्टमाहरेत् ॥ तत्समं सुघनं सर्पिः क्षिप्त्वा पेष्य निधाय च ॥ गोलकस्य घनां कृत्वा पर्पटीं च सुविस्तृतां ॥ अंगुलीभिश्च तस्यां तर्गर्तान् कृत्वा सुपूर्य च ॥ सर्पिषा पूर्वसिद्धेन गर्तैः सार्धं विलिप्य च ॥ विधाय वलिकां भूयो दृषदा सुविकुट्टयेत् ॥ पुनरेवं विधायाथ पर्पटीं वलिकां तथा ॥ त्रिवारं लिप्य संकुच्य तस्मात् पूगेन वै समां ॥ गुटिं गृह्येषद्विस्तार्य पंचभीरंगुलैः समं ॥ गर्तान् किंचिद्विधायाथ घृते सर्वां विपाचयेत् ॥ ता भुक्ताः सितया गुर्व्यो वृष्या धातुविवर्धनाः ॥ पित्तवातनुदः प्रोक्ताः खाजा इत्यभिधानतः ॥

**अर्थ**– गव्हांच्या शेरभर रव्यांत पाणी घालून सुखसुखा कालवून घट्ट गोळा करून

पाटयावर वरवंट्यानें कुटून मृदु करून ठेवावा, आणि तीन दिवस भिजत घातलेले तांदूळ चांगले तीनवेळ धुवून पुसून वाळवून त्यांचें वस्त्रगाळ पीठ करून त्यांत समभाग घट्ट थिजलेलें तूप घालून चांगलें फेसून एका भांड्यांत भरून ठेवावें. नंतर त्या मृदु केलेल्या गोळ्यावर वरवंटा फिरवून त्याची तव्याएवढी जाडी चकती करून तिजवर बोटांनीं खळ्या करून नंतर फेसलेले तुपाचा लेप खळ्या भरत असा देऊन त्या चकतीची गुंडाळून वळकटी करून कुटावी, असें तीन वेळां करून कुटून नंतर त्यांतील पोफळाएवढी गोळी घेऊन हातानीं चपटी करून तिजवर पांचां बोटांनीं खळ्या पाडून तुपांत तळावी. याप्रमाणें सगळ्या कराव्या, त्यांचें नांव खाजा. या साखरेवरोवर खाव्या, त्या गुरु, धातुवर्धक आहेत व वृष्य, पित्त, वायु यांचा नाश करितात.

## भ्राष्ट्जा (खापरपोळी.)

तंदुलानांसुसूक्ष्माणांकंडितानांपुनःपुनः ॥ पिष्टंसुसूक्ष्मंनिर्माय अष्टमांश घृतम्रितं ॥ जलेनांकिंचित्संलोड्यथानुघनधारया ॥ पनिष्यतितनस्तत्तु चुल्लचांमृन्मयखर्परे ॥ भस्मनालोडितेसम्यक अर्धांगुलमितंन्यसेत् ॥ मंदाग्नौतुपचेत्सम्यगुपर्याच्छादनंददेत् । पक्कायांच गृहीत्वातु शर्करादुग्ध आवपेत् ॥ नारिकेरस्यवाक्षीरेसावृष्याधातुवर्धका ॥ गुर्व्युष्णादुर्जराक्षारानाम्नावै भ्राष्ट्जास्मृता ॥

**अर्थ–** चांगले बारीक तांदूळ तिसड करून जात्यानें दळून काजळासारिखें बारीक पीठ करावें, आणि त्यांत अष्टमांश मोहन घालून दोहों हातांनीं चांगलें चोळून नंतर पाणी घालून कालवून मध्यम पातळ करावें आणि मातीचें खापर चुलीवर ठेवून खालीं अग्नि मंद पेटवावा, आणि तें खापर तापलें ह्मणजे त्याचे आंतून पुरचुंडीनें राखेचें जाड पाणी लावून नंतर तें पीठ कालवून ठेवलेलें त्या खापरांत अर्धे आंगुळ जाड पोळी होई इतकें ओतावें आणि त्या पिठास छिद्रें पडलीं ह्मणजे वर झाकण ठेवून ती पोळी शिजली ह्मणजे ऊन असतांच साखर घातलेल्या दुधांत किंवा नारळाचे रसांत सोडावी. ती धातुवर्धक, वृष्य, क्षार, उष्ण, दुर्जर, गुरु अशी आहे.

## दुग्धमंडक (दुधाचे मांडे).

विस्तीर्णमुखेपात्रेक्षिप्त्वाकार्पासबीजसलिलानि ॥ तप्तेशोच्छिन्नेनतथोपरि निधायपात्रंसुविस्तृतंतस्मिन् ॥ दुग्धंघननापत्रेक्षिप्त्वाविस्तारयेत्सुदर्व्या च ॥ शुष्केतस्मिन्नन्यत्क्षिप्त्वाक्षिप्त्वाविशोषयेद्विस्तृतं ॥ यवघनतामा

पत्रेशस्त्रेणोत्पाट्यमंडकोदौग्धः ॥ एलासितासमेतोभक्ष्यःकर्पूरवासितोरुच्यः ॥

अर्थ— रुंद तोंडाच्या भांड्यांत कापसाच्या बिया व पाणी घालून खालीं जाळ लावावा, आणि वर पितळी किंवा पितळेचें ताट ठेवून त्याजवर तापलेलें जाड दूध पळीनें विस्तारावें, तें वाळलें ह्मणजे पुनः विस्तारावें, याप्रमाणें करून करून तांदुळा इतकें जाड झालें ह्मणजे चाकूनें हळूहळू युक्तीनें काढावें, त्याचें नांव दुग्धमंडक. त्याजवर साखर, एलचीपूड, किंचित् कापूर लावून खावा. तो रुचिकर आहे.

## मांडे.

गोधूमानांजलंक्षिप्त्वतथैवचपिधापयेत् ॥ तेषांपिष्टेवस्त्रपूतेषोडशांशंघृतंक्षिपेत् ॥ वारिणामृदुलांकृत्वासमितांमाधुमर्दयेत् ॥ डहुतुल्यांगुटिंगृह्यतोत्तानेनसुपाणिना ॥ सुकंदस्थचयातुल्योवर्धितोगारभ्राष्ट्रके ॥ मृदुनावन्हिनाभ्राष्टःकथितोमंडकस्त्वसौ ॥ सितायुक्तेनपयसाभक्षितःकुशलैर्नरैः ॥ मंडकोबृंहणोवृष्योबल्योरुचिकरोभृशं ॥ पाकेपिमधुरोग्राहीलघुर्दोषत्रयापहः ॥

अर्थ— गव्हांला पाणी लावून कांहीं वेळ दडपून ठेवावे, नंतर भरडून बारीक व शुभ्र अशा वस्त्रानें गाळून रवा काढावा, आणि त्यांत सोळावा हिसा मोहन घालून पाण्यानें मळावा, मळून मळून व कुटून फारच मृदु करावा, आणि त्याची लिंबाएवढी गोळी घेऊन हातांनीं पोळीसारिखा व टोळा व कांद्याच्या पापद्या सारिखा पातळ, असा उलट्या हातावर मोठा विस्तार करून खालीं निखार घालून चुलीवर ठेवलेल्या मडक्याचे बुडावर घालून भाजावा, नंतर त्याची चौघडी करून शर्करामिश्रित दुधांत बुडवून खावा. तो बळकारक, धातुवर्धक, वृष्य, रुचिकर, पाककाळीं मधुर, ग्राहक, लघु, आहे व त्रिदोषनाशकही आहे.

## साखरभात (केशरीभात).

तंडुलान्मस्थनिःकर्षान्सुधौतान्विमलेजले ॥ भक्तादीषदपक्कांस्तानुत्तार्यजलमाहरेत् ॥ बादामबीजानिदशाष्टकर्षाण्यादायतावत्परिमाणद्राक्षाः ॥ एलासुबीजंपिषितंचकर्षंघृष्टंजलेकर्षमितंचकुंकुमं ॥ सितांचतुःप्रस्थमितांप्रगृह्यविलेपिरुध्यस्यसुभक्तकान्तत् ॥ विस्तीर्णपात्रेसुविकीर्यत

स्मिन्एलादिकंक्षिप्यसुपाचितेघृते ॥ सार्धप्रस्थेलवंगंचकर्षार्धंप्रथमंक्षिपेत् ॥ पश्चाद्भक्तंविनिक्षिप्यदर्व्यानुसुविचालयेत् ॥ पिधानंन्यस्यचततउद्धृत्यपुनरेवहि ॥ विचाल्यचापिधायाशुईषत्कालात्समुद्धरेत्॥ मत्स्यंडीप्रस्थपादाचलवंगमर्धकर्षकं ॥ मेलयित्वाकृतंसम्यक्भोजनार्थंनृनिर्हरेत् ॥ सधातुकृद्वातहरोपुष्टिकृन्मधुरःस्मृतः ॥ कफनाशकरश्चैवशर्कराभक्तसंज्ञितः ॥

**अर्थ—** चांगले बारीक तांदुळ पक्का शेर घेऊन चांगले धुऊन त्यांचा भात किंचित् कच्चा राखावा आणि भांड्याचे तोंडावर घट्ट फडका बांधून परातेवर दोन लाकडें सरळ ठेवून त्याजवर तें भांडें पालथें घालून निथळत ठेवावा आणि बदामाचे सोललेले पांढरे गर पावशेर व मनुका पावशेर, एलचीचे दाणे एक तोळा व केशर पाऊण तोळा पाण्यांत खललेले, व पिठीसाखर मापी चार शेर हें सर्व सामान तयार करून ठेवून नंतर त्या भातांतली पेज खाली निथळून कोरडा झाला म्हणजे विस्तीर्ण परातेंत उपसून, विसकळ मोकळा करून ठेवावा, मोकळा जाहाल्यानंतर त्यांत सामान लवंगावांचून सगळे जिन्नस घालून मिसळावे आणि एक मोठे भांडे चुलीवर ठेवून त्यांत सुमारे वजनी दीडशेर तूप घालून सळसळ होईपर्यंत तापवून त्यांत अर्धतोळा लवंगा टाकून पळभर वर ढाकण ठेवून नंतर तो भात फोडणीस टाकून पळीचे दांड्यानें सारखा चाळवून पुनः वर झांकण ठेवून तसाच घटकाभर राखून नंतर खाली उतरून आंत पावशेर खडीसाखर, अर्धतोळा लवंगा मिसळून वाढावा. ह्याचे गुण धातुवर्धक, वातनाशक, पौष्टिक, मधुर, कफनाशक आहे.

## शालिपिष्टभक्ष्य (तांदुळांच्या पिठाचे पदार्थ).

शालिपिष्टकृताभक्ष्याःकिंचित्बल्याविदाहिनः ॥
अवृष्यागुरवश्चोष्णाःकफपित्तप्रकोपनाः॥

**अर्थ—** भाताचे पिठाचे पदार्थ किंचित् बलकर, विदाही, अवृष्य, गुरु, उष्ण, असे आहेत व कफ, पित्त यांना कोपवितात.

## घृतपक्वभक्ष्य (तुपांत तळलेले पदार्थ).

घृतपाचिताःपदार्थावर्ण्यालघवश्चदृक्प्रसादकराः ॥
पित्तानिलशांतिकराबल्याश्चोक्ताश्चपाकशास्त्रज्ञैः ॥

**अर्थ—** तुपांत तळलेले पदार्थ वर्णकारक, लघु, दृष्टि प्रसन्न करणारे, वातपित्तनाशक आणि बलकारक असे आहेत.

## गोधूमपिष्टभक्ष्य (गव्हांचे पदार्थ).

गोधूमाविहिताभक्ष्याबल्याःपित्तानिलापहाः॥

**अर्थ—** गव्हांचे पदार्थ बलकारक व पित्त, वायु यांचा नाश करणारे असे आहेत.

## गौडिकभक्ष्य (गुळाचे पदार्थ).

दाहिनोगुरवोवातपित्तनाशकरामताः॥
गौडाःपदार्थाविज्ञेयाःकफशुक्रविवर्धनाः॥

**अर्थ—** गुळाचे पदार्थ विदाही, जड व वायु, पित्त यांचे नाशक आणि कफ, व शुक्र-धातु, याला वर्धक असे आहेत.

## मोड आलेल्या धान्याचे भक्ष्यपदार्थ.

ईषन्निःसृतांकुरणांधान्यानांभक्ष्यकंगुरु॥
किंचिद्विपित्तकृद्दाहिक्लेशदंदृष्टिदूषकं॥

**अर्थ—** मोड आलेल्या धान्याचे पदार्थ गुरु, किंचित् पित्तकर, विदाही, क्लेशोत्पादक, दृष्टीला दोष करणारे असे आहेत.

## वैदलभक्ष्य.

वैदलावातलाभक्ष्यागुरवस्तुवराहिमाः॥

**अर्थ—** शिंबीधान्याचे पदार्थ वातल, जड, तुरट, शीत आहेत.

## तैलपक्वभक्ष्य.

तैलेनपक्काहिपदार्थजाताविदाहिनोगुरवःपाकतीक्ष्णाः॥
उष्णाश्चनेत्रामयदाश्चनाशनावातस्यपित्तास्लविदूषणाःस्मृताः॥

**अर्थ—** तेलांत तळलेले पदार्थ विदाही, गुरु, पाककाळीं तिखट, उष्ण, नेत्रांस वि-कार करणारे, वातनाशक व रक्तपित्ताला दूषवणारे असे आहेत.

## माषपिष्टभक्ष्य.

माषपिष्टकृताभक्ष्याबल्याःपित्तकफप्रदाः ॥
गुरवोमलधातूनांवृद्धिदावातनाशनाः ॥

अर्थ– उडिदांचे पिठाचे पदार्थ बलकर व पित्त, कफ यांना वाढविणारे, जड, आणि मल व धातु यांना वाढविणारे, आणि वातनाशक असे आहेत.

## दूध घालून केलेले गव्हांचे व तांदुळांचे पिठाचे भक्ष्य.

गोधूमानांतंडुलानांभक्ष्यंदुग्धेनसाधितं ॥ विदाहिदीपकंहृद्यं
शुक्रतुष्टिबलप्रदं ॥ पुष्टिदंवातपित्तघ्नंणाककृद्धिप्रकीर्तितं ॥

अर्थ– गोधूम व तांदुळ यांच्या पिठाचे दुधानें केलेले पदार्थ ते किंचित् विदाही अग्निदीपक, प्रिय व शुक्रधातु, बल, पुष्टि, तुष्टि यांला वाढविणारे व वातपित्ताचा नाश करणारे आणि कफकारक असे आहेत.

## पोहे.

शूर्पशुद्धासुशालीस्तुनस्तंचजलंक्षिपेत् ॥ स्त्रोभूतेभ्राष्ट्रकेक्षिप्ताभ्रष्टाःस्युस्कु
टितास्ततः ॥ कुट्टिताश्चिपिटाःप्रोक्तास्तेस्मृताःपृथुकाअपि ॥ पृथुकागुर
वोवातनाशनाःश्लेष्मलाअपि॥सक्षीराबृंहणावृष्याबल्याःस्निग्धाःसराश्चते॥

अर्थ– साळी चांगल्या पाखडून घेऊन त्यांवर गरम आधणाचें पाणी घालून भिजवून दाबून ठेवाव्या, आणि दुसरे दिवशीं पुनः तसेंच गरम पाणी घालून नंतर खापरांत भाजून कुटून पातळ होतात, त्यांचें नाव पोहे. ते जड, वातनाशक, कफकारक आहेत व ते दुधांत भिजवून सेवन केले असतां धातुवर्धक, वृष्य, बलकारक, स्निग्ध आणि सारक असे आहेत.

## होलक ( हुळा ).

अर्धपक्वैःशमीधान्यकणिशैस्तृणभर्जितः ॥ सहोलकोनिगदितोवातमेद
कफंकरः ॥ श्रमजित्गुरुरुक्षश्चमलावष्टंभकोमतः ॥ दुर्जरःशीतकृद्धा
न्यैःकृतस्तत्तद्गुणीभवेत् ॥

**अर्थ–** अर्धपक्व शिंबी धान्याच्या शेंगा आणून त्या गवताचे अग्नींत भाजाव्या, त्याचें नांव हुळा. तो किंचित् वात, मेद, कफ यांना करणारा, श्रमनाशक, रूक्ष, जड, विष्टंभकारक, दुर्जर, शीत असा आहे. आणि ज्या ज्या धान्याचा होलक केला असेल त्याचे गुण त्या त्या धान्याप्रमाणे जाणावे.

## उंबी (ओंब्या.)

मंजरीत्वर्धपक्वायायवगोधूमयोर्भवेत् ॥ तृणानलेनसंभृष्टाबुधैरुंबी निसास्मृता ॥ उंबीकफप्रदालघ्वीबल्यापित्तानिलापहा ॥

**अर्थ–** यव, गहूं यांचीं कैसरें ओलींच आणून तृणाच्या अग्नीनें भाजावीं. त्याचें नांव उंबी, ती कफकारक, लघु, बल्य आहे. व पित्तवायूचा नाश करिते. जोंधळ्याचीं व बाजरीचीं कणसें भाजून करितात त्याला हुरडा व निबोर म्हणतात.

## लाज (लाह्या.)

येषांस्युस्तंडुलास्तानिधान्यानिसतुषाणिच ॥ भ्रष्टानिस्फुटितान्याहुर्लाजानितिमनीषिणः ॥ लाजास्युर्मधुराःशीतालघवोदीपनाश्चते ॥ स्वल्पमूत्रमलारूक्षाबल्याःपित्तकफच्छिदः ॥ छर्द्यतीसारदाहास्रमेहमेदतृषापहाः ॥

**अर्थ–** ज्या धान्याचे तांदूळ होतात त्याचा भात आणावे. तो भात त्यापरांत भाजून चांगलें फुटलें म्हणजे त्यांला लाह्या असें म्हणतात. त्या मधुर, शीत, लघु, दीपन, आहेत व मूत्र, मल यांना अल्प करणाऱ्या, रूक्ष, बलकारक व पित्त, कफ, ओकारी, अतिसार दाह, रक्त, मेह, मेद, तृषा यांचा नाश करितात.

## तिळकुटी-पलल, (तिलचूर्ण.)

पललंतुसमाख्यातमंक्षवंतिलपिष्टकं ॥ पललंमलकृत्वृष्यंवातघ्नंकफपित्तकृत् ॥ बृंहणंचगुरुवृष्यंस्निग्धंमूत्रनिवर्तकं ॥

**अर्थ–** गूळ व तिळांचें चूर्ण एकत्र केलें म्हणजे त्याचें नांव पलल. तें मलकारक, वृष्य, वातनाशक व कफ, पित्त यांना करितें व धातुवर्धक, जड, पौष्टिक, स्निग्ध, आहे व मूत्राचा नाश करितें.

## कुल्माष ( घुगऱ्या ).

धान्यानि स्विन्नगोधूमास्तथा च चणकादयः॥ हिंगुसैंधवयुक्ताश्च जलेऽर्धविपा
चिताः॥ कुल्माषा इति कथ्यन्ते ह्यग्निमांद्यकफप्रदाः॥ शुक्रदा गुरवो रूक्षा वा
तला भिन्नवर्चसः॥ बलभेदाध्मानकराः पुष्टिदाश्च प्रकीर्तिताः॥

**अर्थ**– इतर धान्यें, किंवा गहूं, चणे ह्यांतील धान्य हिंग, मीठ घालून पाण्यांत अर्धी शिजवावीं, त्यांला कुल्माष ह्मणतात. हे अग्निमांद्यकर, कफप्रद, शुक्रकर, जड, रूक्ष, वातूल, मलभेदक, व बल, भेद, आध्मान यांला करणाऱ्या व पुष्टि देणाऱ्या आहेत.

## धाना ( भृष्टयव ).

धाना यवा वातकरा दुर्जरास्तथा जडाः॥ रूक्षास्तृष्णातृप्तिकरा लेखना
मलबंधकाः॥ कफमेदं च वांतिं च हन्युस्तृषितांकुराः॥ भर्जितान्ने
दिगुरवो आमं कुर्युर्गिनिस्फुटं॥

**अर्थ**– भाजलेले यव वातकर, दुर्जर, जड, रूक्ष, तृषा, तृप्ति यांला करणारे, लेखन, मलस्तंभक, असे आहेत व कफ, मेद, ओकारी यांचा नाश करितात व मोड आलेले यव भाजले असतां गुरू व आमकर करणारे होतात.

## लाजसक्तु ( लाह्यांचें पीठ ).

लाजोद्भवाः सक्तवः स्युर्लघवस्तृप्तिदा मताः॥ ग्राहिणः शीतला श्लेष्म
वातघ्नाः पित्तनाशनाः॥ पथ्याश्च छर्दिरक्तानां नाशना बालयक्ष्मणां।

**अर्थ**– लाह्यांचे सक्तु लघु, तृप्तिकारक, संग्राही, शीत, पथ्यकर, असे आहेत. व कफ वात, ओकारी, रक्त, पित्त, यांचा नाश करितात.

## सक्तु ( भाजलेल्या धान्यांचें पीठ ).

धान्यानि भ्राष्ट्रभृष्टानि यन्त्रपिष्टानि सक्तवः॥ शीतलास्तारका रूक्षा
बलशुक्रप्रदाः स्मृताः॥ कफश्रमग्लानिदाहभ्रमपित्तनिवारणाः॥

**अर्थ**– धान्यें भाजून डाळ करून तीचें पीठ करितात, त्याचें नांव सक्तु. ते शीतल, तारक, रूक्ष, आहेत. व बल, शुक्र यांला देणारे व कफ, श्रम ग्लानि, दाह, भ्रम, पित्त, यांचा नाश करितात.

## यवसक्तु (भाजलेल्या यवांचें पीठ).

यवजाःसक्तवःशीतालघवोरोचनाःसराः ॥ कफपित्तहराःरूक्षालेखनाश्च प्रकीर्तिताः॥ तेपीताबलदावृष्याबृंहणाभेदनास्तथा ॥ तर्पणामधुरारुच्याः परिणामेबलावहाः ॥ कफपित्तश्रमक्षुत्तृड्व्रणनेत्रामयापहाः ॥ प्रशस्ता घर्मदाहाध्वव्यायामार्तानांशरीरिणां ॥

अर्थ— यवांचे सक्तु शीत, लघु, रोचक, सारक असे आहेत आणि कफ, पित्त यांचे नाशक, रूक्ष, लेखन, असे आहेत. ते पाण्याशीं प्राशन केले असतां बलकार, वृष्य, धातु-वर्धक, भेदक, तर्पण, मधुर, रुचिकर, बलदायक आहेत. आणि कफ, पित्त, श्रम, क्षुधा, तृषा, व्रण, नेत्ररोग यांचा नाश करितात. आणि घर्म, दाह, मार्ग यांमध्यें श्रमलेल्या मनुष्यांना प्रशस्त आहेत.

## चणकयवसक्तु.

निस्तुषैश्चणकैर्भ्रष्टैस्तुर्यांशैश्चयवैःकृताः ॥ सक्तवःशर्करासर्पिर्युक्ता ग्रीष्मेतिपूजिताः ॥ शुक्रलालघवोबल्याःशीतास्तृप्तिरुचिप्रदाः ॥

अर्थ— हरभऱ्यांचे डाळीचे चतुर्थांश यव मिळवून ती भाजून दळावी, ते यवचणक-सक्तु. ते साखर व तूप घालून ग्रीष्मऋतूमध्यें भक्षण करण्यास फार उत्कृष्ट आहेत, आणि धातुवर्धक, लघु, बलकारक, शीत, तृप्ति, रुचि यातें देणारे असे आहेत.

## शालिसक्तु (भाजलेल्या तांदुळांचें पीठ).

सक्तवःशालिसंभूतावह्निदालघवोहिमाः ॥ मधुराग्राहिणोरुच्याःपथ्याश्च बलशुक्रदाः ॥ नभुक्त्वानरदैश्छित्वानानिशायांनवाबहून् ॥ नजलांतरितान्नाद्विःसक्तूनद्यात्केवलान् ॥ पृथक्पानंपुनःपानंसामिषंपयसानिशि ॥ दंतच्छेदनमुष्णंचसप्तसक्तुषुवर्जयेत् ॥

अर्थ— भाताचे सातु अग्निदीपक, लघु, शीत, मधुर, ग्राहक, रुचिकर, पथ्यकारक, बल, शुक्र यांना करणारे असे आहेत. हे भोजनानंतर दातांनीं चावून किंवा रात्रीं अथवा केवळ पाण्यांत घोळवून किंवा दिवसांत दोन वेळ व पुष्कळ मांसाशीं, दुधाशीं, किंवा रात्रौ ऊन पदार्थाशीं हे सात सातु भक्षणागमें वर्ज करावे.

## चणकसक्तु.

चाणकाःसक्तवःशीतारूक्षास्तृप्तिकरामताः ॥ ग्राहिणोवातलाश्चैवरक्तस्वच्छकरामताः ॥ पित्तघ्नाश्चकफघ्नाश्चस्मृताःपाकविशारदैः ॥

अर्थ– चण्यांचे सातु शीत, रूक्ष, तृप्तिकारक, संग्राही, वातल, रक्त स्वच्छ करणारे आणि पित्त व कफ यांचा नाश करणारे असे आहेत.

## पेढे, बरफी, बासुंदी इत्यादि.

पयसःकेवलस्यापिपदार्थाबलवृष्यदाः ॥
हिताःसुगंधिनःपुष्टिधातुवृद्धिकराग्निदाः ॥

अर्थ– पेढे, बरफी, बासुंदी इत्यादिक शुध्द दुधाचे पदार्थ, ते बल्य, वृष्य, प्रिय, सुगंधी, पुष्टि, धातुवृद्धि यांना करणारे व विदाही असे आहेत.

## मंथ.

सक्तूनघृतेघोलयित्वाजलेनसहघोलयेत् ॥ नातिद्रवंनातिघनंसमंथोबलदःस्मृतः ॥ परिणामिबलहरोमधुरःशीतलःस्मृतः ॥ वर्णपुष्टिस्थैर्यकारोदाहतृट्श्रमछर्दिहा॥प्रमेहक्षयकुष्ठानांनाशकःपरिकीर्तितः ॥ सगुडाम्लघृतैःसार्धंभक्षितोमूत्रकृच्छ्रहा ॥ उदावर्तहरश्चैवसमितेक्षुरसैर्युतः ॥ द्राक्षाभिर्भक्षितोनित्यंवातरक्तविनाशनः ॥ पित्तस्यनाशकश्चोक्तःद्राक्षामधुभिःसह॥ जलेनघोलितश्चान्तःकफनाशकरोमतः ॥ अम्लैर्घृतैःसिताभिश्चेक्षुमधुद्राक्षागुडैःसह ॥ भक्षितश्चमलान्दोषान्यथामार्गेणवाहकः ॥

अर्थ– मंथ सातूंला चांगलें तुपांत घोळून नंतर पाणी घालून फार पातळ व फार जाड नव्हे असा करावा. तो बलकर, परिणामीं बलहर, मधुर, शीतळ असा आहे. व वर्ण, पुष्टि, स्थैर्य यांना करणारा व दाह, तृषा, श्रम, छर्दि, प्रमेह, क्षय, कुष्ट यांचा नाश करितो. तोच गूळ, चिंच, तूप यांशीं भक्षण केला असतां मूत्रकृच्छ्, उदावर्त यांचा नाश करितो. तोच पांढऱ्या उसाचा रस व द्राक्षें यांशीं भक्षण केला असतां वातरक्त, पित्त यांचा नाश करितो आणि द्राक्षें, मध, पाणी यांशीं भक्षण केला असतां कफनाश होतो व आंबट, तूप, साखर, उसाचा रस, मध, द्राक्षें आणि गूळ यांशीं भक्षण केला असतां मल व दोष यांना यथामार्गानें नेणारा असा आहे.

## निष्पंद.

दधिदुग्धेसमेकृत्वापाच्यंचार्धावशेषकं ॥ तस्मिन्तिलांस्तंदुलांश्चचारोली पनसास्थिच ॥ मातुलिंगस्यखंडानितस्मिन्दुग्धसमंघृतं ॥ सितांनिक्षिप्य विपचेत्तस्मिन्व्योषंसचंद्रकं । निक्षिप्योत्तार्यनिष्पंदोधातुवृद्धिकरोगुरुः ॥ हृद्यश्चवातपित्तानांनाशकःपरिकीर्तितः ॥

अर्थ— निष्पंद. दहीं व दूध समभाग घेऊन अर्धं शेष राहे तों पचन करावा. त्यांत तिळ, तांदूळ, चारोळी, फणसाच्या आंठळ्या, माळुंगाचे तुकडे व दुधाइतकें साखर, तूप घालून पचन करावा, त्यांत सुंठ, मिरीं, पिंपळी व कापूर घालून उतरावा त्याचें नांव निष्पंद. हा धातुवर्धक, जड, हृद्य असा आहे व वात, पित्त यांचा नाश करितो.

## दुग्धकूपिका.

दुग्धेचदधि निक्षिप्यदधियावन्नजायते ॥ तावत्तस्मिन्तंदुलानांपिष्टंनिक्षिप्यमर्दयेत् ॥ कृत्वा[illegible]कूपिकां ॥ घृतेविपाच्यतांकूपीं तप्तदुग्धेनपूरयेत् ॥ पश्चात्तेन पिष्टेनमुखंतस्यानिरोधयेत् ॥ पुनश्चत [illegible]युक्त्या घृते[illegible] ॥ पश्चात्तांशर्करापाकेमज्जयेत्तद्विचक्षणः ॥ सास्याद्बल[illegible]गुर्वीशुक्रकरीमता ॥ तर्पिणीरुचिदानेत्र्यापुष्टिदा वातपित्तहा ॥

अर्थ— दुधांत दहीं घालून जों विरजलें नाहीं तों त्यांत तांदुळाचें पीठ घालून मळावें, तें चांगलें मळलें म्हणजे त्याच्या लहान तोंडाच्या अशा कोठेदार कुप्या कराव्या, त्या तुपांत तळून त्या कुपींत दाट केलेलें दूध घालावें. नंतर दुसरें पीठ कुपीच्या तोंडावर लावून तें तोंड युक्तीनें तळून काढावें. नंतर ती तळलेली कुपी साखरेच्या पाकांत बुडवावी. ती बलकारक, शीतल, श्लक्ष्ण, गुरु, शुक्रकर, तर्पण, रुचिकर, नेत्र्य, पुष्टिकर, वात व पित्त यांचा नाश करणारी अशी आहे.

## क्षीरशाक.

दुग्धं[illegible]यवानकेंसमभागेनमेलयेत् ॥ पश्चात्तत्पिंडसदृशंस्यात्तावद्धिविपाचयेत् ॥ शर्करापूरणेनैवतस्यकार्याचचक्रिका ॥ घृतेविपाचितासातु

क्षीरशाकेनिकथ्यते ॥ कफदापुष्टिदागुर्वीवृष्याहृद्याप्रकीर्तिता ॥ वातान्गिना शिनीचोक्तादीनाग्नीनांहितामता ॥ व्यवायिनामनिद्राणांहितेतिपरिकीर्तिता ॥

**अर्थ**— दूध किंवा दहीं ताकांत समभाग मिळवावें नंतर त्याचा गोळा होईपर्यंत पचन करावें. नंतर त्यांत नारळाचें पुरण घालून त्याचे वडे करावे, ते तुपांत तळावे, त्यांचें नांव क्षीरशाक. तो कफकर, पुष्टिदायक, गुरु, वृष्य, हृद्य आहे व वायु, अग्नि यांचा नाश करणारा व दीनाग्नि, व्यवायी, जागरण करणारे यांना हितकारक आहे.

## वेसवार.

शुंठीजीरकद्वंद्वंशतपुष्पाचधान्यकं ॥ त्वगेलापत्रकंनागकेशरंचतिलान् तथा ॥ दाडिमत्वक्निशाकासमर्दपत्राणिहिंगुकं ॥ फलंचाद्रनारिकेलं सिद्धार्थैरंडमूलकं ॥ वृहत्कंचमरिचंद्राविशंवाफलीफलं ॥ एतेसर्वेयथा योग्यंभृतेभर्ज्यविचूर्णयेत ॥ यथायोग्यंमेलिताश्चेद्वेसवारःसवातहा ॥ य स्मिन्पदार्थेदत्तोयंसोग्नेर्वीर्यस्यवर्धकः ॥

**अर्थ**— सुंठ, जिरें, शिरजिरें, शहाजिरें, शोप, धने, दालचिनी, एलची, तमालपत्र, नागकेशर, तिळ, डाळींबाची साल, हळद, कासिवद्याचीं पानें, हिंग, नारळाचे तुकडे, मोहोऱ्या, एरंडमूळ, मिरच्या, मिरीं, वाकल्यांची फळें इ०. हे सर्व पदार्थ यथायोग्य तुपावर भाजून कुटून एकत्र करून ठेवावे, याचें नांव वेसवार, हा वातनाशक, आहे व ज्या पदार्थांत घालावा तो पदार्थ अग्निवर्धक होतो.

## सांबार (दुसरा वेसवार).

गोधूमाश्चतंडुलाश्चसर्षपामरिचानिच ॥ निशाचणकदालिश्चकर्षषट् कमिताःक्रमात् ॥ धान्यकंरक्तमरिचंसार्धषट्पलसंमितं ॥ कलायमाष तुवरीजीरमुद्राख्यिकाखिकाः ॥ चिरफलंशतपुष्पाचत्वक्चोक्ताकर्षसंमि ता ॥ कर्षमादोगमठःस्यात्सर्वंतैलेविभर्ज्यच ॥ चूर्णयेत्क्रियतेनतुवेसवा राभिधंमतं ॥ एतत्प्रक्षिप्यक्रियतेषट्सूदाद्यंरुचिप्रदं ॥

**अर्थ**— सांबार. गहूं, तांदूळ, मोहऱ्या, मिरें, हळद, चण्याची डाळ हे सर्व साहा तोळे व धने, मिरच्या हे प्रत्येक २६ तोळे व वाटाणे, उडीद, तुरी, जिरें, मूग, यांची डाळ हे तीन तोळे व चिरफळ, बडीशेप, दालचिनी हे एकेक तोळा व

हिंग पावतोळा, हे सर्व तेलावर भाजून त्यांचें चूर्ण एकत्र करावें, त्याला वेसवार म्हणतात. हा वेसवार सांभाऱ्यांत घातला असतां अति रुचिकर होतें.

## सौरभ (गरममसाला).

षट्पलंधान्यकंप्रोक्तंसर्षपाश्चद्विकार्षिकाः ॥ त्रिपलंरक्तमरिचंत्रिकर्षंवेल्लकंमतं ॥ निशात्रिकार्षिकाप्रोक्ताकंकोलंदेवपुष्पकं ॥ शिलाजंत्वक्चिरफलंप्रत्येकंचार्धकार्षिकं ॥ नारिकेलफलंशुष्कंबहुशःसूक्ष्मखंडितं ॥ हिंगुशाणमितंग्राह्यंकिंचिदेरंडकाष्ठकं ॥ तैलभ्रष्टंचतत्सर्वंपाषाणेसूक्ष्मपेषितं ॥ सौरभाख्यंचतत्प्रोक्तंनृनाकादिषुयोजयेत् ॥

अर्थ– धने १ शेर, मोहोऱ्या २ तोळे, मिरच्या १२ तोळे, मिर्यें ३ तोळे, हळद ३ तोळे, व कंकोळ, लवंगा, दगडफूल, दालचिनी, तिरफळ, हे प्रत्येक अर्धा तोळा, सुख्या खोबऱ्याचे तुकडे, हिंग ३ मासे, एरंडाचा कोळसा, हा संपूर्ण तेलावर तळून बारीक वांटावा. याला सौरभ किंवा गरम मसाला म्हणतात. हा वांगीं इत्यादिकांवर घालावा.

## सांभारें.

ग्रंथयोल्कपर्णानांसांकुराश्चकलायकाः ॥ नारिकेलस्यखंडानिनिष्पावाद्रीचदालिका ॥ समभागमिदंग्राह्यंपाच्यंलवणयुक्तविदं ॥ पश्चादिच्छामितंदेयंजलंसाम्लंविपाचयेत् ॥ पश्चात्तुनारिकेलस्यरसंचसजलंतथा ॥ सौरभंचाणकंपिष्टंतंदुलानांतुचाल्पकं ॥ घोलयित्वाचपूर्वोक्तेनिक्षिप्यविनिपाचयेत्॥ दर्व्याविचाल्यबहुशोद्रवंलेहोयथाभवेत् ॥ उत्तार्यनारिकेलस्यस्वरसंचप्रदापयेत् ॥ प्रदीप्तंतिलतैलंचहिंगुसर्षपसंयुतं ॥ तस्मिन्देयंचतद्ज्ञेयंषट्ङ्राद्व्यमनुत्तमं ॥

अर्थ– अळवाच्या पानाचे गांठे, मोड आलेले वाटाणे, नारळाचे तुकडे, पावट्यांची ओली डाळ, हे पदार्थ समभाग घेऊन मीठ घालून शिजवावे, नंतर पाहिजे तेवढें चिंचेचें पाणी घालून आटूं द्यावें, नंतर नारळाचा पाणरस, गरम मसाला, चण्यांचें पीठ, व किंचित् तांदुळांचें पीठ एकत्र कालवून त्याला लावून कढवावें, तें नेमस्त पळीवाढें झाल्यावर उतरून त्यांत नारळाचा पाण्यावांचून रस घालावा, आणि हिंग, मोहऱ्या यांची फोडणी द्यावी, त्याला सांभारें म्हणतात. हें उत्तम होतें.

## दुसरें सांभारें.

रक्ताम्ललाबुखंडानिचार्द्रांचणकदालिका ॥ लवणेनयुतासम्यक्पाच्या चसजलापुनः ॥ तस्मिन्चिंचोदकंपिष्टंचणकानांचसौरभं ॥ गुडंचकटुकंचैवदत्वादर्व्याविचालयेत् ॥ पाच्यंपश्चात्तदुत्तार्यतैलंतप्रसहिंगुकं ॥ दत्वासिद्धंचतज्ज्ञेयंषड्रुद्रादव्यंसुसंमतं ॥

**अर्थ**– तांबड्या भोंपळ्याचे तुकडे व चण्याची भिजलेली डाळ, हे मीठ घालून शिजवावे, नंतर त्यांत चिंचेचें पाणी, चण्याचें पीठ, ममाला, गूळ, तिखट, हे पदार्थ नेमस्त घालून पळीनें ढवळून शिजवावें, नंतर उतरून हिंग घालून तेल तापवून त्याची फोडणी द्यावी, त्याला सांभारें ह्मणतात. हें फार उत्तम होतें.

## पंचामृत.

षट्कर्षमार्द्रमरिचंकिंचिच्छिन्नंचकारयेत् ॥ तैलपक्कंचतत्कार्यंतथामेथ्यर्धटंकिका ॥ निशाशाणमिताचैतदग्नितैलेविपाच्यच ॥ कज्जलेनसमंपिष्टंरसोजलयुतस्तथा ॥ चिंचाहिंगुश्चलवणंसर्वंसंमेलयेत्ततः ॥ तत्रतैलेविनिक्षिप्यसंदंदर्व्याविचालयेत् ॥ किंचिद्विपाच्यपश्चात्तुनारिकेलरसंपुनः ॥ दत्वाक्षणेनचोत्तार्यंतत्पंचामृतमुच्यते ॥

**अर्थ**– पावशेर ओल्या मिरच्या घेऊन त्याचे तुकडे करावे, नंतर अर्धतोळा मेथी, हळद ३ मासे, हीं तेलात तळून काजळासारिखीं बारीक वाटून नारळाच्या पाण्यांत कालवून तयार करावीं, नंतर एक नारळाचा आंगरस व बाकी पाणरस तयार करून त्यांत मिरच्यांचे तुकडे फोडणीस टाकून त्यांत तें मसाल्याचे पाणी, चिंच, हिंग, मीठ, हें सर्व एकत्र करून त्यांत घालून त्या तयार फोडणीवर ओतावें, नंतर पळीनें ढवळून क्षणभर शिजूं द्यावें. नंतर नारळाचा आंगरस घालून क्षणभर वर ढांपण ठेवून उतरावें. त्याचें नांव पंचामृत.

## दुसरें पंचामृत.

तिलाश्चसर्षपाधान्यंप्रत्येकंमुष्टिसंमितं ॥ एलालवंगार्धकर्षंसर्वंतैलेविभर्जयेत् ॥ संकुट्यगालयित्वाचरक्ष्यंपश्चाद्विभर्जितं ॥ नारिकेलफलंशुष्कंहिंगुकुस्तुंबरीयुतं ॥ अर्धप्रस्थंचमरिचंरक्तंसार्द्रंत्रिखंडितं ॥ मेथ्यार्द्रासार्धपलिकातप्ततैलेविपाच्यच ॥ किंचाम्लिकापटुयुतंरक्ष्यंपश्चाच्चसंशृणु ॥

गुडचिंचापटुयुतंजलंचाशीतिटंककं ॥ क्राथयित्वाचपूर्वोक्तंसर्वंतस्मिन् प्रदापयेत् ॥ दर्व्याचाल्यंचबहुशःपाच्यमंगुलमानकं ॥ सहिंगुनप्रतैलंचत स्योपरिविनिक्षिपेत् ॥ एतत्पंचामृतंपक्षंस्थीयतेचोत्तमोत्तमं ॥

अर्थ— तिळ, शिरस, धने हे प्रत्येक मुठभर व अर्धा तोळा एलची, अर्धा तोळा लवंगा घेऊन सर्व तेलावर भाजून त्याची वस्त्रगाळ पूड करून ठेवावी. नंतर सुकें खोबरें व हिंग भाजून कोथिंबिरीसहवर्तमान बारीक कुटून तयार करून ठेवावें. व अच्छेर ओल्या मिरच्यांचे तुकडे व भिजलेल्या मेथ्या ८ तोळे तेलावर तळून त्याला हळद व मीठ लावून ठेवाव्या. नंतर गूळ व चिंचेचें पाणी पक्का शेर त्यात नेमस्त मीठ घालून कढवावें. त्यांत वर तयार करून ठेविलेले सर्व पदार्थ घालून आंगुळभर आटे तों कढवावें. नंतर हिंग घालून तेलाची फोडणी द्यावी. हें पंचामृत पंधरा दिवस पर्यंत टिकतें व रुचीनें फार उत्तम होतें.

## आंब्यांचें लोणचें.

मध्यंचाम्रफलंग्राह्यंशतमानंचछेदितं ॥ पटुचूर्णंचत्रिदिनंस्थाप्यंपश्चाच्चयु क्तितः ॥ बीजंनिष्काश्यपश्चाचसूर्यतापेचतुर्दिनं ॥ शुष्कंचरंजेनततस्तस्मि न्प्रस्थमितानिशा ॥ सर्षपाश्चतथाप्रस्थामरिचंचार्धप्रस्थकं ॥ चतुःक र्षमितोहिंगुर्द्विप्रस्थंलवणंमतं ॥ लवणेनविनासर्वंतैलभ्रष्टंचकुट्टितं ॥ सार्ष पेणचतैलेनपटुयुक्तेनचोलितं ॥ तच्चूर्णंगोलकंकृत्वास्थाप्यंचाम्रोदरेतथा ॥ तेचाम्राःसार्षपैतैलेमज्जयित्वाचरक्ष्येत् ॥ पूर्वस्नुतंचाम्रजलंतस्मिंस्तस्यघटे न्यसेत् ॥ आम्रमज्जनपर्यंततैलंचसार्षपंन्यसेत् ॥ पश्चान्मुखंबंधयित्वा स्थाप्यंचैतत्प्रयत्नतः ॥ अयंचाचारकश्चाग्निदीपकःपाचकोमतः ॥ रुच्यः प्रोक्तोविशेषेणदशवर्षाणितिष्ठति ॥

अर्थ— मध्यम व झेल्यानें उतरलेले असे शंभर आंबे घेऊन उभे चिरून त्यात मीठ भरून तीन दिवस ठेवावे, नंतर त्यांतील बाठी युक्तीनें काढून उन्हात पांढरे होत तोंपर्यंत चार दिवस वाळवावे, नंतर त्यांत हळद एक शेर, मोहोऱ्या एक शेर, मिरच्या अर्धा शेर, हिंग ४ तोळे, मीठ दोन शेर हे पदार्थ मिठावांचून सर्व तेलावर भाजून बारीक कुटून एकत्र करावे, नंतर शिरसांचें तेल व मीठ घालून कालवून ते त्या आंब्यात भरून आंबा त्यासुध्दां शिरसांचे तेलांत बुडवून बरणीत ठेवावा, याप्रमाणें सर्व आंबे भरून तयार झाल्यावर पूर्वी काढलेलें आंब्यांचें पाणी सर्व आंत घालावें, नंतर आंबे सर्व बुडत तों शिरसांचें तेल ओतून तोंडावर घट्ट दादरा बांधून ठेवावें, हें अग्निदीपक, पाचक, रुचिकर असें आहे. हें लोणचें दाहा वर्षेपर्यंत टिकतें.

## कूष्मांडरस.

कूष्मांडखंडखंडानिमरिचंजीरकंतथा ॥ निशाधान्यंमेथिकाचतथारक्तम
रीचकं ॥ सर्वंसम्यक्कृमेलयित्वातैश्चकूष्मांडखंडकैः ॥ सार्धंतिलानांसंत
प्ततैलेसर्वंविभर्ज्यच ॥ लवणंचजलंदत्वाचार्धपक्वानिपाचयेत् ॥ पश्चा
च्चिंचोदकंदत्वासम्यक्पक्वंचकारयेत् ॥ उत्तारात्घटिकापूर्वंनारिकेलरसं
क्षिपेत् ॥ पश्चादाच्छादनंदत्वाकिंचित्कालंस्थिरस्थच ॥ तिलतैलंयथायोग्यं
दत्वाचोत्तारयेद्बुधः ॥ अयंकूष्मांडकरसोद्रव्यवच्चगुणाःस्मृताः ॥

**अर्थ**— कोहोळ्याचे तुकडे करून त्याला मिरीं, जिरें, हळद, धने, मेथ्या व मिरच्या, यांचा मसाला लावून तिळाच्या तेलांत फोडणीवर टाकावे, नंतर त्यांत मीठ व पाणी घालून अर्धकच्चे शिजवावे, नंतर चिंचेचे पाणी घालून चांगले शिजूं द्यावे, चुलीवरून उतरण्याच्या एक घटका पूर्वी नारळाचा रस घालून वर झाकण ठेवून तसेंच शिजूं द्यावे, नंतर तिळाचें कच्चे तेल वर घालून उतरावें. याला कूष्मांडरस म्हणतात. याचे गुण द्रव्यासारिखे आहेत.

## सर्वरस (खतखतलें).

उर्वारुवृंताककदंबलतुरणाःकर्कोटकीशाकविशेषकादीन् ॥ कूष्मांडका
लाबुयुगांकुराश्चस्याक्कारवेल्लंचतथाविप्रदिष्टा ॥ इत्यादिसर्वंखलुमेलयित्वा
तेषांचखंडानिचकारयित्वा ॥ पूर्वोदितेनैवचवेसवारसंज्ञेनकुस्तुंबरिखंड
केन ॥ चिंचादिपिष्टेनचनारिकेलरसेनसर्वंखलुमेलयित्वा ॥ निक्षिप्यतै
लेचपुनस्तदूर्ध्वंतैलंतिलानामथपाचयेच्च ॥ पक्वेरसंक्षिप्यचनारिकेरंवि
श्राम्यकिंचिच्चपिधायरक्षयेत् ॥ उत्तार्यपश्चादिनकृद्य उक्तोमनीषिभिःसर्व
रसःप्रसिद्धः ॥ द्रव्यंसमानास्तुगुणाःप्रदिष्टादर्व्योदिराश्चखलुसाध्यएषः ॥

**अर्थ**— काकडी, वांगे, पडवळ, सुरण, कटोली, भाजीचे देठ, कोहळा, भोपळ्याच्या वेलाचे कोंवळे तुकडे, गोवाऱ्या, कारलें, दोडके, मुळे इत्यादिक मिळवून त्याचे तुकडे करून त्याला पूर्वी सांगितलेला वेसवार व धन्याची बुकी, चिंचेचें पाणी, पीठ, मीठ, नारळाचा रस, हे सर्व एकत्र करून तिळांच्या तेलाच्या फोडणीवर ओतून त्यावर कच्चे तिळांचें तेल सुमारानें ओतून शिजवावें, शिजल्यावर नारळाचा आंगरस घालून वर झांपण ठेवून तसें कांहींवेळ ठेवून उतरावें, याला सर्वरस म्हणतात. हा अतिरुचिकर होतो. याचे गुण द्रव्यांसारिखे. हें पळीवाढें पातळ असावें.

## दुसरे प्रकारचें आंब्यांचें लोणचें.

आम्रंचमध्यमंग्राह्यंशतमानंविशेषतः ॥ तस्यग्रंथिविनाखंडान्कृत्वाचख
लुनस्यतु ॥ सार्धप्रस्थंराजिकाचमेथिकानवकार्षिका ॥ त्रिप्रस्थंरक्तम
रिचंसार्धप्रस्थानिशामता ॥ त्रिकर्षोरामठोग्राह्यःसर्वंतैलेविभर्ज्यच ॥
चूर्णंकृत्वाकुट्टयित्वापटुचत्वारमानिकाः ॥ सर्वंसंमेल्यपश्चाच्चआम्रखंडे
श्चमेलयेत् ॥ घटेधृत्वापिधायाथाद्वितीयेदिवसेपुनः ॥ त्र्यंजलीतिलतैलं
चतप्तंवैराजिकायुतं ॥ तस्मिन्दत्वापिधायाथरक्षेदाचारकोह्ययं ॥

अर्थ– चांगले शंभर आंबे घेऊन त्याचे काप काढावे व दीडशेर मोहऱ्या, मेथी तोळे, मिरच्या ३ शेर, हळद दीडशेर, हिंग ३ तोळे हे पदार्थ सर्व तेलावर भाजून कुटून तयार करावे, व चार शेर मीठ घेऊन त्यांत पूर्वीचें सर्व कूट मिसळून कालवावें, नंतर आंब्याचे काप व तो सर्व मसाला एकत्र कालवून घागरींत भरून त्यावर दापण ठेवावें, दुसरे दिवशीं तीन शेर तिळांच्या तेलाची मोहऱ्या घालून फोडणी तयार करावी, ती त्यावर ओतावी, आणि घट्ट घागरीचें तोंड बांधून ठेवावें, याला लोणचें म्हणतात.

## कर्कोटकी (कर्टोली फाकली).

कर्कोटकीरुचिकराकटुवीचाग्निप्रदीपनी ॥ तिक्तोष्णावातकफहृद्विषपित्तं
विनाशयेत ॥फलमस्यास्तुमधुरंलघुपाकेकटुस्मृतं ॥अग्निदीप्तिकरंगुल्मशू
लपित्तत्रिदोषनुत् ॥ कफकुष्ठकासमेहश्वासज्वरकिलासनुत् ॥ लाला
स्त्रावारुचिर्दोषकिलासहृदयव्यथाः । नाशयेत्पर्णमस्याश्चरुच्यंवृष्यंत्रिदो
षनुत् ॥ कृमिज्वरक्षयश्वासकासहिक्काऽर्शनाशनं ॥ कंदोमाक्षिकसंयुक्तः
शीर्षरोगेप्रशस्यते ॥

अर्थ– कर्टोली रुचिकर, तिखट, अग्निदीपक, कडू, उष्ण अशी आहे आणि वायु, कफ, विष, पित्त यांचा नाश करिते. हिचें फळ मधुर, लघु, पाककाळीं तिखट, अग्निदीपक आहे आणि गुल्म, शूळ, पित्त, त्रिदोष, कफ, कुष्ट, खोकला, मेह, दमा, ज्वर, किलासकुष्ट, लालास्त्राव, अरुचि, किलास, हृद्रोग यांचा नाश करिते, हिचें पान रुचिकर, वृष्य, त्रिदोषनाशक आहे व कृमि, ज्वर, क्षय, दमा, खोकला, हिक्का, अर्श यांचा नाश करिते; हिचा कंद मधाशीं मस्तकरोगावर प्रशस्त आहे.

## वंध्याकर्कोटकी (वांझकर्टोली).

वंध्याकर्कोटकीतिक्ताकटुवीचोष्णालघुःस्मृता ॥ रसायनीशोधनी

चस्थावरादिविषापहा ॥ कफनेत्रशिरोरोगव्रणवीसर्पकासहा ॥ रक्तदोषंसर्पविषंनाशयेदितिकीर्तिता ॥

अर्थ— वांझकटोली कडु, तिखट, उष्ण, लघु, रसायनशोधन अशी आहे व स्थावरादिविष, कफ, नेत्ररोग, शिरोरोग, व्रण, विसर्प, खोकला, रक्तदोष, सर्पविष यांचा नाश करिते.

## करंज.

करंजःकटुकःपाकेनेत्र्योष्णस्तिक्तकोरसे ॥ कषायोदावर्तवातानांयोनिदोषापहःस्मृतः ॥ वातगुल्मार्शव्रणहृत्कंडूकफविषापहः ॥ विचर्चिकापित्तकृमित्वग्दोषोदरमेहहा ॥ प्लीहाहरश्चसंप्रोक्तःफलमुष्णंलघुस्मृतं ॥ शिरोरोगवातकफहृत्कृमिकुष्ठार्शमेहनुत् ॥ पर्णंपाकेकटूष्णंस्याद्भेदकंपित्तलंलघु ॥ कफवातार्शकृमिनुत्व्रणशोथंचनाशयेत् ॥ पुष्पमुक्तंचोष्णवीर्यंपित्तवातकफापहं ॥ अस्यांकुरारसेपाकेकटुकाश्चाग्निदीपकाः ॥ पाचकाःकफवातार्शकुष्ठकृमिविषापहाः ॥ शोथनाशकराःप्रोक्ताबीजतैलंचवातनुत् ॥ कृमिनाशकरंचातिस्निग्धंदीपितुशीतलं ॥

अर्थ— करंज पाककाळीं तिखट, नेत्र्य, उष्ण, रसकाळीं कडु, तुरट, असा आहे व उदावर्त, वायु, योनिदोष, वातगुल्म, अर्श, व्रण, कंडू, कफ, विष, विचर्चिका, पित्त, कृमि, त्वग्दोष, उदर, मेह, प्लीहा यांचा नाश करितो. याचें फळ उष्ण व लघु आहे आणि मस्तकरोग, वायु, कफ, कृमि, कुष्ट, अर्श, मेह यांचा नाश करितें. याचें पान पाककाळीं तिखट, उष्ण, भेदक, पित्तल, लघु आहे व कफ, वायु, अर्श, कृमि, व्रण, शोथ यांचा नाश करितें. याचें फूल उष्णवीर्य, कडु आहे व पित्त, वायु, कफ यांचा नाश करितें. याचे अंकुर रसकाळीं व पाककाळीं तिखट, अग्निदीपक, पाचक आहेत व कफ, वायु, अर्श, कुष्ट, कृमि, विष आणि सूज यांचा नाश करितात. याच्या बियांचे तेल वातनाशक, कृमिनाशक, अति स्निग्ध आहे व दिव्यांना जाळण्याविषयीं थंड आहे.

## महाकरंज.

महाकरंजकस्तीक्ष्णःकटुश्चोष्णश्चतिक्तकः ॥
कंडूविचर्चिकाकुष्ठत्वग्रुग्विषव्रणापहः ॥

अर्थ— महाकरंज तीक्ष्ण, तिखट, उष्ण, कडु असा आहे व कंडू, विचर्चिका, कुष्ट त्वग्दोष, विषदोष आणि व्रण यांचा नाश करितो.

## घृतकरंज.

प्रोक्तोघृतकरंजस्तुकटूष्णोव्रणवातहः ॥ वातंचसर्वचर्मदोषंविषं
चार्शोविनाशयेत् ॥ करंजइवसंप्रोक्तागुणास्तस्यभिषग्वरैः ॥

अर्थ— घृतकरंज तिखट व उष्ण आहे. आणि व्रण, वायु, सर्व त्वग्दोष, विष आणि अर्श यांचा नाश करितो. इतर गुण करंजाप्रमाणें आहेत.

## गुच्छकरंज.

गुच्छानामाकरंजःस्यादुष्णस्तिक्तःकटुस्मृतः ॥ विचर्चिकावातवि
षकंडूकुष्ठार्शोनाशनः ॥ त्वग्दोषनाशकश्चैवस्मृतोभिषग्भिःपरिकीर्तितः ॥

अर्थ— गुच्छकरंज उष्ण, कडू, तिखट असा आहे आणि विचर्चिका, वायु, विष, कंडू, कुष्ट, अर्श, त्वग्दोष यांचा नाश करितो.

## पूतिकरंज (घाणेरडा करंज).

पूतीकरंजकःप्रोक्तोगुच्छपूर्वकरंजवत् ॥

अर्थ— पूतिकरंज याचे गुण गुच्छकरंजासारिखे आहेत.

## करंजिका (काटेकरंज).

कंटकिन्याःकरंजस्तुपाकेकटुश्चतूवरः ॥ ग्राहकश्चोष्णवीर्यःस्या
त्तिक्तःप्रोक्तश्चमेहहा ॥ कुष्ठार्शोव्रणवातानांकृमीणांनाशनः
परः ॥ पुष्पंतुवीर्येचोष्णंस्यात्तिक्तंवातकफापहं ॥

अर्थ— काटेकरंज पाकपाकीं तिखट, तुरट, ग्राहक, उष्णवीर्य व कडू आहे. आणि मेह, कुष्ट, अर्श, व्रण, वायु, कृमि यांचा नाश करितो. याचें फूल उष्णवीर्य व कडू आहे आणि वायु व कफ यांचा नाश करितें.

## करवीर (कण्हेर).

हयारिःपंचधाप्रोक्तःश्वेतोरक्तश्चपाटलः ॥ पीतःकृष्णःसमुद्दिष्टःश्वेतस्यैतान्गु
णान्शृणु ॥ कटुस्तिक्तश्चतुवरस्तीक्ष्णोवीर्येणचोष्णदः ॥ ग्राहीमेहकृमीन्

कुष्ठव्रणार्शोवातनुत्परः ॥ भक्षितो विषवत्‌ज्ञेयो नेत्र्योलघुविषापहः ॥ विस्फोटकुष्ठक्रिमिनुत्कंडूव्रणकफापहः ॥ ज्वरंनेत्ररुजंचैववाहप्राणांश्चनाशयेत् ॥ रक्तवर्णःशोधकःस्यात्कटुःपाकेचतिक्तकः ॥ कुष्ठादिनाशकोलेपादथपाटलवर्णकः ॥ शीर्षपीडांकफंवातंनाशयेदितिकीर्तितः ॥ रक्तादित्रतुरोभेदगुणाःश्वेतहयारिवत् ॥

**अर्थ**– कण्हेर ही श्वेत, रक्त, पाटल, पीत आणि कृष्ण अशी पांच प्रकारची; त्यांत श्वेतकण्हेर तिखट, कडु, तुरट, तीक्ष्ण, उष्णवीर्य, ग्राहक अशी आहे व मेह, कृमि, कुष्ट, व्रण, अर्श, वायु यांचा नाश करिते व भक्षण केली असतां विष आहे. आणि नेत्रांला हितावह, लघु व विष, विस्फोट, कुष्ट, कृमि, कंडू, व्रण, कफ, ज्वर, नेत्ररोग आणि घोडा यांचा नाश करिते. रक्तवर्ण कण्हेर शोधक, तिखट, पाककाळीं कडू व लेप केला असतां कुष्टनाशक आहे. आणि पाटलवर्ण कण्हेर मस्तकशूल, कफ, वायु यांचा नाश करिते. यांचे विशेष गुण व बाकी राहिलेल्या कण्हेरींचे गुण पांढऱ्या कण्हेरीसारखेच आहेत.

## कपिला (कंपिल्लक).

कंपिल्लकःसरश्चाग्निदीपकःकटुकःस्मृतः ॥ व्रणस्यरोपणश्चोष्णोलघुर्भेदी कफापहः ॥ व्रणगुल्मोदराध्मानकासपित्तप्रमेहहा ॥ आनाहंचविषंचैव मूत्राश्मरिरुजापहः ॥ क्रिमिचरक्तदोषंचनाशयेदितिकीर्तितः ॥

**अर्थ**–कपिला- कंपिल्लक सारक, अग्निदीपक, तिखट, व्रणरोपण, उष्ण, लघु, भेदक आणि कफनाशक, आहे व व्रण, गुल्म, उदर, आध्मान, खोकला, पित्त, प्रमेह, आनाह, विष, मूत्राश्मरी, कृमि, रक्तदोष यांचा नाश करितो.

## कटुकी (कुटकी).

कटुकीशीतलातिक्ताकटुर्वीचाग्निप्रदीपनी ॥ भेदकाचसरारुक्षालघ्वीरक्तरुजापहा ॥ शीतपित्तश्वासकफदाहारुचिज्वरान्जयेत् ॥ प्रमेहकुष्ठविषमज्वरकासक्षयापहा ॥ कामलाविषहृद्रोगनाशिनीतिप्रकाशिता ॥

**अर्थ**- कटुकी- कुटकी शीतळ, तिखट, कडू, अग्निदीपक, भेदक, सारक, रुक्ष, लघु अशी आहे व रक्तरोग, शीत, पित्त, दमा, कफ, दाह, अरुचि, ज्वर मेह, कुष्ट, विषमज्वर, खोकला, क्षय, कावीळ, विष, हृद्रोग यांचा नाश करिते.

## कर्चूर (कचोरा).

सशीतिक्ताचकटुकाचोष्णातीक्ष्णाग्निदीपनी ॥ सुगंधिरुचिरालघ्वीमुख स्वच्छकरीमता ॥ कोपनीरक्तपित्तस्यगलगंडादिरोगहा ॥ कुष्ठार्शोव्रण कासघ्नोश्वासगुल्मकफापहा ॥ त्रिदोषक्रिमिवातानांज्वरप्लीहादिनाशकृत् ॥

अर्थ— कर्चूर— कचोरा कडु, तिखट, उष्ण, तीक्ष्ण, अग्निदीपक, सुगंधी, रुचिकर, लघु, मुख स्वच्छ करणारा व रक्तपित्ताला कोपवितो आणि गलगंड, गंडमालादिक, कुष्ट, अर्श, व्रण, खोकला, दमा, गुल्म, कफ, त्रिदोष, कृमि, वायु, ज्वर आणि प्लीहा इत्यादिकांचा नाश करितो.

## सुगंधकचोरा (कापुरकचरी).

ससुगंधःकर्चुरकस्तीक्ष्णोदाहीकटुःस्मृतः ॥ तिक्तश्चतुवरश्चैवशीत वीर्योलघुःस्मृतः ॥ किंचित्पित्तंकोपयतिकासश्वासज्वरापहः ॥ शूल हिक्कागुल्मरक्तरुजंवातंत्रिदोषकं ॥ मुखवैरस्यदौर्गंध्यव्रणामच्छर्दिहिध्महा ॥

अर्थ— सुगंध कचोरा- कापुर कचरी तीक्ष्ण, दाहक, तिखट, कडू, तुरट, शीतवीर्य, लघु, किंचित् पित्तकर आहे व खोकला, दमा, ज्वर, शूल, हिक्का, गुल्म, रक्तरोग, वायु, त्रिदोष, मुखविरसता, दुर्गंध, व्रण, आम, वांत, आणि हिध्मरोग याचा नाश करितो.

## कस्तूरि (मृगमद).

कस्तूरिकातुचक्षुष्याकटुवोतिक्तासुगंधिका ॥ उष्णाशुक्रप्रदागुर्वीवृष्या क्षाररसायनी ॥ किलासकुष्टमुखरुक्कफदौर्गंध्यनाशिनी ॥ अलक्ष्मी मलवाततृट्छर्दिशोषविषापहा ॥ शीतंचनाशयत्येवदेशरूपोद्भवांशृणु ॥ उत्तमासाकृष्णवर्णानिपालस्थातुमध्यमा ॥ ताम्रवर्णाचसाज्ञेयाकाश्मी रस्थाधमामता ॥ वर्णेनकपिशासातुज्ञेयासुज्ञैश्चपंडितैः ॥

अर्थ— कस्तूरी चक्षुष्य, तिखट, कडू, सुगंधि, उष्ण, शुक्रप्रद, गुरु, वृष्य, क्षार, रसायन अशी आहे व किलासकुष्ट, मुखरोग, कफ, दुर्गंध, अलक्ष्मी, मल, वायु, तृषा, वांति, शोष, विष आणि शैत्य यांचा नाश करिते. ही कामरूप देशांत उत्पन्न झालेली कृष्णवर्ण, ती उत्तम व नेपालांत होणारी ताम्रवर्ण, ती मध्यम आणि काश्मीरांत होणारी कपिशवर्ण, ती अधम जाणावी.

## लताकस्तूरी.

लताकस्तूरिकास्वादुर्वृष्याशीतालघुस्मृता ।। नेत्र्यातिक्ताछेदनीचतीक्ष्णा
बस्तिविशोधिनी ।। बस्तिरोगंकफंतृष्णांमुखरोगंचनाशयेत् ।। लालास्रा
वंवांतिवातंदौर्गंध्यंचमदंजयेत ।। अलक्ष्मीनाशिनीप्रोक्तादिशेचदक्षिणेभवेत् ।।

**अर्थ**— लताकस्तुरी स्वादु, वृष्य, शीतल, लघु, नेत्राला हितकारक, कडु, छेदक, तीक्ष्ण, बस्तिशुद्धि करणारी आहे आणि बस्तिरोग, कफ, तृषा, मुखरोग, लालास्राव, वांति, वायु, दुर्गंध, मद आणि अलक्ष्मी यांचा नाश करिते. ही दक्षिण देशात होते.

## जवादीमांजर (मार्जारोद्भव कस्तूरी).

ओतूद्भवाकस्तूरिकाचकटूष्णासुखावहा ।। सुगंधिकाचसुस्निग्धावातेश
स्ताचवर्णदा ।। शुक्रवृद्धिकरीवृष्याअंगकांतिकरीमता ।। कंडूंकिटिभ
कुष्ठंचघर्मगंधंविषंतथा ।। कंठरोगंचकुष्ठंचनाशयेदितिकीर्तिता ।।

**अर्थ**—जवादीमांजर मार्जारोद्भव कस्तूरी [illegible], उष्ण, सुखावह, सुगंधि, स्निग्ध, वायूवर प्रशस्त, कांतिकर, शुक्रवृद्धिकारक, वृष्य, कांतिकर, आहे व कंडु, किटिभकुष्ठ, घाम, दुर्गंध, विष, कंठरोग, कुष्ठ यांचा नाश करिते.

## कलिकारी-कळलावी (खड्यानाग).

कलिकारीसरातिक्ताकटुकोष्णाचपिच्छला।।तीक्ष्णोष्णातुवरालघ्वीकफ
वातकृमीन्हरेत् ।।बस्तिशूलंविषंचार्शःकुष्ठंकंडूंव्रणंतथा।। शोथंशोषंचशूलंच
नाशयेदितिकीर्तिता ।। शुष्कगर्भंचगर्भंचपातयेदितिकीर्तिता ।।

**अर्थ**— कलिकारी- कळलावी- खड्यानाग सारक, कडु, तिखट, खारट, पित्तकर, तीक्ष्ण, उष्ण, तुरट, लघु आहे व कफ, वायु, कृमि, बस्तिशूल, विष, आणि कुष्ठ, अर्श, कंडु, व्रण, सूज, शोष, शूल, शुष्कगर्भ व गर्भ यांचा नाश करिते.

## कसई-काश-कसाड.

काशस्तुतर्पणःशीतोगौल्योरुचिकरोमतः ।। बलकृन्मधुरोवृष्यस्तिक्तःका
केमधुःस्मृतः ।। सरःस्निग्धोपित्तदाहमूत्रकृच्छ्रक्षयापहः ।। मूत्राश्मरीरक्त
दोषंरक्तपित्तंक्षतक्षयं ।। पित्तरोगंनाशयतीत्येवंपूर्वैर्निवेदितः ।।

अर्थ—कमई—काश—कसाड तर्पण, शीत, गौल्य, रुचिकर, बलकारक, मधुर, वृष्य, कडू, पाककाळीं मधुर, सारक, स्निग्ध असा आहे व पित्त, दाह, मूत्रकृच्छ्र, क्षय, मूत्राश्मरी, रक्तदोष, रक्तपित्त, क्षतक्षय, पित्तरोग यांचा नाशक आहे.

## कमळसाधारण-पोसराचें फूल-सूर्यविकासी.

कमलंशीतलंस्वादुसुगंधिभ्रांतितापहं ॥ वर्ण्यंतृप्तिकरंचैवरक्तपि त्तश्रमापहं ॥ कफंपित्तंतृषांदाहंविस्फोटंरक्तदोषकं ॥ विसर्पंचवि षंचैवनाशयेदितिकीर्तितं ॥

अर्थ— कमळसाधारण—पोसराचें फूल—सूर्यविकासी शीतळ, स्वादु, सुगंधि, भ्रांति-हारक, तापनाशक, वर्णकर, तृप्तिकर, असें आहे व रक्तपित्त, श्रम, कफ, पित्त, तृषा, दाह, विस्फोट, रक्तदोष, विसर्प आणि विष यांचा नाश करितें.

## श्वेतकमळ (पांढरे पोसराचें फूल).

श्वेतंतुकमलंशीतंस्वादुतिक्तंकषायकं ॥ मधुरंवर्णकृन्नेत्र्यंरक्तदो षतृषाहरं ॥ कफंपित्तश्रमंदाहंतृष्णांशोषंव्रणंज्वरं ॥ सर्वंविस्फोट कंचैवनाशयेदितिकीर्तितं ॥

अर्थ— श्वेतकमळ—पांढरे पोसराचें फूल शीतळ, स्वादु, कडू, तुरट, मधुर, वर्णकर, नेत्र्य असें आहे व रक्तदोष, तृषा, कफ, पित्त, श्रम, दाह, तृष्णा, शोष, व्रण, ज्वर, संपूर्ण विस्फोट यांचा नाश करितें.

## नीलकमल (निळें कमळ).

नीलोत्पलंस्वादुशीतंसुगंधिरुचिकारकं ॥
रसायनंकेशहितंपित्तनाशकरंमतं ॥

अर्थ— नीलकमल—निळें कमळ स्वादु, शीत, सुगंधि, रुचिकर, रसायन, केशांत हितावह आणि पित्तनाशक आहे.

## स्वर्णकमल (सोनकमळ).

सुवर्णकमलंशीतंमधुरंवर्णकारकं ॥ कफपित्ततृषादाहरक्तदोषवि सर्पकान् ॥ विषविस्फोटकादींश्चनाशयेदितिकीर्तितं ॥

अर्थ– स्वर्णकमल–सोनकमळ शीत, मधुर, वर्णकारक आहे व कफ, पित्त, तृषा, दाह, रक्तदोष, विसर्प, विस्फोट इत्यादिकांचा नाश करितें.

## कल्हार-सौगंधिक-श्वेतरक्तमिश्रवर्ण कमळ.

कल्हारंग्राहिविष्टंभिचातिशीतंतथामतं ॥
गुरुरूक्षंसमुद्दिष्टंऋषिभिश्चरकादिभिः ॥

अर्थ– कल्हार–सौगंधिक–श्वेतरक्तमिश्रवर्ण कमळ ग्राहक, विष्टंभकर, अतिशीतळ, गुरु, रूक्ष असें आहे.

## कमलिनी-पद्मिनी-सूर्यप्रिया.

पद्मिनीमधुराशीतातिक्ताचतुवरागुरुः ॥ वातस्तंभकरीरूक्षास्तनदार्ढ्यकरीमता ॥ कफपित्तरक्तरुजंविषंशोषवांतिकृमीन् ॥ संतापं मूत्रकृच्छ्रंचनाशयेदितिकीर्तिता ॥

अर्थ– कमलिनी–पद्मिनी–सूर्यप्रिया मधुर, शीत कडू, तुरट, गुरु, वातस्तंभक, रूक्ष, स्तनदार्ढ्यकारक आहे व कफ, पित्त, रक्तदोष, विष, शोष, वांति, कृमि, संताप, मूत्रकृच्छ्र यांचा नाश करिते.

## कमळाक्ष-कमळबीज-कमळकांकडी.

कमलाक्षःस्वादुरुच्योपाचनःकटुकःस्मृतः ॥ शीतलस्तुवरस्तिक्तोगुरुर्विष्टंभकारकः ॥ गर्भस्थितिकरोरूक्षोवृष्योवातकरोमतः ॥ कफकृल्लेखनो ग्राहीबल्यःपित्तविनाशकः ॥ रक्तरुग्वमिदाहास्रपित्तनाशकरोमतः ॥

अर्थ– कमळाक्ष–कमळबीज–कमलकांकडी स्वादु, रुच्य, पाचन, तिखट, शीतल, तुरट, कडू, गुरु, मलस्तंभक, गर्भस्थापक, रूक्ष, वृष्य, वातकारक, कफकारक, लेखन, ग्राही, बलकर, आहे व पित्त, रक्तदोष, वांति, दाह, आणि रक्तपित्त यांचा नाश करिते.

## कमलनाल-भिशीं-बिसीं.

बिसंचतुवरंशीतंवृष्यंतिक्तंगुरुस्मृतं ॥ संग्राहिदुर्जरंपाकेस्वादुरूक्षं

मधुस्मृतं ॥ कफानिलस्तन्यदातृपित्तदाहवमीहरं ॥ मूत्रकृच्छ्ररक्त रुजंनाशयेदितिचस्मृतं ॥

**अर्थ–** कमलनाल- भिशीं–बिसीं तुरट, शीतळ, वृष्य, कडू, गुरु, संग्राही, दुर्जर, पाककाळीं स्वादु, रूक्ष, मधुर, कफकर, वातकर, स्तन्यदायक आहे. व पित्त, दाह, वांति, मूत्रकृच्छ्र आणि रक्तदोष यांचा नाश करितात.

## कमलकंद.

शालूकःकटुकश्चोक्तस्तुवरोमधुरोगुरुः ॥ मलस्तंभकरोरुक्षोने त्र्योवृष्यश्चशीतलः ॥ दुर्जरोग्राहकोरक्तपित्तंदाहंतृषांकफं ॥ पित्त वातंचगुल्मंचपित्तंकासंकृमींस्तथा ॥ मुखरोगंरक्तदोषंनाशयेदि तिचस्मृतः ॥

**अर्थ–** कमलकंद तिखट, तुरट, मधुर, गुरु, मलस्तंभक, रूक्ष, नेत्रांला हितावह, वृष्य, शीतळ, दुर्जर, ग्राहक असा आहे व रक्तपित्त, दाह, तृषा, कफ, पित्तवायु, गुल्म, पित्त, खोकला, कृमि, मुखरोग, रक्तदोष यांचा नाश करितो.

## कमलकेसर-किंजल्क.

किंजल्कःशीतलोग्राहीकांतिदस्तुवरोमधुः ॥ कटूरुक्षोरुचिकरोगर्भ स्थैर्यकरोमतः ॥ व्रणंपित्तंतृषांदाहंमुखरोगंक्षयंकफं ॥ विषंरक्ता र्शसंशोषंज्वरवातंचनाशयेत् ॥

**अर्थ–** कमलकेशर–किंजल्क शीतळ, ग्राहक, कांतिद, तुरट, मधुर, तिखट, रूक्ष, रुचिकर, गर्भस्थैर्यकारक असा आहे व व्रण, पित्त, तृषा, दाह, मुखरोग, क्षय, कफ, विष, रक्तार्श, शोष, ज्वर आणि वायु यांचा नाश करितो.

## सामान्य उत्पल (लघुकमळ).

सामान्यनोत्पलंशीतंस्वादुदाहहरंमतं ॥
रक्तदोषंश्रमंवांतिंभ्रांतिंजूर्तिंकृमीन्जयेत् ॥

**अर्थ–** सामान्य उत्पल–लघुकमल शीतळ, स्वादु, दाहहारक असें आहे व रक्तदोष, श्रम, वांति, भ्रांति, ज्वर आणि कृमि यांचा नाश करितें.

## श्वेतोत्पल (पांढरें लघुकमळ).

पुंडरीकंस्वादुशीतंतिक्तंरक्तरुजापहं ॥
कफंदाहंश्रमंपित्तंनाशयेदितिकीर्तितं ॥

अर्थ– श्वेतोत्पल– पांढरें लघुकमळ स्वादु, शीतळ, कडू, आहे व रक्तरोग, कफ, दाह श्रम, पित्त यांचा नाश करितें.

## रक्तोत्पल (तांबडें लघुकमळ).

कोकनदमुक्तंमधुरंशीतंवर्ण्यंकटुस्तिक्तं ॥ वृष्यंतृप्तेःकरणंविस्फोटकरक्तदोषदाहहरं ॥ तृट्कफपित्तविसर्पविषसंतापवातनाशकरं ॥

अर्थ– रक्तोत्पल- तांबडें लघुकमळ मधुर, शीतल, वर्णकारक, तिखट, कडू, वृष्य, तृप्तिकर आहे. व विस्फोटक, रक्तदोष, दाह, तृषा, कफ, पित्त विसर्प, विष, संताप आणि वायु यांचा नाश करितें.

## नीलोत्पल (निळें लघुकमळ).

नीलोत्पलमतिस्वादुशीतंसुखकरंमतं ॥
पाकेतिक्तंचसुरभिरक्तपित्तस्यनाशकं ॥

अर्थ– नीलोत्पल- निळें लघुकमळ स्वादु, शीतळ, सुखकारक, पाककाळीं कडू, सुरभि आणि रक्तपित्तनाशक असें आहे.

## उत्पलिनी (लघुकमलिनी.)

उत्पलिन्युच्यतेशीतातिक्तारक्तविकारहा ॥
पित्तसंतापश्रमतृट्कफकासवमीहरा ॥

अर्थ– उत्पलिनी– लघुकमलिनी शीत व कडू आहे. आणि रक्तविकार, पित्त, संताप, श्रम, तृषा, कफ, खोकला व वांति यांचा नाश करिते.

## कुमुद (चंद्रविकासि.)

कुमुदंमधुरंस्निग्धंकफकृच्छीतलंमतं ॥ आल्हादिउक्तंबीजंतुवात
लंहर्षकारकं ॥ रक्तपित्तातिसारघ्नंपूर्ववैद्यैरुदीरितं ॥

अर्थ– कुमुद– चंद्रविकासि मधुर, स्निग्ध, कफकर, शीतळ, आल्हादकारक आहे. याचें बीज वातल, हर्षकारक आहे. व रक्तपित्त, अतिसार यांचा नाश करितें.

## कुमुदिनी (चंद्रप्रिया).

कमलिन्यागुणायेतेकुमुदिन्यापितेस्मृताः ॥

अर्थ –कुमुदिनी- चंद्रप्रिया. हिचे गुण कमलिनीसारिखेच आहेत.

## स्थलकमल.

स्थलजंकमलंतिक्तंसुगंधिर्मोहनाशकं ॥
अपस्मारहरंज्ञेयागुणान्येस्थलजाइव ॥

अर्थ –स्थलकमल कडू, सुगंधि, मोहनाशक, व अपस्मारहारक आहे, वरकड गुण स्थलकमलिनीसारिखे आहेत.

## स्थलकमलिनी (पद्मचारिणी).

शीतातिक्ताचतुवरास्तनदार्ढ्यकरीमता ॥ लघ्वीकटूवीर्चाविज्ञेयाकफपित्त
स्यनाशिनी ॥ मूत्राश्मरीमूत्रकृच्छ्रवातशूलातिसारहा ॥ वांतिदाहंमोहमेहौ
रक्तरुक्श्वासहामता ॥ अपस्मारविषंकासंनाशयेत्पद्मचारिणी ॥

अर्थ – स्थलकमलिनी- पद्मचारिणी शीतल, कडू, तुरट, स्तनांला घट्ट करणारी लघु, तिखट अशी आहे व कफ, पित्त, मूत्राश्मरी, मूत्रकृच्छ्र, वायु, शूल, अतिसार, वांति, दाह, मोह, मेह, रक्तविकार, दमा, फेंपरें, विष, आणि खोकला यांचा नाश करिते.

## कमालनाचीं पानें.

कमलिन्याश्छदःशीतस्तुवरोमधुरोमतः ॥ तिक्तःपाकेतिकटुकोल्लघु
र्वैग्राहकोमतः ॥ वातकृत्कफपित्तानांनाशकोमुनिभिःस्मृतः ॥

**अर्थ**—कमलिनीचीं पानें शीतळ, तुरट, मधुर, कडू, पाककाळीं तिखट, लघु, ग्राहक, वातकर, असीं आहेत व कफ, पित्त यांचा नाश करितात.

## संवर्तिका (कमळाच्या पाकळ्या.)

संवर्तिकातुवराविक्ताशीतातृग्राहरा ॥
दाहार्शमूत्रकृच्छ्राणिरक्तपित्तंचनाशयेत् ॥

**अर्थ**— संवर्तिका- कमळाच्या पाकळ्या तुरट, कडू, शीतळ, अशा आहेत व ताहान, दाह, अर्श, मूत्रकृच्छ्र, आणि रक्तपित्त यांचा नाश करितात.

## कमळकर्णिका- बीजकोश (कमळाची ढापणी).

बीजकोशस्तुमधुरस्तुवरःशीतलोलघुः ॥ तिक्तोमुखस्वच्छकारी
रक्तदोषतृग्राहरः ॥ कफपित्तेनाशयतीत्येवमुक्तंमनीषिभिः ॥

**अर्थ**— कमळकर्णिका- बीजकोश- म्हणजे कमळाची ढापणी मधुर, तुरट, शीतळ, लघु, कडू, मुखस्वच्छकारक आहे. व रक्तदोष, ताहान, कफ, पित्त यांचा नाश करिते.

## वनोत्पल (लहान रक्तवर्ण वनकमळ असतें तें).

वनोत्पलंत्रिदोषघ्नंनेत्ररोगहरंपरं ॥ बुद्धिमांद्यंभ्रमंदाहंपित्तंसं
ग्रहणींतथा ॥ कुष्ठंज्वरंनाशयतीत्येवमुक्तंमनीषिभिः ॥

**अर्थ**—वनोत्पल- लहान रक्तवर्ण वनकमळ त्रिदोष, नेत्ररोग, बुद्धिमांद्य, भ्रम, दाह, पित्त, संग्रहणी, कुष्ठ, आणि ज्वर यांचा नाश करितें.

## कर्णिकार (वृक्षकमल).

कर्णिकारःकटुस्तिक्तःशोधकस्तुवरोलघुः ॥ संजनःसुंदरःशोथ
कफरक्तरुजांहरः ॥ कुष्ठव्रणौनाशयतीत्येवमुक्तंमनीषिभिः ॥

**अर्थ**—कर्णिकार— वृक्षकमल तिखट, कडू, शोधक, तुरट, लघु, संजनन, सुंदर आहे व सूज, कफ, रक्तदोष, कुष्ठ आणि व्रण यांचा नाश करितें.

## कदंब (कळंबाचें झाड).

कदंबःकटुकस्तिक्तोमधुरस्तुवरःपटुः ॥ शुक्रवृद्धिकरःशीतोगुर्विष्टंभकारकः ॥ रुक्षःस्तन्यप्रदोग्राहीवर्णकृद्योनिदोषहा ॥ रक्तरुग्मूत्रकृच्छ्रंचवातंपित्तंकफंव्रणं ॥ दाहंविषंनाशयतिह्यंकुराश्चास्यतुवराः ॥ शीतवीर्यादीपकाश्चलघवोरोचकापहाः ॥ रक्तपित्तातिसारघ्नाःफलंरुच्यंगुरुस्मृतं ॥ उष्णवीर्यंकफकरंतत्पक्वंकफपित्तकृत् ॥ वातनाशकरंप्रोक्तंऋषिभिस्तत्वदर्शिभिः ॥

**अर्थ**—कदंब- कळंबाचें झाड तिखट, कडू, मधुर, तुरट, खारट, शुक्रवर्धक, शीतळ, गुरु, विष्टंभकारक, रुक्ष, स्तन्यप्रद, ग्राहक, वर्णकर असें आहे, व रक्तरोग, मूत्रकृच्छ्र, वायु, पित्त, कफ, व्रण, दाह, विष यांचा नाश करितें, याचे अंकुर तुरट, शीतवीर्य, दीपक, लघु आहेत व अरुचि, रक्तपित्त, अतिसार यांचा नाश करितें. याचें फळ रुचिकर, गुरु, उष्णवीर्य, कफकारक, आहे. तेंच पिकलें असतां कफ, पित्त, यांना वाढवितें. व वात नाश करितें.

## कदंबिका (कळंबीचें झाड).

कदंबिकातुमधुराशीतलातुवरागुरुः ॥ मलस्तंभकरीक्षारारुक्षास्तन्यकफप्रदा ॥ वातलामुनिभिःप्रोक्ताफलंतस्यास्तुशीतलं ॥ तुवरंमधुरंपित्तरक्तदोषहरंमतं ॥

**अर्थ**—कदंबिका—कळंबीचें झाड मधुर, शीतळ, तुरट, गुरु, मलस्तंभक, खारट, रुक्ष, स्तन्यकारक, कफकर, वातल अशी आहे, हिचें फळ, शीतळ, तुरट, मधुर, पित्तनाशक व रक्तहारक असें आहे.

## धाराकदंब.

धाराकदंबकस्तिक्तोवर्ण्यःशीतःकषायकः ॥ कटुकोवीर्यकृच्छोथविषपित्तकफव्रणान् ॥ वातंनाशयतीत्येवमुक्तंचऋषिभिःकिल ॥

**अर्थ**—धाराकदंब कडू, वर्णकर, शीत, तुरट, तिखट, वीर्यकारक असा आहे सूज, विष, पित्त, कफ, व्रण, आणि वायु यांचा नाश करितो.

## राजकदंब (नीप).

नीपस्तुचाम्लस्तुवरोमधुरःशीतलःस्मृतः ॥ विषंरक्तरुजंपित्तंकफं
चैवविनाशयेत् ॥ फलंतुमधुरंचास्यशीतलंगुरुपित्तहृत् ॥ रक्त
दोषहरंप्रोक्तंऋषिभिस्तत्त्वदर्शिभिः ॥

**अर्थ**—राजकदंब—नीप आंवट, तुरट, मधुर, शीतळ, आहे व विष, रक्तविकार, पित्त, कफ यांचा नाश करितो. याचें फळ मधुर, शीतळ, गुरु असें आहे व पित्त, रक्तदोष, यांचा नाश करितें.

## भूमिकदंब.

भूमेःकदंबकस्तिक्तोवर्ण्यःशीतःकटुःस्मृतः ॥ वीर्यवृद्धिकरश्चैवतुव
रोविषशोथहा ॥ पित्तंकृमींश्चसर्वांश्चमेहान्नाशयतीरितं ॥

**अर्थ**—भूमिकदंब कडू, वर्णकारक, शीतळ, तिखट, वीर्यवर्धक, तुरट असा आहे व विष, सूज, पित्त, कृमि, आणि संपूर्ण मेह यांचा नाश करितो.

## धूलिकदंब.

धूलीकदंबकस्तिक्तःस्तुवरःकटुकोहिमः॥वीर्यवृद्धिकरोवर्ण्योविषशो
थविनाशकः ॥ वातंपित्तंकफंरक्तदोषंचैवविनाशयेत् ॥

**अर्थ**—धूलीकदंब कडू, तुरट, तिखट, हिम, वीर्यवर्धक, वर्ण्य असा आहे व विष' सूज, वायु, पित्त, कफ, आणि रक्तदोष यांचा नाश करितो.

## कदली (केळ).

कदलीशीतलागुर्वीवृष्यास्निग्धामधुःस्मृता॥ पित्तंरक्तविकारंचयो
निदोषंतथाश्मरीं ॥ रक्तपित्तंनाशयतीत्येवमाचार्यभाषितं ॥

**अर्थ**—कदली—केळ शीतळ, गुरु, वृष्य, स्निग्ध, मधुर आहे व पित्त, रक्तविकार, योनिदोष, अश्मरी, रक्तपित्त यांचा नाश करितें.

## कोंवळें केळें.

कोमलंकदलंशीतंमधुरंचकषायकं ॥
रुच्यमम्लंसमुद्दिष्टंपित्तनाशकरंचतत् ॥

अर्थ— कोंवळें केळें शीत, मधुर, कषाय, रुच्य, आंबट, आणि पित्तनाशक असें आहे.

## मध्यम केळें.

मध्यमंकदलंकिंचित्तुवरंमधुरंगुरु ॥
अग्निमांद्यकरंचैवऋषिभिःपरिकीर्तितं ॥

अर्थ— मध्यम जून केळें किंचित तुरट, मधुर, गुरु, आणि अग्निमांद्य करणारें असें आहे.

## जून केळें.

अपक्वंकदलंचैवमलस्तंभकरंमतं ॥ तिक्तंकषायंरुक्षंचरक्तपित्त
तृषाहरं ॥ मेहाक्षिरोगरक्तातिसारज्वरविनाशकृत् ॥

अर्थ — जून केळें मलस्तंभक, कडू, तुरट, रुक्ष, व रक्तपित्त, तहान, मेह, नेत्ररोग, रक्तातिसार, ज्वर यांचा नाश करितें.

## पिकलेलें केळें.

पक्वंतुकदलंबल्यंतुवरंमधुरंगुरु ॥ शीतंवृष्यंशुक्रवृद्धिकरंसंतर्पणंमतं ॥
मांसकांत्यरुचीनांचवर्धनंदुर्जरंमतं ॥ कफकृत्चतृषाग्लानिपित्तरक्तरुज
स्तथा ॥ मेहक्षुधानेत्ररोगनाशकंपरमंमतं ॥ मंदाग्नीनांविकृतिदंऋषिभिः
परिकीर्तितं ॥

अर्थ —पिकलेलें केळें बलकर, तुरट, मधुर, गुरु, शीत, वृष्य, शुक्रवर्धक, संतर्पण, मांस, कांति, अरुचि यांना वाढविणारें, दुर्जर, कफकारक, असें आहे व तृषा, ग्लानि, पित्त, रक्तविकार, मेह, क्षुधा, नेत्ररोग यांचा नाश करितें, आणि मंदाग्नि पुरुषानें भक्षिलेलें केळें असतां विकार करितें.

## सामान्य केळें.

सामान्यंकदलंप्रोक्तंकफकृन्मधुरंगुरु ॥ स्निग्धंविष्टंभिवृष्यं चरुच्यंकिंचिच्चशीतलं ॥ रक्तपित्तंचपित्तंचतृषांदाहंक्षतक्षयं ॥ वातंचनाशयत्येववल्कंतिक्तंलघुःकटुः ॥

अर्थ– सामान्य केळें कफकर, मधुर, जड, स्निग्ध, मलस्तंभक, वृष्य, रुचिकर, किंचित् शीतळ, असें आहे व रक्तपित्त, पित्त, तृषा, दाह, क्षतक्षय, आणि वायु यांचा नाश करितें, त्याची साल कडु, लघु, व तिखट अशी आहे.

## केळफूल.

पुष्पंकदल्याःसुस्निग्धंमधुरंतुवरंगुरु ॥ ग्राहीतिक्तंचाग्निदीप्तिकरंवातविनाशनं ॥ किंचिदुष्णंचवीर्यैस्याद्रक्तपित्तंक्षयं कृमीन् ॥ पित्तंकफंनाशयतीत्येवंचऋषिभिर्मतं ॥

अर्थ– केळफूल स्निग्ध, मधुर, तुरट, गुरु, ग्राहक, कडु, अग्निदीपक, वातनाशक, किंचिदुष्णवीर्य असें आहे. व रक्तपित्त, क्षय, कृमि, पित्त, कफ यांचा नाश करितें.

## कदलीसार (कालें).

सारंकदल्याःसंग्राहीचाप्रियंगुरुशीतलं ॥ तृड्दाहमूत्रकृच्छ्रातिसारमेहांश्चसोमकं ॥ अस्थिस्रावंरक्तपित्तंविस्फोटांश्चैवनाशयेत् ॥

अर्थ– कदलीसार- कालें ग्राहक, अप्रिय, गुरु, शीत असें आहे, व तृषा, दाह, मूत्रकृच्छ्र, अतिसार, सोमरोग, अस्थिस्राव, रक्तपित्त, आणि विस्फोट यांचा नाश करितें.

## कदलीकंद.

कंदःकदल्यारुक्षःस्याद्वातलस्तुवरोगुरुः ॥ शीतोबल्योमधुःकेश्योरुच्योग्निमांद्यकारकः ॥ कर्णशूलंचाम्लपित्तंदाहंरक्तरुजंतथा ॥ सोमदोषंरजोदोषंकृमीन्कुष्टंचनाशयेत् ॥

अर्थ– कदलीकंद रुक्ष, वातल, तुरट, गुरु, शीत, बलकर, मधुर, केश्य, रुच्य, अ-

ग्निमांद्यकर, आहे, व कर्णशूल, आम्लपित्त, दाह, रक्तदोष, सोमरोग, रजोदोष कृमि, आणि कुष्ट यांचा नाश करितो.

## केळीचें पाणी.

कदल्यास्तुजलंशीतंग्राहकंमूत्रकृच्छ्रहृत् ॥ मेहंतृषांकर्णरो
गंचातिसारंचनाशयेत् ॥ अस्थिस्रावंरक्तपित्तंविस्फोटंरक्त
दोषकं ॥ योनिदोषंचदाहंचनाशयेदितिकीर्तितं ॥

अर्थ— केळीचें पाणी शीतळ व ग्राहक, आहे, आणि मूत्रकृच्छ्र, मेह, तृषा, कर्णरोग, अतिसार, अस्थिस्राव, रक्तपित्त, विस्फोट, रक्तदोष, योनिदोष, आणि दाह यांचा नाश करितें.

## वनकदली (रानकेळ).

अरण्यकदलीशीतामधुराबलवर्धिनी ॥ वीर्यवृद्धिकरीरु
च्यादुर्जराचगुरुःस्मृता ॥ तृट्दाहशोषपित्तानांनाशिनीप्रप्र
कीर्तिता ॥ फलंतुतुवरंचास्यामधुरंचगुरुस्मृतं ॥

अर्थ— वनकदली- रानकेळ शीतळ, मधुर, बलवर्धक, वीर्यवर्धक, रुच्य, दुर्जर, जड, अशी आहे, आणि तृषा, दाह, शोष, पित्त यांचा नाश करिते. हिचें फळ तुरट, मधुर, आणि गुरु, असें आहे.

## काष्ठकदली (लोखंडीकेळ).

काष्टस्यकदलीग्राहीहृद्यारुच्याचशीतला ॥ अग्निमांद्यकरी
गुर्वीदुर्जराचातिमाधुरी ॥ तृट्दाहमूत्रकृच्छ्राणांरक्तपित्तस्य
नाशिनी ॥ विस्फोटंचास्थिरोगंचनाशयेदितिकीर्तिता ॥

अर्थ— काष्ठकदली- लोखंडीकेळ ग्राहक, हृद्य, रुच्य, शीतल, अग्निमांद्यकारक, जड, दुर्जर, अतिमधुर, अशी आहे. व तृषा, दाह, मूत्रकृच्छ्र, रक्तपित्त, विस्फोट, आणि अस्थिरोग यांचा नाश करिते.

## सुवर्णकदली (सोनकेळ-मुठळीकेळ).

सुवर्णकदलीशीतामधुराचाग्निदीपनी ॥
बल्यावृष्याचगुर्वीचतृट्दाहकफनाशिनी ॥

अर्थ– सुवर्णकदली–सोनकेळ शीतळ, मधुर, अग्निदीपक, बलकर, वृष्य, गुरु [आ]हे. व तृषा, दाह, आणि कफ यांचा नाश करिते.

## महेंद्रकदली (ब्रह्मशीकेळ).

महेंद्रकदलीचोष्णावातघ्यचविनाशिनी ॥
प्रदरंपित्तरोगंचनाशयेदितिकीर्तिना ॥

अर्थ– महेंद्रकदली–ब्रह्मशीकेळ उष्ण, आहे व वायु, प्रदर, पित्तरोग, यांचा [न]ाश करिते.

## कृष्णकदली (काळी केळ).

कृष्णानुकदलीरुच्यानुवरामधुरालघु ॥
वातोर्धातोर्वृद्धिकरीमेहपित्ततृषाहरा ॥

अर्थ– कृष्णकदली– काळी केळ रुचिकर, तुरट, मधुर, लघु, वातकर, धातुवर्धक [अ]शी आहे. व मेह, पित्त, आणि तृषा यांचा नाश करिते.

## कटभी (मोठी श्वेतकिन्ही).

कटभीकटुकाचोष्णानुवरानिक्तकामना ॥ नाडीव्रणंरक्तरुजंप्रमेहंचविषं क्रमीन् ॥ श्वेतकुष्ठंकफंचैवत्रिदोषंचव्रणंनथा ॥ शिरोरोगमजीर्णंचनाश येदितिकीर्तिना ॥ फलंचास्याधातुवृद्धिकरंचकफवर्धकं ॥ निर्यासोस्या गुरुर्वृष्योबल्योवातविनाशकः ॥

अर्थ– कटभी–मोठी श्वेतकिन्ही तिखट, उष्ण, तुरट, कडू अशी आहे व नाडीव्रण, [र]क्तदोष, प्रमेह, विष, कृमि, श्वेतकुष्ठ, कफ, त्रिदोष, व्रण, शिरोरोग आणि अजीर्ण यांचा [न]ाश करिते. हिचें फळ धातु व कफ यांना वाढविणारें आहे. हिचा चीक गुरु, वृष्य, [ब]ल्य आणि वातनाशक आहे.

## क्षुद्रकटभी (लघु श्वेतकिन्ही).

क्षुद्राचकटभीचोष्णाकटुकाकुष्ठहामना ॥ कफहारक्तदोषघ्नीमेद

ग्निमांद्यकर, आहे, व कर्णशूल, आम्लपित्त, दाह, रक्तदोष, सोमरोग, रजोदोष, कृमि, आणि कुष्ट यांचा नाश करितो.

## केळीचें पाणी.

कदल्यास्तुजलंशीतंग्राहकंमूत्रकृच्छ्रहृत् ॥ मेहंतृषांकर्णरोगंचातिसारंचनाशयेत् ॥ अस्थिस्रावंरक्तपित्तंविस्फोटंरक्तदोषकं ॥ योनिदोषंचदाहंचनाशयेदितिकीर्तितं ॥

**अर्थ**— केळीचें पाणी शीतळ व ग्राहक, आहे, आणि मूत्रकृच्छ्र, मेह, तृषा, कर्णरोग, अतिसार, अस्थिस्राव, रक्तपित्त, विस्फोट, रक्तदोष, योनिदोष, आणि दाह यांचा नाश करितें.

## वनकदली (रानकेळ).

अरण्यकदलीशीतामधुराबलवर्धिनी ॥ वीर्यवृद्धिकरीरुच्यादुर्जराचगुरुःस्मृता ॥ तृड्दाहशोषपित्तानांनाशिनीसंप्रकीर्तिता ॥ फलंतुतुवरंचास्यामधुरंचगुरुस्मृतं ॥

**अर्थ**— वनकदली- रानकेळ शीतळ, मधुर, बलवर्धक, वीर्यवर्धक, रुच्य, दुर्जर, जड, अशी आहे, आणि तृषा, दाह, शोष, पित्त यांचा नाश करिते. हिचें फळ तुरट, मधुर, आणि गुरु, असें आहे.

## काष्ठकदली (लोखंडीकेळ).

काष्टस्यकदलीग्राहीहृद्यारुच्याचशीतला ॥ अग्निमांद्यकरीगुर्वीदुर्जराचातिमाधुरी ॥ तृट्दाहमूत्रकृच्छ्राणांरक्तपित्तस्यनाशिनी ॥ विस्फोटंचास्थिरोगंचनाशयेदितिकीर्तिता ॥

**अर्थ**— काष्ठकदली- लोखंडीकेळ ग्राहक, हृद्य, रुच्य, शीतल, अग्निमांद्यकारक, जड, दुर्जर, अतिमधुर, अशी आहे. व तृषा, दाह, मूत्रकृच्छ्र, रक्तपित्त, विस्फोट आणि अस्थिरोग यांचा नाश करिते.

## सुवर्णकदली (सोनकेळ-मुटळीकेळ).

सुवर्णकदलीशीतामधुराचाग्निदीपनी ॥
बल्यावृष्याचगुर्वीचतृट्दाहकफनाशिनी ॥

अर्थ– सुवर्णकदली–सोनकेळ शीतळ, मधुर, अग्निदीपक, बलकर, वृष्य, गुरु आहे. व तृषा, दाह, आणि कफ यांचा नाश करिते.

## महेंद्रकदली (म्हशीकेळ).

महेंद्रकदलीचोष्णावातक्षयचविनाशिनी ॥
प्रदरंपित्तरोगंचनाशयेदितिकीर्तिना ॥

अर्थ– महेंद्रकदली–म्हशीकेळ उष्ण, आहे व वायु, प्रदर, पित्तरोग, यांचा नाश करिते.

## कृष्णकदली (काळी केळ).

कृष्णातुकदलीरुच्यातुवरामधुरालघु ॥
वातोधातोर्वृद्धिकरीमेहपित्ततृषाहरा ॥

अर्थ– कृष्णकदली– काळी केळ रुचिकर, तुरट, मधुर, लघु, वातकर, धातुवर्धक अशी आहे. व मेह, पित्त, आणि तृषा यांचा नाश करिते.

## कटभी मोठी श्वेतकिन्ही).

कटभीकटुकाचोष्णातुवरातिक्तकामता ॥ नाडीव्रणंरक्तरुजंप्रमेहंचविषं क्रमीन् ॥ श्वेतकुष्ठंकफंचैवत्रिदोषंचव्रणंतथा ॥ शिरोरोगमजीर्णंचनाश येदितिकीर्तिता ॥ फलंचास्याधातुवृद्धिकरंचकफवर्धकं ॥ निर्यासोस्या गुरुर्वृष्योबल्योवातविनाशकः ॥

अर्थ– कटभी–मोठी श्वेतकिन्ही तिखट, उष्ण, तुरट, कडू अशी आहे व नाडीव्रण, रक्तदोष, प्रमेह, विष, कृमि, श्वेतकुष्ठ, कफ, त्रिदोष, व्रण, शिरोरोग आणि अजीर्ण यांचा नाश करिते. हिचें फळ धातु व कफ यांना वाढविणारें आहे. हिचा चीक गुरु, वृष्य, बल्य आणि वातनाशक आहे.

## क्षुद्रकटभी (लघु श्वेतकिन्ही).

क्षुद्राचकटभीचोष्णाकटुकाकुष्ठहामता ॥ कफहारक्तदोषघ्नीमेद

रोगहरापरा ॥ नाडीव्रणंविषंमेहंक्रमींश्चैवविनाशयेत् ॥ कटभी वत्फलगुणाज्ञेयाविद्वज्जनैःसदा ॥

अर्थ– क्षुद्रकटभी– लघु श्वेतकिन्ही उष्ण, तिखट आहे आणि कुष्ट, कफ, रक्तदोष, मेदोरोग, नाडीव्रण, विष, मेह आणि कृमि यांचा नाश करिते. हिच्या फळाचे गुण कटभीसारिखेच आहेत.

## कृष्णकटभी (काळी किन्ही).

कृष्णानुकटभीचोष्णाकटुकागुल्मनाशिनी ॥
आध्मानशूलशमनीगुणाश्चान्येतुपूर्ववत् ॥

अर्थ– कृष्णकटभी–काळी किन्ही उष्ण व तिखट आहे. आणि गुल्म, आध्मानशूल यांचा नाश करिते. वरकड गुण कटभीसारिखेच आहेत.

## कालिंगड-कालिंगण (टरबूज).

कालिंगंशीतलंबल्यंमधुरंतृप्तिकारकं ॥ गुरुपुष्टिकरंज्ञेयंमलस्तंभकरंत था ॥ कफकृत्दृष्टिपित्तंचशुक्रधातोश्चनाशकं ॥ तत्पक्कंपित्तलंक्षारंचोष्णं वातकफप्रणुत् ॥ पर्णंतिक्तंरक्तवृद्धिकरंचैवप्रकाशितं ॥

अर्थ– कालिंगड–कालिंगण–टरबूज शीतळ, बलकर, मधुर, तृप्तिकर, गुरु, पुष्टिकर, मलस्तंभक, कफकर व दृष्टि, पित्त आणि शुक्रधातु यांचा नाश करितें. तें पिकलेले खारट, उष्ण आहे व वायु, कफ यांचा नाश करितें. याचें पान कडू आणि रक्तवृद्धिकारक असें आहे.

## कपित्थवृक्ष (कंवठीचें झाड).

कपित्थंमधुरंचाम्लंतुवरंग्राहिशीतलं ॥ वृष्यंतिक्तंपित्तवातव्रणनाशकरं मतं ॥ फलमामंकपित्थस्यग्राहिचोष्णंचरुक्षकं ॥ लघ्वम्लंतुवरंचैवलेख नंवातपित्तकृत् ॥ जिह्वाजाड्यकरंरुच्यंविषस्वरकफप्रणुत् ॥ तत्पक्कं रुचिदंचाम्लंकषायंग्राहिमाधुरं ॥ कंठशुद्धिकरंशीतंगुरुवृष्यंचदुर्जरं ॥ श्वासंक्षयंरक्तरुजंवांतिवातश्रमंतथा ॥ हिध्मानंचविषंग्लानिंतृषांदोषत्रयं तथा ॥ हिक्कांकासंनाशयतिबीजंचहृद्व्यथापहं ॥ श्वासंक्षयथांविषंचैवत्रिस

तंचैवनाशयेत् ॥ बीजतैलंचतुवरंग्राहकंस्वादुपित्तनुत् ॥ आखोर्विषंकफं चैवहिक्कांवांतिंचनाशयेत् ॥ विषनाशकरंपुष्पंपर्णवांत्यतिसारनुत् ॥ हिक्कांनाशयतीत्येवंप्रोक्तंपूर्वैर्महर्षिभिः ॥

अर्थ– कपित्थवृक्ष–कवठाचें झाड मधुर, आंबट, तुरट, ग्राहक, शीतळ, वृष्य, कडु आहे व पित्त, वायु, व्रण यांचा नाश करितें. याचें हिरवें फळ ग्राहि, उष्ण, रुक्ष, लघु, आंबट, तुरट, लेखन व वायु, पित्त, जिव्हाजाड्य यांना करणारें, रुचिकर असें आहे. व विष, स्वर, कफ यांचा नाश करितें. पक्क कवठ रुचिकर, आंबट, तुरट, ग्राहक, मधुर, कंठशुद्धिकर, शीतळ, गुरु, वृष्य, दुर्जर आहे व श्वास, क्षय, रक्तरोग, वांति, वायु, श्रम, हिध्मा, विष, ग्लानि, तृषा, त्रिदोष, उचकी, खोकला यांचा नाश करितें. याचें बीज हृद्रोग, मस्तकशूल, विष, विसर्प यांचा नाश करितें. याचे बियांचें तेल तुरट, ग्राहक, गोड आहे. व पित्त, उंदराचें विष, कफ, उचकी, वांति यांचा नाश करितें. याचें फूल विषनाशक व याचीं पानें वांति, अतिसार आणि उचकी यांचा नाश करितात.

## करमर्दी (करवंद) मोठें व लहान दोन प्रकारचें.

करमर्दफलंचामंतिक्तंचाग्निप्रदीपकं ॥ गुरुपित्तकरंग्राहोचाम्लमुष्णंरुचिप्रदं ॥ रक्तपित्तकफंचैववर्धयेत्तृड्विनाशकं ॥ तत्पक्वंमधुरंरुच्यंलघुशीतंचपित्तहं ॥ रक्तपित्तंत्रिदोषंचविषंवातंचनाशयेत् ॥ तच्छुष्कंपक्वसदृशंगुणैर्ज्ञेयंविचक्षणैः ॥ अत्यम्लस्यगुणाश्चैवज्ञेयामकरवंदवत् ॥

अर्थ– करमर्दी–करवंद मोठें व लहान दोनप्रकारचें. तें हिरवें कडू, अग्निदीपक, गुरु, पित्तकर, ग्राहक, आंबट, उष्ण, रुचिप्रद, रक्तपित्त, कफ, यांना वाढवणारें. व तृषानाशक असें आहे. तें पिकलें असतां मधुर, रुचिकर, लघु, शीतळ, आहे. व पित्त, रक्तपित्त, त्रिदोष, विष, वायु यांचा नाश करितें. शुष्ककरवंदाचे गुण पिकलेल्या करवंदासारिखे आहेत व आंबट करवंदाचे गुण हिरव्या करवंदासारिखे आहेत.

## कर्मार-कर्मराचें झाड (त्याचीं फळें करमरें तीं).

कर्मारस्यफलंचामंग्राह्यम्लंवातनाशकं ॥ उष्णंपित्तकरंचैवतत्पक्वं मधुरंमतं ॥ अम्लंचबलपुष्टीनांरुचेश्चैवतुवर्धकं ॥

अर्थ–कर्मार– कर्मराचें झाड- त्याचीं फळें करमरें तीं हिरवीं असतां ग्राहक, आंबट, वातनाशक, उष्ण व पित्तकारक आहेत तीं पिकलीं असतां मधुर, आंबट, बलकर, पुष्टिकारक आणि रुचिकर अशीं आहेत.

## खर्परी (कलखापरी).

खर्परीकटुकातिक्तानेत्र्याचैवाग्निदीपनी ॥ रसायनीचतुवराबलपुष्टि
करालघुः ॥ लेखनीशीतलाचैवधातूनांचैवद्राविणी ॥ स्वच्छाभेदक
रीक्षारावांतिदाकफपित्तहा ॥ कुष्टज्वरकृमिविषकंडूत्वग्दोषनाशिनी ॥

**अर्थ**— खर्परी— कलखापरी तिखट, कडू, नेत्र्य, अग्निदीपन, रसायन, तुरट, बलकर, पुष्टिकारक, लघु, लेखन, शीतळ, धातूंना पातळ करणारी, स्वच्छ, भेदक, क्षार, वांतिकर अशी आहे व कफ, पित्त, कुष्ट, ज्वर, कृमि, विष, कंडू आणि त्वग्दोष, यांचा नाश करिते.

## कुसुंभ (करडईचें झाड).

कुसुंभोवातलोरुक्षोविदाहीकटुकःस्मृतः ॥
मूत्रकृच्छ्रंकफंरक्तपित्तंचैवविनाशयेत् ॥

**अर्थ**— कुसंभ करडईचें झाड वातल, रूक्ष, विदाही, तिखट, असें आहे व मूत्रकृच्छ्र, कफ आणि रक्तपित्त यांचा नाश करितें.

## करडईचीं फुलें.

कुसुंभपुष्पंमुस्वादुत्रिदोषघ्नंचभेदकं ॥ रुक्षमुष्णंपित्तलंचकेशरं
जनकारकं ॥ कफनाशकरंचैवलघुप्रोक्तंमनीषिभिः ॥

**अर्थ**— करडईचीं फुलें स्वादु, त्रिदोषनाशक, भेदक, रूक्ष, उष्ण, पित्तकर, केशरंजनकारक, कफनाशक आणि लघु अशीं आहेत.

## करडईची भाजी.

कुसुंभपत्रंमधुरंनेत्र्यमुष्णंकटुस्मृतं ॥ अग्निदीप्तिकरंचाति
रुच्यंरुक्षंगुरुस्मृतं ॥ सरंपित्तकरंचाम्लंगुदरोगकरमतं ॥
कफविण्मूत्रमेदानांनाशकंपरमंमतं ॥

**अर्थ**— करडईची भाजी मधुर, नेत्र्य, उष्ण, तिखट, अग्निदीपक, अतिरुचिकर, रूक्ष,

गुरु, सारक, पित्तकर, आंबट, गुदरोगकारक आहे, आणि कफ, मळ, मूत्र आणि मेद यांचा नाश करिते.

## कर्डईचें बीज.

कुसुंभबीजंमधुरंस्निग्धंशीतंकषायकं ॥
अवृष्यंगुरुचप्रोक्तंकफवातास्रपित्तनुत् ॥

अर्थ– कर्डईचें बीज मधुर, स्निग्ध शीतळ, तुरट, अवृष्य, गुरु असें आहे आणि कफ, वायु, रक्तपित्त यांचा नाश करितें.

## लघुलड्वा (लघुकर्डई).

लघुलड्वापित्तलास्याद्रूक्षोष्णास्वादुकालघुः ॥
कफकारीविषंचैवनाशयेदितिकीर्तिता ॥

अर्थ– लघुलड्वा- लघुकर्डई पित्तल, रूक्ष, उष्ण, स्वादु, लघु, कफकर व विषनाशक अशी आहे.

## रानकर्डई.

वनलड्वादीप्तिकरीपाकेकट्वीकफापहा ॥

अर्थ– रानकर्डई- दीपक, पाककाळीं तिखट, आणि कफनाशक अशी आहे.

## करंबी.

करंबीमधुराचैवशुक्रस्तन्यविवर्धिनी ॥

अर्थ– करंबी मधुर, शुक्रवर्धक व स्तन्यवर्धक अशी आहे.

## कवला भाजी.

कवलाभेदकाचोष्णातिक्तादोषत्रयापहा ॥

अर्थ– कवलाभाजी भेदक, उष्ण, कडू आणि त्रिदोषघ्न अशी आहे.

## कसेरु- कचरा- फुरड्या (लहान व मोठ्या).

कसेरुर्मधुराशीतारसेचतुवरागुरुः ॥ ग्राहकाशुक्रवातानांकारकास्तन्यदाम

ना ॥ मलस्तंभकरीरुच्यावृष्याकफकरीमता ॥ क्रमिकृद्रक्तपित्तघ्नीदाह श्रमतृषाहरा ॥ रक्तदोषंनेत्ररोगंप्रमेहंचविनाशयेत् ॥ पुष्पंचास्याःकाम लाग्निपित्तनाशकरंमतं ॥

**अर्थ**— कसेरु— कचरा- फुरड्या लहान व मोठ्या मधुर, शीत, तुरट, गुरु, ग्राहक, शुक्रवर्धक, वातकर, स्तनांत दूध वाढविणाऱ्या, मलस्तंभक, रुचिकर, वृष्य, कफकारक, क्रमिकर अशा आहेत व रक्तपित्त, दाह, श्रम, तृषा, रक्तदोष, नेत्ररोग, प्रमेह यांचा नाश करितात. यांचे फूल कावीळ व पित्त यांचा नाश करितें.

## कपर्द-कवडी.

कपर्दःकटुकश्चोष्णोवृष्यश्चाग्निप्रदीपनः ॥ तिक्तःशीतःकर्णशूलव्रणनेत्र रुजापहः ॥ ग्रहणीगुल्मशूलानिपरिणामंक्षयंतथा ॥ वातंकफंनाशयती त्येवंप्रोक्तोमनीषिभिः ॥

**अर्थ**— कपर्द— कवडी तिखट, उष्ण वृष्य, अग्निदीपक, कडु, शीत अशी आहे. व कर्णशूल, व्रण, नेत्ररोग, संग्रहणी, गुल्म, शूल, परिणामशूल, क्षय, वायु, कफ यांचा नाश करिते.

## कंवटपत्री- कपित्थपत्रा-सरसी.

कपित्थपत्रातीक्ष्णोष्णापाकेकटूष्णोचतुवरा॥ रसेतिक्ताक्रमिकफमे दमेहविषंजयेत् ॥ स्नायुरोगंनाशयतीत्येवमाचार्यभाषितं ॥

**अर्थ**— कंवठपत्री— कपित्थपत्रा— सरसी तीक्ष्ण, उष्ण, पाककाळीं तिखट, तुरट, रसकाळीं कडू अशी आहे. व क्रमि, कफ, मेद, मेह, विष आणि स्नायुरोग यांचा नाश करिते.

## कडमडवल्ली (आंबटवेल).

आम्लवल्लीदीपनीस्यात्तीक्ष्णाम्लारुचिदामता ॥
कफशूलगुल्मवातप्लीहानाशकरीमता ॥

**अर्थ**—कडमडवल्ली- आंबटवेल दीपन, तीक्ष्ण, आंबट, रुचिप्रद, अशी आहे. व कफ, शूल, गुल्म, वायु, आणि प्लीहा यांचा नाश करिते.

## कटुकवल्ली.

कटुवल्लीरुचिकराशीताकट्वीकफापहा ॥
सर्वान्ज्वरांश्वश्वासंचनाशयेद्राजयक्ष्मकं ॥

**अर्थ**– कटुकवल्ली रुचिकर, शीत, तिखट, आहे व कफ, संपूर्ण ज्वर, दमा आणि राजयक्ष्मा यांचा नाश करिते.

## कटुकंदरी (लघुवाघांटी).

कटुकंदरिकाचोष्णातिक्तावातकफापहा ॥
विषूच्यादीन्नाशयतीत्येवंवद्यैश्वभाषितं ॥

**अर्थ**– कटुकंदरी- लघुवाघांटी उष्ण, कडू, आहे व वायु, कफ, विषूची इत्यादिकांचा नाश करिते.

## क्षुद्रकारली (मुळास कांदा होतो ती).

क्षुद्राकारलिकाचोष्णाकट्वीरुच्याग्निदीपनी॥कोपनीरक्तवातानांतिक्ताव्रण्यासरामता ॥ फलंचास्याःपित्तकरंरुच्यंकंदोर्शहामतः ॥ मलरोधंगलग्रंथियोनिदोषंचनाशयेत् ॥ गर्भस्रावकरश्चैवऋषिभिः परिकीर्तितः ॥

**अर्थ**–क्षुद्रकारली उष्ण, तिखट, रुचिकर, अग्निदीपक, रक्तवातकोपन, कडू, व्रण्य, सारक, अशी आहे. हिचें फळ पित्तकर, रुचिकारक, आहे. हिचा कंद अर्श, मलरोध, गलग्रंथि, योनिदोष यांचा नाश करितो व गर्भाचा स्राव करितो.

## करवीरणी.

तिक्ताचोष्णाचकट्वीचकफवातविषापहा ॥ आध्मानवातंछर्दिंचऊर्ध्वश्वासंकृमीन्जयेत् ॥ इत्येवंकरवीरण्यागुणाःप्रोक्ताभिषक्तमैः ॥

**अर्थ**–करवीरणी कडू,उष्ण, तिखट आहे आणि कफ, वायु, विष, आध्मानवायु, ओकारी, ऊर्ध्वश्वास, कृमि यांचा नाश करिते.

## कर्पूरमणि (कापूरमणि).

मणिःकर्पूरकस्तिक्तःकटुश्चोष्णोव्रणापहः ॥
त्वग्दोषवातदोषादीन्नाशयेदितिकीर्तितः ॥

**अर्थ**– कर्पूरमणि- कापूरमणि कडू, तिखट, उष्ण, आहे आणि व्रण, त्वग्दोष, वायुदोष यांचा नाश करितो.

## कांकोली.

काकोलीशीतलावृष्यामधुराशुक्रकारिणी ॥ तिक्ताकफकरीगुर्वी क्षयपित्ततृषाहरा ॥ रक्तदोषंरक्तपित्तंपित्तंदाहंज्वरंविषं ॥ वातपित्त रुजंचैवनाशयेदितिकीर्तिता ॥

**अर्थ**–कांकोली शीतळ, वृष्य, मधुर, धातुवृद्धिकर, कडू , कफकर, गुरु, अशी आहे आणि क्षय, पित्त, तृषा, रक्तदोष, रक्तपित्त, दाह, ज्वर, विष, वायु व पित्तरोग यांचा नाश करिते.

## क्षीरकांकोली.

क्षीरकाकोलिकावृष्यास्तन्यवृद्धिकरीमधुः ॥
हृद्रोगनाशनकरीगुणाह्यन्येतुपूर्ववत् ॥

**अर्थ**–क्षीरकांकोली वृष्य, स्तन्यवर्धक, मधुर, व हृद्रोगाला नाश करणारी आहे. वरकड गुण काकोलीसारिखे आहेत.

## कांकडशिंगी-कर्कटशृंगी (हरड्याचें बोंड).

कर्कटस्यचशृंगीस्यात्तिक्तोष्णातुवरागुरुः ॥ वातहिक्कातिसारघ्नीबालानांच हितावहा ॥ कासंश्वासंरक्तदोषंपित्तंजूर्तिकफंक्षयं ॥ वांतिहिध्मांचोर्ध्वं वातंकृमितृष्णांक्षतक्षयं ॥ अरुचिंनाशयत्येवऋषिभिःपरिकीर्तिता ॥

**अर्थ**–कांकडशिंगी–कर्कटशृंगी–हरड्याचें बोंड कडू, उष्ण, तुरट, जड असें आहे व वायु, उचकी, अतिसार यांचा नाश करणारें, बाळकाला हितकारक आहे व

दमा, खोकला, रक्तदोष, पित्त, ज्वर, कफक्षय, वायु, हिध्मा, ऊर्ध्ववात, कृमि, तृष्णा, क्षतक्षय आणि अरुचि यांचा नाश करितें.

## कट्फल (कायफळ).

कट्फलंरुचिदंचोष्णंकटुतिक्तंचतूवरं ॥ कासंश्वासंचोग्र दाहंमुखरोगंज्वरंतथा ॥ कफवातप्रमेहार्शोरुचिगुल्मगला मयान् ॥ अग्निमांद्यंपांडुरोगंग्रहणींचैवनाशयेत् ॥

अर्थ– कायफळ रुचिकारक, उष्ण, तिखट, तुरट आहे व खोकला, दमा, उग्रदाह, मुखरोग आणि संग्रहणी यांचा नाश करितें.

## श्वेतपलांडु (पांढरा कांदा).

श्वेतःपलांडुर्बल्यःस्यात्कटुर्वृष्योगुरुर्मधुः ॥ रुच्यःस्निग्धः कफकरोधातुवृद्धिकरोमतः ॥ निद्राकरोदीपकःस्यात्क्षय हृद्रोगनाशनः ॥ वांत्यारुचीरक्तपित्तवातपित्तकफार्शसि ॥ वातार्शस्वेदशोथंचशोषंरक्तरुजंहरेत् ॥

अर्थ–कांदा बलकर, तिखट, वृष्य, गुरु, मधुर, रुचिकर, स्निग्ध, कफकर, धातुवर्धक, निद्राप्रद, दीपक असा आहे आणि क्षय, हृद्रोग, वांति, अरुचि, रक्तपित्त, वात, पित्त, कफार्श, वातार्श, घाम, सूज आणि रक्तदोष यांचा नाश करितो.

## हरित्पलांडु (हिरवा कांदा).

हरित्पलांडुस्तुगुणैःश्वेतवत्परिकीर्तितः ॥

अर्थ– हरित्पलांडु– हिरवा कांदा. याचे गुण श्वेतपलांडूसारिखे आहेत.

## रक्तपलांडु (तांबडा कांदा).

रक्तःपलांडुःशीतःस्यात्स्निग्धश्चाग्निप्रदीपकः ॥ गुरुःकटुश्चमधुरः किंचिदुष्णश्चपित्तलः ॥ वृष्योबलकरःप्रोक्तःकफंवातंचशोथकं ॥ अर्शान्कृमीन्नाशयतीत्येवंप्रोक्तागुणाःखलु ॥

**अर्थ**— तांबडा कांदा शीतल, स्निग्ध, अग्निदीपक, गुरु, तिखट, मधुर, किंचित् उष्ण, पित्तकर, वृष्य, बलकारक आहे व कफ, वायु, सूज, अर्श, कृमि यांचा नाश करितो.

## कांद्याचें बीज.

बीजंपलांडोर्वृष्यंस्याद्दंतकीटप्रमेहजित् ॥

**अर्थ**— कांद्याचें बीज वृष्य आहे व दांतांतील कृमि आणि प्रमेह यांचा नाश करितें.

## कापूर साधारण.

कर्पूरोमधुरस्तिक्तःशीतलःसुरभिर्लघुः ॥ नेत्र्योलेखनकृत्वृष्यःकटुःप्रीतिकरोमृदुः ॥ मदकारीचसंप्रोक्तःकफदाहतृषापहः ॥ रक्तपित्तंकंठरोगंनेत्ररोगंविषंतथा ॥ पित्तंचमुखवैरस्यंदौर्गंध्यमुदरंतथा ॥ मूत्रकृच्छ्रंप्रमेहंचमलगंधंचनाशयेत् ॥ सएवनूतनःस्निग्धस्तिक्तश्चोष्णश्चदाहकृत् ॥ सोपिजीर्णोदाहशोषनाशनःपरिकीर्तितः ॥सोपिधौतोगुणैःश्रेष्ठःप्रोक्तोवैद्यैःपुरातनैः ॥

**अर्थ**— कापूर मधुर, कडू, शीतळ, सुगंध, लघु, नेत्र्य, लेखन, वृष्य, तिखट, प्रीतिकारक, मृदु, मदकर, असा आहे आणि कफ, दाह, तृषा, रक्तपित्त, कंठरोग, नेत्ररोग, विष, पित्त, तोंडाची विरसता, दुर्गंध, उदर, मूत्रकृच्छ्र, प्रमेह आणि मलाचा गंध यांचा नाश करितो. हा ताजा असतां स्निग्ध, कडू, उष्ण, दाहकर, आहे व जुना झाला असतां दाह, शोष यांचा नाश करितो. तोच स्वच्छ केला असतां गुणानीं अधिक होतो.

## ईशावास- कापुराचा भेद.

ईशावासःकर्पूरोक्तोभेदीवृष्योमदापहः ॥ अतिशुभ्रोन्मादतृषाश्रमकासकृमिक्षयान् ॥ स्वेदंचैवांगदाहंचनाशयेदितिकीर्तितः ॥

**अर्थ**— ईशावास भेदक, वृष्य, मदनाशक, अतिशुभ्र असा आहे आणि उन्माद, तृषा, श्रम, खोकला, कृमि, क्षय, घाम, अंगदाह यांचा नाश करितो.

## हिम-कापुराचा दुसरा भेद.

हिमकर्पूरकःशुभ्रोवृष्यःशीतोरसेकटुः ॥

नृट्दाहमोहस्वेदानांनाशकःपरमोमतः ॥

**अर्थ—** हिम शुभ्र, वृष्य, शीत, रसकाळीं तिखट, असा आहे आणि तृषा, दाह, मोह, आणि स्वेद यांचा नाश करितो.

## पोताश्रय-भीमसेनी-बरास कापूर.

पोताश्रयःस्वादुशीतोवृष्यस्तिक्तःकटुःस्मृतः ॥ नृट्दाहरक्तपित्तानां कफस्यचविनाशकः ॥ त्रयोप्येतेतुकर्पूराःपक्वपक्वाविभेदतः ॥ द्वि प्रकारःसमुद्दिष्टःपक्वोतिगुणदःस्मृतः ॥

**अर्थ—** पोताश्रय गोड, शीतळ, वृष्य, कडू, तिखट, आहे, आणि तृषा, दाह, रक्तपित्त, कफ यांचा नाश करितो. हे तिन्ही कापूर पक्व व अपक्व या भेदानें दोन प्रकारचे आहेत, त्यांत पक्व गुणांनीं अधिक आहे.

## उदयभास्कर कापूर पक्व सदल निर्दल भेदानें दोन प्रकारचा.

कर्पूरोदयभास्करोनिगदितःपीतःसरःस्वच्छकःसप्रोक्तःकठिनःकटुःसमुदितःस्याद्दीपकोम्नेर्लघुः ॥ श्रीदःपित्तकरःकफक्रुमिविशान्वातंचनासास्रुतिलालास्त्रावगलग्रहौचशमयेत् जिव्हाजडत्वापहः ॥

**अर्थ—** उदयभास्कर कापूर—पक्व सदल निर्दल भेदानें दोन प्रकारचा. तो पीत, सारक, स्वच्छ, कठिण, तिखट, दीपक, लघु, श्रीकर, पित्तकर असा आहे आणि कफ, कृमि, वायु, नासास्राव, लालास्राव, गलग्रह, आणि जिव्हेचें जाड्य यांचा नाश करितो.

## पानकापूर.

पर्णकर्पूरकास्तिक्तःशुद्धचुन्मादकरोमतः॥
मूत्रकृत्पीनसंदाहंनाशयेदितिकीर्तितः ॥

**अर्थ—** पानकापूर कडू, शोधक, उन्मादकारक, असा आहे आणि मूत्र, पीनस, दाह यांचा नाश करितो.

## चिनी कापूर.

बाणासुरपुरेजातःकर्पूरःकटुकःस्मृतः ॥ तिक्तोष्णःशीतलःकिंचित्
कफंकंठरुजंक्रमीन् ॥ कफक्षयंवमिंकुष्ठंकंडूंचैवविनाशयेत् ॥

**अर्थ–** चिनी कापूर तिखट, कडू, उष्ण, किंचित शीतळ असा आहे, आणि कफ, कंठरोग, कृमि, कफक्षय, वांति, कुष्ट, आणि कंडू यांचा नाश करितो.

## तांबडा कांचन.

रक्तस्तुकांचनःशीतःसरोह्यग्निप्रदीपनः ॥ तुवरोग्राहिसंप्रोक्तःकफ
पित्तव्रणक्रमीन् ॥ गंडमालारक्तपित्तकुष्टवातांश्चनाशयेत् ॥ गु
दभ्रंशंरक्तपित्तंनाशयेत्पुष्पमस्यच ॥ शीतलंतुवरंरुक्षंसंग्राहिमधुरं
लघु ॥ पित्तंक्षयंचप्रदरंकासंरक्तरुजंहरेत् ॥

**अर्थ–** तांबडा कांचन शीतळ, सारक, अग्निदीपक, तुरट, ग्राहक असा आहे, आणि कफ, पित्त, व्रण, कृमि, गंडमाला, रक्तपित्त, कुष्ट, वायु, गुदभ्रंश, रक्तपित्त यांचा नाश करितो. आणि याचें फूल शीतळ, तुरट, रुक्ष, ग्राहक, मधुर, लघु, असें आहे. पित्तक्षय, प्रदर, खोकला, आणि रक्तविकार यांचा नाश करितें.

## श्वेत कांचन.

श्वेतस्तुकांचनोग्राहीतुवरोमधुरःस्मृतः ॥ रुच्योरुक्षःश्वासकासपित्त
रक्तविकारहा ॥ क्षतप्रदरनुत्प्रोक्तोगुणाश्चान्येतुरक्तवत् ॥

**अर्थ–** श्वेतकांचन ग्राहक, तुरट, मधुर, रुचिकर, रुक्ष, असा आहे, व दमा, खोकला, पित्त, रक्तविकार, क्षत, प्रदर यांचा नाश करितो, बरकड गुण तांबड्या कांचनाप्रमाणें आहेत.

## पीत कांचन.

पीतस्तुकांचनोग्राहीदीपनोव्रणरोपणः ॥
तुवरोमूत्रकृच्छ्रस्यकफवाय्वोश्चनाशनः ॥

**अर्थ**— पीतकांचन ग्राहक, दीपन, व्रणरोपण, तुरट, आहे, व मूत्रकृच्छ्, कफ, आणि वायु यांचा नाश करितो.

## कांचनी.

कांचन्युक्ताशीर्षरुजंत्रिदोषंचैवनाशयेत् ॥
स्तन्यस्यवर्धनकरीऋषिभिःसूक्ष्मदर्शिभिः ॥

**अर्थ**— कांचनी शीर्षरोग, त्रिदोष, यांचा नाश करिते, आणि स्तनांतील दूध वाढविते.

## कांचनभेद-कोविदार-कोरळ.

कोविदारोदीपनःस्यात्कषायोव्रणरोपणः ॥ संग्राहीसारकः
स्वादुःपर्णशाकेषुचोत्तमः ॥ मूत्रकृच्छ्रंत्रिदोषंचशोषंदाहंक
फंतथा ॥ वातंहरेत्पुष्पगुणारक्तकांचनपुष्पवत् ॥

**अर्थ**— कांचनभेद- कोविदार- कोरळ दीपन, तुरट, व्रणरोपण, संग्राहक, सारक, स्वादु, आहे व पालेभाज्यांमध्यें उत्तम आहे, आणि मूत्रकृच्छ्, त्रिदोष, शोष, दाह, कफ आणि वायु यांचा नाश करितो, याचे फुलाचे गुण रक्त कांचनासारिखे आहेत.

## कार्पासी ( कापशी ) रक्त व पीतवर्ण.

कार्पासीमधुराशीतास्तन्यवृद्धिकरीमता ॥ किंचिदुष्णाचबल्याच
कषायाचलघुःस्मृता ॥ कफपित्ततृषादाहभ्रमश्रमवमीहरा ॥ मू
र्छाहारीचसंप्रोक्तायुर्वेदविशारदैः ॥

**अर्थ**— कार्पासी—कापशी मधुर, शीतळ, स्तन्यवर्धक, किंचित् उष्ण, बलकर, तुरट, लघु अशी आहे व कफ, पित्त, तृषा, दाह, भ्रम, श्रम, वांति, मूर्छा यांचा नाश करिते.

## कापसीचें फळ ( बोंड ).

कार्पासिकाफलंप्रोक्तंमूत्रस्यचातिवर्धकं ॥ वातंरक्तरुजंकर्णपिटि
कांकर्णनादकं ॥ कर्णपूयंचशमयेदितिपूर्वैर्निरूपितं ॥

अर्थ– कापशीचें फळ मूत्रवर्धक आहे व वायु, रक्तविकार, कानांतील फोड, कर्णनाद आणि पूतिकर्ण यांचा नाश करितें.

## कापशीचें बीज ( सरक्या ).

कार्पासबीजंस्तन्यस्यवर्धकंचगुरुस्मृतं ॥
वृष्यंकफकरंस्निग्धंपूर्वाचार्यैनिरूपितं ॥

अर्थ– कापसीचें बीज स्तन्यवर्धक, गुरु, वृष्य, कफकर व स्निग्ध, असें आहे.

## कार्पास ( कापूस ).

कार्पासःकिंचिदुष्णःस्याद्वातनाशकरोलघुः ॥
मधुरश्चैवसंप्रोक्तोऋषिभिस्तत्वदर्शिभिः ॥

अर्थ– कार्पास–कापूस किंचित् उष्ण, वातनाशक, लघु, मधुर असा आहे.

## कालांजनी-कृष्ण कार्पासी.

कृष्णकार्पासिकाचोष्णाकटुर्वाहृद्रोगनाशिनी॥
मलंचामंकृमींश्चैवउदरंचार्शकंहरेत् ॥

अर्थ– कालांजनी–कृष्णकार्पासी उष्ण, तिखट, अशी आहे आणि हृद्रोग, मळ, आम, कृमि, उदर, आणि अर्श यांचा नाश करिते.

## अरण्यकार्पासी ( रानकापसी. )

वनकार्पासिकाशीनाकिंचिदुष्णारुचिप्रदा ॥ तुवरामधुरालघ्वी
व्रणशस्त्रक्षतापहा ॥ रक्तरोगंचवातंचनाशयेदितिकीर्तिता ॥

अर्थ– अरण्यकार्पासी– रानकापसी शीत, किंचित उष्ण, रुचिप्रद, तुरट, मधुर, लघु अशी आहे. व व्रण, शस्त्रक्षत, रक्तरोग, आणि वायु यांचा नाश करिते.

## कांडवेल साधारण.

कांडवल्लीतुकटुकातिक्ताचोष्णासरामता ॥ पित्तलाचकफंगुल्मं लूतांदुष्टव्रणंतथा ॥ प्लीहोदराग्निमांद्यानिशूलंवातंचनाशयेत् ॥ मलस्तंभहराचैवकीर्तितामुनिभिः पुरा ॥

अर्थ— कांडवेल साधारण तिखट, कडु, उष्ण, सारक, पित्तल अशी आहे, व कफ, ल्म, लूता, दुष्टव्रण, प्लीहा, उदर, अग्निमांद्य, शूल, वायु आणि मलस्तंभ यांचा नाश करिते.

## चौधारी कांडवेल.

चतुर्धाराकांडवल्लीभूतोपद्रवशूलहा ॥ अत्युष्णाध्मानवातंचतिमिरंवातरक्तकं ॥ अपस्मारंवातरोगंनाशयेदितिकीर्तिता ॥

अर्थ— चौधारी कांडवेल भूतोपद्रव, शूल, यांचा नाश करिते व अतिउष्ण, आध्मान-यु, तिमिर, वातरक्त, अपस्मार, वातरोग यांचा नाश करिते.

## तिधारी कांडवेल.

त्रिधाराकांडवल्लीतुसगलघ्व्यग्निदीपनी ॥ रुक्षोष्णामधुरावातकृम्यर्शकफनाशिनी ॥ गुणास्त्वन्येतुविज्ञेयाःपूर्वोक्तकांडवल्लीवत् ॥

अर्थ— तिधारी कांडवेल सारक, लघु, अग्निदीपक, रुक्ष, उष्ण, मधुर, आहे, व वात, मि, अर्श, कफ यांचा नाश करिते, वरकड गुण कांडवेलीसारिखे आहेत.

## काकमाची-कामोणी-लघुकावळी-कावळी.

काकमाचीरसेचोष्णातिक्ताकट्वीरसायनी ॥ वृष्यास्निग्धाचस्वर्याचहृद्याधातुविवर्धिनी ॥ नेत्र्यारुच्यासरालघ्वीकफशूलार्शशोफहा ॥ त्रिदोषकुष्ठकंडूनिकर्णकीटातिसारहा ॥ हिक्काछर्दिश्वासकासज्वरहृद्रोगमेहहा ॥

अर्थ— काकमाची- कामोणी- लघुकावळी- कावळी रसकाळीं उष्ण, कडु, तिखट, रसायन, वृष्य, स्निग्ध, स्वर्य, हृद्य, धातुवर्धक, नेत्र्य, रुचिकर, सारक, लघु, अशी आहे व कफ, शूल, अर्श, सूज, त्रिदोष, कुष्ट, कंडू, कर्णकीट, अतिसार, उचकी, वांति, दमा, खोकला, ज्वर, हृद्रोग, आणि मेह, यांचा नाश करिते.

## काहुंडली ( थोर श्वेतकावळी ).

श्वेतानुकाकमाचीस्यान्मधुरावरसायनी ॥ शीताकषायाकटुश्चैव
तिक्ताचोष्णावमिप्रदा ॥ तनोर्दाढ्यकरीप्रोक्ता कफकासौ तथार्शनाशि
नी ॥ वलीपलितनाशिन्यपि श्वेतकुष्ठापहामता ॥

अर्थ— काहुंडली- थोर श्वेतकावळी मधुर, रसायन, शीत, तुरट, तिखट, कडू, उष्ण
वांतिकर, शरीरदृढताकारक, अशी आहे आणि कफ, मूत्र, अर्श, वलीपलित, कि
आणि श्वेतकुष्ट यांचा नाश करिते.

## रक्तकाहुंडली (लघुरक्तकावळी).

रक्ताचकाकमाच्युक्तानुवरोष्णारसायनी ॥ कटुश्चैवतिक्ताकाग्निक
रीवातकुष्ठविनाशिनी ॥ पांडुप्रमेहकफहाच्छर्दिकृमिज्वरापहा ॥
पलितस्यचहंत्रीत्यादिनिपूर्वविदोजगुः ॥

अर्थ रक्तकाहुडली— लघुरक्तकावळी तुरट, उष्ण, रसायन, तिखट, कडू, अग्नि
कारक, अशी आहे आणि वात, कुष्ठ, पांडु, प्रमेह, कफ, वांति, कृमि, ज्वर, आणि पलित
यांचा नाश करिते.

## काकजंघा (कांग अघाड्याच्या झाडासारखी व क्षतोपयोगी ).

काकजंघातनुस्तराकटुश्चोष्णाचातिक्तका ॥ हन्यात्कफव्रणकृमी
न्बाधिर्यंविषमज्वरं ॥ जीर्णज्वरमजीर्णंचरक्तपित्तज्वरंतथा ॥
कंडुकुष्ठंविषंपित्तंनाशयेदितिकीर्तिता ॥

अर्थ— काकजंघा— कांग अघाड्यासारखी व क्षतोपयोगी आहे. ती तुरट, तिखट
उष्ण, कडू, बलकार, आहे व कफ, व्रण, कृमि, बधिरपणा, विषमज्वर, जीर्णज्वर, अजीर्ण
रक्तपित्त, ज्वर, कंडू, कुष्ठ, विष आणि पित्त यांचा नाश करिते.

## कांग- कंगुधान्य ( काळे, पांढरे, पिवळे असे ४ प्रकारचे राळे).

कंगुधान्यंधातुवृद्धिकरंवातकरंगुरु ॥ अस्थिसंधानकृद्रुक्षमश्वानां

चहितावहं ॥ कफघ्नंचगुणाधिक्यंपीतंमुनिभिरीरितं ॥

अर्थ– कांग- कंगुधान्य- काळे, पांढरे, तांबडे, पिवळे असे चार प्रकारचे धातुवर्धक, वातल, ;, अस्थिसंधानकारक, रुक्ष, घोड्यांना हितावह आणि कफनाशक आहेत व पीत- गुणांनीं अधिक आहेत.

## कालशाक.

कालशाकःकटुस्तिक्तःपटुरग्निप्रदीपनः ॥ पाचकोभेदको रुच्योवातलोष्णोसरःस्मृतः ॥ कफशोथविषार्शोनांनाश नःपरिकीर्तितः ॥

अर्थ– कालशाक तिखट, कडू, खारट, अग्निदीपक, पाचक, भेदक, रुचिकर, वात- र, उष्ण, सारक, असा आहे व कफ, शोथ, विष, आणि अर्श यांचा नाश करितो.

## कासविंदा (कासमर्द- कासिंदा).

कासमर्दःकटुस्तिक्तोमधुरोष्णोरुचिप्रदः ॥ पाचकोदीपनःकंठशो धनोग्राहकोलघुः ॥ रुक्षःकफाजीर्णवातकासपित्तविषक्रमीन् ॥ विषूचिघ्नश्चसंप्रोक्तःपर्णपाकेकटुस्मृतं ॥ वृष्यमुष्णंलघुप्रोक्तंश्वा सकासारुचींजयेत् ॥ पुष्पंतुश्वासकासघ्नमूर्ध्ववातविनाशनं ॥

अर्थ– कासविंदा- कासमर्द– कासिंदा तिखट, कडू, मधुर, उष्ण, रुचिकर, पाचक, ।पक, कंठशुद्धिकर, ग्राही, लघु, रुक्ष, असा आहे व कफ, अजीर्ण, वायु, कास, पित्त, ष, कृमि, विषूची यांचा नाश करितो. याचें पान पाककाळीं तिखट, वृष्य, उष्ण, लघु सें आहे व दमा, खोकला, अरुचि यांचा नाश करितें. याचें फूल दमा, खोकला, ।णि ऊर्ध्ववात यांचा नाश करितें.

## कांकडी.

कर्कटीमधुराशीतारुच्यालघ्वीचमूत्रला ॥ त्वचायांकटुकातिक्ता पाचकाग्निप्रदीपनी ॥ अवृष्याग्राहिणीप्रोक्तामूत्ररोधाश्मरीहरा ॥ मूत्रकृच्छ्रंवमिंदाहंश्रमंचैवविनाशयेत् ॥ सापक्कारक्तदोषस्यकारि ण्युष्णाबलप्रदा ॥

**अर्थ**– कांकडी– कर्कटी मधुर, शीत, रुचिकर, लघु, मूत्रल, सालेध्याठायीं तिखट, कडू, पाचक, अग्निप्रदीपक, अवृष्य, ग्राहिणी, मूत्ररोध, अश्मरी, मूत्रकृच्छ्र, वमि, दाह, श्रम, यांचा नाश करिते. ही पिकली असतां रक्तदोषकर, उष्ण आणि बलकर अशी आहे.

## तौसें कांकडी.

द्वितीयाकर्कटीरुच्यामधुरावातकारिणी ॥ शीतामूत्रप्रदागुर्वीकफ
कृद्दाहनाशिनी ॥ वमिंपित्तंभ्रमंमूत्रकृच्छ्रंमूत्राश्मरींहरेत् ॥

**अर्थ**– तौसेंकांकडी रुचिकर, मधुर, वातकर, शीतल, मूत्रल, गुरु, कफकर, दाहनाशक आहे, व वांति, भ्रम, मूत्रकृच्छ्र, आणि मूत्राश्मरी यांचा नाश करिते.

## रानतवसें (कांकडी).

अरण्यकर्कटीचोष्णारसेतिक्ताचभेदका ॥
पाकेकट्वीकफकृत्कृमीपित्तकंडूज्वरापहा ॥

**अर्थ**– रानतवसें– कांकडी उष्ण, रसकाळीं कडू, भेदक, पाककाळीं तिखट, कफकर, कृमि, पित्त, कंडू आणि ज्वर यांचा नाश करिते.

## कडू तवसें (कांकडी).

तिक्तकर्कटिकाप्रोक्तारसेपाकेकटुःस्मृता ॥ तिक्तामूत्रकरीवांति
कारकामूत्रकृच्छ्रहा ॥ आध्मानवातंचाष्ठीलांनाशयेदितिकीर्तिता ॥

**अर्थ**–कडू तवसें– कांकडी रसकाळीं व पाककाळीं तिखट, कडू, मूत्रल, वांतिकर, अशी आहे, व मूत्रकृच्छ्र आध्मानवायु, अष्ठीला यांचा नाश करिते.

## एर्वारुक–थोर वाळुक कांकडी.

एर्वारुकंतुमधुरंरुच्यंरुक्षंचशीतलं ॥ तृप्तिकृत्ग्राहकंप्रोक्तमत्यंत
वातकारकं ॥ गुरुवातज्वरकफकारकंतापकारकं ॥ पित्तंमूर्छां
मूत्रकृच्छ्रंनाशयेदितिकीर्तितं ॥ कोमलैर्वारुकंतिक्तंलघुस्वादुहिति
मूत्रलं ॥ शीतंरुक्षंरक्तपित्तमूत्रकृच्छ्रालदोषजित् ॥ तत्पक्वंपित्त

लंचाग्निदीपनंचतृषापहं ॥ उष्णंत्रिदोषशमनंक्लमदाहहरंमतं ॥
गृहेजीर्णंनुतनंज्ञेयमुष्णंपित्तकरंमतं ॥ कफवायोर्नाशकरंप्रोक्तमायु
र्विदैर्जनैः ॥

**अर्थ**— घोरवाळुक कांकडी मधुर, रुचिकर, रुक्ष, शीतल, तृप्तिकारक, ग्राही, अत्यंत वातुल, गुरु, वातकर, ज्वरकर, कफकारक, तापनाशक, आहे. आणि पित्त, मूर्छा, मूत्रकृच्छ्र यांचा नाश करिते. तीच कोंवळी असतां कडू, लघु, अस्वादु, अतिमूत्रल, शीत, रुक्ष, असी आहे आणि रक्तपित्त, मूत्रकृच्छ्र, रक्तदोष यांचा नाश करिते. तीच पिकली असतां पित्तल, अग्निदीपक, तृषाहर, उष्ण, त्रिदोषशामक, क्लमनाशक, दाहहारक, असी आहे. तीच घरांत काढून पिकली असतां उष्ण, पित्तकारक आहे व कफ, वायु, यांचा नाश करिते.

## क्षुद्रैर्वारुक (लहान वाळुक कांकडी).

क्षुद्रमैर्वारुकंशीतंमधुरंरुचिकारकं ॥ कामपीनसकारीस्यात्पाचकं
श्रमपित्तहं ॥ आध्मानवायोःशमनंमुनिभिःपरिकीर्तितं ॥

**अर्थ**— लघुवाळुक कांकडी शीत, मधुर, रुचिकर, खोकला, पीनस, यांना करणारी, पाचक, आहे, व श्रम, पित्त, आध्मान वायु यांचा नाश करिते.

## टरकांकडी-चीनाकर्कटी-पडवळासारखी लांब असते ती.

चीनाकर्कटिकाशीतामधुरारुचिदागुरुः ॥ कफवाततृप्तिकरीहृद्या
पित्तरुजापहा ॥ दाहशोषहराप्रोक्तामुनिभिश्चरकादिभिः ॥

**अर्थ**— चीनाकर्कटी शीतळ, मधुर, रुचिकर, गुरु, कफकर, वातल, तृप्तिकारक, हृद्य, असी आहे, व पित्तरोग, दाह, शोष यांचा नाश करिते.

## सर्व जातीच्या कांकड्या.

सर्वाकर्कटिकागुर्वीदुर्जरावातरक्तहा ॥ अग्निमांद्यकरीप्रोक्ताऋ
षिभिःशास्त्रकोविदैः ॥ वर्षाशरदिचोत्पन्नानोहितानचभक्षयेत् ॥
हेमंतजारुचिकरापित्तहाभक्षिताहिता ॥ सैवार्धपक्कासंप्रोक्तापीन
सोत्पादिनीमता ॥ सम्यक्पक्काचमधुराकफनाशकरीमता ॥

**अर्थ**— सर्व जातीच्या कांकड्या गुरु, दुर्जर, वातरक्तनाशक, अग्निमांद्यकर असा

आहेत, ज्या वर्षाकाळीं व शरत्काळीं उत्पन्न होणाऱ्या त्या हितकारक नाहींत, त्या भक्षण करूंनये, व हेमंत ऋतूंत होणाऱ्या त्या रुचिकर, पित्तनाशक आहेत, त्या भक्षण केल्या असतां हितकारक आहेत. ती अर्धपक्व असतां पीनस उत्पन्न करिते, व चांगली पिकली असतां मधुर व कफनाशक आहे.

## कारवल्ली-लघुकारली तिचें फळ.

कारवेल्लंचातितिक्तमाग्निदीप्तिकरंलघु ॥ उष्णंशीतंभेदकं
चस्वादुपथ्यंसमीरितं ॥ अरुचिंचकफंवातंरक्तदोषंज्वरंकृ
मीन् ॥ पित्तंपांडुंचकुष्टंचनाशयेदितिकीर्तितं ॥

अर्थ—लघुकारलीचें फळ अतिकडु, अग्निदीपक, लघु, उष्ण, शीत, भेदक, स्वादु, पथ्यकर असें आहे व अरुचि, कफ, वायु, रक्तदोष, ज्वर, कृमि, पित्त, पांडुरोग, कुष्ट यांचा नाश करितें.

## थोरल्या कारळीचें फळ.

बृहदुक्तंकारवेल्लंकटुतिक्तंचदीपकं ॥ अवृष्यंभेदकंस्वादुरुच्यंक्षारं
लघुस्मृतं ॥ अवातलंपित्तहरंरक्तरुक्पांडुरोगहृत् ॥ अरोचकंक
फंश्वासंव्रणंकासंकृमींस्तथा ॥ कोठकुष्टंज्वरंचैवप्रमेहाध्माननाश
नं ॥ कामलांनाशयत्येवगुणास्त्वन्येतुपूर्ववत् ॥

अर्थ— थोरल्या कारळीचें फळ तिखट, कडू, अग्निदीपक, अवृष्य, भेदक, स्वादु, रुचिकर, खारट, लघु, अवातल, पित्तनाशक आहे. व रक्तरोग, पांडुरोग, अरुचि, कफ, श्वास, व्रण, कास, कृमि, कोठरोग, कुष्ट, ज्वर, प्रमेह, आध्मान आणि कामला यांचा नाश करितें. वरकड गुण पूर्व कारल्यासारिखेच आहेत.

## जळकारळीचें फळ.

जलजंकारवेल्लंस्याक्तिक्तंभेदकरंमतं ॥
कफंकुष्टंपांडुरोगंकृमीन्पित्तंचनाशयेत् ॥

अर्थ— जलकारलीचें फळ कडू व भेदक आहे. आणि कफ, कुष्ट, पांडुरोग, कृमि आणि पित्त यांचा नाश करितें.

## वनकारळीचें फळ.

वनजंकारवेल्लंतुदीपनंतिक्तकंमतं ॥
हृद्यंज्वरार्शकासघ्नंकफवातकृमीहरं ॥

अर्थ—रानकारळीचें फळ दीपक, कडू व प्रिय आहे. आणि ज्वर, अर्श, खोकला, कफ, वायु, आणि कृमि यांचा नाश करितें.

## कांजीची कृति व गुण.

नूतनंमृन्मयंकुंभंकटुतैलेनलेपयेत् ॥ निर्मलंचजलंतस्मिन्राजिकाजाजिसैंधवं ॥ हिंगुविश्वानिशाचैवओदनंवंशपल्लवाः ॥ ओदनस्यकुलित्थानांजलंवटकखांडवं ॥ सर्वंतस्मिन्निधायाथमुद्रांदत्वादिनत्रयं ॥ रक्षयित्वाततोवस्त्रेगालितंकांजिकंमतं ॥ तद्भेदकंबस्तिशुद्धिकरमुष्णंचतीक्ष्णकं ॥ रुच्यमम्लंपाचकंचलघुलेपेचदाहकं ॥ ज्वरनाशकरंप्रोक्तंतत्पीतंकफवातहं ॥ शूलंशोथंभ्रमंदाहंमूर्छांपित्तज्वरंतथा ॥ अजीर्णाध्मानविट्स्तंभानामनाशकरंमतं ॥ कांजिकेसंस्थिताश्चैववटकाश्चरुचिदामताः ॥ शीताःकफकरादाहशूलाजीर्णविनाशकाः ॥ नेत्ररोगेहितानोक्ताऋषिभिःपाककोविदैः ॥

अर्थ— कोरा मातीचा घडा घेऊन त्याला आंतून शिरसांचें तेल लावावें. त्यांत निर्मळ स्वच्छ पाणी घालून त्यांत मोहऱ्या, जिरें, सैंधव, हिंग, सुंठ, हळद, भात, वेळूचा पाला, पेज, कुळयांचें काढें व वड्यांचे तुकडे हे सर्व पदार्थ घालून तोंडावर दादरा बांधून तीन दिवस झांकून ठेवावी. नंतर वस्त्रावर गाळावी तिला कांजी म्हणतात. ती भेदक, बस्तिशुद्धिकर, उष्ण, तीक्ष्ण, रुच्य, आंबट, पाचक, लघु, आहे. व लेप केला असतां दाह, ज्वर यांची नाशक आहे आणि प्राशन केली असतां कफ, वायु, शूल, शोथ, भ्रम, दाह, मूर्छा, पित्तज्वर, अजीर्ण, आध्मान, मलस्तंभ यांचा नाश करिते. आणि कांजींत घातलेले वडे फार रुचिकर, शीत, कफकर, दाह, शूल, अजीर्ण यांचा नाश करितात, आणि नेत्ररोगावर अहित आहेत असें पाकवेत्ते सांगतात.

## फाणित ( काकवी ).

फाणितंक्षारमुष्णंचतीक्ष्णंकफकरंगुरु ॥ बस्तिशुद्धिकरंमूत्रशोध
नंधातुवर्धकं ॥ वातंपित्तंश्रमंचैवनाशयेदितिकीर्तितं ॥

**अर्थ**— काकवी खारट, उष्ण, तीक्ष्ण, कफकर, गुरु, बस्तिशुद्धिकारक, मूत्रशोधक, धातुवर्धक आहे व पित्त, श्रम यांचा नाश करिते.

## खदिरसार ( कात ).

खादिरस्तुवरश्चोष्णस्तिक्तोरुचिकरोमतः ॥ अग्निदीप्तिकरोग्राहीदं
तदृढकरोमतः ॥ कटुकःकफवातानांव्रणस्यचविनाशकः ॥ कंठ
रोगंसर्वमेहंकृमीन्मुखरुजंतथा ॥ अष्टादशैवकुष्ठानिस्थौल्यंचार्शच
नाशयेत् ॥ रात्रौदुग्धप्राशकानांनहितस्तद्विरोधतः ॥ कषायस्तुर
सश्चास्यसदुष्टापायसस्मृतः ॥

**अर्थ**— खदिरसार तुरट, उष्ण, कडू, रुचिकर, अग्निदीपक, ग्राहक, दंतांना दृढ करणारा, तिखट आहे. व कफ, वात, व्रण, कंठरोग, सर्व प्रमेह, कृमि, मुखरोग, अष्टादश कुष्टें, स्थूलता, अर्श यांचा नाश करितो आणि रात्रीं दुग्ध प्राशन करणारांला हितकारक होत नाहीं व याचा रस तुरट तो, दुधाचा नाशक आहे.

## कातगोळीची कृति.

जातीफलंचकंकोलंकर्पूरंचलवंगकं ॥ चतुर्भागंचप्रत्येकंकस्तूरी
चैकभागिका ॥ खादिरःशतभागःस्यात्सर्वसंचूर्ण्यमेलयेत् ॥ आ
म्रनिर्यासकेमर्द्यात्रिगुंजागुटिकांकुरु ॥ सावृष्यामुखदौर्गंध्यनाशि
नीरुचिदामता ॥ कामदीप्तिकराचैवसौभाग्यस्यचकारका ॥ खाद
रस्यगुणैर्युक्तासागात्रैभासितासती ॥ आयुर्लक्ष्मीवृद्धिकरीदुग्धेव
र्ज्याप्रयत्नतः ॥

**अर्थ**—कातगोळीची कृति. जायफळ, कंकोल, कापूर, लवंगा हे प्रत्येक ४ भाग, कस्तूरी १ भाग व कात १०० भाग, या सर्वांचें चूर्ण करून एकत्र मिळवावें आणि आंब्याच्या चिकांत खलून तीन गुंजाभार गोळी करावी. ती वृष्य, मुखदुर्गंधनाशक, रुचिकर,

दीपक, सौभाग्यकारक, आहे. वरकड गुण खदिरासारिखे आहेत. ही रात्रीं भक्षण असतां आयुष्य व लक्ष्मी यांची वृद्धि करिते व दुग्ध प्राशन करणारानें ही करूं नये.

## दुसरी कातगोळींची कृति.

चंदनैलाजातिफलंकर्पूरंचलवंगकं ॥ कंकोलंचैवप्रत्येकंचैकभागंप्रकल्पयेत् ॥ षट्भागःखादिरःकल्प्यःसर्वंसंचुर्ण्यमेलयेत् ॥ सुगंधपुष्पकस्तूरीवासितेनजलेनह ॥ मर्दयित्वाचतैलेनसुगंधेनवकारयेत् ॥ त्रिगुंजाप्रमिताचैवसावृष्याधातुवर्धिनी ॥ अग्निदीप्तिकरी वृष्यावुद्धेश्चवनुवर्धका ॥ तांबूलिभक्षितासैवदंतदौर्बल्यनाशिनी ॥ वातरोगक्षयंचैवमुखदौर्गंध्यनाशिनी ॥

अर्थ– चंदन, एलची, जायफळ, कापूर, लवंग, कंकोळ, हे प्रत्येक १ भाग व कात ६ या सर्वांचें चूर्ण करून मिळवावें. नंतर सुगंध फुलें व कस्तुरी यांच्या पाण्यांत मळून तेल हातास लावून तीन गुंजांची गोळी करावी ती वृष्य, धातुवर्धक, अग्निदीपक, बुद्धिवर्धक आहे. ही विड्यांत खाली असतां दांत घट्ट होतात. व वायु, क्षय, आणि दुर्गंध यांचा नाश करिते.

## कामजा कर्नाटकांत प्रसिद्ध, तिचें बीज.

कामजामधुराबल्याकामवृद्धिकरीमता ॥
इंद्रियाणांतृप्तिकरीरुच्याचैवप्रकीर्तिता ॥

अर्थ–कामजा. कर्नाटकांत प्रसिद्ध, तिचें बीज मधुर, बळकर, कामवर्धक, इंद्रियांना तृप्ति करणारें आणि रुचिकर असें आहे.

## कारी, सकंटक व निष्कंटक या भेदेंकरून.

कारीतुग्राहकारुच्यातुवराचाग्निदीपनी ॥ कंठशुद्धिकरागुर्वीमधुरा पित्तनाशिनी ॥ फलंचास्यास्तुतुवरंपटुम्लंदोषनाशकं ॥

अर्थ– कारी ग्राहक, रुचिकर, तुरट, अग्निदीपक, कंठशुद्धिकारक, गुरु व मधुर हे. आणि पित्तनाश करिते. हिचें फळ तुरट, खारट, आंबट, आणि त्रिदोषनाशक, असें आहे.

## थोरकांकडाचें झाड- कुडकाचें झाड, व त्याचें फळ.

फलंबृहत्काकडस्यतुवरंचाग्निदीपकं ॥ अम्लंशीतंलघूष्णंचचक्षुष्यंरक्तपित्तकृत् ॥ कफकृत्सारकंचैववातनाशकरंमतं ॥ तत्पक्वंशीतलंरुच्यंगुरुपित्तहरंमतं ॥ रक्तदोषंकफंचैवनाशयेदितिकीर्तितं ॥

**अर्थ**— थोरकांकडाचें फळ तुरट, अग्निदीपक, आंबट, शीतळ, लघु, उष्ण, नेत्रांला हितकारक व रक्तपित्त, कफ यांला करणारें व वातनाशक आहे. तेंच पिकलें असतां शीतळ, रुचिकारक, जड आहे व पित्त, रक्तदोष, कफ यांचा नाश करितें.

## लघुकांकडाचें फळ.

फलंलघुकाकडस्यग्राह्यम्लंपित्तलंमतं ॥ अग्निदीप्तिकरंचोष्णंलघूक्तंमुनिभिःपुरा ॥ तत्पक्वंमधुरंस्निग्धंतुवरंवातनाशकं ॥ कफपित्तहरंचैवमुनिभिःकीर्तितंपुरा ॥

**अर्थ**— लहान कांकडाचें फळ ग्राहक, आंबट, पित्तल, अग्निदीपक, उष्ण, लघु, असें आहे. व तें पिकलें असतां मधुर, स्निग्ध, तुरट, वातनाशक व कफ, पित्तकारक असें आहे.

## ज्योतिष्मती (कांगोणी).

ज्योतिष्मतीतुकटुकातिक्ताचाग्निप्रदीपनी ॥ अत्युष्णादाहकामेधाप्रज्ञापुष्टिकरामता ॥ वृष्यावांतिकरीतीक्ष्णावर्ण्याचतुवरामता ॥ कफंवातंव्रणंपांडुंविसर्पंचाविनाशयेत् ॥ उदरस्यचपीडांचनाशयेदितिकीर्तिता ॥

**अर्थ**— कांगोणी तिखट, कडू, अग्निदीपक, अतिउष्ण, दाहक अशी आहे व मेधा, प्रज्ञा, पुष्टि यांला करणारी, वृष्य, वांतिकारक, तीक्ष्ण, वर्णकर, तुरट, आहे. आणि कफ, वात, व्रण, पांडु, विसर्प, आणि उदरपीडा यांचा नाश करिते.

## कांच- वांगड्या, इत्यादिकांची.

काचातुसारकालघ्वीव्रणनेत्रहितावहा ॥
लेखनीशूलहृत्प्रोक्तावैद्यशास्त्रविशारदैः ॥

अर्थ– कांच सारक, लघु आहे. व व्रण आणि नेत्र यांला हितकारक, लेखन व शूलक आहे.

## काचलवण (बांगडखार).

काचंतुलवणंक्षारमत्युष्णंचाग्निदीपकं ॥ पित्तंचरक्तपित्तंचवर्धयेदितिकीर्तितं ॥ नेत्र्यंदाहकरंशूलवातगुल्मकफापहं ॥

अर्थ– काचलवण अतिउष्ण, अग्निदीपक व पित्त, रक्तपित्त, यांना वाढवितें. व नेत्रांला हित, दाहकारक असें आहे. आणि शूल, वायु, गुल्म, कफ यांचा नाश करितें.

## कर्णस्फोटा (कानफोडी).

कर्णस्फोटातुकटुकातिक्ताशीताविषापहा ॥
सर्वव्याधिपिशाचानांग्रहपीडांचनाशयेत् ॥

अर्थ–कानफोडी तिखट, कडू, शीतल आहे व विष, संपूर्ण व्याधि, पिशाचपीडा आणि पीडा यांचा नाश करिते.

## कंटकारिद्रुम (काकई).

कंटकारिद्रुमस्तिक्तःसरोहृद्यःप्रकीर्तितः ॥ वर्णबुद्धिबलानां चकारकःसूतिदोषहृत् ॥ वातनाशकरःप्रोक्तःफलंचमधुरं मतं ॥ मलावष्टंभकंरक्तपित्तनाशकरंगुरु ॥

अर्थ– काकई कडू, सारक, हृद्य व वर्ण, बुद्धि, बल यांना वाढविणारी आहे. व बातरोग, वायु यांचा नाश करिते. हिचें फळ मधुर, मलस्तंभक, रक्तपित्तनाशक आणि जड असें आहे.

## काजूतक (जांबिचें झाड).

काजूनकस्तुतुवरोमधुरोष्णोलघुःस्मृतः ॥ धातुवृद्धिकरोवातकफगुल्मोदरज्वरान् ॥ कृमिव्रणाग्निमांद्यानिकुष्ठंचश्वेतकुष्ठकं ॥ संग्रहण्यर्शमानाहान्नाशयेदितिकीर्तितः ॥

अर्थ– काजू तुरट, मधुर, उष्ण, लघु, धातुवर्धक असा आहे. वायु, कफ, गुल्म, उदर, ज्वर, कृमि, व्रण, अग्निमांद्य, कुष्ट, श्वेतकुष्ट, संग्रहणी, अर्श आणि आनाह यांचा नाश करितो.

## अंधकार (काळोख).

अंधकारःपित्तकफक्लमंमोहभयावहः ॥

**अर्थ**— काळोख पित्त, कफ, क्लम, मोह आणि भय यांना करितो.

## कारस्कार ( काजरा-कुचला).

कारस्करोमदकरस्तुवरोग्राहकःस्मृतः ॥ कटुस्तिक्तोलघुश्चोष्णःकुष्ठरक्तविकारहा ॥ कंडूंकफंवातरोगंव्रणंचार्शज्वरंजयेत् ॥ अस्य चामफलंग्राहीतुवरंवातकृल्लघु ॥ शीतलंचसमुद्दिष्टंतत्पक्वंविषदंगुरु ॥ पाकेचमधुरंप्रोक्तंकफंवातंप्रमेहकं ॥ पित्तंरक्तविकारंचनाशयेदितिकीर्तितं ॥

**अर्थ**— काजरा मदकर, तुरट, ग्राहक, तिखट, कडू, लघु, उष्ण व कुष्ठ, रक्तविकार कंडू, कफ, वातरोग, व्रण, अर्श आणि ज्वर यांचा नाश करितो. याचें हिरवें फळ ग्राहक तुरट, वातकर, लघु, व शीतळ असें आहे. आणि पिकलें फळ विषद, गुरु, पाककालीं मधुर, व कफ, वायु, प्रमेह, पित्त, आणि रक्तविकार यांचा नाश करितें.

## यष्टि-काठी-दांडा.

यष्टिकाश्वापिशाचानांचोरस्यभयनाशिनी ॥
विशेषतोनिशायांतुहितकर्त्रीप्रकीर्तिता ॥

**अर्थ**— काठी कुत्रा, पिशाच, आणि चोर यांच्या भयापासून संरक्षण करिते, आणि विशेषेंकरून रात्रीं हितकारक आहे.

## भूनिंब (किराईत).

भूनिंबोवातलस्तिक्तोव्रणरोपणकारकः ॥ सरःशीतःपथ्यकरोलघुरुक्षस्तृषापहः ॥ कफंपित्तंज्वरंकुष्ठंकंडूंशोथंकृमींस्तथा ॥ सन्निपातज्वरंदाहंशूलंमेहंव्रणंतथा ॥ श्वासंकासंचप्रदरंशोषंचार्शारुचीजयेत् ॥

**अर्थ**— किराईत वातळ, कडू, व्रणरोपक, सारक, शीत, पथ्यकर, लघु, रुक्ष तृषा, कफ, पित्त, ज्वर, कुष्ट, कंडू, सूज, कृमि, सन्निपातज्वर, दाह, शूल, मेह, व्रण, श्वास, प्रदर, शोष, अर्श, आणि अरुचि यांचा नाश करितें.

## नेपाल किराईत.

नेपालनिक्तंकिंचिच्चउष्णंयोगवहंलघु ॥ निक्तंपित्तंकफंशोथंरक्तरु
कतृट्ज्वरान्जयेत् ॥ अन्येगुणास्तुभूनिंबसदृशाःकविभिर्मताः ॥

अर्थ- नेपाल किराईत किंचित उष्ण, योगवाहक, लघु, कडू, व पित्त, कफ, शोथ, रक्तरोग, तृषा, ज्वर यांचा नाश करितें, वरकड गुण किराईतासारिखे आहेत.

## किंकिराट (कंकीचें झाड-कोकई-देवबाभूळ-कासेबाभूळ).

किंकिराटंतुतुवरंनिक्तंशीतोष्णदंमनं ॥ कफपित्ततृषारक्तदोषदाह
ज्वरान्वमि ॥ मोहंविषंनाशयनीत्येवमुक्तंभिषग्वरैः ॥

अर्थ- कंकी तुरट, कडू, शीतळ, उष्ण, व कफ, पित्त, तृषा, रक्तदोष, दाह, ज्वर, वांति, मोह, व विष यांचा नाश करिते.

## कुहिली (जिचे कुसांनीं खाज पडते ती.)

मर्कटीमधुरावृष्याशीनाधातुविवर्धिनी ॥ बल्यागुर्वीचनिक्ताचक्षय
वातहरीमता ॥ शीतपित्तंरक्तदोषंव्रणंपित्तंकफंतथा ॥ रक्तपित्तं
नाशयतितत्बीजंधातुवर्धकं ॥ वृष्यंचशीतलंस्वादुगुरुवातहरंमतं॥
दुष्टव्रणंरक्तपित्तंनाशयेदितिकीर्तितं ॥ अन्येगुणास्तुसंप्रोक्तामाष
स्यसदृशाबुधैः ॥

अर्थ- कुहिली मधुर, वृष्य, शीत, धातुवर्धक, बळकर, गुरु, कडू, व क्षय, वायु, शीत, पित्त, रक्तदोष, व्रण, पित्त, कफ, रक्तपित्त, यांचा नाश करिते. हिचें बीज धातुवर्धक, वृष्य शीतळ, स्वादु, गुरु, व वात, दुष्टव्रण, आणि रक्तपित्त यांचा नाश करितें. वरकड गुण, उडिदासारिखे आहेत.

## कच्छूरा (लघु खाजकुहिली).

कच्छूरातुवरातिक्तायोनिदोषापहामता ॥
कोष्ठव्रणंरक्तकोपंशमयेदितिकीर्तिता ॥

अर्थ- लघुकुहिली तुरट, कडू, व योनिदोष, कोठरव्रण, रक्तकोप, यांचा नाश करिते.

## दधिपुष्पी (गोड कुहिली- काकांडोळा).

दधिपुष्पीतुमधुराकटुवीशीतोष्णदामता ॥ वृष्याहृद्यागुरुर्ज्ञेयामल
स्तंभाग्निमांद्यकृत् ॥ रुचिशुक्रप्रदाप्रोक्तासंतापारोचकान्जयेत् ॥
त्रिदोषशमनीप्रोक्तापूर्ववैद्यैर्मनीषिभिः ॥ बीजमस्यागुरुर्हृद्यंरुचिदं
मलस्तंभकं ॥ कफाग्निमांद्यकरणंवातंपित्तंचनाशयेत् ॥

**अर्थ—** गोड कुहिली मधुर, तिखट, शितोष्ण ह्मणजे समधात, वृष्य, हृद्य, गुरु, व मलस्तंभ, अग्निमांद्य, रुचि, व शुक्र यांना करणारी, व संताप, अरुचि, त्रिदोष, यांचा नाश करिते. हिचें बीज गुरु, प्रिय, रुचिकर, मलस्तंभक, कफकर, अग्निमांद्यकारक, व वायु, आणि पित्त, यांचें नाशक आहे.

## कुंदुरु (साळईचे झाडाचा चीक).

कुंदुरुर्मधुरस्तीक्ष्णस्तिक्तोरुच्यःकटुःस्मृतः ॥ स्निग्धस्त्वच्यस्तथा
चोष्णोज्वरस्वेदकफापहः ॥ रक्तरुक्प्रदरंवातमलक्ष्मींग्रहपीडनं ॥
रक्तातिसारंयूकांचनाशयेदितिकीर्तितः ॥

**अर्थ—** कुंदुरु मधुर, तीक्ष्ण, कडू, रुचिकर, तिखट, स्निग्ध, त्वचेला हितावह, उष्ण व ज्वर, घाम, कफ, रक्तविकार, प्रदर, वायु, अलक्ष्मीपीडा, ग्रहबाधा, रक्तातिसार आणि उवा यांचा नाश करितो.

## पांढरा कुडा.

श्वेतस्तुकुटजस्तिक्तःकटुश्चोष्णोग्निदीपकः ॥ पाचकस्तुवरोरुक्षोग्रा
हकोरक्तदोषहा ॥ कुष्ठातिसारपित्तार्शकफतृट्कृमिहामतः ॥ ज्व
रंचामंचदाहंचनाशयेदितिकीर्तितः ॥

**अर्थ—** पांढरा कुडा कडू, तिखट, उष्ण, अग्निदीपक, पाचक, तुरट, रुक्ष, ग्राहक, व रक्तदोष, कुष्ट, अतिसार, पित्तार्श, कफ, तृषा, कृमि, ज्वर, आंव आणि दाह यांचा नाश करितो.

## कुड्याचीं फुलें.

पुष्पंतुवत्सकस्योक्तंतुवरंचाग्निदीपकं ॥ तिक्तंशीतंवातलंच
लघुपित्तातिसारनुत् ॥ रक्तदोषंकफंपित्तंकुष्ठंचैवातिसारकं ॥
कृमींश्चैवहरेदेतदुक्तंपूर्वैश्चसूरिभिः ॥

**अर्थ**– कुड्याचीं फुलें तुरट, अग्निदीपक, कडू, शीतल, वातल, लघु व पित्तातिसार, रक्तदोष, कफ, पित्त, कुष्ट, अतिसार व कृमि यांचा नाश करितात.

## काळा कुडा.

कृष्णस्तुकटुजश्चोक्तोरक्तदोषार्शनाशनः ॥
त्वग्दोषपित्तशमनोगुणस्त्वन्येतुपूर्ववत् ॥

**अर्थ**– काळा कुडा रक्तदोष, अर्शरोग, त्वग्दोष व पित्त यांचा नाश करितो. वरकड गुण कुड्यासारिखे आहेत.

## ककुंदर (कुकरबंध).

ककुंदरःकटुस्तिक्तोज्वरघ्नश्चोष्णकृन्मतः ॥ रक्तरुक्कफदाहानां तृषायाश्चविनाशनः ॥ अस्यार्द्रमूलंचमुखेधारितंमुखदोषनुत् ॥

**अर्थ**– ककुंदर तिखट, कडू, ज्वरनाशक, उष्ण व रक्तविकार, कफ, दाह, तृषा यांचा नाश करितो. याचे ओलें मूळ तोंडांत धरिलें असतां मुखदोषनाशक आहे.

## कुरंडिका (लघुकलगी).

कुरंडिकासरारुच्यागुर्वीचाग्निप्रदीपनी ॥
नाशिनीकफवातानांवैद्यैस्तुपरिकीर्तिता ॥

**अर्थ**– कुरंडिका सारक, रुचिकर, गुरु, अग्निदीपक व कफ, वायु यांचा नाश करिते.

## थोर कुरंडिका (मोठी कलगी).

बृहत्कुरंडिकाशीतापाकेमाध्वीकटुःस्मृता ॥ तिक्ताक्षाराच
रुक्षाचसरावृष्याजडामता ॥ वातलापित्तलाबस्तौवातका
रीकफापहा ॥ रक्तदोषंमूत्रकृच्छ्रंनाशयेदितिकीर्तिता ॥

**अर्थ**– थोरकुरंडिका शीत, पाककाळीं मधुर, तिखट, कडू, खारट, रुक्ष, सारक, वृष्य, जड व वातल, पित्तकर, बस्तींत वायु करणारी व कफ, रक्तदोष, मूत्रकृच्छ्र यांचा नाश करिते.

## कुक्कुटक- कुरडू (सुणसुणा रानमाठ).

कुक्कुटकोक्तस्तुवरोग्राहीकोष्णोरसायनः ॥ मेधारुचिकरःशीतो

रुक्षश्चाग्निप्रदीपकः ॥ अविदाहीलघुःस्वादुर्हृद्योवृष्यस्त्रिदोषजि
त् ॥ ज्वरमेहश्वासदाहमेदकुष्ठभ्रमापहः ॥ अरोचकंनाशयनीत्ये
वमुक्तंपुराननैः ॥

**अर्थ**– कुरडू तुरट, ग्राहक, उष्ण, रसायन व मेधा रुचि यांतें करणारा, शीत रुक्ष अग्निदीपक, अविदाही, लघु, स्वादु, हृद्य, वृष्य व त्रिदोष, ज्वर, मेह, श्वास, दाह, मेद, कुष्ट भ्रम, अरुचि यांचा नाश करितो.

## देवकुक्कट (देवकुरडू).

देवकुक्कटकःशीतोवृष्योमूत्ररुजापहः ॥
अश्मर्यानाशकःप्रोक्तःपूर्ववैद्यैर्मनीषिभिः ॥

**अर्थ**– देवकुरडू शीत, वृष्य व मूत्ररोग, अश्मरी यांचा नाश करितो.

## शतपत्री (कुब्जक- पांढरी कांटेशेवती).

शतपत्रीसरावृष्याशीताहृद्याचशुक्रला ॥ लघ्वीचतुवरास्वादुःसु
रभिर्ग्राहिणीमता ॥ वर्ण्याकटुश्चतिक्ताचरुच्याचाग्निप्रदीपनी ॥
त्रिदोषंमुखपाकंचरक्तपित्तंकफंतथा ॥ पित्तंरक्तविकारंचदाहं
चैवतुनाशयेत् ॥ पुष्पंतुशीतलंवर्ण्यंवातपित्तविदाहनुत् ॥

**अर्थ**– रक्तकुब्जक सारक, शीतळ, हृद्य, शुक्रकर, लघु, तुरट, स्वादु, सुरभि, ग्राहक, वर्ण्य, तिखट, कडू, रुचिकर, अग्निदीपक व त्रिदोष, मुखपाक, रक्तपित्त, कफ, पित्त, रक्तविकार आणि दाह यांचा नाश करितो. याचें पुष्प शीतळ, वर्णकर व वातपित्त, दाह, यांचा नाश करितें.

## रक्तकुब्जक (तांबडी कांटेशेवती-गुलाबी शेवती).

रक्तस्तुकुब्जकोरक्तविकृतेर्नाशकोमतः ॥ वृश्चिकाणांवि
षंचैवत्रिदोषंचैवनाशयेत् ॥ अन्येगुणाःसमुद्दिष्टाःश्वेतकु
ब्जकवद्बुधैः ॥

**अर्थ**– रक्तकुब्जक रक्तविकृति, विंचवाचें विष, त्रिदोष, यांचा नाश करितो. वरकड गुण श्वेतकुब्जका सारिखेच आहेत.

## कुंद (कागडा).

कुंदःशीतोतिमधुरस्तुवरःसारकोलघुः ॥ पाचकोदीपकोहृद्यःकटु कस्तिक्तकःस्मृतः ॥ पित्तरोगशिरोरोगविषशोथामनाशनः ॥ रक्तदोषंचवातंचनाशयेदितिकीर्तितः ॥

अर्थ– कुंद शीत, अतिमधुर, तुरट, सारक, लघु, पाचक, दीपक, हृद्य, तिखट, कडू, व पित्तरोग, शिरोरोग, विष, सूज, रक्तदोष आणि वायु यांचा नाश करितो.

## द्रोणपुष्पी (कुंभा- तुंबा- शेतवड).

द्रोणपुष्पीरुचिकराकटूष्णाचभेदका ॥ पथ्यास्वादुःसरारुक्षागुर्वीक्षाररसामता ॥ वातपित्तकरावातककनाशकरीमता ॥ वातंचैवाग्निमांद्यंचकफंचामंचशोथकं ॥ कामलांतमकश्वासंकृमीन्शूलंचनाशयेत् ॥ पर्णंत्वस्याःस्वादुरुक्षंपित्तलंचगुरुस्मृतं ॥ भेदकंकटुकंचैवकामलायाश्चनाशकं ॥ मेहंज्वरंचशोथंचनाशयेदितिकीर्तितं ॥

अर्थ– द्रोणपुष्पी रुचिकर, तिखट, उष्ण, भेदक, पथ्यकर, गोड, सारक, रुक्ष, गुरु, खारट, वातपित्तकर, व वात, कफ, वायु, अग्निमांद्य, कफ, आम, सूज, कावीळ, तमकश्वास, कृमि, आणि शूल यांचा नाश करिते, हिचें पान स्वादु, रुक्ष, पित्तल, गुरु, भेदक, तिखट, व कावीळ, मेह, ज्वर, शोथ यांचा नाश करितें.

## देवकुंभा (देवतुंबा).

देवकुंभाकटुस्तिक्तोमेध्यःपारदशोधकः ॥ पिशाचबाधाकफहृद्वातानाग्निमांद्यनाशकः ॥ अन्येगुणाःसमुद्दिष्टाद्रोणपुष्पीसमागुणैः ॥

अर्थ– देवकुंभा तिखट, कडू, मेध्य, पारदशोधक, व पिशाचबाधा, कफ, वायु, अग्निमांद्य यांचा नाश करितो. वरकड गुण द्रोणपुष्पीसारिखे आहेत.

## कुटुंबिनी (पाहारकुटुंबी).

कुटुंबिनीतुमधुराग्राहकाचरसायणी ॥ शीतलाच

व्रणंपित्तंकफंरक्तरुजंतथा ॥ निक्तस्यनाशनक
रीमुनिभिःपरिकीर्तिता ॥

अर्थ– कुटुंबिनी मधुर, ग्राहक, रसायन, शीतल, व व्रग, पित्त, कफ, रक्तरोग, कडू रस यांचा नाश करिते.

## कुलथी (कुळी).

कुलथीशीतलास्वाद्वीवातलाकफकृत्गुरुः ॥

अर्थ– कुळी शीतळ, स्वादु, वातकर, कफकर, गुरु, असी आहे.

## कुक्कुटपादी (देवशिरस).

साराकुक्कुटपाद्युक्तामूलेरक्ताचरुक्षदा ॥
गंधेचोग्रासन्निपातकफवातविनाशिनी ॥

अर्थ– कुकुटपादी सारक. मूळाचे ठायीं आरक्त, रुक्ष, उग्रगंध, व सन्निपात, कफ, आणि वायु यांचा नाश करिते.

## कुलिंजन (कोळिंजन.) लहान व मोठें.

कुलिंजनंकटुस्तिक्तमुष्णंचाग्निप्रदीपनं ॥ रुच्यंस्वर्यंचहृद्यंचमुखकं
ठविशुद्धिकृत् ॥ मुखदोषंकफंचैवकासंवातकफंहरेत् ॥ बृहत्कु
ष्टंगुणैर्ज्ञेयंन्यूनमस्मादितिस्मृतं ॥

अर्थ– कोळिंजन तिखट, कडू, उष्ण, अग्निदीपक, रुचिकर, स्वर्य, हृद्य, व मुख, कंठ यांची शुद्धि करणारें, मुखदोष, कफ, खोकला, वायु, कफ, यांचा नाश करितें. मोठें कुष्ट याहून गुणानीं कमी आहे.

## कुटिंजर (पत्रशाक).

कुटिंजरःस्वादुपाकेक्षारोरुक्षश्चशीतलः ॥
गुरुर्मलस्तंभकरोदोषोत्पादनकारकः ॥

अर्थ– कुटिंजर पाककाळीं स्वादु, खारट, रुक्ष, शीत, गुरु, मलस्तंभक, आणि दोषोत्पादनकारक असा आहे.

## कुणिंजर-अरण्यवास्तुक ( रान चाकवत ).

अरण्यवास्तुकंरुच्यंमधुरंचाग्निदीपनं ॥ पाचकंपथ्यकृच्छी
तंबल्यंधातुविवर्धकं ॥ पित्तनाशकरंचोक्तंशाकास्यमधुरा
लघुः ॥ रुच्याकिंचित्तुवरादीपनीग्राहिणीमता ॥ कफ
पित्तेनाशयतीत्येवमाहुर्मनीषिणः ॥

**अर्थ**— कुणिंजर रुच्य, मधुर, अग्निदीपक, पाचक, पथ्यकर, शीत, बलकर, धातुवर्धक, पित्तनाशक आहे. याची शाक मधुर, लघु, रुच्य, किंचित् तुरट, दीपन, ग्राहक, व कफ, पित्त यांचा नाश करिते.

## दग्धरुहा ( कुरुहीवृक्ष ).

तिक्तादग्धरुहाचोक्तातुवरोष्णाग्निदीपनी ॥
पित्तप्रकोपनकरीकफवातविनाशिनी ॥

**अर्थ**— कुरुहीवृक्ष कडू, तुरट, उष्ण, अग्निदीपक, पित्तकोपन आणि कफवातनाशक आहे.

## कुंभीवृक्ष ( कुंभ्याचें झाड ).

कुंभीतुकटुकश्चोष्णस्तुवरोग्राहकःस्मृतः ॥ वातंपित्तज्वरंदाहंकफं
रक्तातिसारकं ॥ योनिदोषंविषंचैवकृमींश्चैवविनाशयेत् ॥

**अर्थ**— कुंभ्याचें झाड तिखट, उष्ण, तुरट, ग्राहक व वात, पित्त, ज्वर, दाह, कफ, रक्तातिसार, योनिदोष, विष आणि कृमि यांचा नाश करितें.

## केशर.

कुंकुमंसुरभिस्तिक्तंकटुकंरुचिकारकं ॥ आनंदकारकंचोष्णंकां
तिकृत्तुवरंमतं ॥ स्निग्धंकंठरुजंवातंकफंकासंचनाशयेत् ॥ शि
रःशूलंविषंवांतिंव्रणंव्यंगंकृमींस्तथा ॥ हिक्कांत्रिदोषंकुष्टंचनाशये
दितिकीर्तितं ॥ काश्मीरभूमातुत्पन्नंसूक्ष्मंरक्तंप्रकीर्तितं ॥ पद्म
गंधिचविज्ञेयमुत्तमंतत्प्रकीर्तितं ॥ बाल्हीकजंपांडुसूक्ष्मंकेतकीगं
धकृन्मतं ॥ तन्मध्यमंपारसिकंपांडुरंमधुगंधिकं ॥ अधमंत
त्समुद्दिष्टंसुज्ञैःकुंकुमवेदिभिः ॥

**अर्थ-** केशर सुगंध, कडू, तिखट, रुचिकर, आनंदकारक, उष्ण, कांतिकर, तुरट, स्निग्ध व कंठरोग, वायु, कफ, खोकला, मस्तक, शूल, विष, वांति, व्रण, व्यंग, कृमि, हिक्का, त्रिदोष, कुष्ट यांचा नाश करितें. काश्मीरदेशोत्पन्न केशर सूक्ष्म, रक्तवर्ण व पद्मगंधि असतें. हें उत्तम व बाल्हीकदेशोद्भव पांढरसर, सूक्ष्म, केतकगंधि असतें. तें मध्यम व पारसिकोद्भव केशर पांढरें, मधुगंधि असतें. हें अधम जाणावें.

## तृणकेशर.

तृणकेशरकंचोष्णंभास्वरंकटुकंमतं ॥
कफवातामशोफानांकुष्टदद्र्वादिनाशनः॥

**अर्थ-** तृणकेशर उष्ण, भास्वर, तिखट व कफ, वायु, आम, सूज, कुष्ट आणि दद्रु यांचा नाश करितें.

## केतकी ( पांढरे फुलांची केवडगी ).

श्वेतातुकेतकीकट्वीस्वाद्वीतिक्तालघुःस्मृता॥ विषंकफंनाशयति पुष्पमस्यालघुस्मृतं ॥ कटुतिक्तंकांतिकरमुष्णंवातकफापहं ॥ केशदुर्गंधतापघ्नंकेसरोसिध्मकंडुहा॥ किंचिदुष्णंफलंस्वादुवातमेहकफापहं॥

**अर्थ-** श्वेतकेतकी तिखट, गोड, कडू, लघु, व विष, कफ, यांचा नाश करिते. हिचें फूल लघु, तिखट, कडू, कांतिकर, उष्ण व वायु, कफ, केशांचा दुर्गंध यांचा नाश करितें. त्याचा केसर शिध्म्यांचा नाशक, किंचित् उष्ण असा आहे. हिचें फळ गोड व वायु, मेह आणि कफ यांचा नाश करितें.

## सुवर्ण केतकी -पिवळे फुलांची केंवड.

सुवर्णकेतकीतिक्तानेत्र्याचोष्णालघुःस्मृता ॥ कटुकामधुराचैवविषरुक्कफनाशिनी ॥अस्याःपुष्पंसुखकरंकामोद्दीपनकारकं ॥ किंचिदुष्णंचकटुकंतिक्तंनेत्र्यंसुगंधिकं ॥ स्तनोस्याश्चातिशिशिरोदेहदार्ढ्यकरःकटुः ॥ बल्यारसायनःपित्तकफस्यचविनाशकः ॥ फलकेसरयोश्चैवगुणाःपूर्वोक्तवन्मताः ॥

**अर्थ-** सुवर्णकेतकी कडू, नेत्राला हितावह, उष्ण, लघु, तिखट, मधुर व विषदोष, कफ यांचा नाश करिते. हिचें फूल सुखकर, कामोद्दीपन, किंचित् उष्ण, कडू, तिखट,

त्रहितावह, सुगंधि असें आहे. हिच्या पारंब्या म्हणजे तिचे स्तन ते अतिथंड, देहाला दृढ करणारे, तिखट, बलकर, रसायन व पित्त, कफ यांचा नाश करितात. हिच्या फळाचे केसराचे गुण श्वेतकेतकीचें फळ व केसर यांसारिखेच आहेत.

## केमुका ( कोबी, जिचे पानाचा गड्डा होतो ती).

केमुकामधुरावृष्यापाकेकट्वीचातिक्तका ॥ ग्राहिणीशीतलालघ्वी पाचकाग्निप्रदीपनी ॥ हृद्याचवातलाचैवकफपित्तज्वरान्जयेत् ॥ प्रमेहकुष्टकासघ्नीरक्तरोगविनाशिनी ॥ पित्तजन्यंभ्रमंचैवनाशयेदिनिकीर्तिना ॥

अर्थ– कोबी मधुर, वृष्य, पाककाळीं तिखट, कडू, ग्राहक, शीतळ, लघु पाचक, अग्निदीपक, हृद्य, वातकर व कफ, पित्त, ज्वर, प्रमेह, कुष्ट, खोकला, रक्तदोष, आणि पित्तजन्य भ्रम यांचा नाश करिते.

## केलूट ( कोबी जिला भुई बरोबर कंद असतो ती).

केलूटकंतुमधुरंरुक्षमच्छंचशीतलं ॥ भेदकंग्राहकंरुच्यंगुरुपित्तकफापहं ॥ वातनाशकरंचैवकंदेप्येतेगुणाःस्मृताः ॥

अर्थ– केलूट मधुर, रुक्ष, स्वच्छ, शीतळ, भेदक, ग्राहक, रुचिकर, गुरु व पित्त, कफ, वायु यांचा नाश करितें. त्याच्या कंदाचेहि तेच गुण आहेत.

## केना ( केनी भाजी ).

केनातुमधुराशीतारुच्यास्तन्यविवर्धिनी ॥

अर्थ– केना मधुर, शीतळ, रुचिकर आणि स्तनांत दूध वाढविणारी अशी आहे.

## केविका ( पुष्पविशेष ).

केविकामधुराशीतादाहपित्तश्रमापहा ॥ पित्तंछर्दिकफंवातंनाशयेदितिकीर्तिना ॥

अर्थ– केविका मधुर, शीत व दाह, पित्त, श्रम, पित्तजवांति, कफ, वायु यांचा नाश करिते.

## कैवर्त्तिका.

कैवर्तिकातुतुवरावृष्यालघ्वीकफापहा ॥
कासंश्वासंचाग्निमांद्यंनाशयेदितिकीर्तिता ॥

**अर्थ—** कैवर्तिका तुरट, वृष्य, लघु व कफ, खोकला, दमा, अग्निमांद्य यांचा नाश करिते.

## कोष्ठ (कुष्ठ- उपलोट- चोख.)

कोष्टमुष्णंकटुस्तिक्तंस्वादुवृष्यंचशुक्रलं ॥ रसायनंकांति
करंलघुवातकफापहं ॥ कुष्टंविषंविसर्पंचकंडुंदद्रुंत्रिदोष
कं ॥ पामांरक्तविकारंचकासंश्वासंतृषांतथा ॥ नाशयेदिति
चप्रोक्तंलेपनाद्वातव्याधिजित् ॥

**अर्थ—** कोष्ठ उष्ण, तिखट, कडू, गोड, वृष्य, शुक्रल, रसायन, कांतिकारक, लघु, वातकफनाशक व कुष्ट, विष, विसर्प, कंडू, दद्रु, त्रिदोष, पामा, रक्तदोष, खोकला, शांति, ताहान यांचा नाश करिते. हें लेपानें वातव्याधि नाशक आहे.

## श्वेतकुरंटक (पांढरा कोरांटा).

श्वेतःकुरंटकस्तिक्तःकेश्यःस्निग्धोमधुरस्मृतः ॥ कटुश्चोष्णो
दंतहितोवलीपलितनाशनः ॥ कुष्टंवातंरक्तदोषंकफंकंडुं
विषंतथा ॥ नाशयेद्दारुणंचैवत्वक्पिभःपरिकीर्तितः ॥

**अर्थ—** पांढरा कोरांटा कडू, केश्य, स्निग्ध, मधुर, तिखट, उष्ण, दंतांना हितावह व वलीपलित, कुष्ट, वात, रक्तदोष, कफ, कंडू, विष आणि दारुणा यांचा नाश करितो.

## रक्तकुरंटक (तांबडा कोरांटा).

रक्तःकुरंटकस्तिक्तोवर्ण्यश्चोष्णःकटुःस्मृतः ॥ शोथंज्वरंवातरोगंक
फंरक्तरुजंतथा ॥ पित्तमाध्मानकंशूलंश्वासंकासंचनाशयेत ॥

**अर्थ—** तांबडा कोरांटा कडू, वर्णकारक, उष्ण, तिखट व शोथ, ज्वर, वातरोग, कफ, रक्तविकार, पित्त, आध्मान, शूल, दमा व खोकला यांचा नाश करितो.

## किंकिरात (पीत कोरांटा).

पीतःकुरंटकश्चोष्णस्तिक्तःतुवरःस्मृतः ॥ अग्निदीपिकरोवातक
फकंडूहरःस्मृतः ॥ शोथंरक्तविकारंचत्वग्दोषंचैवनाशयेत् ॥

अर्थ— पीतकोरांटा उष्ण, कडू, तुरट, अग्निदीपक व वायु, कफ, कंडू, सूज, रक्तवि-
कार आणि त्वग्दोष यांचा नाश करितो.

## आर्तगल (नील कोरांटा).

नीलःकुरंटकस्तिक्तःकटुर्वातकफापहः ॥
शोथकंडूशूलकुष्ठव्रणत्वक्दोषनाशनः ॥

अर्थ— नीलकोरांटा कडू, तिखट, वात, कफ, सूज, कंडू, शूल, कुष्ट, व्रण आणि
त्वग्दोष यांचा नाश करितो.

## नीलझिंटी (काळा कोरांटा).

नीलाझिंटीतुकटुकातिक्तात्वग्दोषनाशिनी ॥
दंतरोगंकफंशूलंवातंशोथंचनाशयेत् ॥

अर्थ— काळा कोरांटा तिखट, कडू, त्वग्दोषनाशक व दंतरोग, कफ, शूल, वायु
आणि सूज यांचा नाश करितो.

## कोहळीचें फळ- कोहोळा.

कूष्मांडकफलंवृष्यंपुष्टिकृद्धातुवर्धकं ॥बस्तिशुद्धिकरंबल्यमतिस्वा
दुश्चशीतलं ॥ गुरुरुक्षंसारकंचहृद्यंकफकरंमतं ॥ मूत्राघातंप्रमेहं
चमूत्रकृच्छ्राश्मरीतृषां ॥ अरोचकंवातपित्तंपित्तंरक्तरुजांतथा ॥
वातंरेतोविकारंचनाशयेदितितन्मतं ॥ तत्कोमलंचातिशीतंदोष
कृत्पित्तहारकं ॥ तन्मध्यमंकफकरंपक्कंकिंचिच्चशीतलं ॥ दीपकं
चलघुस्वादुक्षारंबस्तेश्चशुद्धिदं ॥ सर्वदोषहरंपथ्यंपक्कमज्जाचमाधु
री ॥ बस्तिशुद्धिकरीवृष्यापित्तनाशकरीमता ॥

अर्थ— कोहोळा वृष्य, पुष्टिकर, धातुवर्धक, बस्तिशुद्धिकारक, बलकर, अतिस्वादु,
शीतळ, गुरु, रुक्ष, सारक, हृद्य, कफकर, मूत्राघात, प्रमेह, मूत्रकृच्छ्र, अश्मरी,

तृषा, अरुचि, वातपित्त, रक्तविकार, वायु आणि रेतोविकार यांचा नाश करितो. तो कोंवळा असतां अतिशीत, दोषकर, पित्तहर, असा आहे. तोच जून असतां कफकारक आणि पिकला असतां किंचित् शीतळ, दीपक, लघु, स्वादु, खारट, बस्तिशुद्धिकारक, सर्व दोषनाशक व पथ्य आहे. आणि याचा गीर मधुर, बस्तिशुद्धिकारक, वृष्य आणि पित्तनाशक असा आहे.

## लघु कोहळीचें फळ (कोहळा).

लघुकूष्मांडकंरुक्षंमधुरंग्राहिशीतलं ॥ दोषलंरक्तपित्तघ्नं
मलस्तंभकरंगुरु ॥ तत्पक्कंपित्तलंचाग्निदीपकंकफकार
कं ॥ कफवातयोर्नाशकरंक्षारंचकार्तभिर्मतं ॥

**अर्थ**—लघु कोहळा रुक्ष, मधुर, ग्राहक, शीतल, दोषल, रक्तपित्तनाशक, मलस्तंभक, गुरु, असा आहे व तो पिकला असतां पित्तल, अग्निदीपक, कफकर, कफवातनाशक आणि खारट, असा आहे.

## कोंव वेळू, वांवू इत्यादिकांचे.

करीरंकटुकंतिक्तमम्लंचलघुतुवरं ॥ रुच्यंचशीतलंदोषपित्तघ्नं
जायते ॥ दाहंचमूत्रकृच्छ्रंचत्रिदोषंचैवनाशयेत् ॥

**अर्थ**— कोंब तिखट, कडु, आंबट, लघु, तुरट, रुचिकर, शीतल व पित्तघ्न, दाह, मूत्रकृच्छ्र, आणि त्रिदोष यांचा नाश करितो.

## नद्याम्र-कोतुंबा (कडवणा).

नद्याम्रःकटुकश्चोष्णोरुच्यश्चमुखशोधनः ॥
दाहकृद्दीपकश्चैवकफवातंचनाशयेत् ॥

**अर्थ**— कोतुंबा तिखट, उष्ण, रुचिकर, मुखशोधन, दाहकर, दीपक, व कफवातनाशक असा आहे.

## कोलकंद.

कोलकंदःकटुश्चोष्णोविषवांतिकृमीन्जयेत् ॥

**अर्थ**— कोलकंद तिखट, उष्ण, व विष, वांति, आणि कृमि यांचा नाश करितो.

## कुमारी ( कोरफड-कोरकांडें ).

कुमारीशीतलातिक्तामदगंधिरसायनी ॥ अग्निदीप्तिकरीभेदीमधुरा
पुष्टिकृन्मता ॥ बल्यावृष्याविषघ्नीचकफपित्तज्वरापहा ॥ कफं
पित्तंश्वासकासंप्लीहांकुष्ठंचनाशयेत् ॥ गुल्मानिलयकृज्ज्वरग्रं
थित्वग्दोषनाशना ॥ विस्फोटकंरक्तरुजंचाग्निदग्धव्रणंतथा ॥
रक्तपित्तंनाशयतिपुष्पमस्यागुरुर्मतं ॥ वातंपित्तंकृमींश्चैवनाशये
दितिकीर्तितं ॥

**अर्थ**– कुमारी शीतल, कडू, मदगंधि, रसायन, अग्निदीपक, भेदक, मधुर, पुष्टिकर, बलकर, वृष्य, विषदोष, कफपित्तज्वर, कफ, पित्त, दमा, खोकला, प्लीहा, कुष्ट, गुल्मवात, यकृत्, ज्वर, ग्रंथि, त्वग्दोष, विस्फोट, रक्तविकार, अग्निदग्धव्रण, रक्तपित्त यांचा नाश करिते. हिचें फूल गुरु व वात, पित्त, कृमि यांचा नाश करितें.

## कोकिलाक्ष ( कोलिस्ता-विखरा ).

कोकिलाक्षोमधुःशीतोरुच्योबल्योगुरुःस्मृतः ॥ वृष्योम्लस्तर्पण
स्तिक्तःस्वादुःस्निग्धश्चपिच्छलः ॥ आमवातामवातातिसारतृष्णाश्म
रीरुजः ॥ वाताश्रमेहशोथामरक्तहृत्कृतनाशनोमतः ॥ पित्तंचदृष्टि
रोगंचनाशयेदितिकीर्तितः ॥ पत्रंचस्वादुतिक्तंस्याच्छोथशूलविषा
पहं ॥ आनाहवातमुदरंपांडुरोगंचनाशयेत् ॥ बंधंचमलमूत्राणां
वातस्यैवचनाशयेत् ॥ बृहत्स्यकोकिलाक्षस्यगुणास्तस्यसमासतः ॥

**अर्थ**– कोकिलाक्ष मधुर, शीतल, रुचिकर, बलकर, गुरु, वृष्य, आंबट, तर्पण, कडू, गोड, स्निग्ध, चिकण, व आमवात, आम, वातातिसार, तहान, अश्मरीरोग, वातरक्त, मेह, सूज, आंवरक्त, पित्त, दृष्टिरोग यांचा नाश करितो. याचें पान गोड, कडु, व सूज, शूल, विष, आनाहवायु, उदर, पांडुरोग, मलावष्टंभ, मूत्रावष्टंभ, वातावष्टंभ यांचा नाश करितें. थोर कोलिस्त्याचे गुण यासारिखेच आहेत.

## कोलिस्त्याचें बीज ( तालीमखाना ).

कोकिलाक्षस्यबीजंतुशीतंस्वादुकषायकं ॥ तिक्तंवृष्यंगु
रुर्बल्यंग्राहकंगर्भस्थापनं ॥ कफवातकरंचैवमलस्तंभकरं
तथा ॥ रक्तदोषंचदाहंचपित्तंचैवविनाशयेत् ॥

**अर्थ**– तालीमखाना शीत, स्वादु, तुरट, कडू, वृष्य, गुरु, बलकर, ग्राहक, गर्भस्थापनकर, कफवातकारक, मलस्तंभक, व रक्तदोष, दाह, पित्त यांचा नाश करितो.

## कौशिंबवृक्ष.

कौशिंबवृक्षश्चाम्लःस्यान्गुरुःशोषकरोमतः ॥ विदाहीपित्तलश्चैवकफकृत्कोष्ठशोधनः ॥ वातकुष्ठार्शशोथानांपित्तव्रणविनाशनः ॥ रक्तपित्तंरक्तरुजंनाशयेदितिकीर्तितः ॥ फलंमेध्यंग्राहिचोष्णंपित्तलंचगुरुर्मतं ॥ अम्लंचैवविनिर्दिष्टंवातनाशकरंमतं ॥ किंचित्पक्वंपटुश्चाम्लंरुच्यंचाग्निप्रदीपनं ॥ बल्यंचपौष्टिकंज्ञेयंसम्यक्पक्वंलघुस्मृतं ॥ अग्निदीप्तिकरंरुच्यंस्निग्धंचोष्णंमधुरस्मृतं ॥ बल्यंहृद्यंचवृष्यंचकफवातविनाशकं ॥ रसःपक्वफलस्यापिसरःस्निग्धश्चरोचनः ॥ बलवर्धनकृत्प्रोक्तःफलमज्जाग्निदीपनी ॥ बल्याचग्राहिणीचैववातपित्तविनाशिनी ॥

**अर्थ**– कौशिंबवृक्ष आंबट, गुरु, शोषकर, विदाही, पित्तल, कफकर, कोष्ठशोधक, व वायु, कुष्ठ, अर्श, सूज, पित्तव्रण, रक्तपित्त, रक्तरोग यांचा नाश करितो. याचें फळ मेध्य, ग्राहक, उष्ण, पित्तल, जड, आंबट, वातनाशक आहे. तेंच अर्धपक्व असतां खारट, आंबट, रुचिकर, अग्निदीपक, बलकर, पौष्टिक आहे. तेंच चांगलें पिकलें असतां लघु, अग्निदीपक, रुचिकर, स्निग्ध, उष्ण, मधुर, बलकर, हृद्य, वृष्य, व कफवातनाशक आहे. पिकल्या फळाचा रस सारक, स्निग्ध, रुचिकर, बलवर्धक, आहे. याच्या फळाचा गीर अग्निदीपक, बलकर, ग्राहक, व वातपित्तनाशक आहे.

## कंकोळ (शीतळ चिनी)

कंकोलंकटुकंतिक्तमुष्णंदीपनपाचकं ॥ रुच्यंहृद्यंसुगंधिश्चलघुश्चकफनाशकं ॥ मुखजाड्यंवातरोगंहृद्रोगंचकृमींस्तथा ॥ अंधत्वंमुखदौर्गंध्यमामंचैवाग्निमांद्यकं ॥ नाशयेदितिचप्रोक्तंऋषिभिःसूक्ष्मदर्शिभिः ॥ एतेगुणास्तुसुबृहत्कंकोलस्यापिगद्यते ॥

**अर्थ**– कंकोळ तिखट, कडू, उष्ण, दीपन, पाचन, रुचिकर, हृद्य, सुगंधी, लघु, कफनाशक व मुखजाड्य, वातरोग, हृद्रोग, कृमि, अंधत्व, मुखदुर्गंध, आम, अग्निमांद्य यांचा नाश करितो. व बृहत्कंकोळाचे गुण याप्रमाणेंच आहेत.

## कंकुष्ठ, श्वेत व पीत दोन प्रकारचें.

कंकुष्ठंसारकंचोष्णंतिक्तंकांतिकरंकटु ॥ सारकंभेदकंचैवव्रणरोपणकारकं ॥ वांतिकृन्मूत्रकृच्छ्राणांप्रमेहस्यचकारकं ॥ कफवातंव्रणंशूलमुदरंकृमिशोथकं ॥ आध्मानवातंगुल्मंचआनाहंशोफजंज्वरं ॥ उदावर्तंनाशयतीत्येवमाहुर्मनीषिणः ॥

**अर्थ—** मुडदाडशिंग सारक, उष्ण, कडू, कांतिकर, सारक, भेदक, व्रणरोपण, वांति, मल व मूत्र, प्रमेह यांना करणारें व कफ, वायु, व्रण, शूल, उदर, कृमि, सूज, आध्मानवायु, गुल्म, आनाह, सुजेपासून आलेला ज्वर आणि उदावर्त यांचा नाश करितें.

## कंटकत्रितय ( गोखरू रिंगणी डोरली ).

कंटकत्रितयंप्रोक्तंत्रिदोषभ्रमनाशकं ॥
ज्वरंपित्तंचहिक्कांचतंद्रालापंचनाशयेत् ॥

**अर्थ—** कंटकत्रितय त्रिदोष, भ्रम, ज्वर, पित्त, उचकी, झापड आणि बडबड यांचा नाश करितें.

## कंदपंचक ( तैलकंद, सुकंद, क्रोडकंद रुदंती. अहिनेत्रकंद ).

कंदस्यपंचकंप्रोक्तंताम्रादिरसमारकं ॥
सर्वरोगहरंप्रोक्तमेतद्रामस्यपंचकं ॥

**अर्थ—** कंदपंचक ताम्रादि सप्त धातु व पारद यांना मारणारें व सर्वरोगनाशक आहे.

## कडवीकंकोळी.

तिक्तकंकोलकीग्राहिण्युष्णारुचिकरीमता ॥ मलावष्टंभकरणीपित्तलाचाग्निदीपनी ॥ कफप्रमेहकुष्ठंचजंतूंश्चैवविनाशयेत् ॥

**अर्थ—** कडवी कंकोळी ग्राहक, उष्ण, रुचिकर, मलस्तंभकारक, पित्तल, अग्निदीपक व कफ, प्रमेह, कुष्ट व जंतु यांचा नाश करिते.

## कंचुकशाक ( बोबके ).

कंचुकीशाकवृक्षस्तुवातलाग्राहिणीमता ॥

क्षुद्रकरीकफपित्तानांनाशिनीपरिकीर्तिता ॥

**अर्थ–** कंचुक शाक वातल, ग्राहक, क्षुधाकारक व कफ, पित्त यांचा नाश करणारी अशी आहे.

## क्वाथ ( काढा ).

क्वाथःसप्तविधश्चोक्तःपाचनःशोधनोमतः ॥ क्लेदनःशमनश्चैवदीपनस्तर्पणस्तथा ॥ शोषकश्चैवभेदैस्तुगुणास्तस्यब्रवीमिते ॥ अर्धांशःपाचनश्चोक्तोरव्यांशःकोष्ठशुध्दिकृत् ॥ चतुर्थांशोघर्मकारोव्वष्टांशोरोगनाशनः ॥षष्ठांशश्चाग्निजनकःषोडशांशस्तुशोषणः ॥ पंचमांशस्तृप्तिकारीमुनिभिःपरिकीर्तितः ॥

**अर्थ–** काढा पाचन, शोधन, क्लेदन, शमन, दीपन, तर्पण, शोषक व भेदक, असा सात प्रकारचा. अर्धा उरवावा तो पाचन करितो. बारावा हिस्सा उरवावा तो कोष्टशुद्धिकारक. चतुर्थांश ठेवावा तो घाम काढितो. अष्टमांश उरवावा तो रोगाचें शमन करितो. सहावा अंश ठेवावा तो अग्निदीपन करितो. पांचवा हिस्सा उरवावा तो तृप्ति करितो. सोळावा अंश ठेवावा तो शोषण करितो.

## खसखशीचें झाड- ड्यापासून अफू होते तें.

खसखसंग्राहकंबल्यंगुरुवृष्यंकफप्रदं ॥ पाकेचमधुरंवीर्यकांतिदंबलदंमतं ॥ वातंपित्तंनाशयतिफलंरुक्षंचग्राहकं ॥ रक्तशोषकरंप्रोक्तंफलवल्कंतुशीतलं ॥ लघुतिक्तंग्राहकंचतुवरंवातकृन्मतं ॥ रुच्यंचसप्तधातूनांशोषकंपुंस्त्वनाशकं ॥ रुक्षंमदकरंचाग्निवर्धनंमोहकंमतं ॥

**अर्थ–** खसखशीचें झाड ग्राहक, बलकार, गुरु, वृष्य, कफप्रद, पाककालीं मधुर, वीर्यप्रद, कांतिकारक, बलकर व वात, पित्त यांचा नाश करणारें आहे. याचें फळ रूक्ष, ग्राहक, रक्तशोषक आहे. व फळाची साल शीतळ, लघु, कडु, ग्राहक, तुरट, वातकारक, रुच्य, सप्तधातुशोषक, पुंस्त्वनाशक, रूक्ष, मदकर, अग्निवर्धक आणि मोहक असें आहे.

## खसखस.

खसबीजंकफकरंबल्यंवृष्यंगुरुमतं ॥
मधुरंग्राहकंवातनाशकंपरिकीर्तितं ॥

अर्थ— खसखस कफकारक बल्य, वृष्य, गुरु, मधुर, ग्राहक आणि वातनाशक असी आहे.

## पिकलेलें खर्बूज.

पक्वंतुखर्बुजंतृप्तिकारकंपौष्टिकंमतं ॥ कफकृन्मूत्रलंबल्यंकोष्ठशुद्धिकरंगुरु ॥ स्निग्धंसुस्वादुशीतंचवृष्यंदाहश्रमापहं ॥ वातंपित्तंच उन्मादंनाशयेदितितन्मतं ॥ तत्कोमलंमधुरंतिक्तंकिंचिदम्लंचतन्मतं ॥ तत्तुवृद्धंचमधुरंरसेक्षारंच अम्लकं ॥ रक्तपित्तंमूत्रकृच्छ्रं करोतीतिबुधाजगुः ॥

अर्थ— पिकलेलें खर्बूज तृप्तिकर, पौष्टिक, कफकर, मूत्रल, बल्य, कोष्टशुद्धिकर, स्निग्ध, सुस्वादु, शीत, वृष्य व दाह, श्रम, वायु, पित्त, उन्माद यांचा नाश करितें. तें कोंवळें असतां मधुर, कडु, किंचित् आंबट असें आहे. व तें जून असतां मधुर, रसकाळीं खारट, आंबट व रक्तपित्त व मूत्रकृच्छ्र याना करितें.

## साधारण खजुरी (शिंदी).

खर्जूरीतुवराज्ञेयासापक्वामधुरामता ॥ तुवराशीतलावृष्याश्लेष्मशुक्रविवर्धिनी ॥ लघ्वीचकृमिकृज्ज्ञेयावातपित्तमदापहा ॥ मूर्छांमदात्ययंदाहंक्षयंचैवविनाशयेत् ॥

अर्थ— खजुरी पिकली असतां मधुर, तुरट, शीतळ, वृष्य, व कफ, शुक्र यांतें वाढविणारी, लघु, जंतुकारक, वात, पित्त, मद, मूर्छा, मदात्यय, दाह, आणि क्षय यांचा नाश करिते.

## पिंडखजुरी.

पिंडखर्जूरिकावृष्यास्वाद्वीशीतागुरुर्मता ॥ अग्निमांद्यंकृमींश्चवकरोतींतद्धमता ॥ धातुवृद्धिंचतृप्तिंचपुष्टिंचैवकरोतिहि ॥ हृद्याच स्यादुर्जराचस्निग्धापाकेरसेमधुः ॥ रक्तपित्तंचपित्तंचदाहंश्वासंकफंश्रमं ॥ क्षतक्षयंविषंतृष्णांशोषंचैवविनाशयेत् ॥ अम्लपित्तंनाशयतीत्येवमाहुर्मनीषिणः ॥

अर्थ— पिंडखजूरी वृष्य, स्वादु, शीत, गुरु व अग्निमांद्य, कृमि, धातुवृद्धि, तृप्ति, पुष्टि यांना करणारी, हृद्य, बल्य, दुर्जर, स्निग्ध, पाककाळीं व रसकाळीं मधुर व रक्तपित्त, पित्त, दाह, श्वास, कफ, श्रम, क्षतक्षय, विष, तृष्णा, शोष आणि अम्लपित्त यांचा नाश करिते.

## थोर खर्जूरी.

बृहत्खर्जूरिकायास्तुगुणाःखर्जूरिवन्मताः ॥
राजोत्तराचखर्जूरीपिंडखर्जूरिवन्मता ॥

अर्थ– थोरखर्जूरी हिचे गुण खजुरीसारिखे आहेत. आणि राजखजूरीचे गुण पिंड-खजूरीसारिखे आहेत.

## मधुखर्जूरी ( गोड शिंदी ).

मधुखर्जूरिकावृष्यामधुराशीतलागुरुः ॥ जंतुकारीतृप्तिकारीधातुवृद्धिकरामता ॥ स्निग्धारुच्याचहृद्याचपौष्टिकीमलबंधिनी ॥ क्षतक्षयंरक्तपित्तंकोष्ठवातंकफंज्वरं ॥ वातंक्षुधांचाभिघातंतृष्णांकासंमदंजयेत् ॥ श्वासंमूर्छांवातपित्तंपित्तंचैवांवनाशयेत । मद्यजन्यंचरोगंचनाशयेदितिकीर्तिता ॥

अर्थ– मधुखर्जूरी वृष्य, मधुर, शीतल, गुरु, जंतुकर, तृप्तिकारक, धातुवर्धक, स्निग्ध, रुच्य, हृद्य, पुष्टिकर, मलबंधक व क्षतक्षय, रक्तपित्त, कोष्ठगतवायु, कफ, ज्वर, वायु, क्षुधा, अभिघात, तृष्णा, खोकला, मद, दमा, मूर्छा, वातपित्त, पित्त आणि मद्यविकार यांचा नाश करिते.

## भूखर्जूरी ( लघुशिंदी ).

भूखर्जूरीतुमधुराशीतापित्तविनाशिनी ॥
दाहनाशकरीप्रोक्तागुणास्त्वन्येतुपूर्ववत् ॥

अर्थ– भूखर्जूरी मधुर, शीतळ, पित्तनाशक, दाहनाशक अशी आहे. बाकीचे गुण मधुखर्जूरीसारिखेच आहेत.

## द्वीपांतरस्थ खर्जूरी-लघुपालेवत.

द्वीपांतरस्थाखर्जूरीवृष्याहृद्याचमाधुरी ॥ स्निग्धारुच्याधातुवृद्धिकारिणीकृमिनाशनी ॥ वातंतृषांज्वरंदाहंभ्रमशोषश्रमापहा ॥ मूर्छांचनाशयत्येवगुणास्त्वन्येतुपूर्ववत् ॥

अर्थ– लघुपालेवत वृष्य, हृद्य, मधुर, स्निग्ध, रुचिकर, धातुवर्धक, कृमिनाशक व वायु, तृषा, ज्वर, दाह, भ्रम, शोष, श्रम, मुर्छा यांचा नाश करिते.

## महापालेवत-थोर द्वीपांतरस्थ खर्जूरी.

बृहद्द्वीपांतरस्थायाखर्जूरीपुष्टिकृन्मता ॥ बल्यावृष्याचमधुराशीत
लाकफकारिणी ॥ अग्निमांद्यकरीगुर्वीमूर्छावातंज्वरंजयेत् ॥ सा
पक्वारुचिकृद्वल्याचाग्निदीप्तिकरामता ॥ गुणास्त्वन्येतुविज्ञेयालघु
पालेवतनाधिकाः ॥

अर्थ– महापालेवत पुष्टिकारक, बलकर, वृष्य, मधुर, शीतळ, कफकारक, अग्निमांद्य-कर, गुरु व मूर्छा, वात आणि ज्वर यांचा नाश करितो. तोच पिकला असतां रुचि-कर, बल्य, अग्निदीपक आहे. बाकीचे गुण लघुपालेवतासारिखे आहेत.

## सिलेमानी खारीक.

द्वीपांतरस्थासंशुष्काखर्जूरीभ्रांतिनाशिनी ॥
श्रमंमूर्छांरक्तपित्तंदाहंचैवविनाशयेत् ॥

अर्थ– सिलेमानी खारीक भ्रांति, श्रम, मूर्छा, रक्तपित्त आणि दाह यांचा नाश करिते.

## खर्जूरीचा मस्तक ( मज्जा, हाडी, पांजर ).

खर्जूरीशीर्षमज्जातुवृष्यास्वाद्वीकफापहा ॥
रक्तदोषस्यशमनीमुनिभिःपरिकीर्तिता ॥

अर्थ– खजूरीच्या शेंड्यांचा गीर वृष्य, स्वादु व कफ, रक्तदोष यांचा नाश करितो.

## खर्जूरीवृक्षाचें पाणी.

खर्जूरीवृक्षजातंतुजलंचाग्निप्रदीपकं ॥ रुच्यंबल्यंधातुवृद्धिकार
कंपित्तलंमतं ॥ मादकंकफवातानांनाशनंसंप्रकीर्तितं ॥

अर्थ– खर्जूरीवृक्षाचें पाणी अग्निदीपक, रुच्य, बल्य, धातुवर्धक, पित्तल, मादक व कफ, वायु यांचा नाश करितें.

## तांबडी खरसंबळी ( आबईची शेंग ).

रक्तखर्सबलीशिंबीगुरुःशीताकफप्रदा ॥

रसेनुमधुरावल्याच्चित्तवातविनाशिनी ॥

अर्थ– तांबडी खरसंबळी जड, शीतळ, कफकर रसकाळीं मधुर, बलकर व पित्त, वायु यांचा नाश करिते.

## पांढरी खरसंबळी.

शुक्लखरसंबलीप्रोक्तागुणैरक्तावईसमा ॥

अर्थ– पांढरी खरसंबळी ही गुणांनीं रक्तखरसंबळींत सारखीच आहे.

## काळी खरसंबळी.

कृष्णाखरसंबलीचोष्णागुर्वीबल्यारुचिप्रदा ॥ शुक्राग्निमांद्यजननी

मलस्तंभकरीमता ॥ तुवरामादकावातकफनुत्पित्तलामता ॥

अर्थ– काळी खरसंबळी उष्ण, गुरु, बल्य, रुचिप्रद, शुक्रवृद्धिकारक, अग्निमांद्यजनक, मलस्तंभक, तुरट, मादक व कफवातनाशक आणि पित्तकर अशी आहे.

## खडी (खडू).

खटिकामधुराशीतकाशीतलाव्रणदोषहा ॥

पित्तंदाहंकफंरक्तदोषंनेत्ररुजंजयेत् ॥

अर्थ– खडू मधुर, कडू, शीतळ व व्रणदोष, पित्त, दाह, कफ, रक्तदोष व नेत्ररोग यांचा नाश करितो.

## श्वेत खडू.

श्वेतायाःखटिकायास्तुगुणाःसाधारणाःस्मृताः ॥

अर्थ– श्वेत खडूचे गुण साधारण खडूसारखे आहेत.

## वृश्चिकाली (खाजकुहिली, खाजकोलती, आग्या).

वृश्चिकालीतुबल्यास्यात्तिक्ताकट्वीविबंधनुत् ॥ हृद्याचोष्णाबस्तिशु

द्धिकारिणीरक्तपित्तहा ॥ अरोचकंनाशयनीत्येवमाहुर्मनीषिणः ॥

अर्थ– खाजकोलती बलकर, कडू, तिखट, विबंधनाशक, हृद्य, उष्ण, बस्तिशुद्धिकारक, व रक्तपित्त, अरोचक यांचा नाश करिते.

## साधारण खैर.

खदिरःपाचकःशीतोरसेतिक्तःकषायकः ॥ रक्तप्रसादनो
दंत्यःकफपित्तकृमिव्रणान् ॥ कुष्टंकंडूंज्वरंशोथंकासंमेदं
प्रमेहकं ॥ आमंचारोचकंपांडुरक्तदोषंचनाशयेत् ॥

अर्थ— खैर पाचक, शीत, रसकाळीं कडू, तुरट, रक्तशुद्धिकारक, दंताला हितावह व कफ, पित्त, कृमि, व्रण, कुष्ट, कंडू, ज्वर, शोथ, खोकला, मेद, प्रमेह, आम, अरोचक, पांडुरोग आणि रक्तदोष यांचा नाश करितो.

## श्वेत खैर.

श्वेतारिमेदस्तुवरस्तिक्तश्चोष्णःकटुःस्मृतः ॥ विशदःशीतलःप्रोक्तः
कफवातव्रणापहः ॥ भूतबाधांप्रमेहंचसर्वकुष्टानिनाशयेत् ॥ कं
डूंमेदंरक्तदोषंपांडुरोगंज्वरंतथा ॥ अरोचकंचाम्लपित्तमामंशोथं
चनाशयेत् ॥

अर्थ— श्वेतखैर तुरट, कडू, उष्ण, तिखट, विशद, शीतळ व कफ, वायु, व्रण, भूतबाधा, प्रमेह, संपूर्ण कुष्ट, कंडू, मेद, रक्तदोष, पांडुरोग, ज्वर, अरुचि, आम्लपित्त, आम आणि सूज यांचा नाश करितो.

## रक्त खैर.

रक्तारिमेदस्तुवरःकिंचिदुष्णश्चशीतलः ॥ तिक्तोगुरुर्दंतहितोव्रण
वातविनाशनः ॥ आमवातंज्वरंमेहंमेदंरक्तरुजंतथा ॥ भूतबाधां
कृमीन्शोथंश्वेतकुष्टमरोचकं ॥ आमंपित्तंपांडुरोगंकफंशीतंवि
नाशयेत् ॥ पित्तंकासंचशुक्रंचकंडूंचैवविनाशयेत् ॥

अर्थ— रक्तखैर तुरट, किंचित् उष्ण, शीतळ, कडू, गुरु, दंताला हितावह व व्रण, वायु, आमवात, ज्वर, मेह, मेद, रक्तविकार, भूतबाधा, कृमि, सूज, श्वेतकोड, अरुचि, आम, पित्त, पांडुरोग, कफ, शीत, पित्त, खोकला, शुक्रधातु आणि कंडू यांचा नाश करितो.

## खैराचा डीक.

अरिमेदस्यनिर्यासोमधुरस्तुबलप्रदः ॥
धातुवृद्धिकरश्चैवमुनिभिःसंप्रभाषितः ॥

अर्थ— खैराचा डीक मधुर, बलकर, धातुवर्धक असा आहे.

## खैराचा सार ( नार, साड ).

सारस्तुखादिरस्याथव्रण्यश्चविशदोमतः ॥
रक्तदोषंकफंचैवमुखरोगंचनाशयेत् ॥

अर्थ— खैराचा सार व्रण्य, विशद, व रक्तदोष, कफ, आणि मुखरोग यांचा नाश करितो.

## लघुखैर-शेण्या खैर-गांधियाहिंवर.

लघुस्तुखादिरःप्रोक्तस्तिक्तोष्णश्चकषायकः ॥ कटुस्तीक्ष्णश्चअम्लश्चरुक्षःकृमिकफापहः ॥ मुखरोगंदंतरोगंरक्तदोषंप्रमेहकं ॥ मर्दकंडूंविसर्पंचबस्तिरोगांविषंज्वरं ॥ पिशाचबाधामुन्मादंकुष्टंदाहंव्रणंतथा ॥ आध्मानंनाशयत्येवफलंचास्यमधुरस्मृतं ॥ स्निग्धंकटूष्णं चमनंकफवातविनाशकं ॥

अर्थ— लघुखैर कडु, उष्ण, तुरट, तिखट, तीक्ष्ण, आंबट, रुक्ष, व कृमि, कफ, मुखरोग, दंतरोग, रक्तदोष, प्रमेह, कंडू, विसर्प, बस्तिरोग, विषमज्वर, पिशाचबाधा, उन्माद, कुष्ट, दाह, व्रण, आणि आध्मान यांचा नाश करितो. याचें फळ मधुर, स्निग्ध, तिखट, उष्ण, आहे. व कफ, वायु, यांचा नाश करितें.

## वल्लीखदिर ( वेल्याखदिर, आरि ).

वल्लीखादिरकोतिक्तःकटुश्चोष्णःकषायकः ॥
रसेम्लःश्वासकासघ्नःपित्तरक्तत्रिदोषजित् ॥

अर्थ— वल्लीखदिर कडु, तिखट, उष्ण, तुरट, रसकाळीं आंबट व दमा, खोकला, पित्त, रक्तविकार, आणि त्रिदोष यांचा नाश करितो.

## गजपिंपळी ( मिरवेलीची पिंपळी ).

गजपिप्पलिकाचोष्णाकटूरुक्षाग्निदीपनी ॥ नवराम्ननकर्णानांवग्निग्राहिणीमता ॥ कासज्वरातिसारघ्नीकफश्वासरुजापहा ॥ कंठरोगंवानरोगंकृमींश्चैवविनाशयेत् ॥

**अर्थ**— गजपिंपळी उष्ण, तिखट, रुक्ष, अग्निदीपन, तुरट, व स्तन, आणि कान यांना वाढणारी, ग्राहक, व खोकला, ज्वर, अतिसार, कफ, दमा, कंठरोग, वातरोग, आणि कृमि, यांचा नाश करिते.

## गंधप्रियंगु (गव्हला, फुलफेन).

गंधप्रियंगुस्तुवरस्तिक्तोवृष्यश्चशीतलः ॥ केश्योवांतिभ्रांतिदाहपित्तरक्तरुजस्तथा ॥ ज्वरमोहस्वेदकुष्ठमुखजाड्यतृषाहरेत् ॥ वात गुल्मंविषंमेदंमेहंचैवविनाशयेत् ॥ रक्तपित्तंनाशयतिवीजमस्यकषायकं ॥ मधुरंशीतलंरुक्षंतुवरंग्राहकंगुरु ॥ मलस्तंभकरंवन्ध्यंपित्तघ्नंकफनाशकं ॥ आध्मानकारकंचैवमुनाभिःपरिकीर्तितं ॥

**अर्थ**— गव्हला तुरट, कडू, वृष्य, शीतल, केशाला हितावह, वांति, भ्रांति, दाह, पित्त, रक्तरोग, ज्वर, मोह, घर्म, कुष्ठ, मुखजाड्य, तृषा, वात, गुल्म, विष, मेद, मेह, रक्तपित्त यांचा नाशक आहे. याचे बीज तुरट, मधुर, शीतल, रुक्ष, ग्राहक, मलस्तंभकर, वन्ध्य, पित्तनाशक, कफनाशक, आध्मानवायुकारक असें आहे.

## दुसरा सुगंध गव्हला.

सुगंधफलिनीशीतासुगंधिःकुष्ठदाहनुत् ॥
ज्वररक्तविकारंचनाशयेदितिकीर्तितः ॥

**अर्थ**— सुगंधगव्हला शीतल, सुगंधि, व कुष्ठ, दाह, ज्वर, रक्तविकार यांचा नाश करितो.

## भूतृण (गवत साधारण).

भूतृणंकटुकंतिक्तंतीक्ष्णंचोष्णंलघुस्मृतम् ॥ रुच्यंदाहकरंचाग्निदीपकंरुक्षमीरितम् ॥ नेत्राणामहितंचैवमुखशुद्धिकरंतथा ॥ रक्तपित्तकरंचैवावृष्यमुत्क्लेदकारकं ॥ उदर्दंचकफंचैवकासंश्वासमरोचकं ॥ कफजन्यकृमींश्चैववांतिंपित्तंचनाशयेत् ॥ पिशाचग्रहपीडांचवातंदाहंविषंतथा ॥ रक्तदोषंचदद्रुंचनाशयेदितिकीर्तितं ॥

**अर्थ**— गवत साधारण तिखट, कडू, तीक्ष्ण, लघु, रुच्य, दाहकारक, अग्निदीपक, रुक्ष, नेत्रांला अहितकारक, मुखशुद्धिकारक, रक्तपित्तकारक, वृष्य, उत्क्लेदकारक, व उदर्द, कफ, खोकला, दमा, अरुचि, कफजन्यकृमि, वांति, पिशाच, ग्रहपीडा, वात, दाह, विष, रक्तदोष, दद्रु यांचा नाश करितें.

## इक्षुदर्भा ( अश्वालु, मुठेंगवत ).

इक्षुदर्भातुमधुरास्निग्धाकिंचित्कषायका ॥
लघुःसंतर्पणीहृद्याकफपित्तविनाशिनी ॥

**अर्थ—** इक्षुदर्भा मधुर, स्निग्ध, किंचित् तुरट, लघु, संतर्पण, हृद्य व कफ, पित्त यांचा नाश करिते.

## गोमूत्रिका ( तांबटी गवत, थोर शिपी गवत ).

गोमूत्रिकातुमधुरावृष्यागोःस्तन्यवर्धिनी ॥

**अर्थ—** गोमूत्रिका मधुर, वृष्य, आणि गाईचें दूध वाढविणारें आहे.

## सुगंध तृण ( पुदिनी गवत ).

सुगंधिकतृणंकिंचित्कटुस्निग्धंरसायनं ॥
सुगंधिमधुरंशीतंकफपित्तश्रमापहं ॥

**अर्थ—** सुगंधतृण किंचित् कटु, स्निग्ध, रसायन, सुगंधि, मधुर, शीत व कफ, पित्त, आणि श्रम यांचा नाश करितें.

## अश्वल ( घोडेसर, जिनागा गवत ).

अश्वलंचतृणंबल्यंरुच्यंपशुहितावहं ॥

**अर्थ—** घोडेसर बलकर, रुचिकर, व पशूंला हितावह, असें आहे.

## शिलिपिका ( लहान शिपी गवत ).

शिलिपिकामधुराशीतावीजमस्याबलप्रदं ॥
वृष्यंमुनिभिराख्यातंपूर्वैर्वैद्यकशिक्षकैः ॥

**अर्थ—** शिपीगवत मधुर, शीत आहे. ह्याचें बीज बल देणारें, वृष्य असें आहे.

## निःश्रेणि गवत.

तृणंनिःश्रेणिसंज्ञंतुपशूनांबलनाशकं ॥
रसेचोष्णंसमुद्दिष्टंबुधैर्वैद्यप्रपूजितैः ॥

अर्थ— निःश्रेणि गवत पशूंच्या बलाचा नाश करणारें व रसकाळीं उष्ण, असें आहे.

## जरटी ( गोंडा लोणा गवत ).

तृणंजरटिसंज्ञंतुमधुरंशीतलंसरं ॥
रुच्यंपशूनांस्तन्यकरंदाहरक्तरुजाकरं ॥

अर्थ— गोंडा लोणागवत मधुर, शीतळ, सारक, रुचिकर, पशूंना दूध वाढविणारें. रुचिकर व दाह, रक्तदोष यांनें करणारें असें आहे.

## मज्जर ( पवना गवत ).

तृणंमज्जरसंज्ञंतुमधुरंस्तन्यदंगवां ॥

अर्थ— मज्जरगवत मधुर, गाईंचें स्तन्य वाढविणारें असें आहे.

## मृगप्रिय ( गोंडें गवत ).

तृणंमृगप्रियंबल्यंरुच्यंपुष्टिकरंमतं ॥
सर्वकालेपशूनांचहितमुक्तंमनीषिभिः ॥

अर्थ— मृगप्रिय बलकर, रुच्य, पुष्टिकर, व सर्वकाळीं पशूंला हितावह असें आहे.

## वेणुपत्री गवत.

वेणुपत्रीतृणंशीतंमधुरंरुचिकारकं ॥
पशूनांस्तन्यजननंरक्तकफपित्तनाशकं ॥

अर्थ— वेणुपत्री गवत शीत, मधुर, रुचिकारक, पशूंना स्तन्य वाढविणारें व रक्तविकार आणि पित्त यांचा नाश करितें.

## मंथानक ( मुरें गवत ).

मंथानकतृणंस्निग्धंधेनूनांचप्रियंमतं ॥
दुग्धस्योत्पादकंधातुवर्धकंमधुरंमतं ॥

अर्थ— मंथानक गवत स्निग्ध, गाईंना प्रिय, दूध उत्पन्न करणारें, धातुवर्धक व मधुर असें आहे.

## पल्लीवाह ( पोकळी गवत, तांबडे पातीचें ).

पल्लीवाहतृणंप्रोक्तमदृढंबलनाशकं ॥

अर्थ— पल्लीवाह गवत अदृढ व पशूंच्या बलाचा नाश करितें.

## कुंदरु ( कुंदा गवत ).

कुंदरुर्मधुरंशीतंबल्यंपुष्टिकरंमतं ॥
गोःप्रशस्तंसमुद्दिष्टंपित्तानिलास्रनाशकं ॥

अर्थ— कुंदरु मधुर, शीत, बलकर, पौष्टिक, गुरांना प्रशस्त आणि आमानिलार याचा नाश करितें.

## चणिका ( चणेगवत, वर्णया गवत ).

चणिकंमधुरंवृष्यंबल्यंदुग्धप्रदंमतं ॥
अतिनीलंचवर्णेनपशूनांचहितावहं ॥

अर्थ— चणेगवत मधुर, वृष्य, बलकर, दुग्धप्रद, अतिनीलवर्ण व पशूंना हितावह असें आहे.

## शूली ( सुळेंगवत ).

शूलीतृणंकिंचिदुष्णंगुरुस्निग्धंमधुरंमतं ॥
दुग्धवृद्धिकरंबल्यंरुच्यंवैपित्तदाहनुत् ॥

अर्थ— सुळेंगवत उष्ण, गुरु, स्निग्ध, मधुर, दुग्धाला वाढविणारें, बलप्रद, रुच्य व पित्त, दाह याचें नाशक असें आहे.

## लवण तृण ( लोणा गवत ).

तृणंतुलवणंक्षारमम्लंचतुवरंमतं ॥
स्तन्यनाशकरंचाश्वपुष्टिकृद्दर्षिभिर्मतं ॥

अर्थ— लवणतृण खारट, आंबट, तुरट, स्तन्यनाशक आणि घोड्याला पुष्टि देणारें असें आहे

## शूकतृण ( कुसळें गवत ).

शूकयुक्तंतृणंप्रोक्तंदुर्जरंचचतुष्पदां ॥
तच्छूकरहितंप्रोक्तंहितंचमहिषीगवां ॥

**अर्थ—** शूकतृण गुरांना दुर्जर आहे. व तेंच कुसळांवांचून महिषीला व गाईला हितावह असें आहे.

## पण्यंध ( पेंधेंगवत ).

तृणंपण्यंधकंतिक्तंसारकंचमतंपटु ॥ शस्त्रक्षतहरंह्रस्वदीर्घ
मध्यमभेदतः ॥ त्रिप्रकारंसमुद्दिष्टमेतत्तज्ज्ञैश्चपंडितैः ॥

**अर्थ—** पेंधेंगवत कडु, सारक, खारट, शस्त्रक्षतनाशक आहे. हें ऱ्हस्व, दीर्घ व मध्यम या भेदानीं तीन प्रकारचें आहे.

## असिपत्र ( गुंडा गवत-निधारी ).

असिपत्रतृणंशीतंमधुरंकफवातनुत् ॥ रक्तदोषातिसाराणां
नाशकंदाहनुत्परं ॥ द्विप्रकारंदीर्घलघुभेदैर्दीर्घंगुणाधिकं ॥

**अर्थ—** गुंडा गवत शीत, मधुर व कफ, वायु, रक्तदोष, अतिसार, दाह, यांचा नाश करितें. हें दीर्घ व लघु या भेदानीं दोन प्रकारचें.

## कट्तृण (सुगंध रोहिस तृण.)

कट्तृणंकटुकंतिक्तंतुवरंचसुगंधिकं ॥ उष्णंपित्तंरक्तदोषंकफंकं
डूंकृमींस्तथा ॥ हृद्रोगंश्वासकासंचज्वरंशूलमजीर्णकं ॥ अरु
चिंचविषूचिंचप्लीहांकंठरुजंतथा ॥ शस्त्रशल्यादिदोषंचवातरक्तं
तथामतं ॥ बालग्रहान्नाशयतीत्येतत्प्रोक्तंमनीषिभिः ॥

**अर्थ—** कट्तृण तिखट, कडु, तुरट, सुगंधि, उष्ण, पित्त, रक्तदोष, कफ, कंडु, कृमि, हृद्रोग, दमा, खोकला, ज्वर, शूल, अजीर्ण, अरुचि, विषूचिका, प्लीहा, कंठरोग, शस्त्राचे क्षत, शल्यक्षत, वातरक्त आणि बालग्रह यांचा नाश करितें.

## मोठें सुगंध रोहिस तृण- दीर्घनाल,

दीर्घनालतृणंतिक्तंकटुश्चोष्णंकफापहं ॥ पिशाचंग्रहपीडां

चन्नातंचैवविषंजयेत् ॥ उपदंशव्रणांश्चान्यान्व्रणांश्चैवविनाशयेत् ॥

**अर्थ—** मोठें रोहिसतृण कडू, उष्ण व कफ, पिशाच, ग्रहपीडा, वायु, विष, उपदंशव्रण आणि अन्य व्रण यांचा नाश करितें.

## गुंद्रा (गोंदपटेर, पानीगवत आपू).

गुंद्रातुतुवरातिक्तास्वाद्वीकट्वीचसंमता ॥ किंचिदुष्णास्तन्यशुक्ररजमूत्रविशोधिनी ॥ पशूनांनहितापित्तदाहश्रमविनाशिनी ॥ रक्तदोषंमूत्रकृच्छ्रंव्रणदोषंचनाशयेत् ॥

**अर्थ—** गुंद्रा गवत तुरट, कडू, स्वादु, तिखट, किंचित् उष्ण व स्तन्य, शुक्र, रज, मूत्र, यांचें शोधन करणारें, पशूंना हितावह व पित्त, दाह, श्रम, रक्तदोष, मूत्रकृच्छ्र आणि व्रणदोष यांचा नाश करितें.

## बल्वजा- मोळतृण.

बल्वजामधुराशीताकंठशुद्धिकरीमता ॥
वातकोपकरीरुच्यापित्तदाहतृषांजयेत् ॥

**अर्थ—** मोळतृण मधुर, शीत, कंठशुद्धिकारक, वातल, रुचिकर व पित्त, दाह आणि तृषा यांचा नाश करितें.

## मुंजतृण- दर्भविशेष- लघु व दीर्घ.

मौंजंतुमधुरंशीतंवृष्यंचतुवरंमतं ॥ कफपित्तविसर्पघ्नंग्रहपीडाविनाशकं ॥ भूतराक्षसबाधांचदाहंतृष्णांचशूलकं ॥ रक्तदोषंमूत्ररोगंबस्तिरोगंतथैवच ॥ नेत्ररोगंत्रिदोषंचनाशयेदितिकीर्तितं ॥

**अर्थ—** मुंजतृण मधुर, शीत, वृष्य, तुरट व कफ, पित्त, विसर्प, ग्रहपीडा, भूतबाधा, राक्षसबाधा, दाह, तृषा, शूल, रक्तदोष, मूत्ररोग, बस्तिरोग, नेत्ररोग, आणि त्रिदोष यांचा नाश करितें.

## मोथीतृण- एरका पानलव्हाळा.

एरकंशीतलंवृष्यंचक्षुष्यंवातकोपनं ॥
मूत्रकृच्छ्राश्मरीदाहपित्तरक्तरुजंजयेत् ॥

अर्थ— मोथीतृण शीतळ, वृष्य, चक्षुष्य, वातकोपन व मूत्रकृच्छ्र, अश्मरी, दाह, पित्त आणि रोग यांचा नाश करितें.

## गर्भदवृक्ष.

गर्भदोमधुरःशीतोगर्भस्थापनकारकः ॥
पित्तदाहश्रमरजोदोषंचैवविनाशयेत् ॥

अर्थ— गर्भदवृक्ष मधुर, शीत, गर्भस्थापनकारक व पित्त, दाह, श्रम, रजोदोष, यां नाश करितो.

## गणेरुक-गणिकारी.

गणेरुकाकटुस्तिक्तासुगंधिस्तुवरामता ॥ लघ्वीचशोधिनीज्ञेया शोषरक्तरुजापहा ॥ त्रिदोषव्रणशोफाश्चकफदाहज्वरांस्तथा ॥ रक्तपित्तंचकुष्ठंचनाशयेदितिकीर्तिता ॥

अर्थ— गणेरुक तिखट, कडू, सुगंधि, तुरट, लघु, शोधन व शोष, रक्तदोष, त्रिदोष, व्रण, कफ, दाह, ज्वर, रक्तपित्त, कुष्ट यांचा नाश करितें.

## गजकर्णी.

गजकर्णीस्वादुपाकेतिक्ताचोष्णाकफापहा ॥ शीतज्वरंच वातंचनाशयेदितिकीर्तिता ॥ कंदोस्याःपांडुशोथार्शःक्रिमि गुल्मोदरापहः ॥ आनाहवातंप्लीहांचग्रहणीमपिनाशयेत् ॥

अर्थ— गजकर्णी पाककाळीं स्वादु, कडू, उष्ण व कफ, शीतज्वर, वायु यांचा नाश करिते. या कंद पांडुरोग, सूज, अर्श, कृमि, गुल्म, उदर, आनाहवायु, प्लीहा आणि ग्रहणी या नाश करितो.

## ग्रंथिपर्ण-गठोनावृक्ष.

ग्रंथिपर्णःकटुस्तिक्तोलघुस्तीक्ष्णोग्रगंधिकः ॥
अग्निदीप्तिकरश्चोष्णोरुच्योवातकफापहः ॥ श्वासार्शः
शोथदौर्गंध्यक्रमींस्तिक्तंचनाशयेत् ॥

अर्थ— गठोनावृक्ष तिखट, कडू, तीक्ष्ण, उग्रगंध, अग्निदीपक, उष्ण, रुचिकर व वायु, कफ, दमा, विष, दुर्गंध, कृमि आणि तिखट यांचा नाश करितो.

## गळोन्याचा भेद-चोरक भटीर.

चोरकस्तीव्रगंधोऽष्णोमधुस्तिक्तोलघुःस्मृतः ॥ पाकेकटुश्चतीक्ष्ण
श्चहृद्योवातविकारहा ॥ कंडूकुष्ठकफस्वेदत्वग्दोषविषनाशनः ॥
व्रणंमेदंरक्तदोषंमुखनासारुजंजयेत् ॥ कृमीनजीर्णदौर्गंध्यमल
क्ष्मीनाशनंविदुः ॥ क्रव्यादबाधांशमयेदितिवैद्यैर्निरूपितः ॥

**अर्थ—** चोरक तीव्रगंध, उष्ण, मधुर, कडु, लघु, पाककाळीं तिखट, तीक्ष्ण, हृद्य, व वायु, कंडू, कुष्ट, कफ, मेद, त्वग्दोष, विष, व्रण, मेद, रक्तदोष, मुखरोग, नासारोग, कृमि, जीर्णज्वर, दुर्गंध, अलक्ष्मी, राक्षसबाधा यांचा नाश करितो.

## गृंजन ( गाजर ).

गृंजनंमधुरंरुच्यंग्राहकंतिक्तकंकटु ॥ रक्तपित्तकरंचोष्णंहृद्यंचा
ग्निप्रदीपनं ॥ नेत्राहितंविदाहिस्याद्रुक्षंपित्तकरंमतं ॥ हृद्यमाध्मान
शूलार्शःकृमिसंग्रहणीहरं ॥ वातंकफंतृषांशुक्रंनाशयेदितिकीर्तितं ॥
बीजंचोष्णंमतंचास्यवृष्यंवैगर्भपातकृत् ॥

**अर्थ—** गाजर मधुर, रुच्य, ग्राहक, कडु, तिखट, व रक्तपित्तकारक, उष्ण, हृद्य, अग्निदीपन, नेत्रांला विकार करणारें, विदाहि, रुक्ष, पित्तकर, हृद्य, व आध्मानशूल, मूळव्याध, कृमि, संग्रहणी, वात, पित्त, कफ, तृषा, शुक्र यांचा नाश करितें. याचें बीज उष्ण, वृष्य, गर्भपात करणारें असें आहे.

## भूनाग ( गांडवळ-काडूं ).

भूनागोवज्रहंतास्याद्रसजारणकृन्मतः ॥
सत्वंरसायनंचास्यविषनाशकरंमतं ॥

**अर्थ—** गांडवळ हिऱ्याला मारणारा, पाऱ्याला जारण करणारा आहे. याचें सत्व रसायन आणि विषनाशक असें आहे.

## गुग्गुळ-गुगूळ.

गुग्गुलुःपंचधाप्रोक्तोमहिषाक्षोमहानिलः ॥ कुमुदपद्महिरण्याश्चभे
दाएतेसमीरिताः ॥ सामान्यतोगुग्गुलुश्चकटुस्तिक्तोरसायनः ॥
विशदोग्गःपिच्छलश्चसारकस्तुवरोलघुः ॥ भग्नसंधानकृत्वृष्यःपा
चकश्चाग्निदीपनः ॥ सूक्ष्मःस्वर्यश्चमधुरोबल्याश्चक्षणकृन्मतः ॥

तीक्ष्णःस्निग्धःसुगंधिश्चपुष्टिकृत्कांतिकारकः ॥ भेदकश्चैवसंप्रोक्तः कफवातार्शनाशकः ॥ वातोदरकृमीकासक्लेदशोथप्रमेहकान् ॥ मेदोग्रंथ्यपचीगंडमालाव्रणविनाशकः ॥ वातरक्तरक्तदोषपिटिकांचामवातकं ॥ अश्मरीकुष्ठकंडूमच्छर्दिंचैवविनाशयेत् ॥ नूतनःसतुवृष्यःस्याद्धातुवर्धनकारकः ॥ जीर्णस्तुलेखनश्चोक्तोमुनिभिःपारदर्शिभिः ॥ महिषाक्षोमहानीलोगजरोगविनाशकः ॥ कुमुदःपद्मकश्चैवहयरोगविनाशकौ ॥ हिरण्यस्तुमनुष्याणामुपयोगकरोमतः ॥ महिषाक्षोपिविज्ञेयोनरयोगेबुधैःपुनः ॥ गुग्गुलुर्मधुरत्वाच्चवातनाशकरोमतः ॥ तुवरत्वाच्चपित्तघ्नस्तिक्तत्वात्कफनाशकः ॥ अथास्यपर्णजाशाकामधुरूक्षात्रशीतला ॥ कट्टोविष्टंभिनीगुर्वीमूत्रलाकफवातकृत् ॥

अर्थ— गुग्गुळ हा महिषाक्ष, महानील, कुमुद, पद्म व हिरण्य असा पांच प्रकारचा. तो खट, कडू, रसायन, विशद, उष्ण, पित्तल, सारक, तुरट, लघु, भग्नसंधानकारी, वृष्य, चक, अग्निदीपक, सूक्ष्म, स्वर्य, मधुर, बल्य, चिकण, तीक्ष्ण, स्निग्ध, सुगंधि, पुष्टिकर, तिकारक, भेदक, व कफ, वायु, अर्श, वातोदर, कृमि, खोकला, क्लेद, सूज, प्रमेह, मेद, थे, अपचि, गंडमाला, व्रण, वातरक्त, रक्तदोष, पिटिका, आमवात, अश्मरी, कुष्ट, कंडू, व आणि ओकारी यांचा नाश करितो. हा नूतन असतां वृष्य व धातुवर्धक आहे. जुना खनकारक आहे. महिषाक्ष व महानील नामक गुग्गुल हत्तींचे रोग नाश करितात. व मुद आणि पद्मक घोड्याच्या रोगांचा नाश करितात. आणि महिषाक्ष व हिरण्य हा ळ मनुष्यांच्या रोगांचा नाश करितो. गुग्गुल मधुर आहे म्हणून वातनाश करितो. ट आहे म्हणून पित्ताचा व कडू आहे म्हणून कफाचा नाश करितो. याच्या पानांची जी मधुर, रूक्ष, शीतळ, तिखट, विष्टंभकारक, गुरु, मूत्रल, आणि कफवातकरणारी शी आहे.

## कणगुग्गुळ.

कणगुग्गुलकश्चोष्णःसुरभिश्चरसायनः ॥
कटुर्वातोदरंगुल्मंशूलाध्मानौचनाशयेत् ॥

अर्थ— कणगुग्गुल उष्ण, सुगंध, रसायन, तिखट व वातोदर, गुल्म, शूल आणि ध्मान यांचा नाश करितो.

## भूमिजगुग्गुळ.

भूमिगुग्गुलकस्तिक्तःकटुश्चोष्णःकफापहः ॥

पिशाचबाधाशमनोवातनाशकरोमतः ॥

अर्थ– भूमिजगुग्गुल कडू, तिखट, उष्ण व कफ, पिशाचबाधा आणि वायु यांचा नाश करितो.

## गुंजा श्वेत व रक्त.

गुंजाद्वयंस्वादुतिक्तंबल्यंचोष्णंकषायकं ॥ त्वच्यंकेश्यंच रुच्यंचशीतंवृष्यंमतंबुधैः ॥ नेत्ररोगंविषंपित्तमिंद्रलुप्तंव्रणं कृमीन् ॥ राक्षसग्रहपीडांचकंडूंकुष्ठंकफंज्वरं ॥ मुखशीर्षरुजंवातंभ्रमंश्वासंतृषांतथा ॥ मोहंमदंनाशयतिबीजंवांतिकरंमतं ॥ शूलनाशकरंमूलंपर्णंचविषनाशकं ॥ श्वेतगुंजाविशेषेणवशीकरणकृन्मता ॥

अर्थ–गुंजा स्वादु, कडू, बलकर, उष्ण, तुरट, त्वचेला हितावह, केश्य, रुच्य, शीत, वृष्य, व नेत्ररोग, विष, पित्त, इंद्रलुप्त, व्रण, कृमि, राक्षस, ग्रहपीडा, कंडू, कुष्ट, कफ, ज्वर, मुखरोग, शीर्षरोग, वायु, भ्रम, दमा, तृषा, मोह, मद यांचा नाश करिते. हिचें बीज वांतिकारक, शूलनाशक आहे. हिचें पर्ण विषनाशक आहे. श्वेतगुंजा विशेषेंकरून वशीकरण आहे. वरील गुण गुंजेप्रमाणेंच आहेत.

## गुड ( गूळ ).

नूतनोगुडोमधुःक्षारोगुरुश्चोष्णश्चसंमतः ॥ रक्तरुक्पित्तदोषीणामहितोमूत्रशोधनः ॥ वृष्यःस्निग्धःसरःप्रोक्तःकृमिभेदकरोमतः ॥ शुक्रमज्जामांसरक्तकारकश्चाग्निदीपनः ॥ पित्तलोभेदकोवातश्वासकासकफापहः ॥ सगुडोरक्तकफकृत्स्वादुःस्निग्धश्चवातहा ॥ मलमूत्रेयथामार्गंप्रवर्तयतिचांजसा ॥ सचैकहायनोरुच्योपथ्यश्चाग्निप्रदीपकः ॥ मूत्रविट्शुद्धिकरोहृद्यःस्वादुश्चपौष्टिकः ॥ रसायनोलघुःस्निग्धोवृष्योमेहश्रमापहः ॥ त्रिदोषपांडुसंतापपित्तवातापहोमतः ॥ संयोगेनज्वरहरस्त्वब्दजीर्णोलघुःस्मृतः ॥ सर्वदोषहरःश्रेष्ठःपुराणेषुचउत्तमः ॥ अरिष्टादिषुयोज्यःस्याद्ध्वंहीनगुणःस्मृतः ॥ आर्द्रकेभक्षितश्चासौकफनाशकरोमतः ॥ हरीतक्यामायुहंताशुंठ्यावातस्थनाशकः ॥

अर्थ– गूळ नवा मधुर, क्षार, गुरु, उष्ण व रक्तदोष, पित्तविकार यांना अहितक-

रणारा, मूत्रशोधनकारक, वृष्य, स्निग्ध, सारक व कृमि, मेद, शुक्र, मज्जा, मांस आणि रक्त यांना करणारा, अग्निदीपन, पित्तल, भेदक, वात, श्वास, खोकला, कफ यांचा नाश करितो. हा शुद्ध करून घेतला असतां रक्त, कफ यांना करणारा, स्वादु, स्निग्ध, वातनाशक, मलमूत्रांना यथामार्गानें नेणारा असा आहे. हा एक वर्षाचा जुना असला तर, रुचिकारक, पथ्य, अग्निदीपक, मूत्र व मल यांची शुद्धि करणारा, हृद्य स्वादु, पौष्टिक, रसायन, लघु, स्निग्ध, वृष्य, मेह, श्रम, त्रिदोष, पांडुरोग, संताप, पित्त, वायु यांचा नाश करितो व संयोगानें ज्वरनाश करितो. हा तीन वर्षांचा जुना असला तर लघु, सर्वदोषनाशक, श्रेष्ठ, संपूर्ण जुन्या गुळांत उत्तम हा अरिष्टादिकांत योजावा. तीन वर्षांवर राहिलेला गुळ हीनगुण होतो आणि आल्याशीं भक्षण केला असतां कफाचा नाश करितो व हरीतकीशीं पित्ताचा आणि सुंठीशीं भक्षण केला असतां वायूचा नाश करितो.

## गुडूची (गुळवेल, गरुडवेल, गरोळ).

गुडूचीतुवरातिक्तावीर्येचोष्णाचकटुका ॥ ग्राहीरसायनीबल्याम धुराचाग्निदीपनी ॥ लघ्वीहृद्यायुःप्रदाचज्वरदाहतृषाहरी ॥ रक्त दोषंवमिंवातंभ्रमंपांडुंप्रमेहकं ॥ त्रिदोषंकामलांचामंकासंकुष्ठंत थाकृमीन् ॥ रक्तार्शंवातरक्तंचकंडूंमेदोविसर्पकं ॥ पित्तंकफंनाश यतिघृतेनसहवातहा ॥ गुडेनबद्धविट्कत्वंसितयापित्तनाशका ॥ मधुनाकफहाप्रोक्तावातंवातारितैलके ॥ शुंठ्यामवातशमनीमुनि भिःपरिकीर्तिता ॥

अर्थ— गुळवेल तुरट, कडू, वीर्यानें उष्ण, तिखट, ग्राहक, रसायन, बलकर, मधुर, अग्निदीपक, लघु, हृद्य, आयुःप्रद व ज्वर, दाह, तृषा, रक्तदोष, वमि, वात, भ्रम, पांडुरोग, प्रमेह, त्रिदोष, कावीळ, आम, खोकला, कुष्ट, कृमि, रक्तार्श, वातरक्त, कंडू, मेद, विसर्प, पित्त आणि कफ यांचा नाश करिते. ही तुपाशीं वायूचा, गुळाशीं मलबंधाचा, साखरेशीं पित्ताचा, मधाशीं कफाचा, एरंडेलाशीं वायूचा आणि सुंठीशीं आमवायूचा नाश करिते.

## गुळवेलीच्या पाल्याची भाजी.

गुडूचीपर्णशाकातुतुवरोष्णालघुःस्मृता ॥ कटुस्तिक्तापाक कालेमधुराचरसायनी ॥ अग्निदीप्तिकरीबल्याग्राहिणीच त्रिदोषहा ॥ वातरक्तंतृषांदाहंमेहंकुष्ठंचकामलां ॥ पांडु रोगंनाशयतीत्येवमाचार्यभाषितं ॥

अर्थ— गुळवेलीच्या पाल्याची भाजी तुरट, उष्ण, लघु, तिखट, कडू, पाककाळीं मधुर, रसायन, अग्निदीपक, बलकर, ग्राहक व त्रिदोष, वातरक्त, तृषा, दाह, मेह, कुष्ट, कामला आणि पांडुरोग यांचा नाश करिते.

## गुळवेलीचें सत्व.

गुडूचिसत्वंसुस्वादुपथ्यंलघुचदीपनं ॥ चक्षुष्यंधातुकृन्मेध्यंवयःस्थापनकारकं ॥ वातरक्तंत्रिदोषंचपांडुंतीव्रज्वरंतथा ॥ वमिंजीर्णज्वरंपित्तंकामलांचप्रमेहकं ॥ अरुचिंश्वासकासौचाहिक्कांचार्शक्षयंतथा ॥ सदाहंमूत्रकृच्छ्रंचप्रदरंसोमरोगकं ॥ नाशयेदितिसंप्रोक्तं पित्तंमेहंसशर्करं ॥

अर्थ— गुळवेलीचें सत्व स्वादु, पथ्य, लघु, दीपन, चक्षुष्य, धातुवर्धक, मेध्य, वयःस्थापक व वातरक्त, त्रिदोष, पांडु, तीव्रज्वर, वमि, जीर्णज्वर, पित्त, कावीळ, प्रमेह, अरुचि, दमा, खोकला, उचकी, अर्श, क्षय, दाह, मूत्रकृच्छ्र, प्रदर आणि सोमरोग यांचा नाश करितें.

## कंदोद्भवा गुडूची ( कंदगुळवेल ).

कंदोद्भवागुडूच्युष्णाकट्वीचैवज्वरापहा ॥ सन्निपातंविषंचैववलीपलितनाशिनी ॥ पिशाचानांचपीडाघ्नीगुणास्त्वन्येगुडूचिवत् ॥

अर्थ— कंदगुळवेल उष्ण, तिखट व ज्वर, सन्निपात, विष, वलीपलित आणि पिशाचबाधा यांचा नाश करिते.

## गुच्छकंद.

गुच्छकंदोतिशीतःस्यान्मधुरस्तृप्तिकारकः ॥
दाहनाशकरश्चैवमुनिभिःपरिकीर्तितः ॥

अर्थ— गुच्छकंद अतिशीत, मधुर, तृप्तिकर व दाहनाशक असा आहे.

## गुलवास ( नक्ता, संध्याकाळीं फुलते तो ).

नक्तानुवातलाशीतागलगंडविनाशिनी ॥

अपक्वार्शस्यशमनीमुनिभिःपरिकीर्तिता ॥

अर्थ– गुलबास वातल, शीत व गलगंड यांची नाशक व अपक्व अर्शाला शमविणारी अशी आहे.

## नलिका ( गुलछब्बू )

नलिकातुवरास्निग्धालघ्वीकुष्ठविनाशिनी ॥
गलगंडहराप्रोक्तामुनिभिःशास्त्रकोविदैः ॥

अर्थ– गुलछब्बू तुरट, स्निग्ध, लघु व कुष्ठ, गलगंड यांचा नाश करितो.

## शंखोदरी ( गुलतुरा-शंखेसरी-शंखासुर-शंकर ).

शंखोदरीमताचोष्णाकफवातविनाशिनी ॥
शूलामवातशमनीसंप्रोक्तापूर्वसूरिभिः ॥

अर्थ– गुलतुरा उष्ण आहे व कफ, वायु, शूल, आमवायु यांचा नाश करितो.

## गुंठतृण ( कोंचें ).

गुंठसंज्ञंतृणंप्रोक्तंतुवरंस्वादुशीतलं ॥ मधुरंचैवस्त्रीपुष्पदुग्धशुद्धिकरमतं ॥ शोधकंशुक्रमूत्राणांकृच्छ्रंपित्तास्त्रकंहरेत् ॥

अर्थ– गुंठतृण तुरट, स्वादु, शीतल, मधुर, स्त्रीचें दूध, रज व मूत्र, शुक्र यांची शुद्धि करणारें व कृच्छ्र, रक्तपित्त यांचा नाश करणारें असें आहे.

## वज्रभृंगी ( गुडाखू ).

वज्रभृंगीतुकटूष्णाचोष्णाश्वासरुजापहा ॥ हिक्कांकफंकंठरोगंवातंगुल्मंचपीनसं ॥ प्लीहांजंतूंश्चामशूलमुदरस्थंरुजंजयेत् ॥

अर्थ– गुडाखू तिखट, उष्ण, दमा, खोकला, उचकी, कफ, कंठरोग, वायु, गुल्म, पीनस, प्लीहा, जंतु, आमशूल, उदररोग यांचा नाश करितो.

## मदनवृक्ष ( साधारण गेळ ).

मदनःकटुकस्तिक्तोमधुरश्चोष्णश्चलेखनः ॥ लघूरुक्षोवां

तिकारीबस्तिकर्मणिचोत्तमः ॥ कफवातव्रणंशोथमानाहं विद्रधींस्तथा ॥ गुल्मंकुष्ठंप्रतिश्यायंविषंचार्शोज्वरंजयेत् ॥

अर्थ– गेळ तिखट, कडू, मधुर, उष्ण, लेखन, लघु, रूक्ष, वांतिकारक, बस्तिकर्माविषयीं उत्तम हितकारक व कफ, वायु, व्रण, शोथ, आनाह, विद्रधि, गुल्म, कुष्ठ, पडसें, विष, अर्श आणि ज्वर यांचा नाश करितो.

## काळा व पांढरा थोर गेळ.

कृष्णःश्वेतश्चमदनःशीतलोमधुरःस्मृतः ॥ कटुस्तिक्तश्चतुवरोवांतिकृत्कफनाशनः ॥ पक्वामाशयशुद्धेश्चकारकःपित्तनाशकः ॥ हृद्रोगनाशकश्चैवपूर्वस्मादुत्तमोगुणैः ॥

अर्थ– काळा व पांढरा थोर गेळ शीतळ, मधुर, तिखट, कडू, तुरट, वांतिकर, कफनाशक, पक्वाशय व आमाशय यांची शुद्धि करणारा. आणि पित्त व हृद्रोग यांचा नाश करणारा. गुणानीं सामान्य गेळाहून अधिक आहे.

## पिंवळा लघु गेळ.

पीतस्तुमदनःप्रोक्तोगुणैःपूर्वसमोबुधैः ॥

अर्थ– पिंवळा लघु गेळ गुणानीं पांढऱ्या गेळाप्रमाणेंच आहे.

## सुवर्णगैरिक ( गेरू-रक्तगैरिक-सोनगेरू ).

सुवर्णगैरिकंस्निग्धंमधुरंतुवरंमतं ॥ चक्षुष्यंशीतलंबल्यंव्रणरोपणकारकं ॥ विशदंकांतिकृत्प्रोक्तंदाहंपित्तंकफंजयेत् ॥ हिक्कांरक्तरुजंजूर्तिंविषंविस्फोटकंवमिं ॥ अग्निदग्धव्रणंचार्शोरक्तपित्तंचनाशयेत् ॥

अर्थ– सोनगेरू स्निग्ध, मधुर, चक्षूला हितावह, शीतल, बलकर, व्रणरोपण, विशद, कांतिकारक, व दाह, पित्त, कफ, हिक्का, रक्तदोष, ज्वर, विषदोष, विस्फोट, वांति, अग्निदग्धव्रण, अर्श, आणि रक्तपित्त यांचा नाश करितें.

## गोरोचन.

गोरोचनंचातिशीतंरुच्यंमंगलदायकं ॥ वश्यकरंकांतिक

रंवृष्यंतिक्तंसमीरितं ॥ पिशाचग्रहपीडांचाविषंकुष्ठंकृमींस्त था ॥ अलक्ष्म्युन्मादश्रमनंगर्भस्रावहरंपरं ॥ क्षतंरक्तवि कारंचनेत्ररोगंचनाशयेत् ॥

अर्थ– गोरोचन अतिशीत, रुचिकर, मंगलदायक, बलकर, कांतिकारक, वृष्य, कडू, व पिशाचबाधा, ग्रहपीडा, विषदोष, कुष्ट, कृमि, अलक्ष्मी, उन्माद, गर्भस्राव, क्षत, रक्त- विकार, आणि नेत्ररोग यांचा नाश करितें.

## गोखरू-सराटे, मोठे व लहान दोन प्रकारचे.

गोक्षुरःशीतलोबल्योमधुरोबृंहणोमतः ॥ बस्तिशुद्धिकरोवृष्यःपौष्टि कश्चरसायनः ॥ अग्निदीप्तिकरःस्वादुर्मूत्रकृच्छ्राश्मरीपहः ॥ दाहमे हश्वासकासहृद्रोगार्शोविनाशनः ॥ बस्तिवातंत्रिदोषंचकुष्ठंशूलंचना शयेत् ॥ वातंचैनाशयत्येवमीरितंचानघंटके ॥

अर्थ– गोखरू शीतल, बलकारक, मधुर, बृंहण, बस्तिशुध्दिकारक, वृष्य, पौष्टिक, रसायन, अग्निदीपक, स्वादु, व मूत्रकृच्छ्र, अश्मरी, दाह, मेह, दमा, खोकला, हृद्रोग, अर्श, बस्तिवात, त्रिदोष, कुष्ट, शूल, आणि वायु यांचा नाश करितो.

## श्वेत गोकर्ण ( सुपली ).

श्वेतागोकर्णिकाकट्वीशीतातिक्ताचबुद्धिदा ॥ चक्षुष्यातुवराचैवस राविषविनाशिनी ॥ त्रिदोषंशीर्षशूलंचदाहंकुष्टंचशूलकं ॥ आमं पित्तरुजंचैवशोथंजंतून्व्रणंकफं ॥ ग्रहपीडांशीर्षरोगंविषंसर्प स्यनाशयेत् ॥

अर्थ– श्वेतगोकर्ण तिखट, शीत, कडू, बुद्धिप्रद, चक्षुष्य, तुरट, सारक, विषनाशक व त्रिदोष, मस्तकशूल, दाह, कुष्ठ, शूल, आम, पित्तोपद्रव, सूज, कृमि, व्रण, कफ, ग्रह- पीडा, शीर्षरोग आणि सर्पविष यांचा नाश करिते.

## काळी गोकर्णी ( सुपली ).

कृष्णगोकर्णिकातिक्तारसेस्निग्धात्रिदोषहा ॥ शीतवीर्यावातपित्त ज्वरदाहभ्रमापहा ॥ पिशाचबाधारक्तातिसारोन्मादमदापहा ॥ अ तिकासश्वासकफकुष्ठजंतुक्षयापहा ॥ अन्येगुणास्तुसुश्वेतगोकर्णी सदृशामताः ॥

अर्थ– सुपली रसकाळीं कडू, स्निग्ध, त्रिदोषनाशक, शीतवीर्य, व वायु, पित्त, कफ, ज्वर, दाह, श्रम, पिशाचबाधा, रक्तातिसार, उन्माद, मद, अतिकास, दमा, कफ, कुष्ट, जंतु, क्षय यांचा नाश करिते. वरकड गुण श्वेत गोकर्णीसारिखे आहेत.

## गोपीचंदन ( सोरटी माती ).

गोपीचंदनकंदाहक्षतरक्तविकारनुत् ॥ पित्तंकफंचप्रदरंनाशयेदि
निकीर्तितं ॥ तुवर्यास्तुगुणायेचतेसर्वेगोपिचंदने ॥

अर्थ– गोपीचंदन दाह, क्षत, रक्तविकार, पित्त, कफ, प्रदर यांचा नाश करितें. वरकड गुण तुरटीसारिखे आहेत.

## गोरक्षी ( गोरखचिंच ).

गोरक्षीमधुरातिक्ताशीतादाहज्वरापहा ॥
पित्तविस्फोटवम्यातिसारनाशकरीपरा ॥

अर्थ–गोरखचिंच मधुर, कडू, शीत, दाह, ज्वर, पित्त, विस्फोट, वमि, अतिसार यांचा नाश करिते.

## गुंडाला ( गोंडाळ-तळ्यांत असत्ये ती ).

गुंडालाकटुकातिक्ताचोष्णाशोथव्रणापहा ॥
कृमिनाशकरीप्रोक्तापूर्वेवैद्यैर्मनीषिभिः ॥

अर्थ– गुंडाळा तिखट, कडू, उष्ण, सूज, व्रण, कृमि, यांचा नाश करिते.

## गोडंबी ( भिलाव्याचे आंतील गोळे ).

भल्लातकस्यबीजंतुकांतिनृप्तिकरंमतं ॥ गुरुवृष्यंचाग्निदीप्ति
करंदाहकफापहं ॥ शोषवातकृमीन्पित्तमरुचिंचैवनाशयेत् ॥

अर्थ– गोडंबी कांतिकारक, तृप्तिकर, गुरु, वृष्य, अग्निदीपक, व दाह, कफ, शोष, वायु, कृमि, पित्त, आणि अरुचि यांचा नाश करिते.

## गोमेठी-मेठिका-रान परवरें.

गोमेठंमधुरंशीतंलघुदंतरुजापहं ॥

**अर्थ–** गोमेठी मधुर, शीतल, लघु, व दंतपीडानाशक आहे.

## गोंवारीच्या शेंगा.

बाकुचिकाशिंबीरूक्षावानलामधुरागुरुः ॥
सराकफकरोचाग्निदीपनीपित्तनाशिनी ॥

**अर्थ–** गोंवारीच्या शेंगा रूक्ष, वातकर, मधुर, गुरु, सारक, कफकर, अग्निदीपक, आणि पित्तनाशक अशा आहेत.

## गौर सुवर्ण शाक.

गौरासुवर्णशाकानुशीतलापथ्यकारका ॥ कफपित्तारुचीदाहज्वर
भ्रांतिश्रमापहा ॥ रक्तदोषहरीप्रोक्तामुनिभिस्तत्वदर्शिभिः ॥

**अर्थ–** गौर सुवर्णशाक शीतल, पथ्यकारक व कफ, पित्त, अरुचि, दाह, ज्वर, भ्रांति, श्रम, व रक्तदोष यांचा नाश करिते.

## गंधकोकिला व गंधमालती.

गंधकोकिलकास्निग्धातिक्ताचोष्णाकफापहा ॥

**अर्थ–** गंधमालती स्निग्ध, कडू, उष्ण, व कफनाशक अशी आहे.

## गंधक.

गंधकस्तीव्रगंधःस्यात्कटुश्चोष्णःसरःस्मृतः ॥ अत्यग्निदीपकस्ति
क्तस्तुवरःपित्तलश्चसः ॥ रसायनःपाचकश्चलोहसूतमृतिप्रदः ॥
मधुरोवीर्यवृद्धिश्चकारकोविषकुष्ठहा ॥ कंडूत्वग्दोषकंपामांश्वेतकु
ष्ठंविसर्पकं ॥ कृमिक्षयककप्लीहावातांश्चामंचनाशयेत् ॥ श्वेतः
प्रशस्तोव्रणकुष्ठकादौरक्तस्तुलोहेषुमतःप्रशस्तः ॥ पीतस्तुसूतस्य
विधौप्रशस्तोरसायनेकृष्णइतिप्रदिष्टः ॥ सुदुर्लभोभाग्यवशाद्यदासौ
स्वर्णक्रियादौविनियोजनीयः ॥

**अर्थ–** गंधक तीव्रगंध, तिखट, उष्ण, सारक, अति अग्निदीपक, कडू, तुरट, पित्तल

रसायन, पाचक, लोह व पारा यांला मारणारा, मधुर, वीर्यवर्धक, व विष, कुष्ट, कंडू, त्वग्दोष, कंप, आम, श्वेतकुष्ट, विसर्प, कृमि, क्षय, कफ, प्लीहा, वायु, आणि आम यांचा नाश करितो. श्वेतगंधक व्रण, कुष्ट इत्यादिकांवर. रक्तगंधक लोहमारणाविषयीं, पिंवळा पाऱ्याच्या कृतीविषयीं, आणि कृष्णगंधक रसायनाविषयीं उत्तम आहे, कृष्ण गंधक दुर्लभ आहे. तो भाग्यवशात् मिळतो व तो किमयाविषयीं योजितात.

## गंगावती ( वटगंधारी, वनबाबरी ).

गंगावतीकटुश्चोष्णावातहाव्रणरोपणी ॥

अर्थ– गंगावती तिखट, उष्ण, वातनाशक, आणि व्रणरोपणी अशी आहे.

# घृतवर्ग.

## गाईचें तूप.

गोघृतंतुरसेपाकेस्वादुशीतंगुरुस्मृतं ॥ अग्निदीप्तिकरंस्निग्धंसुगंधिचरसायनं ॥ रुच्यंनेत्र्यंकांतिदंचवृष्यंमेधाकरंमतं ॥ लावण्यतेजबलकृद्वयःस्थापनकारकं ॥ बुध्दिप्रदंशुक्लंचस्वर्यंहृद्यंनृणांहितं ॥ बालवृध्दक्षतक्षीणान्चाग्निदग्धव्रणान्जयेत् ॥ शस्त्रक्षतंवातपित्तंकफभ्रमविषान्जयेत् ॥ त्रिदोषंनाशयत्येतत्ऋषिभिःपरिकीर्तितं ॥

अर्थ– गाईचें तूप रसकाळीं व पाककाळीं स्वादु, शीत, गुरु, अग्निदीपक, स्निग्ध, सुगंधि, रसायन, रुच्य, नेत्र्य, कांतिकारक, वृष्य व मेधा, लावण्य, तेज, बल यांना देणारें, वयःस्थापक, बुद्धिप्रद, शुक्ल, स्वर्य, हृद्य, मनुष्याला हितावह व बाळ, वृद्ध, क्षतक्षीण अग्निदग्धव्रण, शस्त्रक्षत, वात, पित्त, कफ, भ्रम, विष आणि त्रिदोष यांचा नाश करितें.

## अजाघृत ( शेळीचें तूप ).

अजाघृतंचचक्षुष्यंदीपनंबलवर्धनं ॥ वृष्यंपाकेकटुप्रोक्तंकासश्वासक्षयापहं ॥कफार्शराजयक्ष्माणांनाशनंपरमंमतं ॥

अर्थ– शेळीचें तूप चक्षुष्य, दीपन, बलवर्धक, वृष्य, पाककाळीं तिखट व कास, श्वास, क्षय, कफ, अर्श, राजयक्ष्मा यांचा नाश करणारें असें आहे

## आविघृत ( मेंढीचें तूप ).

आवेर्घृतंकटुश्चोष्णंकफवातरुजापहं ॥
योनिदोषेषपित्तेचशोषेचैवप्रशस्तकं ॥

**अर्थ**— मेंढीचें तूप तिखट, उष्ण, कफ, वात, योनिदोष, पित्त आणि शोष यांचा नाश करितें.

## महिषीघृत ( म्हशीचें तूप ).

घृतंचोक्तंमहिष्यास्तुसौख्यदंवर्णकारकं ॥ हृद्यंकांतिकरंरुच्यं कफकृत्स्वादुशीतलं ॥ विष्टंभकारकंबल्यंधृतिदंचगुरुस्मृतं ॥ अर्शसंग्रहणींवातंरक्तपित्तंभ्रमंतथा ॥ पित्तंचनाशयत्येवंऋषिभिःपरिकीर्तितं ॥

**अर्थ**— म्हशीचें तूप सौख्यद, वर्णकारक, हृद्य, कांतिकर, रुच्य, कफकर, गोड, शीतळ विष्टंभकारक, बलप्रद धैर्यदेणारें, गुरु व अर्श, संग्रहणी, वात, रक्तपित्त, भ्रम, आणि पित्त यांचें नाशक आहे.

## हस्तिनीघृत ( हत्तिणीचें तूप ).

हस्तिन्यास्तुघृतंतिक्तंलघुश्चतुवरंमतं ॥ अग्निदीप्तिकरंप्रोक्तंकुष्ठकृमिविनाशनं ॥ मलमूत्रस्तंभकरंकफपित्तविनाशनं ॥ विषंरक्तविकारंचनाशयेदितिकीर्तितं ॥

**अर्थ**—हत्तिणीचें तूप कडु, लघु, तुरट, अग्निदीपक व कुष्ठ, कृमि यांचें नाशक आणि मल व मूत्र यांचें स्तंभक, कफनाशक, पित्तहारक व विष, रक्तविकार यांचा नाश करणारें असें आहे.

## अश्वाघृत ( घोडीचें तूप ).

अश्वाघृतंतुमधुरंकिंचिच्चाग्निप्रदीपकं ॥ तुवरंकटुकंचैवमलमूत्रावरोधकं ॥किंचिच्चवातलंचोष्णंपाककालेलघुस्मृतं ॥ गुरुचकफमूर्छानांनाशनंपरमंमतं ॥

**अर्थ**—घोडीचें तूप किंचित् मधुर, अग्निदीपक, तुरट, तिखट, मलमूत्रावरोधक, किंचित वातल, उष्ण, पाककालीं लघु, गुरु आणि कफ, मूर्छा यांचें नाशक असें आहे.

## औष्ट्रघृत (उंटिणीचें तूप).

औष्ट्रंघृतंचाग्निदीप्तिकारकंचपटुस्मृतं ॥ पाककालेचकटुकंविषार्शःक्रिमिनाशकं ॥ शोथंवातंकफंचैवकोष्टुशीर्षंतथोदरं ॥ कुष्टगुल्मोन्मादमोहमूर्छापस्मारजूर्तिहं ॥

**अर्थ–** उंटिणीचें तूप अग्निदीपक, खारट, पाककाळीं तिखट व विष, अर्श, कृमि सूज, वायु, कफ, क्रोष्टुशीर्ष, उदर, कुष्ट, गुल्म, उन्माद, मोह, मूर्छा, अपस्मार आणि, ज्वर यांचा नाश करितें.

## गर्दभीघृत (गाढवीचें तूप).

गर्दभ्यास्तुघृतंबल्यंबुध्दिदंवामकंमतं ॥ अग्निदीप्तिकरंचोष्णवीर्यं पाकेलघुस्मृतं ॥ कषायंग्लानिदंप्रोक्तंमूत्रदोषकफापहं ॥

**अर्थ–** गाढवीचें तूप बलकर, बुद्धिप्रद, वामक, अग्निदीपक, उष्णवीर्य, पाककाळीं लघु, तुरट, ग्लानिकारक, मूत्रदोष व कफ यांचें नाशक असें आहे.

## स्त्रीघृत.

स्त्रीघृतंरुचिदंनेत्र्यंपाकेलघ्वग्निदीपनं ॥
वातंपित्तंकफंचैवविषंचैवविनाशयेत् ॥

**अर्थ–** स्त्रीघृत रुचिप्रद, नेत्र्य, पाककाळीं लघु, अग्निदीपक व वात, पित्त, कफ आणि विष यांचा नाश करितें.

## दूध घुसळून काढलेल्या लोण्याचें तूप.

दुग्धमंथनजोत्पन्नंघृतंतृप्तिकरंमतं ॥ शीतंचग्राहकंचैवसौकुमार्यकरंमतं ॥ भ्रममूर्छानेत्ररोगापित्तरक्तविकारनुत् ॥ वातंकफंमदंदाहंनाशयेदितिकीर्तितं ॥

**अर्थ–** दुधाच्या लोण्याचें तूप तृप्तिकर, शीतळ, ग्राहक, सौकुमार्यकारक व भ्रम, मूर्छा, नेत्ररोग, पित्त, रक्तविकार, वायु, कफ, मद, दाह यांचा नाश करितें.

## घृत-सर्व साधारण तूप.

घृतंशीतंरसेपाकेमधुरंजीवनंमतं ॥ स्नेहेषुचोत्तमंवृष्यंकांतिकृत्था

तुवर्धकं ॥ कंठ्यंस्वर्यंचेंद्रियाणांतृप्तिकृद्भेदकंमतं ॥ व्रण्यंवयःस्थापकं चभेदकं चमृदुस्मृतं ॥ चक्षुष्यंकफकृत्प्रोक्तमग्निदीप्तिकरंगुरु ॥ बुध्धिमेधास्मृतिप्रज्ञातेजौजबलपुष्टिकृत् ॥ सौकुमार्यस्यमेदस्यलावण्यस्य चवर्धकं ॥ श्लेष्मकृद्बालवृध्धानांहितकृद्रुचिदंमतं॥ स्निग्धं रसायनंचैवक्षतक्षीणेहितंमतं ॥ विसर्पेचाग्निदग्धेचशस्त्रक्षीणेहितंमतं ॥ अजीर्णोन्मादशूलानि उदावर्तक्षयंतथा ॥ आनाहंरक्तपित्तं चवातपित्तंव्रणंतथा ॥ रक्तदोषंक्षतंदाहंयोनिनेत्रश्रुतीरुजं ॥ दद्रूं शिरोरुजंशोथंत्रिदोषंचैवनाशयेत् ॥ निरामवातज्वरिणांहितंचामेविषोपमं ॥

साधारण तूप रसकाळीं शीत, पाककाळीं मधुर, जीवन, स्नेहनाविषयीं उत्तम, वृष्य, कांतिकर, धातुवर्धक, कंठ्य, स्वर्य, इंद्रियांना तृप्तिकारक, भेदक, व्रण्य, वयःस्थापक, भेदक, मृदु, चक्षुष्य, कफकर, अग्निदीपक, गुरु व बुद्धि, मेधा, स्मृति, प्रज्ञा, तेज, ओज, बल, पुष्टि यांना करणारें, व सौकुमार्य, मेद, लावण्य यांना वाढविणारें, श्लेष्मकारक व बाल, वृद्ध यांना हितकारक, रुचिप्रद, स्निग्ध, रसायन, क्षतक्षय, विसर्प, अग्निदग्धव्रण, शस्त्रक्षत, क्षीण यांना हितकर व अजीर्ण, उन्माद, शूळ, उदावर्त, क्षय, आनाहवायु, रक्तपित्त, वातपित्त, व्रण, रक्तदोष, क्षत, दाह, योनिरोग, नेत्ररोग, कर्णरोग, दद्रू, शिरोरोग, सूज, त्रिदोष यांचा नाश करितें. व निरामवातज्वराला हितकारक आणि आमज्वरावर विषासारिखें आहे.

हय्यंगवीनंचक्षुष्यंरुच्यं चाग्निप्रदीपकं ॥
बल्यंवृष्यंधातुकरंविशेषात्ज्वरनाशकं ॥

हय्यंगवीन चक्षूंना हितावह, रुचिकर, अग्निदीपक, बलकर, वृष्य, धातुकर, आणि विशेषेंकरून ज्वरनाशक असें आहे.

नूतनंतुघृतंतृप्तिकारकंदुर्बलेहितं ॥ भोजनेस्वाददंप्रोक्तंनेत्र्यंपांडुरुजापहं ॥ कामलायांप्रशस्तंस्याद्विषूच्यामग्निमांद्यके ॥ बालेवृध्धे क्षयेचामेकफरोगेमदात्यये ॥ बध्धविट्के ज्वरेचैवाल्पाल्पंचैवप्रदीयते ॥

लोणकढें तूप तृप्तिकारक, दुर्बल मनुष्याला हितावह, भोजनामध्यें आस्वाद देणारें, नेत्र्य व पांडु, कावीळ यांवर प्रशस्त आणि विषूची, अग्निमांद्य, बाल, वृद्ध, क्षयरोग, आमव्याधि, कफरोग, मदात्यय, बद्धविट्क आणि ज्वर यांला अल्प द्यावें.

पुराणंतुघृतंतीक्ष्णंसरंचाम्ललघुस्मृतं ॥ कटूष्णवार्यवर्ण्यंचछेदकं लेखनंमतं ॥ स्रोतोविवर्धनंचाग्निदीपकंव्रणशोधकं ॥ व्रणसंधानकृद्गुल्मयोनिशीर्षरुजापहं ॥ नेत्रकर्णरुजंशोथमपस्मारंमदंजयेत् ॥ मूर्छांज्वरंश्वासकासौग्रहपीडार्शपीनसान्॥ कुष्टोन्मादकृमिविषालक्ष्मीदोषत्रयान्हरेत्॥ बस्तिकर्मणिनस्येचप्रशस्तंसमुदाहृतं॥ यद्वातुदशवर्षोर्ध्वंपुराणंतुघृतंमतं ॥ शतवर्षसहस्रंवास्थितंकौंभमितीरितं ॥ एकादशशताद्यंचमहाघृतमितीरितं ॥ यथायथाजीर्णतरंगुणैश्चाधिवयमुच्यते ॥

जुनें तूप तीक्ष्ण, सारक, आंबट, लघु, तिखट, उष्णवीर्य, वर्णकारक, छेदक, लेखन, स्रोतसांला वाढविणारें, अग्निदीपक, व्रणशोधन, व्रणाला सांधणारें व गुल्म, योनिरोग, मस्तकरोग, नेत्ररोग, कर्णरोग, सूज, अपस्मार, मद, मूर्छा, ज्वर, श्वास, कास, संग्रहणी, मूळव्याध, पीनस, कुष्ट, उन्माद, कृमि, विष, अलक्ष्मी, दोषत्रय यांचा नाश करितें. हें बस्तिकर्म व नस्य यांविषयीं प्रशस्त. हें दाहा वर्षांपर्यंत जुनें समजावें. दाहा वर्षांउपरांत जुनें झालें तें शंभरसहस्र वर्षेपर्यंतचें तें कौंभ जाणावें. अकराशें वर्षांचे उपरांतचें तें महाघृत जाणावें. हें जसें जुनें होईल तसें गुणांनीं अधिक जाणावें.

घृतमंडस्तुवर्ण्यःस्याल्लघुस्तीक्ष्णोऽग्निदीपनः ॥ किंचित्सरोधातुवृद्धिकारकश्चद्रवःस्मृतः ॥ रूक्षःसूक्ष्मोयोनिकर्णनेत्रमस्तकशूलके ॥ बस्त्यादिनाहितःप्रोक्तोगुणास्त्वन्येतुहव्यवत् ॥

तुपाची साय वर्णकर, लघु, तीक्ष्ण, अग्निदीपक, किंचित्सारक, धातुवृद्धिकारक, द्रव, रूक्ष, सूक्ष्म व योनि, कर्ण, नेत्र, मस्तक यांचे शूळ यांवर, बस्तिदेण्याविषयीं हितकारक अशी आहे, बाकी गुण तुपासारिखे आहेत.

शतधौतंघृतंप्रोक्तंदाहमोहज्वरापहं ॥ गुणैर्दुग्धस्यसदृशंनवनीतंघृतंदधि ॥ पूर्वोक्तेषुघृतेप्रोक्तंगव्यंश्रेष्टतमंबुधैः ॥ आविकंतुघृतंप्रोक्तंनिंद्यंसर्वबुधोत्तमैः ॥

शतधौतघृत दाह, मोह, ज्वर यांचा नाश करितें. वरकड गुण दुधासारिखे व लोणी, तूप, दहीं, इत्यादिक गाईचें फार उत्तम आहे. आणि शेळीचें फार निंद्य आहे.

ग्रामजावानलारुच्यानुवरामधुरामता॥ मुखप्रियाकंठशुद्धिकारिणीग्राहिणीमता ॥ अग्निदीप्तिकरीचैवकफपित्तविनाशका ॥

**घेवडा** वातकर, रुक्ष, तुरट, मधुर, मुखाला प्रिय, कंठशुद्धिकारक, ग्राहक, अग्निदीपक व कफ, पित्त यांचा नाशक असा आहे.

बृहत्तुग्रामजारुच्यावातलाचाग्निदीपनी ॥
मुखप्रियाचसंप्रोक्ताशाकाज्ञानविशारदैः ॥

**थोर घेवडा** रुचिकर, वातल, अग्निदीपक आणि मुखाला प्रिय असा आहे.

कृष्णातुग्रामजाकंठ्यामेध्याचाग्निप्रदीपनी ॥
तुवराचरसेमाध्वीरुच्याचग्राहिणीमता ॥

**काळा घेवडा** कंठ्य, मेध्य, अग्निदीपक, तुरट, रसकाळीं मधुर, रुचिकर आणि ग्राहक असा आहे.

प्रोक्तांगुलिफलावातकारिणीकफकारिणी ॥ विष
नाशकरीप्रोक्तागुणास्त्वन्येतुकृष्णवत् ॥ पीतायाल्त
धिकाज्ञेयापूर्वैर्वैद्यैर्विचारिभिः ॥

**पांढरा घेवडा** वात, कफ यांना करणारा, विषनाशक, असा आहे. वरकड गुण काळ्या घेवड्यासारिखेच आहेत. पिंवळा घेवडा याहून गुणानीं अधिक आहे.

गोनसीशीतलागुर्वीशूलहिक्कापहामता ॥
जीर्णविषंसर्पविषमुन्मादंचविनाशयेत् ॥

**घणमकांडं** शीतल गुरु, व शूल, उचकी, जीर्णविष, सर्पविष, आणि उन्माद यांचा नाश करितें.

घोलिकारुचिदापथ्यापित्तलाचाम्लिकामता ॥ सराकफकरीचोष्णा
वातत्वग्दोषनाशिनी ॥ गुल्मव्रणश्वासकासनेत्ररुङ्मेहशोथहा ॥

**घोळ** रुचिकर, खारट, पित्तल, आंबट, सारक, कफकर, उष्ण व वायु, त्वग्दोष, गुल्म, व्रण, श्वास, कास, नेत्ररोग, मेह आणि सूज यांचा नाश करिते.

राजपूर्वाघोलिकातुरुक्षाचाम्लापटुःस्मृता ॥ रुच्याकट्वीचगुर्वीचदी
पकाग्नेःकफापहा ॥ वातंचार्शांसिमांद्यंविषंशुक्रंचनाशयेत् ॥

**मोठी घोळ** रुक्ष, आंबट, खारट, रुचिकर, तिखट, गुरु, अग्निदीपक, कफनाशक व वायु, अर्श, अग्निमांद्य, विष आणि शुक्र यांचा नाश करिते.

क्षुद्रघोलिकापित्तलासराकफकरीकटुजीर्णज्वरहा ॥ श्वासकास हागुल्मनाशिनीमेहशोथहासारसायनी ॥ वातहामताचोष्णकारिणी चाम्लिकामतानेत्ररोगहा ॥ चर्मदोषहाव्रणहरीमतापूर्ववैद्यकैःसा निरूपिता ॥

क्षुद्रघोळ पित्तल, सारक, कफकर, तिखट व जीर्णज्वर, श्वास, कास, गुल्म, मेह, शोथ यांचा नाश करणारी, रसायन, वातनाशक, उष्ण, आंबट, व नेत्ररोग, चर्मदोष, आणि व्रण यांची नाशक असी आहे.

प्रानःकोशानकीस्निग्धावृष्याचमधुरामता ॥ क्रम्याध्मानक गीतिक्ताव्रणरोपणकारिणी ॥ सराकफकरीगुर्वीबल्याचैव प्रकीर्तिता ॥ वातपित्तज्वरहराऋषिभिःपरिकीर्तिता ॥

पारोशी दोडकी स्निग्ध, वृष्य, मधुर व कृमि, आध्मान यांना करणारी, कडु, व्रणरोपण, सारक, कफकर, गुरु, बलकर व वातपित्तज्वरनाशक अशी आहे.

राजकोशानकीशीतामधुरावातलामता ॥ अग्निदीप्तिकरीचैवकफ कृत्पित्तहामता ॥ कासश्वासज्वरहराक्रमीणांचविनाशिनी ॥

शिरदोडकी शीतळ, मधुर, वातल, अग्निदीपक, कफकर, पित्तल व दमा, खोकला, ज्वर, आणि कृमि यांचा नाश करिते.

शनपुत्रीशीतलास्यात्हृद्यापाकेकटुःस्मृता ॥ तिक्तापित्तंविषंकासंज्वरंवातंचनाशयेत ॥

सातपुती घोसाळी शीतळ, हृद्य, पाककाळीं तिखट, कडु व पित्त, विष, खोकला, ज्वर आणि वायु यांचा नाश करिते.

घोंडिकाथगिकातिक्तावातहाचाग्निदीपनी ॥

घोंडकाथग कडु, वातनाशक व अग्निदीपक असी आहे.

गुलघोंटिकातुमधुराकट्वीचोष्णाग्निदीपनी ॥ पाचकाकामलारक्त दोषशोथकफापहा ॥ वातंपित्तंव्रणंकुष्ठंकंडूंचैवविनाशयेत् ॥

घोंटीग्राह मधुर, तिखट, उष्ण, अग्निदीपक, पाचक व कावीळ, रक्तदोष, सज, कफ, वायु, पित्त, व्रण, कुष्ठ, कंडू यांचा नाश करिते.

चवकंकटुकंचोष्णंरुच्यंचाग्निश्चदीपनं ॥ लघूक्तंचक्रमिश्वासका
सवातकफापहं ॥ ज्वरार्शशूलशमनंऋषिभिःपरिकीर्तितं ॥ अन्ये
गुणास्तुविज्ञेयाःपिप्पलीमूलवद्बुधैः ॥

**चवक—मिरवेलीचें मूळ** तिखट, उष्ण, रुच्य, अग्निदीपक, लघु व कृमि, श्वास, कास, वायु, कफ, ज्वर, अर्श आणि शूल यांचा नाश करितें. बाकीचे गुण पिंपळीमूळा-सारिखे आहेत.

चतुर्बीजभवंचूर्णंवानाजीर्णविनाशकं ॥
आध्मानपार्श्वशूलघ्नंकटिरुक्शूलनाशनं ॥

**चतुर्बीजचूर्ण** वायु, अजीर्ण, विष, आध्मान, पार्श्वशूल आणि कटिशूल यांचा नाश करितें.

चतुरूषणकंप्रोक्तंमेदोघ्नंचाग्निदीपनं ॥ गुल्मत्वग्दोषमेहांश्चकफंका
संविनाशयेत् ॥ पीनसश्लीपदश्वासनाशकंपरिकीर्तितं ॥

**चतुरूषण** म्हणजे सुंठ, मिरी, पिंपळी आणि पिंपळमूळ तें मेदनाशक, अग्निदीपक व गुल्म, त्वग्दोष, मेह, कफ, कास, पीनस, श्लीपद, श्वास यांचा नाश करितें.

चणपत्रंरुचिकरंदुर्जरंकफकारकं ॥ मलावष्टंभकंचाम्लंमधुरं
पित्तनाशकं ॥ दंतशोफहरंचैवऋषीणांबहुसंमतं ॥

**चण्याचीं पानें** रुचिकर, दुर्जर, कफकारक, मलावष्टंभक, आंबट, मधुर, पित्त-नाशक, दंतशोफाहर असीं आहेत.

वास्तुकंमधुरंशीतंक्षारंरुचिकरंसरं ॥ पाचकंमलमूत्राणांशोधकं
चाग्निदीपनं ॥ लघुशुक्रप्रदंबल्यंहृद्यंचज्वरनाशनं ॥ त्रिदोषार्शःकृ
मिप्लीहारक्तरुक्कुष्ठपित्तनुत् ॥ उदावर्तभवंवातंनाशयेदितिकीर्तितं ॥

**चाकवत** मधुर, शीत, खारट, रुचिकर; सारक, पाचक, मल व मूत्र यांना शुद्ध करणारा, अग्निदीपक, लघु, शुक्रप्रद, बलकर, हृद्य, ज्वरनाशक व त्रिदोष, अर्श, कृमि, प्लीहा, रक्तविकार, कुष्ठ, पित्त, उदावर्तवायु यांचा नाश करितो.

चातुर्जातंरुचिकरंपित्तलंचाग्निदीपनं ॥ रूक्षोष्णंचसुगंधि
स्यात्तुतीक्ष्णंवर्ण्यंलघुस्मृतं ॥ कटुवृष्यंबलकरंकफघ्नंचर

सायनं ॥ स्वरभेदंविषंवातंमुखरोगंचनाशयेत् ॥ श्वासंका
संनाशयतोत्येवमाहुर्मनीषिणः ॥

चातुर्जात म्हणजे दालचिनी, एलची, तमालपत्र, नागकेशर रुचिकर, पित्तल, अग्निदीपक, रुक्ष, उष्ण, सुगंधि, तीक्ष्ण, वर्ण्य, लघु, तिखट, वृष्य, बलकर, कफनाशक, रसायन व स्वरभेद, विष, वायु, मुखरोग, श्वास, कास यांचा नाश करितें.

चातुर्भद्रंपाचकंस्याज्ज्वरजीर्णज्वरापहं ॥
त्रिदोषकंठरुक्शोथारुचिशूलामनाशनं ॥

चातुर्भद्र पाचक, व ज्वर, जीर्णज्वर, त्रिदोष, कंठरोग, सूज, अरुचि, शूल, आणि आम यांचा नाश करितें.

चारमूलंतुतुवररक्तरुक्कफपित्तहं ॥ चारमज्जातुमधुरावृष्यास्नि
ग्धाचशीतला ॥ मलस्तंभकरीचामवर्धकादुर्जरामता ॥ हृद्याचशु
क्लावातपित्तनाशकरीमता ॥

चारवृक्षाचें मूळ म्हणजे जिच्या चारोळ्या होतात तें तुरट, रक्तरोग, कफ, पित्त यांचा नाश करितें; व चाराच्या वृक्षाची मज्जा मधुर, वृष्य, स्निग्ध, शीतल, मलस्तंभक, आमवर्धक, दुर्जर, हृद्य, शुक्ल आणि वातपित्तनाशक अशी आहे.

चारिलीमधुरावृष्याचाम्लागुर्वीसरामता ॥ मलस्तंभकरीस्निग्धा
शीतलाधातुवर्धिनी ॥ कफकृत्दुर्जराबल्याप्रियावातविनाशिनी ॥
पित्तदाहज्वरतृषाक्षतरुक्रक्तदोषनुत् ॥ क्षतक्षयंनाशयतितन्म
ज्जामधुरामता ॥ वृष्याचदाहपित्तघ्नीतत्तैलंमधुरंगुरु ॥ किंचिदु
ष्णंकफकरंपित्तवातविनाशनं॥

चारोळ्या मधुर, वृष्य, आंबट, गुरु, सारक, मलस्तंभक, स्निग्ध, शीतल, धातुवर्धक, कफकारक, दुर्जर, बलकारक, प्रिय व वात, पित्त, दाह, ज्वर, तृषा, क्षतरोग, रक्तदोष, क्षतक्षय यांचा नाश करितात. फळांतील गोळे मधुर, वृष्य, व दाह, पित्त यांचा नाश करितात. चाराचें तेल मधुर, जड, किंचित् उष्ण, कफकारक, व पित्त, वात यांचा नाश करणारें आहे.

सुवर्णचंपकश्चोक्तस्तिक्तःकटुश्चशीतलः ॥ तुवरोमधुरोवृष्योहृद्यश्चे

वसुगंधिदः ॥ भ्रमराणांघानकरोदाहापित्तकफापहः ॥ रक्तदोषंमूत्र कृच्छ्रंवातंकुष्ठंविषंनथा ॥ कृमिकंडूव्रणांश्चैवनाशयेदितिकीर्तितः ॥

**सोनचांफा** कडू, तिखट, शीतळ, तुरट, मधुर, वृष्य, हृद्य, सुगंधि, भ्रमरांचा नाश करणारा व दाह, पित्त, कफ, रक्तदोष, मूत्रकृच्छ्र, वात, कुष्ट, विष, कृमि, कंडू, व्रण यांचा नाश करितो.

नागनामाचंपकस्तुवर्ण्यश्चोष्णःकटुःस्मृतः ॥ व्रणरोपणकारीचच क्षुष्यःकफवातहा ॥ वस्त्वंतरस्यसंयोगादग्निस्तंभकरोमतः ॥

**नागचांफा** वर्ण्य, उष्ण, तिखट, व्रणरोपण, चक्षुष्य व कफ, वायु यांचा नाश करितो. व दुसऱ्या वस्तूच्या संयोगानें अग्निस्तंभक आहे.

श्वेतस्तुचंपकःप्रोक्तःसरस्तिक्तःकटुःस्मृतः ॥ तुवरोष्णःकुष्ठकंडूव्र णशूलकफापहः ॥ वातंचोदररोगंच आध्मानंचैवनाशयेत् ॥

**खुरचांफा** सारक, कडू, तिखट, तुरट, उष्ण व कुष्ट, कंडू, व्रण शूल, कफ, वायु, उदर आणि आध्मान यांचा नाश करितो.

भूमिजश्चंपकश्चोष्णःकटुःशोथरुजापहः ॥
गलगंडव्रणंचैवनाशयेदितिकीर्तितः ॥

**भुयचांफा** उष्ण, तिखट व सूज, गलगंड, व्रण यांचा नाशक असा आहे.

प्रसारिणीगुरुश्चोष्णातिक्तावल्यासरामता ॥ भग्नास्थिसंधान करीकांतिकृद्धातुवर्धका ॥ वातार्शशोथकफहामलस्तंभक रीमता ॥ वातरक्तंत्रिदोषंचनाशयेदितिकीर्तिता ॥

**चांदवेल** गुरु, उष्ण, कडू, बलकर, सारक व मोडलेल्या हाडाला सांधणारी व कांतिकारक, धातुवर्धक, आहे. व वातार्श, सूज, कफ, वातरक्त, त्रिदोष यांचा नाश करिते. व मलस्तंभक आहे.

श्वेतचिल्लीसराशीतापथ्याज्वरत्रिदोषहा ॥

**पांढरी चील** सारक, शीतळ, पथ्यकारक आणि ज्वरनाशक अशी आहे.

रक्तचिल्लीसरालघ्वीपट्वीमेध्याचशीतला ॥ रुचिप्रदाबलकरीरु क्षाचाग्निप्रदीपनी ॥ रुक्षापथ्याचमधुरापाकेकट्वीकषायका ॥ क

फवातप्रमेहांश्चपित्तंरक्तरुजंतथा ॥ मूत्रकृच्छ्रंचयकृतंरक्तदोषंकृ
मीन्हरेत् ॥

**तांबडी चील** सारक, लघु, खारट, वेष्य शीतळ, रुचिकर, बलकारक, रुक्ष, अग्नि-दीपक, रुक्ष, पथ्यकारक, मधुर, पाककाळीं तिखट, तुरट व कफ, वायु, प्रमेह, पित्त, रक्तरोग, मूत्रकृच्छ्र, यकृत, रक्तदोष आणि कृमि यांचा नाश करिते.

चिल्लीभेदःपत्रशाकःसरःशीतोमधुःस्मृतः ॥ क्षारोरुक्षोगुरूरुच्योम
लस्तंभकरोमतः ॥ वातंपित्तंकफंचैवनाशयेदितिकीर्तितः ॥

**पत्रशाक** सारक, शीतळ, मधुर, खारट, रुक्ष, गुरु, रुच्य, मलस्तंभक व वायु, पित्त, कफ यांचा नाश करिते.

शुनचिल्लीतुतीक्ष्णोक्ताकटुःकंडूव्रणापहा ॥

**कुत्रचील** तीक्ष्ण, तिखट व कंडू, व्रण यांची नाशक अशी आहे.

तिक्तामुमधुराबल्यावीर्यदावृष्यशीतला ॥ स्निग्धापित्तकफघ्नीच
अतिसारक्षतंज्वरं ॥ रक्तपित्तंत्रिदोषंचहन्यात्नागबलाभिधा॥ अ
स्यास्त्वचायाश्चूर्णचदुग्धशर्करयायुतं ॥ मूत्रातिसारंजयतिविज्ञेयं
नत्वतोबुधैः ॥

**लघुचिकणा** कडू, मधुर, बलकर, वीर्यप्रद, वृष्य, शीतळ, स्निग्ध व पित्त, कफ, अतिसार, क्षत, ज्वर, रक्तपित्त, त्रिदोष यांचा नाश करितो. याच्या मुळांच्या सालीचें चूर्ण दूध व साखर यांशीं घेतलें असतां मूत्रातिसाराचा नाश करिते.

बृहन्नागबलाचाम्लामधुराचत्रिदोषहा ॥
दाहज्वरहराप्रोक्तापूर्ववैद्यैर्मनीषिभिः ॥

**थोर चिकणा** आंबट, मधुर व त्रिदोष, दाह, ज्वर यांचा नाशक असा आहे.

चिर्भटःशीतलोग्राहीगुरुश्चमधुरःस्मृतः ॥ मलस्तंभकरःपित्तमूत्र
कृच्छ्राश्मरीहरः ॥ दाहंप्रमेहंवातंचशोषंचैवविनाशयेत् ॥ तत्कोम
लफलंवातकोपनंकफपित्तनुत् ॥ तत्पक्वंपित्तलंचोष्णंमुनिभिः
परिकीर्तितं ॥

**चिर्भट—चिबूड—गोपालकर्कटी** शीतळ, ग्राहक, गुरु, मधुर, मलस्तंभक व पित्त,

मूत्रकृछ्र, अश्मरी, दाह, प्रमेह, वायु, शोष यांचा नाश करिते. ती कोंवळी असतां वातकर, व कफ, पित्त यांची नाशक आहे, व पिकलेली पित्तकर, उष्ण, असी आहे.

कुलिंजरंतुरुक्षंस्याच्छीतलंभेदकंमतं ॥ तुवरंमधुरंक्षारंतिक्तंपाके कटुस्मृतं ॥ स्वादिष्टंवातकृत्श्वासकासश्लेष्मविनाशनं ॥

कुलिंजर- चिरफोटी- कुंवली रुक्ष, शीतल, भेदक, तुरट, मधुर, खारट, कडू, पाककालीं तिखट, स्वादिष्ट, वातकर व दमा, खोकला आणि कफ यांचा नाश करिती.

चिंचावृक्षोगुरुश्चोष्णश्चाम्लःपित्तकफप्रदः॥ रक्तकोपनकारीचवा ननाशकरोमतः ॥ चिंचापुष्पंतुतुवरंस्वाद्वम्लंचरुचिप्रदं ॥ विशदं चाग्निजनकंलघुवातकफापहं ॥ प्रमेहघ्नंसमुद्दिष्टंपर्णंशोथहरंमतं ॥ रक्तदोषहरंचैवफलंचास्यतुकोमलं ॥ अत्यम्लंग्राहकंचोष्णंरुच्यं चाग्निप्रदीपकं ॥ रक्तपित्तस्यपित्तस्यकफरक्तस्यकोपनं ॥ वात नाशकरंप्रोक्तंतत्पक्वंवातलंमतं ॥ कफपित्तकरंचैवतत्पक्वंमधुरंस रं ॥ अम्लंहृद्यंभेदकंचमलस्तंभकरंमतं ॥ दीपनंरुचिदंचोष्णंरुक्षं बस्तिविशोधनं ॥ व्रणदोषंकफंवातंजंतूंश्चैवविनाशयेत् ॥ शुष्कं चिंचाफलंहृद्यंलघुभ्रांतिश्रमापहं ॥ तृषाहरंक्लमहरंकृमिनाशकरंमतं ॥

चिंचेचें झाड गुरु, उष्ण, आंबट, पित्तकर, कफप्रद, रक्तकोपन, वातनाशक असें आहे. चिंचेचीं फुलें तुरट, स्वादु, आंबट, रुचिकर, विशद, अग्निदीपक, लघु व वायु, कफ, प्रमेह यांचा नाश करितात. चिंचेचीं पानें सूज व रक्तदोष यांचा नाश करितात, कोंवळ्या चिंचा अति आंबट, ग्राहक, उष्ण, रुचिकर, अग्निदीपक व रक्तपित्त, पित्त, कफ, रक्त, यांना कोपविणाऱ्या, वातनाशक आहेत. जुन चिंचा वातल व कफ, पित्त यांना करणाऱ्या अशा आहेत. पिकया चिंचा मधुर, सारक, आंबट, हृद्य, भेदक, मलस्तंभक, दीपन, रुचिकर, उष्ण, रुक्ष, बस्तिशोधक व व्रणदोष, कफ, वायु, जंतु यांचा नाश करितात. सुक्या चिंचा हृद्य, लघु व श्रम, भ्रांति, तृषा, क्लम आणि कृमि यांचा नाश करितात.

चिंचानुनूतनावातकफस्यकारिणीमता ॥
सावार्षिकीवातपित्तनाशिनीपरिकीर्तिता ॥

नवी चिंच वात, कफ करणारी आहे. ती एक वर्षाची वातपित्तनाशक अशी आहे.

चिंचाक्षारश्चाग्निमांद्यशूलनाशकरोमतः ॥

चिंचेचे सुकलेल्या सालीचा खार अग्निमांद्य, शूल यांचा नाश करितो.

पक्वचिंचारसश्चाम्लोमधुरोरुचिकृन्मतः ॥
व्रणनाशकरश्चैवलेपनाच्छोथपक्तिहृत् ॥

पिकल्या चिंचांचा रस ह्मणजे वरवट आंबट, मधुर, रुचिकर, व्रणनाशक व लेपानें सूज, पक्तिशूल यांचा नाशक आहे.

चिंचासारंदाहकफकारकंचातिअम्लकं ॥ वातनाशकरंप्रो
क्तंसमानशर्करायुतं ॥ दाहंपित्तंकफंचैवनाशयेदीतिकीर्तितं ॥

चिंचेचें सार दाह, कफ याना करणारें, अतिआंबट, वातनाशक आहे. तेंच बरोबरीनें साखर घालून केलेलें दाह, पित्त आणि कफ यांचा नाश करितें.

चित्रकःपाचकोरूक्षोलघुश्चाग्निप्रदीपनः ॥ पाकेकटुर्ग्राहकश्चति
क्तोष्णोरुचिदोमतः ॥ रसायनोग्निसदृशःशोथकुष्ठार्शकासहा ॥
कृमीन्वातोदरंकंडूंयकृत्संग्रहणींतथा ॥ आमंक्षयंचोदरंचनाशयेदि
तिकीर्तितः ॥ कटुत्वात्कफहाप्रोक्तस्तिक्तत्वात्पित्तनाशकः ॥ उ
ष्णत्वाद्वातहाप्रोक्तोमुनिभिस्तत्वदर्शिभिः ॥

चित्रक पाचक, रूक्ष, लघु, अग्निदीपक, पाककालीं तिखट, ग्राहक, कडू, उष्ण, रुचिप्रद, रसायन, अग्नीसारिखा पराक्रमी, सूज, कुष्ठ, अर्श, खोकला, कृमि, वातोदर, कंडू, यकृत, संग्रहणी, आम, क्षय आणि उदर यांचा नाश करितो. हा तिखट आहे ह्मणून कफाचा नाश करितो. व कडू आहे याकरितां पित्ताचा नाश करितो. आणि उष्ण आहे ह्मणून वातनाश करितो.

रक्तस्तुचित्रकोरुच्योपारदस्यनियामकः ॥ रसायनोलोहवेधीकुष्ठ
नाशकरोमतः ॥ शरीरतूलकरणोमतोवैद्यकपंडितैः ॥

रक्तचित्रक रुचिकर, पारदबंधक, रसायन, लोहाला वेध करणारा, कुष्ठनाशक आणि शरीराला ताजें करणारा असा आहे.

चिल्लिकातुवराकट्वीरसायनकरामता ॥
वमौजीर्णज्वरेचैवहितेतिपरिकीर्तिता ॥

**चिविल—चिल्लिका—चील**—शुद्धघोळीसारिखी असते ती तुरट, तिखट, रसायन, शांति, अजीर्ण, ज्वर यांवर हितकारक आहे.

चुक्रोग्निदीपनश्चोष्णोरुचिकारीलघुःस्मृतः ॥ पित्तलःसारकःपथ्यो ह्यत्यम्लःशूलनाशकः ॥ गुल्माग्निमांद्यहृत्पीडाबद्धविट्कामवात हा ॥ स्वादुतृष्णाशांतिकफवातगुल्मापहोमतः ॥ वातंचमुखवैरस्यं नाशयेदितिकीर्तितः ॥

**चुक्रा** अग्निदीपक, उष्ण, रुचिकर, लघु, पित्तल, सारक, पथ्यकर, गोड, अतिआंबट व शूल, गुल्म, अग्निमांद्य हृदयपीडा, बद्धविट्क, आमवात, तृष्णा, शांति, कफ, वात, गुल्म, वायु, तोंडाचा पचपचीतपणा यांचा नाश करितो.

लघुचुक्रोरसेचाम्लश्चोष्णश्चाग्निप्रदीपकः ॥ मुखशुद्धिकरोरुच्यः पित्तलस्तुवरःस्मृतः ॥ रक्तपित्तकरोग्राहीसंग्रहण्यर्शनाशनः ॥ वातं कफंचामवातंकुष्ठंचातिसृतिंजयेत् ॥

**लघुचुका—आंबवती.** रसकाळीं आंबट, उष्ण, अग्निदीपक, मुखशुद्धि करणारा, रुचिकर, पित्तल, तुरट, रक्तपित्तकारक, ग्राहक व संग्रहणी, अर्श, वायु, कफ, आमवात, कुष्ठ आणि अतिसार यांचा नाश करितो.

अर्जुनोर्कश्चकुटजोमौक्तिकंचाशिलाभवं ॥ कारंजंस्फाटिकंशुक्तं चूर्णमष्टविधंमतं ॥ सुधाह्यर्जुनजाप्रोक्ताकफस्यचविनाशिनी ॥ अर्कजागुल्मरोगस्यकौटजाशोषनाशिनी ॥ मौक्तिकीपित्तशमनी बल्यारुच्याग्निदीपनी ॥ शिलाजापित्तलाचोष्णाकफवातविनाशि नी ॥ अग्निदीप्तिकरीचैवकारंजीतुरुचिप्रदा ॥ वातनाशकरीप्रो क्तास्फाटिकीदंतदार्ढ्यकृत् ॥ शुक्तिजातुमतारुक्षाजंतुनाशकरीमता ॥

**चुना** अर्जुनवृक्ष, रुई, कुडा, मोती, शिला, करंजवृक्ष, स्फटिक आणि शिंपी या आठांपासून होतो, त्यांत अर्जुन वृक्षाचा चुना कफनाशक आहे. रुईचा गुल्मनाशक आहे. कुड्याचा शोषनाशक. मोत्यांचा पित्तशामक, बल्य, रुचिकर, अग्निदीपक, असा आहे. शिळेचा पित्तल, उष्ण, कफ, वायु यांचा नाशक व अग्निदीपक आहे. करंजवृक्षाचा रुचिप्रद,

वातनाशक आहे. स्फटिकाचा दंत दृढ करणारा, शिंपीचा रुक्ष, जंतुनाशक असा आहे.

द्वीपांतरवचातिक्ताचोष्णाचाग्निप्रदीपनी ॥ धातुवृद्धिकरीबल्यामल मूत्रविशोधिनी ॥ तारुण्यदापौष्टिकीचवृष्याचैवरसायनी ॥ गर्भ प्रदाबद्धविट्कमाध्मानोन्मादनाशिनी ॥ वातंशूलमपस्मारधातुक्ष यविनाशिनी ॥ अंगग्रहंफिरंगोपदंशंमांद्यंकटिग्रहं ॥ पक्षाघात मुरुस्तंभंराजयक्ष्मव्रणौतथा ॥ गंडमालांनेत्ररोगंशुक्रशोणितदो षकं ॥ सर्वांगकंपवातंचकुब्जवातंचनाशयेत् ॥

द्वीपांतरवचा—चोपचिनी कडु, उष्ण, अग्निदीपक, धातुवर्धक, बलकर, मल व मूत्र याना शोधन करणारी, तारुण्यदायक, पुष्टिकर, वृष्य, रसायन, गर्भप्रद, बद्धविट्क आध्मान, उन्माद, वायु, शूल, अपस्मार, धातुक्षय, अंगग्रह, फिरंगोपदंश, मांद्य, कटिग्रह, पक्षाघात, उरुस्तंभ, क्षय, व्रण, गंडमाला, नेत्ररोग, शुक्र व शोणित यांचे दोष, सर्वांगवात कंपवात आणि कुब्जवात यांचा नाश करिते.

चोरवल्लीतुमधुरातिक्तापाकेकटुःस्मृता ॥ लघ्वीतीक्ष्णाचहृद्याच सुगंधाशीतलामता ॥ भक्षणाल्लेपनेनैवदेहदौर्गंध्यशोथहा ॥ अ ग्निदग्धव्रणंकुष्टंत्वग्रुजंचकफंतथा ॥ वातंकंडूंरक्तदोषंमेदंस्वेदंज्वरं तथा ॥ विषंव्रणंभूतबाधांनाशयेदितिकीर्तिता ॥

चोरवल्ली मधुर, कडु, पाककाळीं तिखट, लघु, तीक्ष्ण, हृद्य, सुगंध, अतिशीतळ, भक्षणानें शोथनाशक, व लेपनानें दुर्गंधनाशक आहे व अग्निदग्धव्रण, कुष्ट, त्वचेचा रोग, कफ, वायु, कंडू, रक्तदोष, मेद, स्वेद, ज्वर, विष, व्रण आणि भूतबाधा याचा नाश करिते.

श्रीखंडःकटुकस्तिक्तोवृष्यःशीतःकषायकः ॥ कांतिकृत्कामजन कोहृद्यश्चसुरभिर्मतः ॥ आन्हादनोलघूरुक्ष पित्तभ्रांतिज्वरापहः ॥ छर्दितृट्क्रामसंतापदाहश्रमार्तिनाशनः ॥ मुखरोगंरक्तदोषंनाशये दितिकीर्तितः ॥

पांढराचंदन तिखट, कडू, वृष्य, शीतळ, तुरट, कांतिकारक, कामजनक, हृद्य, सुरभि, आनंदकारक, लघु, रुक्ष व पित्त, भ्रम, ज्वर, वांति, तृषा, क्लमि, संताप, दाह, श्रम, मुखरोग, रक्तदोष यांचा नाश करितो.

श्रीखंडोयंद्वितीयःस्यादतिशीतश्चतिक्तकः ॥ दाहपित्तज्वरच्छर्दिमो
हतृष्णाविनाशकः ॥ रक्तरुक्कुष्ठतिमिरकासांश्चैवविनाशयेत् ॥

टचंदन अति शीतळ, कडू व पित्तज्वर, वांति मोह, तहान, रक्तदोष, कुष्ट,
र आणि खोकला यांचा नाशक आहे.

मृतश्च चंदनःशीतःसुगंधिस्तिक्तकोमतः ॥
रक्तरुक्मूत्रकृच्छ्रघ्नःपित्तदाहविनाशकः ॥

मृतचंदन (जाग्यावर मरून आपोआप शुष्क झाला तो.) शीत, सुगंधि, कडू व रक्त
, मूत्रकृच्छ्र, पित्त आणि दाह यांचा नाश करितो.

श्रीखंडोग्रंथिभिच्छिद्रैर्युक्तश्चैवजडःस्मृतः ॥ उखरःश्वेतवर्णश्चछे
दनेरक्तवर्णकः ॥ घर्षणेपीतवर्णश्चभासितस्तिक्तकःस्मृतः ॥ शी
तश्चातिसुगंधश्च उत्तमःपरिकीर्तितः ॥ एतैर्गुणैस्तुन्यूनोयोमध्यमः
परिकीर्तितः ॥ एतैर्गुणैर्हीनतमःश्रीखंडश्चाधमःस्मृतः ॥

जो चंदन गांठाळ छिद्रें पडलेला, तो जड, उखर, श्वेतवर्ण, साल काढल्यावर
रक्तवर्ण, उगाळिला असता पिंवळा, स्वादानें कडू, शीतळ, अतिसुगंध तो उत्तम व जो या
हीं लक्षणानीं युक्त तो मध्यम. आणि हीं लक्षणें ज्यांत मुळींच नाहींत तो अधम जाणावा.

कैरातकःशीतलश्चतिक्तःपित्तकफापहः ॥ विस्फोटपामाकंडूतिश्र
मवातविनाशकः ॥ गजकर्णादिकुष्टानिलूतातृड्मोहनाशनः ॥

गवरचंदन शीतळ, कडु व पित्त, कफ, विस्फोट, पामा, कंडूति, श्रम, वायु,
गजकर्णादिकुष्टें, लूता, तृषा आणि मोह यांचा नाशक आहे.

पीतश्चचंदनःशीतस्तिक्तःकांतिकरोमतः ॥ विचर्चिकाकुष्टकंडूक
फदद्रुविषापहः ॥ रक्तपित्तकृमिव्यंगपित्ततृड्ज्वरदाहहा ॥

पीतचंदन—मलयागर शीतळ, कडु, कांतिकारक व विचर्चिका, कुष्ट, कंडू, क
फ, दद्रु, विष, रक्तपित्त, कृमि, व्यंग, पित्त, तृषा, ज्वर आणि दाह यांचा नाश करितो.

रक्तश्चचंदनःस्वादुरतिशीतोगुरुःस्मृतः ॥ चक्षुष्यस्तिक्तकोवृष्यो
वर्ण्यःकफकरोमतः ॥ नेत्ररुक्रक्तदोषघ्नःपित्तकासज्वरापहः ॥ वां

निभ्रांतितृषांदाहंव्रणंजंतूनूविषंतथा ॥ व्यंगंचवातपित्तंचरक्तपित्तं
चनाशयेत् ॥ राक्षसानांपिशाचानांबाधायाश्चविनाशनः ॥

रक्तचंदन गोड, अतिशीतळ, गुरु, चक्षूंना हितावह, कडु, वृष्य, कर्णकर, कफकर व नेत्ररोग, रक्तदोष, पित्त, कास, ज्वर, वांति, भ्रांति तृषा, दाह, व्रण, कृमि, विष, व्यंग, वातपित्त, रक्तपित्त, राक्षसबाधा आणि पिशाचबाधा यांचा नाश करितो.

बर्बरश्चंदनःशीतस्तिक्तोवातकफापहः ॥
कंडूंकुष्टंव्रणंपित्तंरक्तदोषंचनाशयेत् ॥

बर्बरचंदन—श्वेतरक्तवर्ण शीतळ, कडू व वायु, कफ, कंडू, कुष्ट, व्रण, पित्त, आणि रक्तदोष, यांचा नाश करितो.

कुंकुमागरुकःशीतस्तिक्तःपित्तश्रमापहः ॥ शोषंचदवथुंचैवना
शयेदितिकीर्तितः ॥ स्वर्गिभोग्योमनुष्याणांदुर्लभःपरिकीर्तितः ॥

कुंकुमागरु—हरिचंदन—पीतरक्तवर्ण शीतळ, कडू व पित्त, श्रम, शोष, दमा यांचा नाश करितो. हा देवांना भोग्य आहे. मनुष्यांना दुर्लभ आहे.

चंचुशाकस्तुमधुरस्तीक्ष्णःशीतःकषायकः ॥ सराग्निदीपनी
हृद्याबल्याधातोश्चवर्धिनी ॥ स्निग्धारसायनाप्रोक्तागुल्मो
दरकफापहा ॥ त्रिदोषवातग्रहणीमलबंधार्शनाशना ॥ मू
त्रकृच्छ्रंरक्तदोषंबस्तिवातंचनाशयेत् ॥

चंचुक मधुर, तीक्ष्ण, शीत, तुरट, सारक, अग्निदीपक, हृद्य, बल्य, धातुवर्धक, स्निग्ध रसायन व गुल्म, उदर, कफ, त्रिदोष, वायु, संग्रहणी, मलबन्धता, अर्श, मूत्रकृच्छ्र, रक्तदोष, बस्तिवात यांचा नाश करिते

महाचंचुस्तुतुवराकटूष्णामलरोधिनी ॥
रसायनीगुल्मशूलविषार्शोदरनाशिनी ॥

थोरचंचु तुरट, तिखट, उष्ण, मलरोधक, रसायन व गुल्म, शूल, विष, अर्श, आणि उदर यांचा नाश करिते.

क्षुद्राचंचुस्तुमधुरातीक्ष्णोष्णातुवरामता ॥ अग्निदीप्तिकरीगुल्मम
लस्तंभविनाशिनी ॥ शूलार्शनाशिनीप्रोक्तापूर्वैःसूरिजनैरियं ॥

**क्षुद्रचंचु** मधुर, तीक्ष्ण, उष्ण, तुरट, अग्निदीपक व गुल्म, मलस्तंभ, शूल, अश्म यांचा नाश करिते.

चंचुशाकाभवंबीजंकटूष्णंचोदरापहं ॥ त्वग्दोषगुल्मशूलानिकंडूं
पामादिकुष्ठकं ॥ आखोर्विषंनिहंत्याशुइतिपूर्वजनैर्मतं ॥

**चंचुशाकाबीज** तिखट, उष्ण व उदर, त्वग्दोष, गुल्म, शूल, कंडू, पामादिक कुष्ठ, उंदराचें विष यांचा नाश करितें.

चंडालकंदोमधुरोरसायनकरःस्मृतः ॥
कफंपित्तंरक्तदोषंभूतबाधांविषंजयेत् ॥

**चंडालकंद** मधुर, रसायन व कफ, पित्त, रक्तदोष आणि भूतबाधा यांचा नाशक आहे.

चंद्रकांतमणिःशीतःस्निग्धोरक्तरुजापहः ॥
दाहपित्तालक्ष्मिग्रहपीडाविनाशकः ॥

**चंद्रकांतमणि** शीत, स्निग्ध व रक्तदोष, दाह, पित्त, अलक्ष्मी आणि ग्रहपीडा यांचा नाश करितो.

चंद्रुसःकटुकःस्वादुःस्निग्धश्चोष्णश्चशुकलः ॥ लघुर्वृष्यः
कांतिकरःकंडुस्वेदज्वरापहः ॥ ग्रहपीडाकुष्ठदाहान्नाशये
दितिकीर्तितः ॥

**चंद्रुस** तिखट, स्वादु, स्निग्ध, उष्ण, शुकल, लघु, वृष्य, कांतिकारक, व कंडू, घाम, ज्वर, ग्रहपीडा, कुष्ठ, दाह, यांचा नाश करितो.

जीवंतिकःपटुश्चैवपाकेस्वादुर्बलप्रदः ॥
त्रिदोषनाशनकरोविशेषात्त्वयमीरितः ॥

**चंदनबटवा** खारट, पाककालीं स्वादु, बलप्रद व विशेषेंकरून त्रिदोषनाशक आहे.

हिमांशुःशीतलःप्रोक्तःस्त्रीणामाल्हादकारकः ॥
दाहनाशकरश्चैवकामोद्दीपनकारकः ॥

**चंद्र** शीतल, स्त्रियांना आनंद देणारा, दाहनाशक व कामोद्दीपक असा आहे.

अतसीमधुरास्निग्धागुर्वीचोष्णाबलप्रदा ॥ पाकेकट्वीचतिक्ताच कफवातव्रणापहा ॥ पृष्ठशूलंचशोथंचपित्तंशुक्रंदृशंजयेत् ॥ पर्ण मस्याःकासकफवाततनुत्बीजकंतथा ॥

**जवस—अळसी** मधुर, स्निग्ध, गुरु, उष्ण, बलप्रद, पाककाळीं तिखट, कडू, व कफ, वात, व्रण, पृष्ठशूल, सूज, पित्त, शुक्रधातु आणि दृष्टि यांचा नाश करिते. हिचीं पानें व बीज खोकला, कफ, वायु यांचा नाश करितात.

जटामांसीतुतुवराशीतलाकांतिकारका ॥ बल्याकट्वीस्वादु तिक्ताकफांतर्दाहपित्तहा ॥ विसर्पकुष्ठत्वग्दोषभूतबाधाज रापहा ॥ दाहंत्रिदोषंवातंचरक्तदोषंविषंहरेत् ॥

**जटामांसी** तुरट, शीतल, कांतिकारक, बलकर, तिखट, गोड, कडू व कफ, अंतर्दाह, पित्त, विसर्प, कुष्ठ, त्वग्दोष, भूतबाधा, ज्वर, दाह, त्रिदोष, वात, रक्तदोष आणि विष, यांचा नाश करिते.

कृष्णासुगंधामांसीतुकेश्यासुरभितिक्तका ॥ वर्ण्याचशीतलाप्रोक्ता कफकंठरुजाहरा ॥ भूतबाधारक्तपित्तरक्षोबाधाज्वरापहा ॥ विष वातहराचान्येगुणामांसीवदीरिताः ॥

**काळी सुगंध—जटामांसी** केश्य, सुगंधि, कडू, वर्णकर, शीतल व कफ, कंठरोग, भूतबाधा, रक्तपित्त, राक्षसबाधा, ज्वर, विष आणि वायु यांचा नाश करिते.

आकाशमांसीवर्ण्यातुशीतलाव्रणशोथहा ॥ जालगर्दभकंलूतावि स्फोटंचमसूरिकां ॥ नाडीव्रणांविसर्पादिनाशयेदितिकीर्तिता ॥

**आकाशजटामांसी** वर्ण्य, शीतल, व्रणशोथ, जालगर्दभनामक क्षुद्ररोग, लूता, विस्फोट, देवी, नाडीव्रण, आणि विसर्प इत्यादिकांचा नाश करिते.

यवक्षारःसरश्चोष्णःकटुरग्निप्रदीपकः ॥ सूक्ष्मोलघुर्वातकफशूला श्मरिरुजापहः ॥ वातरोगंकंठरोगमामशूलाश्मरीहरः ॥ यकृत्प्ली हमूत्रकृच्छ्रगुल्मश्वासार्शेप्सशनः ॥ आनाहवातहृद्रोगमामंपांडुरुजं तथा ॥ ग्रहणींनाशयत्येवंपूर्वाचार्यैर्निरूपितं ॥

**यवखार—जवखार** सारक, उष्ण, तिखट, अग्निदीपक, सूक्ष्म, लघु व वायु, कफ,

शूल, अश्मरी, वातरोग, कंठरोग, आमशूल, यकृत्, प्लीहा, मूत्रकृच्छ्र, गुल्म, श्वास, अर्श, आनाहवात, हृद्रोग, आम, पांडुरोग आणि ग्रहणी यांचा नाश करितो.

जलपिप्पलिकाहृद्याचक्षुष्याशीतलामता ॥ रसकालेचकटुकाग्राहिणीशुक्रलालघुः ॥ रूक्षातीक्ष्णाचतुवरामुखशुद्धिकरीमता ॥ रुच्याग्निदीपनीवातकारिणीरक्तदोषहा ॥ रसदोषंकृमीन्दाहंव्रणंश्वासंकफंतथा ॥ वातंविषंभ्रमंमूर्छांतृषांपित्तज्वरंहरेत् ॥

जलपिंपळी हृद्य, चक्षुष्य, शीतल, रसकालीं तिखट, ग्राहक, शुक्रल, लघु, रूक्ष, तीक्ष्ण, तुरट, मुखशुद्धिकारक, रुचिकर, अग्निदीपक, वातकर, रक्तदोषनाशक व रसदोष, कृमि, दाह, व्रण, श्वास, कफ, वायु, विष, भ्रम, मूर्छा, तृषा आणि पित्तज्वर याचा नाश करितें.

बलमोटाकटुकातिक्तोष्णामदगंधिका ॥ मूत्रकृच्छ्रंकफंवातंविषंकंठरुजंतथा ॥ भूतबाधांचपित्तंचनाशयेदितिकीर्तिता ॥

जयंती तिखट, कडू, उष्ण, मदगंधि व मूत्रकृच्छ्र, कफ, वात, विष, कंठरोग, भूतबाधा आणि पित्त यांचा नाश करिते.

अग्निमनाबलमोटातुरसायनकरीमता ॥
गुणाश्चान्येजयंतीवत्स्मृताःपूर्वैर्महर्षिभिः ॥

काळी जयंती रसायन आहे, बाकीचे गुण जयंतीसारिखेच आहेत.

जंबूवृक्षस्तुतुवरोग्राहीमधुरपाचकः ॥ मलस्तंभकरोरूक्षोरुचिकृत्पित्तदाहहा ॥ अम्लःकंठ्यःकृमिश्वासशोषातीसारकासहा ॥ रक्तदोषंकफंचैवव्रणंचैवविनाशयेत् ॥ फलंचतुवरंचाम्लंमधुरंशीतलंमतं ॥ रुच्यंरूक्षंग्राहकंचलेखनंकंठदूषकं ॥ मलस्तंभकरंवातकारकंकफपित्तनुत ॥ आध्मानकारकंप्रोक्तंपूर्ववैद्यैर्मनीषिभिः ॥

जांभूळ तुरट, ग्राहक, मधुर, पाचक, मलस्तंभक, रूक्ष, रुचिकर व पित्त, दाह यांचा नाशक व आंबट, कंठाला हितावह व कृमि, श्वास, शोष, अतिसार, कास, रक्तदोष, कफ, व्रण यांचा नाशक आहे. याचें फळ तुरट, आंबट, मधुर, शीतल, हृद्य, रूक्ष, ग्राहक, लेखन, कंठदूषक, मलस्तंभक, वातकारक, व कफ, पित्त, आध्मानवायु यांचा नाश करितें.

राजजंबूस्तुमधुराचोष्णाचतुवरामता ॥ स्थैर्यामलस्तंभकरीश्वास

शोषश्रमापहा ॥ मुखजाड्यातिसारघ्नीकफकासविनाशिनी ॥ फलंचास्यास्तुरुचिदंमधुरंस्तंभकंगुरु ॥ दोषनाशकरंस्वादुऋषिभिः परिकीर्तितं ॥

राजजंबूवृक्ष मधुर, उष्ण, तुरट, रुच्य, मलस्तंभक व श्वास, शोष, श्रम, मुखजाड्य, अतिसार, कफ, खोकला यांचा नाश करितो. याचें फळ रुचिकर, मधुर, स्तंभक, गरु, दोषनाशक आणि स्वादु असें आहे.

जलजंबूस्तुतुवराशीतातिक्तागुरुःस्मृता ॥ पाकेचमधुराचाम्लापुष्टिकृद्ग्राहिणीमता ॥ वीर्यवृद्धिकरीबल्याश्रमदाहातिसारहा ॥ रक्तदोषंकफंपित्तंव्रणंचैवाविनाशयेत् ॥

जलजंबूवृक्ष तुरट, शीत, कडू, गुरु, पाककाळीं मधुर, आंबट, पुष्टिकर, ग्राहक, वीर्यवृद्धिकारक, बलकर व श्रम, दाह, अतिसार, रक्तदोष, कफ, पित्त आणि व्रण यांचा नाश करितो.

क्षुद्रजंबूस्तुतुवराहृद्याचमधुरामता ॥ वीर्यप्रदाग्राहिणीचपुष्टिकृत्कफपित्तहा ॥ हृद्रोगंकंठरोगंचदाहंचैवविनाशयेत ॥ अस्याःफलगुणाःप्रोक्ताराजजंबूफलैःसमाः ॥

भुयजांभूळ तुरट, प्रिय, मधुर, वीर्यप्रद, ग्राहक, पुष्टिकारक व कफ, पित्त, हृद्रोग, कंठरोग आणि दाह, यांचा नाश करिते. हिच्या फळाचे गुण राजजंबुफळासारखेच आहेत.

जातीफलंतुतुवरंकटुवृष्यंचदीपनं ॥ रसेतिक्तंलघुग्राहिहृद्यंचोष्णंस्वरेहितं ॥ कंठरोगंकफंवातंमेहंवातातिसारकं ॥ मलदौर्गंध्यशमनंमुखवैरस्यकारकं ॥ कृमिनाचकासंछर्दिंश्वासंचपीनसं ॥ हृद्रोगशोषशमनमृषिभिःपरिकीर्तितं ॥

जायफळ तुरट, तिखट, वृष्य, दीपन, रसकाळीं कडू, लघु, ग्राहक, हृद्य, उष्ण, स्वराविषयीं हितकर व कंठरोग, कफ, वायु, मेह, वातातिसार, मलदौर्गंध्य यांचें शामक व मुखवैरस्यकारक व काळेपणा; कृमि, खोकला, वांति, दमा, पीनस, हृद्रोग, शोष यांचा नाश करणारें आहे.

जातिपत्रीचकटुकातिक्ताचसुरभिर्मता ॥ मुखवैशद्यजनकास्वाद्वी वर्णकरीलघुः ॥ कांतिप्रदाचरुच्योष्णाचांगजाड्यकफापहा ॥ रक्त

**सितात्रय–त्रिसिता** मधुर, उष्ण व कंठरोग, शोक, तंद्रा, कफ आणि पित्त यांचा नाश करिते.

त्रिकार्षिकंज्वरंशोथंपित्तंवातंभ्रमंतथा ॥
आमंशूलमतीसारंग्रहणींचविनाशयेत् ॥

**त्रिकार्षिक म्हणजे** अतिविष, नागरमोथा, सुंठ हे समभाग ज्वर, सूज, पित्त, वायु, भ्रम, आमशूल, अतिसार आणि संग्रहणी यांचा नाश करितें.

स्थौणेयकंकटुस्तिक्तंबल्यंपुष्टिकरंमतं ॥ सुगंधिमेध्यंसुस्वादुस्निग्धंशुक्रकरंगुरु ॥ त्वच्यंवृष्यंशीतलंचकफवातज्वरापहं ॥ त्रिदोषकुष्ठजंतुघ्नंरक्तदोषतृषापहं ॥ व्यंगदौर्गंध्यदाहघ्नंकंडूत्वग्दोषनाशनं ॥ अलक्ष्मीरक्षसहरंतिलनाशकरंमतं ॥

**शुंगर– स्थौणेयक–गठोन्याचा भेद** तिखट, कडू, बलकर, पुष्टिकारक, सुगंधि, मेध्य, सुस्वादु, स्निग्ध, शुक्रकर, गुरु, त्वच्य, वृष्य, शीतल व कफ, वायु, ज्वर, त्रिदोष, कुष्ट, कृमि, रक्तदोष, तृषा, व्यंग, दुर्गंध, दाह, कंडू, त्वग्दोष, अलक्ष्मी, राक्षसबाधा आणि आंगावरील तीळ याचा नाश करितें.

शालिपर्णीपृष्टिपर्णीबृहतीद्वयगोक्षुरः ॥ बिल्वोग्निमंथश्योनाककाश्मरीपाटलायुतं ॥ दशमूलमिदंतंद्रात्रिदोषश्वासकासहं ॥ ज्वरशोथानाहवातहिक्कापीनसनाशनं ॥पार्श्वमस्तकपीडाचारुचिस्वेदंचनाशयेत् ॥ अपतंत्रकवातंच अग्निमांद्यंचनाशयेत् ॥

**दशमूळ** साळवण, पिठवण, रिंगणी, डोर्ली, गोखरू, बेल, टाकळा, टेंटू, शिवण, पाडळ यांची मुळें एकत्र करावीं तें शापड, त्रिदोष, दमा, खोकला, ज्वर, सूज, आनाहवायु, उचकी, पीनस, पार्श्वपीडा, मस्तकशूल, अरुचि, घाम, अपतंत्रकवायु आणि अग्निमांद्य यांचा नाश करितें.

दर्भःशीतोरुचिकरोमधुरस्तुवरोमतः ॥ स्निग्धःकफकरःशुक्रस्तन्यशुद्धिकरोमतः ॥ कफंरक्तंरक्तपित्तंपित्तंश्वासंतृषांतथा ॥ मूत्रकृच्छ्रंबस्तिशूलंकामलांप्रदरंतथा ॥ रक्तदोषंविसर्पंचच्छर्दिंमूर्च्छांतथाश्मरीं ॥ नाशयेदितिचप्रोक्तोमूलंतस्यतृशीतलं ॥ रुच्यंचमधुरंरक्तज्वरतृड्श्वासकामलां ॥ पित्तंचनाशयेदेवंमुनिभिःपरिकीर्तितं ॥

**क्षुद्रश्वेतदर्भ** लहान पात्याचा व थोर मोठ्या हिरव्या पात्यांचा शीतळ, रुचिकर, मधुर, तुरट, स्निग्ध, कफकर, शुक्रशुद्धिकारक, रजःशोधक व कफ, रक्त, रक्तपित्त, पित्त, दमा,

नाहान, मूत्रकृच्छ्र, बस्तिशूल, कावीळ, प्रदर, रक्तदोष, विसर्प, छर्दि, मूर्छा, तृषा, अश्मरी, यांचा नाश करितो. याचें मूळ शीतळ, रुचिकर, मधुर व रक्त, ज्वर, तृषा, दमा, खोकला, कावीळ आणि पित्त यांचा नाश करितें.

दमनःकटुकःशीततिक्तश्चतुवरोमतः ॥ वृष्योहृद्यःसुगंधिश्चकुष्ट
विस्फोटकंडुहा ॥ द्विदोषंचत्रिदोषंचविषक्लेदनथार्शकं ॥ भूतबाधां
संग्रहणींग्रहपीडांचनाशयेत् ॥

**दमनक**— दवणा तिखट, शीतळ, कडू, तुरट, वृष्य, हृद्य सुगंधि व कुष्ट, विस्फोट, कंडू, द्विदोष, त्रिदोष, विष, क्लेद, अर्श, भूतबाधा, संग्रहणी आणि ग्रहपीडा यांचा नाश करितो.

वन्यजोदमनःप्रोक्तोवीर्यस्तंभनकारकः ॥
बलप्रदश्चामदोषनाशकःपरिकीर्तितः ॥

**वन्यदमनक**— रानदवणा वीर्यस्तंभक, बलप्रद आणि आमदोषनाशक असा आहे.

अग्निदमनकश्चोष्णःकटुरूक्षोग्निदीपनः ॥
रुच्योहृद्योवातकफगुल्मप्लीहाविनाशकः ॥

**अग्निदमनक**— आगीदवणा उष्ण, तिखट, रूक्ष, अग्निदीपक, रुचिकर, हृद्य व वायु, कफ, गुल्म आणि प्लीहा यांचा नाश करितो.

त्वक्कटीपित्तलास्वादाकंठशुद्धिकरीलघुः ॥ रूक्षातिक्ताबस्तिशुद्धि
कारिणीचोष्णदामता ॥ कफार्हृत्कावातकासकंडूहृद्रोगनाशिनी ॥
आमंचबस्तिरोगंचपीनसंचाविषंतथा ॥ शुक्रंचार्शःक्रमींश्चैवनाश
येदितिकीर्तिता ॥

**त्वच**— दालचिनी तिखट, पित्तल, गोड, कंठशुद्धिकारक, लघु, रूक्ष, कडू, बस्तिशोधक, उष्ण व कफ, उचकी, वायु, खोकला, कंडू, हृद्रोग, आम, बस्तिरोग, पीनस, विष, शुक्र, अर्श आणि कृमि यांचा नाश करिते.

तनुत्वक्सुरभिस्तिक्तास्वादाबलकरीमता ॥
वातवृद्धिकरीवातपित्ततृट्मुखदोषनुत् ॥

**तनुत्वक**— पातळ सालीची दुसरी दालचिनी गोड, कडू, स्वादु, बलकर, वातवर्धक व वायु, पित्त, तृषा आणि मुखदोष यांचा नाश करिते.

दाडिमंतुवरंचाम्लंमधुरंतृप्तिकारकं ॥ स्निग्धंचदीपनंग्राहिहृद्यंचो

नागार्जुनीतुमधुरावृष्यारुक्षाचग्राहिणी ॥ तिक्ताचवातलागर्भस्था
पर्नाकटुकापटुः ॥ धातुवृध्दिकरीहृद्याचोष्णापारदबंधिनी ॥ मल
स्तंभकरीमेहकफकुष्टक्रमीनहरेत ॥

दुधी– दुधुर्ली– नागार्जुनी–गोरक्षदुग्धी मधुर, वृष्य, रुक्ष, ग्राहक, कडू, वातल, गर्भस्थापक, तिखट, खारट, धातुवर्धक, हृद्य, उष्ण, पारदबंधक, मलस्तंभक व मेह, कफ, कुष्ठ आणि कृमि यांचा नाश करिते.

स्यात्तुबंधुजीवकोग्राहीकिंचिदुष्णोगुरुर्मतः ॥ कफकृत्तुज्वरहृद्वात
पित्तेचैवविनाशयेत ॥ पिशाचग्रहबाधांचनाशयेदितिकीर्तिता ॥

दुपारी ग्राहक, किंचित उष्ण, गुरु, कफकर, व ज्वर, वात, पित्त, पिशाचबाधा, ग्रहपीडा, यांचा नाश करिते.

दूर्वातुतुवराशीतामधुरातृप्तिदायिनी ॥ पित्ततृट्वांतिदाहास्रदोष
भ्रमकफापहा ॥ मूर्छारुचिविसर्पांश्चभूतबाधांचनाशयेत् ॥

दूर्वा, साधारण तुरट, शीतळ, मधुर, तृप्तिकारक, आहे, व पित्त, तृषा, वांति, दाह, रक्तदोष, भ्रम, कफ, मूर्छा, अरुचि, विसर्प आणि भूतबाधा यांचा नाश करिते.

श्वेतादूर्वातुमधुरारुच्याचतुवरामता ॥ तिक्ताशीतलावांतिविस
र्पतृट्कफापहा ॥ पित्तदाहामातिसारक्तपित्तहरामता ॥ कासंच
नाशयत्येवंपूर्ववैद्यैर्निरूपिता ॥

श्वेतदूर्वा मधुर, रुचिकर, तुरट, कडू, शीतळ, आहे व वांति, विसर्प, तृषा, कफ, पित्त, दाह, आमातिसार, रक्तपित्त, खोकला यांचा नाश करिते.

नीलादूर्वातुमधुरातिक्ताशीतारुचिप्रदा ॥ संजीवनीचतुवरारक्त
शुध्दिकरीमता ॥ रक्तपित्तातिसारघ्नीज्वरपित्तवमीहरा ॥ कफर
क्तरुजंतृष्णांविसर्पंचविनाशयेत् ॥ दाहंचचर्मदोषंचनाशयेदितिकीर्तिता ॥

नीलदूर्वा अतिमधुर, कडू, शीतल, रुचिकर, संजीवन, तुरट, रक्तशोधक आहे, व रक्तपित्त, अतिसार, ज्वर, पित्त, वांति, कफ, रक्तरोग, तृषा, विसर्प, दाह व चर्मदोष यांचा नाश करिते.

स्निग्धदारुःकटुःपाकोस्निग्धोष्णस्तिक्तकोलघुः ॥ कफवातप्रमेहार्श
मलस्तंभामदोषहा ॥ ज्वराध्मानश्वासकासशोथकंडूविनाशकः ॥
हिक्कातंद्रारक्तदोषपीनसंचैवनाशयेत ॥

**नेल्यादेवदार**— चोपडादेवदार— स्निग्धदारु पाककाळीं, तिखट, स्निग्ध, उष्ण, कडू, लघु व कफ, वात, प्रमेह, अर्श, मलस्तंभ, आमदोष, ज्वर, आध्मान, दमा, खोकला, सूज, कंडू, उचकी, तंद्रा, रक्तदोष आणि पीनस यांचा नाश करितो.

देवकाष्ठमतंचोष्णंतिक्तंरुक्षंकफापहं ॥
वातंचभूतबाधांचलेपनाद्व्यंगनाशनं ॥

**काष्ठदेवदार.** उष्ण, कडू, रुक्ष व कफ, वायु, भूतबाधा आणि लेपानें तोंडावरील व्यंग यांचा नाश करितो.

सरलःकटुकस्तिक्तोमधुरोष्णोलघुःस्मृतः ॥ कोष्ठशुद्धिकरःस्निग्धः कफत्वग्दोषवातहा ॥ कर्णरोगव्रणशोथंकंडूंकंठरुजंतथा ॥ अक्षिरोगमलक्ष्मींचकासंस्वेदंविनाशयेत् ॥ रक्षःपीडांचयूकांचनाशयेदितिकीर्तितः ॥

**सरळ देवदार.** तिखट, कडू, मधुर, उष्ण, लघु, कोष्टशोधक, स्निग्ध, व त्वग्दोष, वायु, कर्णरोग, व्रण, सूज, कंडू, कंठरोग, नेत्ररोग, अलक्ष्मी, खोकला, घाम, राक्षसपीडा आणि उवा यांचा नाश करितो.

ज्ञेयोदेवनलःशीतोरुच्यश्चतुवरोमधुः ॥ वीर्यवृद्धिकरस्तिक्तोदीपनोमूत्रशोधनः ॥ विसर्पकृच्छ्रदाहास्रदोषपित्तकफापहः ॥ हृद्रोगबस्तिशूलंचयोनिरुग्रक्तपित्तहा ॥

**देवनळ** शीतल, रुच्य, तुरट, मधुर, वीर्यवर्धक, कडू, दीपन, मूत्रशोधक, व विसर्प, मूत्रकृच्छ्र, दाह, रक्तदोष, पित्त, कफ, हृद्रोग, बस्तिशूल, योनिरोग, आणि रक्तपित्त यांचा नाश करितो.

देवदालीर्वामकरीतिक्ताचोष्णाचऊष्मणा ॥ तीक्ष्णापांडुकफश्वासकासार्शक्षयनाशिनी ॥ कामलाकृमिहिक्काग्नीज्वरशोथविषापहा ॥ भूतबाधारुचिहराचोदरोविषनाशिनी ॥ फलमस्याःसरंतिक्तंगुल्मकृमिकफापहं ॥ शूलार्शकामलावातनाशकंपरिकीर्तितं ॥

**देवडांगरी**- देवदाली (आंगावर कुसवें असून फळें पोफळाएवढीं व बिया कुळथासारिख्या चपट्या असतात) ती वांतिकारक कडू, उष्ण, तिखट, तीक्ष्ण, आर्द्र, व पांडुरोग, कफ, दमा, खोकला, मुळव्याध, क्षय, कावीळ, कृमि, उचकी, ज्वर, सूज, विषदोष, भूतबाधा, अरुचि, उदरांचें विष यांचा नाश करिते. हिचें फळ सारक, कडू, व गुल्म, कृमि, कफ, शूल, अर्श, आणि कावीळ यांचा नाश करितें.

दोडीतुकटुकाचोष्णातिक्ताचाग्निप्रदीपनी ॥ रक्तपित्तकरारुच्या

दाहकाकफरोगहा ॥ वातंचकंठरोगंचनाशयेदीतिकीर्तिता ॥

**दोडी**— वेलदोडी तिखट, उष्ण, कडू, अग्निदीपक, व रक्तपित्तकारक, रुचिकर, दाहक, व कफरोग, वायु, कंठरोग यांचा नाश करिते.

विषदोडीभवेत्तिक्ताकट्वीचाग्निप्रदीपनी ॥ मलस्तंभकरीग्राहीपित्त लोष्णास्रपित्तकृत् ॥ लघ्वीवृष्याचरुच्याचदाहकारीकफापहा ॥ कंठरुग्वातगुल्मार्शक्रिमिकुष्ठविषापहा ॥ श्वासप्रमेहाखुविषना शिनीपरिकीर्तिता ॥

**विषदोडी**—विषगांठी—विषमुष्टी कडू, तिखट, अग्निदीपक, मलस्तंभक, ग्राहक, पित्तल, उष्ण, रक्तपित्तकारक, लघु, वृष्य, रुचिकर, दाहकारक, आणि कफ, कंठरोग, वायु, गुल्म, अर्श, कृमि, कुष्ठ, विष, दमा, प्रमेह, आणि उंदराचें विष यांचा नाश करिते.

तिक्ताकोशातकीशीतार्किंचित्कट्वीकषायका ॥ तिक्तापक्काशया ध्मानमलामाशयशुद्धिकृत् ॥ लघ्वीरुक्षावातकफपित्तपांडुविषा पहा ॥ यकृत्कुष्ठार्शशोथघ्नीकासोदरविनाशिनी ॥ कामलागुल्म शमनीफलंचास्याश्रुभेदकं ॥ कटुतिक्तंचशीतंचस्निग्धंहृद्यंचदी पनं ॥ कासारोचकमेहघ्नंज्वरकुष्ठकफापहं ॥ श्वासंपित्तंचवातं चनाशयेदीतिकीर्तितं ॥ फलबीजमस्तकस्यशोधनंपरिकीर्तितं ॥

**दिवाळी**— कडू दोडका. शीत, किंचित तिखट, तुरट, कडू, व पक्काशय, आध्मानवायु, आणि मलाशय यांची शुद्धि करणारी, लघु, रुक्ष, व वायु, कफ, पित्त, पांडुरोग, विषदोष, यकृत्, कुष्ठ, अर्श, सूज, खोकला, उदर, काविळ, गुल्म यांचा नाश करिते. हिचें फळ भेदक, तिखट, कडू, शीतळ, स्निग्ध, हृद्य, दीपन व खोकला, अरुचि, मेह, ज्वर, कुष्ठ, कफ, दमा, पित्त, वायु यांचा नाश करितें. याच्या फळाचें बीज मस्तकशुद्धि करणारें आहे.

दंतधावनकंनेत्र्यंमुखशुद्धिकरंमतं ॥
स्रोतसांचैवनाडीनांशोधकंकफपित्तहृत ॥

**दंतधावन**— दांतवणानें दांत घासणें नेत्र, मुख, स्रोतस, आणि नाडी यांची शुद्धि करणारें, व कफ, पित्त, यांचें नाशक आहे.

पक्कंद्राक्षाफलंस्वर्यंमधुरंतृप्तिकारकं ॥ पाकेस्निग्धंचातिरुच्यंचच क्षुष्यंमूत्रलंगुरु ॥ तुवरंचसरंचाम्लंवृष्यंशीतंश्रमापहं ॥ पित्तंश्वा संचकासंचछर्दिंशोथंभ्रमंज्वरं ॥दाहंमदात्ययंवातंवातापित्तंक्षतक्षयं॥

कामलांवातरक्तंचरक्तपित्तंचनाशयेत् ॥ आध्माननाशकंतच्चश लाटुकफकारकं ॥ गुर्वम्लंपित्तलंचोष्णंरक्तपित्तकरंमतं ॥ रुच्यंचदीपनंचैववातनाशकरंमतं ॥ नद्रबालंविशदंचोष्णंकटुकंपित्तलंमतं ॥ रक्तदोषकरंप्रोक्तंपक्वशुष्कंचतन्मतं ॥ वृष्यंसंतर्पणं बल्यंपौष्टिकंपरिकीर्तितं ॥

द्राक्षे (पिकलेलीं द्राक्षें) स्वराला हितकारक, मधुर, तृप्तिकारक, पाककाळीं स्निग्ध, अतिरुचिकर, चक्षुष्य, मूत्रल, गुरु, तुरट, सारक, आंबट, वृष्य, शीतल, श्रमनाशक, व पित्त, श्वास, खोकला, वांति, सूज, भ्रम, ज्वर, दाह, मदात्यय, वातपित्त, क्षतक्षय, कावीळ, वातरक्त, रक्तपित्त, आणि आध्मान यांचा नाश करितात. तीं हिरवीं कफकारक, गुरु, आंबट, पित्तल, उष्ण, रक्तपित्तकारक, रुचिकर, दीपन, आणि वातनाशक अशीं आहेत, तीं कोंवळीं विशद, उष्ण, तिखट, पित्तल, रक्तदोषकारक अशीं आहेत. तीं पिकून सुकलीं असतां वृष्य, संतर्पण, बलकर, पौष्टिक अशीं आहेत.

द्राक्षातुगोस्तनीशीताहृद्यावृष्यागुरुर्मता ॥ वातानुलोमनीस्निग्धाहर्षदाश्रमनाशिनी ॥ दाहमूर्छाश्वासकासकफपित्तज्वरापहा ॥ रक्तदोषंतृषांवांतंहृद्व्यथांचैवनाशयेत् ॥

काळीं द्राक्षे (गोस्तनी, सबीज) शीत, हृद्य, वृष्य, गुरु, वातानुलोमन, स्निग्ध, हर्षप्रद, श्रमनाशक, व दाह, मूर्छा, दमा, खोकला, कफ, पित्त, ज्वर, रक्तदोष, तृषा, वांति, हृदयव्यथा, यांचा नाश करितात.

लघ्वीद्राक्षातुमधुराशीतावृष्यारुचिप्रदा ॥ अम्लारसालासंप्रोक्ता श्वासकासज्वरापहा ॥ हृदव्यथारक्तपित्तक्षीणक्षतक्षयविनाशिनी ॥ स्वरभेदंतृषांवातंपित्तंचैवविनाशयेत ॥ तिक्ततांचमुखस्यापिनाशयेदितिकीर्तिता ॥

लघुद्राक्षें (बेदाणा निर्बीज) मधुर, शीतल, वृष्य रुचिकर, आंबट, रसाल आणि दमा, खोकला, ज्वर, हृदयव्यथा, रक्तपित्त, क्षतक्षय, स्वरभेद, तृषा, वायु, पित्त आणि तोंडाचा कडूपणा यांचा नाश करितो.

धान्यकंमधुरंहृद्यंतुवरंदीपनंमतं ॥ स्निग्धंतिक्तंकिंचिदुष्णमवृष्यंमूत्रलंलघु ॥ पाचकंग्राहकंरुच्यंतृशादाहानिसारनुत ॥ कासंपित्तज्वरंछर्दिकफंश्वासंत्रिदोषकं ॥ अर्शांसिकृमींश्चैवहन्यादितिशोषांपित्तनाशकं ॥

धणे (कुस्तुंबरु) मधुर, हृद्य, तुरट, दीपन, स्निग्ध, कडू, किंचिदुष्ण, अवृष्य,

मूत्रल, लघु, पाचक, ग्राहक, रुचिकर व तृषा, दाह, अतिसार, खोकला, पित्त, ज्वर, वांति, कफ, दमा, त्रिदोष, अर्श, कृमि आणि विशेषेंकरून पित्त यांचा नाश करितात.

यासस्तुमधुरस्तिक्तोबल्यश्चाग्निप्रदीपकः ॥ सरःशीतोलघुश्चैवतुवरः कफपित्तजित् ॥ रक्तरुक्कुष्ठवीसर्पमेदभ्रममदापहः ॥ वातरक्तंतृषां छर्दिकासंदाहंज्वरंहरेत् ॥

**धमासा** म्हणजे यास (शरपुंखेसारिखा मधुरेंत होतो तो) मधुर, कडू, बलकर, अग्निदीपक, सारक, शीतल, लघु, तुरट, व कफ, पित्त, रक्तकुष्ठ, वीसर्प, मेद, भ्रम, मद, वातरक्त, ताहान, वांति, खोकला, दाह, आणि ज्वर यांचा नाश करितो.

दुरालभाकटुस्तिक्तामधुरारक्तशुध्दिकृत ॥ शीताचोष्णाविसर्पघ्नी विषमज्वरनाशिनी ॥ तृट्छर्दिमेहगुल्मघ्नीमोहरक्तरुजापहा ॥ वात पित्तकफंकुष्ठंज्वरंचैवविनाशयेत् ॥

**दुरालभा नांवडा धमासा** तिखट, कडू, मधुर, रक्तशुद्धिकारक, शीत, उष्ण, व विसर्प, विषमज्वर, तृषा, वांति, मोह, रक्तदोष, वातपित्त, कफ, कुष्ठ, आणि ज्वर यांचा नाश करितो.

कंदोधरण्यामधुरःकफरक्तरुजापहः ॥ पित्तकंडूकु ष्ठहरोमुनिभिःपरिकीर्तितः ॥

**धरणीकंद**–मधुर, व कफ, रक्तरोग, पित्त, कंडू, कुष्ठ, यांचा नाशक असा आहे.

धातकीकटुकाशीतातुवरामदकारिणी ॥ तिक्तालघ्वीचसंप्रोक्ता गर्भस्थापनकारिणी ॥ रक्तप्रवाहिकापित्ततृटविसर्पव्रणापहा ॥ कृम्यतीसारहननीरक्तदोषरुजापहा ॥ पुष्पमस्याःस्वादुरुक्षंरक्तापि त्तातिसारहं ॥ विषनाशकरंचोक्तंमुनिभिस्तत्त्वदर्शिभिः ॥

**धायटीचें झाड** तिखट, शीतळ, तुरट, मादक, कडू, लघु, गर्भस्थापन, व रक्तप्रवाहिका, पित्त, तृषा, विसर्प, व्रण, कृमि, अतिसार, रक्तदोष, यांचा नाश करितें. याचीं फुलें स्वादु, रूक्ष व रक्तपित्त अतिसार आणि विष यांचा नाश करितात.

धवस्तुतुवरःशीतोमधुरःकटुकोमतः ॥ दीपनोरुचिकृच्चैवपांडुरोगप्रमेहजित् ॥ कफपित्तार्शवातानांनाशनःपरिकीर्तितः ॥ फलंचास्यहिमंस्वादुरुक्षंचतुवरंमतं ॥ मलस्तंभकरंचैववातलंकफपित्तजित् ॥

**धावडा** तुरट, शीतल, मधुर, तिखट, दीपन, रुचिकर, व पांडुरोग, प्रमेह, कफ, पित्त, अर्श, वायु, यांचा नाशक असा आहे, याचें फळ हिम, स्वादु, रूक्ष, तुरट, मलस्तंभक, वातल, व कफ, पित्त यांचें नाशक आहे.

धर्मणस्तुवरोवृष्योमधुरःकटुकोमतः ॥ बल्योरुक्षोलघुश्चैवधातुवृद्धिकरोमतः ॥ किंचिदुष्णश्चसंप्रोक्तोव्रणरोपणकारकः ॥ कफवातहरोदाहशोषकंठरुजापहः ॥ रक्तरुक्पित्तकासघ्नःपीनसस्यविनाशकः ॥ फलंचास्यस्वादुशीतंतुवरंकफवातहं ॥

धामणीचें झाड तुरट, वृष्य, मधुर व तिखट, बलकर, रूक्ष, लघु, धातुवर्धक, किंचित उष्ण, व्रणरोपण, व कफ, वात, दाह, शोष, कंठरोग, रक्तरोग, पित्तकास, आणि पीनस यांचा नाश करितें. याचें फळ स्वादु, शीतल, तुरट, कफ, आणि वात यांचा नाश करितें.

शूकधान्यंतेजबलवीर्यवृध्दिकरंमतं ॥ मधुरंतुवरंस्निग्धंरुच्यंचमलबंधकं ॥ स्वर्यंवृष्यंशीतलंचमूत्रलंवातलंमतं ॥ किंचित्कफकरं ज्ञेयंज्वरंपित्तंचनाशयेत् ॥

धान्यवर्ग— साधारण शूकधान्य तेज, बल, वीर्य, यांना वाढविणारें, मधुर, तुरट, स्निग्ध, रुचिकर, मलबंधक, स्वर्य, वृष्य, शीतल, मूत्रल, वातल, किंचित कफकारक, व ज्वर, पित्त यांचा नाश करितें.

राजान्नशालिकास्निग्धामधुराचाग्निदीपनी ॥ बलकांतिधातुपथ्यकारकाचत्रिदोषहा ॥ लघ्वीगुणैरभ्यधिकाज्ञेयाचैवोत्तरोत्तरः ॥ श्वेतारक्तातथाकृष्णाज्ञेयात्रगुणदर्शिभिः ॥

रायभोगसाळी राजान्नशाली या पांढऱ्या, काळ्या व तांबड्या अशा तीन प्रकारच्या स्निग्ध, मधुर, अग्निदीपन, बलकर, कांतिकर, धातुवर्धक, पथ्यकारक, त्रिदोषनाशक, लघु, अशा आहेत, या एकाहून एक गुणानीं अधिक आहेत.

रक्तशालीलघुःस्निग्धामधुरापथ्यकारका ॥ रुच्याबल्याचवर्ण्याचचक्षुष्याचाग्निदीपनी ॥ मूत्रलाशुक्रलास्वर्याहृद्यापुष्टिकरीमता ॥ त्रिदोषरक्तरुग्दाहतृषाव्रणविनाशिनी ॥ वातंविषंचपित्तंचश्वासंकासंज्वरंहरेत ॥

तांबडी साळी लघु, स्निग्ध, मधुर, पथ्यकारक, रुचिकारक, बलकारक, वर्णकारक, चक्षुष्य, अग्निदीपक, मूत्रल, शुक्रल, स्वर्य, हृद्य, पुष्टिकारक, त्रिदोष, रक्तरोग, दाह, तृषा, व्रण, वायु, विष, पित्त, श्वास, कास, आणि ज्वर, यांचा नाश करितात.

शालीतुषष्टिकाश्वेताकृष्णाचाद्विप्रकारका ॥ सारुच्याशीतलाबल्यापथ्यावीर्यस्यवर्धिनी ॥ ग्राहिणीदीपनीस्वाद्वीज्वरदोषत्रयापहा ॥ कृष्णागुणैरभ्यधिकाज्ञेयावैद्यैर्मनीषिभिः ॥

**पांढऱ्या साठेसाळी** रुचिकर, शीतल, बलकर, पथ्य, वीर्यवर्धक, ग्राहक, दीपन, गोड, व ज्वर त्रिदोष, यांचा नाश करितात. काळ्या साठ्या साळी गुणानीं अधिक आहेत.

स्थूलाशालींतुमधुरास्वाद्वीशीताबलप्रदा ॥ वीर्यप्रदादीपनीचदाहजी र्णज्वरापहा ॥ पित्तहाबालवृध्दानांसर्वदाहितकारिणी ॥

**स्थूलशाली** मधुर, स्वादु, शीत, बलप्रद, वीर्यप्रद, दीपन, व दाह, जीर्णज्वर, पित्त, यांचा नाश करिते. व बाल, वृध्द यांना सर्वकाळ हितकारक आहे.

भ्रष्टस्थानभवाशालीतुवरामूत्रलासरा ॥
लघ्वीरुक्षाकफघ्नीचपूर्ववैद्यैःप्रकीर्तिता ॥

**भाजलेल्या जमिनीचें भात** तुरट, मूत्रल, सारक, लघु, रुक्ष, व कफनाशक, असे आहे.

केदारशालिकागुर्वीश्लेष्मलाशुक्लामता ॥ तुवरामधुराबल्यावात पित्तविनाशिनी ॥ अल्पवर्चप्रदाप्रोक्ताऋषिभिस्तत्वदर्शिभिः ॥

**केदारसाळी**– काळ्या जमिनींत पिकलेल्या साळी गुरु, कफकर, शुक्ल, तुरट, मधुर, बलकर, व वायु, पित्त, यांचा नाश करणाऱ्या व अल्प वीर्य देणाऱ्या अशा आहेत.

देवसंज्ञाव्रीहयस्तुकृष्णापाटलसंज्ञया ॥ शालामुखाकुक्कुटांडजंतुभे देश्चपंचधा ॥ सापाकेमधुराशीतामलावष्टंभकारिणी ॥ अभिष्यंदक रीप्रोक्ताकृष्णाश्रेष्टागुणैर्मता ॥

**देवभात.** हें कृष्ण, पाटल, शालामुख, कुकुटांड, आणि जंतुभेद, असें पांच प्रकारचें ते पाककाळीं मधुर, शीतल, मलस्तंभक, व अभिष्यंदकारक असें आहे, यांत कृष्ण गुणानीं अधिक आहे.

महागोधूमकःस्निग्धोमधुरःशीतलोगुरुः ॥ धातुवृद्धिकरोबल्यःक फकृत्सारकोमतः ॥ वर्ण्योरुच्योजीवनश्चभग्नसंधानकारकः ॥ व्र ण्यःस्थैर्यकरश्चामकारकोवातपित्तहा ॥ जीर्णाश्चैतेकफघ्नाश्चमुनि भिःपरिकीर्तिताः ॥

**महागोधूम**– थोर गहूं स्निग्ध, मधुर, शीत, गुरु, धातुवर्धक, बलकर, कफकर सारक, वर्ण्य, रुच्य, जीवन, भग्नसंधानकारक, व्रणाला हित, स्थिरताकारक, आमाला करणारे, व वायु, पित्त यांचे, नाशक, असे आहेत, हे जुने कफनाशक आहेत.

लघुगोधूमकःस्निग्धोवृष्यःकफकरोगुरुः ॥ आमदोषकरोबल्यो

मधुरोधातुवर्धकः ॥ पुष्टिकृच्चगुणाश्चान्येमहागोधूमवन्मताः ॥

**लघुगोधूम**—बारीक गहूं स्निग्ध, वृष्य, कफकारक, गुरु, आमदोषकारक, बलकर, मधुर, धातुवर्धक, पौष्टिक आहेत, बरकड गुण महागोधूमासारिखेच आहेत.

यवःसशूकानिःशूकहरितभेदैस्त्रिधामतः॥ सशूकस्तुभवेत्वृष्यःशीत श्चतुवरःसरः ॥ रुक्षोमेध्यश्चमधुरोव्रणेशस्तोग्निवर्धनः ॥ स्वर्योव र्ण्योलेखनश्चमूत्रबंधकरोगुरुः ॥ मृदुःकटुःस्थैर्यकरोमेदतृट्पित्त वातहा ॥ कफंरक्तरुजंश्वासंकासंचत्वग्रुजंतथा ॥ पीनसंकंठरो गंचप्रमेहंचैवनाशयेत्॥ऊरुस्तंभहरःप्रोक्तोनिःशूकोल्पगुणोमतः॥ हरिद्गोंहीनगुणोमुनिभिःपरिकीर्तितः ॥

**यव**—जव सशूक, निःशूक, आणि हरित या भेदानें तीन प्रकारचा, त्यांत सशूक यव, वृष्य, शीत, तुरट, सारक, रुक्ष, मेध्य, मधुर, व्रणा विषयीं हितकर, अग्निवर्धक, स्वर्य, वर्ण्य, लेखन, मूत्रबंधकारक, गुरु, मृदु, तिखट, स्थैर्यकर, व मेद, तृषा, पित्त, वायु, कफ, रक्तरोग, श्वास, कास, त्वग्रोग, पीनस, कंठरोग, प्रमेह, आणि ऊरुस्तंभ यांचा नाश करितो, याहून निःशूक अल्पगुण आहे.

वेणोर्यवस्तुतुवरोरुक्षश्चमधुरोमतः॥ पुष्टिकृद्वीर्यकृत्बल्यःकफपित्त हरोमतः॥ विषप्रमेहशमनोमुनिभिःपरिकीर्तितः॥

**वेणुयव** ह्म० माणग्याचें बीज तुरट, रुक्ष, मधुर, पौष्टिक, वीर्यकारक, बलकर, व कफ, पित्त, विष, प्रमेह यांचा नाश करितें.

गुणावंशयवानांतुमतावेणुयवाइव ॥

**वंशयव** ह्मणजे कळकीचें बीज याचे गुण माणग्याच्या बीजासारिखे आहेत.

यावनालोगुरुःशीतोरुक्षोग्राहीरुचिप्रदः ॥ वृष्योमलस्तंभकरःस्वा दुःपित्तकफापहः ॥ रक्तरोगप्रशमनोऋषिभिःपूर्वमीरितः ॥

**यावनाल**—साधारण जोंधळे गुरु, शीत, रुक्ष, ग्राहक, रुचिकर, वृष्य, मलस्तंभक, स्वादु, व पित्त, कफ, रक्तरोग, यांचा नाश करितात.

धवलोयावनालस्तुपथ्योवृष्योबलप्रदः॥त्रिदोषार्श व्रणहरोगुल्मारुचिविनाशकः ॥

**धवलयावनाल**—पांढरे जोंधळे पथ्यकर, वृष्य, बलप्रद, व त्रिदोष, अर्श, व्रण, गुल्म, आणि अरुचि यांचा नाश करितात.

शारदोयावनालस्तुश्लेष्मलःपिच्छलोगुरुः ॥ शीतलोमधुरोवृष्यो बल्यःपुष्टिकरोमतः ॥ त्रिदोषशमनश्चैवपूर्ववैद्यैर्निरूपितः ॥

**शारदयावनाल**–शाळू जोंधळे कफकारक, पिच्छल, गुरु, शीतल, मधुर, वृष्य, बलकर, पुष्टिकारक, आणि त्रिदोषनाशक असे आहेत.

शिंबिधान्यंतुमधुरंशीतंरुक्षंकषायकं ॥ पाकेकटुवातलंचमूत्रलं मलस्तंभकृत् ॥ मसूरामुद्गरहितंगुरुचाध्मानकारकं ॥ लेपादिना रक्तदोषमेदपित्तकफापहं ॥

**शिंबिधान्य**– साधारण चणक मुद्गादिक तें– शेंगा येणारें धान्य मधुर, शीतल, रुक्ष, तुरट, पाकाकाळीं तिखट, वातल, मूत्रल, मलस्तंभक आहे, व मसूरा, मूग, यांवांचून सर्व शिंबिधान्य गुरु, आध्मानकारक, व लेपादिकानीं रक्तदोष, मेद, पित्त, व कफ यांचा नाश करितें.

चणकोवातलःशीतोलघूरूक्षःकषायकः ॥ विष्टंभीमधुरोरुच्योव र्ण्योबल्योज्वरापहः॥ आध्मानकारकोरक्तपित्तकफापहः ॥ रक्तदो षंचपित्तंचनाशयेदितिकीर्तितः

**चणक**– चणे, हरभरे, गलाम हे वातल, शीत, लघु, रुक्ष, तुरट, विष्टंभकारक, मधुर, रुचिकर, वर्णकारक, बलकर, व ज्वरनाशक, आध्मानकारक, व रक्तपित्त, कफ, रक्तदोष, आणि पित्त यांचा नाश करितात.

गौरस्तुचणकोरुच्योमधुरश्चबलप्रदः ॥ श्वेतस्तुवात लोरुच्यःशीतःपित्तहरोगुरुः ॥

पिंवळे व पांढरे चणे रुचिकर, मधुर व बलकारक आहेत, आणि पांढरे चणे वातकर, रुचिकर, शीत आणि पित्तनाशक असे आहेत.

कृष्णस्तुचणकःशीतोमधुरश्चरसायनः ॥ बलकृत् श्वासकासघ्नोपित्तातीसारपित्तहा ॥

**कृष्णचणक**– काळे चणे शीतल, मधुर, रसायन, बलकारक, व श्वास, खोकला, पित्तातिसार, आणि पित्त यांचा नाश करितात.

आमस्तुचणकःशीतोरुच्यश्चतुवरोमधुः॥ संतर्पणःकफकरोधातुवृ द्धिकरोगुरुः ॥ किंचित्कटुस्तृषादाहशोषाश्मरीविनाशकः ॥

**आमचणक**– ओले चणे शीतल, रुचिकर, तुरट, मधुर, संतर्पण, कफकारक, धातुव-

र्धक, गुरु, किंचित तिखट, व तृषा, दाह, शोष, आणि अश्मरी (मूत्रकृच्छ्र) यांचा नाश करितो.

भ्रष्टस्तु चणकश्चोष्णो रुच्यो रक्तरुजाकरः ॥ लघुर्बल्यः शुक्लश्चतेजसः कार कोमनः ॥ स्वेदशैत्यामकफहृद्वातक्लमाविनाशकः ॥ विनाजलेनचभ्रष्टा श्चातिरुक्षाश्चवातलाः ॥ कुष्टप्रवर्धनाःप्रोक्तागुणास्त्वन्येतुपूर्ववत ॥

**भ्रष्टचणक**— फुटाणे उष्ण, रुचिकर, रक्तकोपन, लघु, बलकर, शुक्ल, शरीराला तेज देणारे, व स्वेद, शैत्य, आम, कफ, वायु, क्लम यांचा नाश करितात, हे पाणी लावल्या- शिवाय भाजले असतां अतिरुक्ष, वातळ, व कुष्टाला वाढविणारे. वरकड गुण पूर्वीसारिखेच आहेत.

चणकानांदलंचाम्लंकिंचिद्वातप्रकोपिनं ॥ मलस्तंभकरंरुच्यंतर्पणं चाग्निकारकं ॥ कफनाशकरंप्रोक्तंपूर्ववैद्यैःकृपालुभिः ॥

**चणकदल**—चण्यांची डाळ आंबट, किंचित वायूला कोपविणारी, मलस्तंभक, रुचिकर, तर्पण, अग्निकारक, कफनाशक, अशी आहे.

आढकीमधुराकिंचिद्वातलाचकषायका ॥ गुर्वीरुच्याग्राहिणीचरु क्षावर्ण्याचशीतला ॥ कफपित्तज्वरविषरक्तरुग्गुल्मवातनुत ॥ अर्शनाशकराप्रोक्ताघृतयुक्ताचवातहा ॥ कफपित्तहरालेपैःसेकैर्मे दककापहा ॥ तुवरीदालिकापथ्याकिंचिद्वातकरामता ॥ कृमित्रि दोषशमनीघृतयुक्तात्रिदोषहा ॥

**साधारण आढकी**— तुरी किंचित मधुर, वातल, तुरट, गुरु, रुचिकर, ग्राहक, रुक्ष, वर्णकर, शीतल, व कफ, पित्तज्वर, विष, रक्तदोष, गुल्म, वायु, अर्श, यांचा नाश करिते ही तुपाशीं, वायूचा नाश करिते, व लेपनानें कफ, पित्त यांचा नाश करिते, व सेच- नानें कफ, व मेद यांचा नाश करिते. तुरीची डाळ पथ्यकर, किंचित वातळ, व कृमि, त्रिदोष, यांचा नाश करिते, आणि ही घृतयुक्त असतां त्रिदोषनाशक आहे.

श्वेतातुतुवरीगुर्वीवातपित्तप्रकोपदा ॥ अम्ल पित्तकराग्राहिण्यपथ्याध्मानकारिणी ॥

**श्वेततुवरी**—पांढऱ्या तुरी गुरु, व वायु, पित्त, अम्लपित्त यांना करणारी, ग्राहक, पथ्यक- र, आणि आध्मान यांना करणारी आहे.

रक्तातुतुवरीरुच्याबल्यापथ्याज्वरापहा ॥ पित्तसंतापादिनानारोगनाशकरीमता ॥

**तांबड्या तुरी** रुचिकर, बलकर, पथ्य, ज्वरनाशक, व पित्त, संतापादि नानारोग, यांचा नाश करितात.

कृष्णातुतुवरीबल्याचाग्निदीप्तिकरामता ॥
पित्तदाहप्रशमनीऋषिभिःपरिकीर्तिता ॥

**काळी तुरी** बलकर, अग्निदीपक, व पित्त, दाह याचा नाश करणारी आहे.

मुद्गःसाधारणाःशीताग्राहकालघवोमताः ॥ किंचिद्वातकरानेत्र्याः
कफपित्तज्वरापहाः ॥ स्वादवश्चैवऋषिभिर्निघंटैुनिरूपिताः ॥

**मुद्ग**— मूग साधारण शीत, ग्राहक, लघु, किंचिद्वातकारक, नेत्राला हितावह, व कफ, पित्त, ज्वर, याचे नाशक, आणि स्वादु असे आहेत.

मुद्गःकृष्णोबलकरोवीर्यकृत्पुष्टिकृन्मतः ॥
पथ्योलघुर्दीपनश्चदाहदोषत्रयापहः ॥

**कृष्णमुद्ग**— काळे मूग बलकर, वीर्यकर, पुष्टिकर, पथ्य, लघु, दीपन, व दाह, आणि दोषत्रय याचा नाश करितात.

पीतोमुद्गस्तुतुवरोमधुरोरुचिकारकः ॥
वातबंधकरश्चैतेरक्तस्यापिगुणामताः ॥

**पीतमुद्ग**—पिंवळे मूग तुरट, मधुर, रुचिकारक, वायुला प्रतिबंध करणारे असे आहेत, तांबड्या मुगाचेही याच सारखे गुण आहेत.

शाकानमुद्गपर्णानांतिक्ताश्रेष्ठामताबुधैः ॥

**मुगांच्या पाल्याची भाजी** कडू व श्रेष्ठ अशी आहे.

माषः साधारणःस्निग्धःशोषणोष्णोकफप्रदः ॥ वृष्यःपित्तकरः
पित्तकोपनोरोचकोगुरुः ॥ बल्यःसंतर्पणःस्वादुःपुष्टिकृन्मूत्रशुक्र
लः ॥ मलभेदकरोदुग्धकारकोमांसवर्धकः ॥ मेदवृद्धिकरश्चैव
श्वासश्रमनिवारणः ॥ परिणामभवंशूलमर्दितंचविनाशयेत ॥ वा
तंचार्शनाशयतीत्येवमार्यैर्निरूपितं ॥

**उडीद**— स्निग्ध, शोषक, उष्ण, कफकारक, वृष्य, पित्तल, पित्ताला कोपविणारा, रोचक, जड, बलकर, संतर्पण, स्वादु, पौष्टिक, मूत्रल, शुक्रल, मलभेदक, दुग्ध उत्पन्न करणारा, मांसाला वाढविणारा, मेदवर्धक, व दमा, श्रम, परिणामशूल, अर्दितवायु, वायु आणि अर्श यांचा नाश करितो.

कृष्णमाषोबलकरोरुच्योदोषत्रयापहः ॥

**कृष्णमाष**— काळे उडीद बलकारक, रुचिकर आणि त्रिदोषनाशक असे आहेत.

राजमाषःस्वादुरूक्षःकषायस्तर्पणोगुरुः ॥ ग्राहीवातकफौदुग्धंवर्च स्त्वंचकरोतिवै॥शीतःपित्तकरोवृष्यःसरश्चाध्मानकारकः॥ श्रमहारीचविज्ञेयस्त्रिधाश्वेतादिभेदतः ॥ तेषुवृद्धशिंबीप्रोक्तागुणैश्वश्रेष्ठतत्तराः ॥

**राजमाष** — साधारण शेंगचवळ्या स्वादु, रूक्ष, तुरट, तर्पण, गुरु, ग्राहक, व वायु, कफ, दुग्ध, वर्चस, यांना करणाऱ्या, शीतल, पित्तकारक, वृष्य, सारक, आध्मानकारक, व श्रमहारक अशा आहेत. या श्वेत, रक्त, आणि कृष्ण या भेदानें तीन प्रकारच्या. त्यांत मोठ्या शेंगाच्या चवळ्या गुणानीं अधिक आहेत.

गृहेभवाचवल्लिकास्वाद्वीरुच्याकषायका ॥ मधुरातर्पणीस्तन्यप्रदा चमुनिभिर्मता ॥ तुवरत्वान्मूत्रककमलानांवार्धिनीनच ॥

**दारचवळ्या**— अळसंदे स्वादु, रुचकर, तुरट, मधुर, तर्पण, स्तनांत दुग्ध वाढविणारे, आहेत. हे तुरट आहेत म्हणून मूत्र, कफ, आणि मळ यांला वाढवीत नाहीत.

मकुष्टस्तुवरःपथ्योमधुरोरुचिकारकः ॥ वातलोग्राहकोरूक्षोलघुः शीतःप्रकीर्तितः ॥ पित्तंकफंरक्तपित्तंवांतिंदाहंक्रमिंज्वरं ॥ सर्वदोषं रक्तदोषमुन्मादंचविनाशयेत् ॥

**मकुष्ट-मटक्या**— मठ तुरट, पथ्यकारक, मधुर, रुचिकर, वातल, ग्राहक, रूक्ष, उष्ण, लघु, शीतळ आहेत. व पित्त, कफ, रक्तपित्त, वांति, दाह, कृमि, ज्वर, सर्वदोष, रक्तदोष आणि उन्माद यांचा नाश करितात.

लांकस्तुशीतलोरुच्योमधुरोवातकारकः ॥ गुरुश्चतुवरोरूक्षःकफ पित्तविनाशकः॥ वृषभाणांहितःप्रोक्तःपर्णशाकातुवातला ॥रुच्या पित्तकफानांतुहननीपरिकीर्तिता ॥

**लांक**—खंडिक व त्रिपुट या भेदानें दोन प्रकारचा शीतळ, रुचिकर, मधुर, वातकारक, गुरु, तुरट, रूक्ष, व कफ, पित्त यांचे नाशक आहेत, व बैलाला हितकारक आहेत. यांच्या पानांची भाजी वातल, रुचिकर, व पित्त, कफ, यांचा नाश करणारी आहे.

कलायोवातलोरुच्यःपुष्टिकृच्छीतलोमतः ॥ पाकेचमधुरःप्रोक्त स्तुवरश्चामदोषकृत् ॥ रूक्षोवृष्योग्राहकश्चलघुःपित्तकफापहः ॥शा कायाअपिसंप्रोक्तागुणाश्चैतेविशारदैः ॥

बारीक व मोठे वाटाणे वातल, रुचिकर, पौष्टिक, शीतळ, पाककालीं मधुर, तुरट, आमकारक, रुक्ष, वृष्य, ग्राहक, लघु व पित्त, कफ यांचे नाशक आहेत. यांच्या पानांच्या भाजीचे गुण यांसारिखेच आहेत.

मसूरामधुराशीताग्राहिणीवातकारका ॥ लघ्वीरुक्षाचवर्ण्याचब ल्याबृंहणकारिणी ॥ रक्तदोषंकफंपित्तंरक्तपित्तंज्वरंतथा ॥ नाश येत्पर्णजाशाकातिक्तालघ्वीप्रकीर्तिता ॥

पांढऱ्या व तांबड्या मसुरा मधुर शीत, ग्राहक, वातकारक, लघु, रुक्ष, वर्णकर, बलकर, बृंहण, व रक्तदोष, कफ, पित्त, रक्तपित्त आणि ज्वर यांचा नाश करितात. यांच्या पानांची भाजी कडू व लघु अशी आहे.

निष्पावोमधुरोरुक्षःपाकेम्लःसारकोगुरुः ॥ उष्णःशोषकरोबल्यः पुष्टिकृत्तुवरोमतः ॥ वातविष्टंभकारीस्याद्विदाहीशुक्रनाशनः ॥ वि षदृष्टिहरःप्रोक्तःपूर्ववैद्यैःकृपालुभिः ॥

निष्पाव– पावटे साधारण मधुर, रुक्ष, पाककालीं आंबट, सारक, गुरु, उष्ण, शोषकारक, बलकर, पौष्टिक, तुरट, व वायुविष्टंभ, यांना करणारे, विदाही, व शुक्र, विष, आणि दृष्टि यांचा नाश करितात.

निष्पावस्तुवरोमेध्यो दीपनोमधुरोरसे ॥ कंठशुद्धिकरोरुच्योग्राहको मुनिभिर्मतः ॥ निष्पावसदृशास्त्वन्येगुणाज्ञेयाचिकित्सकैः ॥

श्वेत व नील निष्पाव मेध्य, दीपन, रसकालीं मधुर, कंठशुद्धिकारक, रुच्य, ग्राहक, असे आहेत, वरकड गुण पावट्यांसारिखेच आहेत.

रक्तनिष्पावकोरुच्योमधुरःशीतलोगुरुः ॥ किंचित्कषायोबल्यश्च वातलःपुष्टिकृन्मतः ॥ आध्मानकृद्गुणास्त्वन्येनिष्पावसदृशामताः ॥

रक्तनिष्पाव–मोठे तांबडे पावटे रुचिकर, मधुर, शीतल, गुरु, किंचित् तुरट, बलकर, वातल, पौष्टिक, आध्मानकारक आहेत, वरकड गुण निष्पावासारिखेच आहेत.

नदीनिष्पावकस्तिक्तःकटुर्वातकरोगुरुः ॥ रक्तप्रदःकफकरोरुचिकृ त्तुवरोमतः ॥ विषदोषहरश्चैवमुनिभिःपरिकीर्तितः ॥

नदीनिष्पाव–कडवे, पावटे, वर्णे कडू, तिखट, वातकारक, गुरु, रक्तप्रद, कफकर, रुचिकर, तुरट, आणि विषदोषनाशक असे आहेत.

कुलित्थोमधुरस्तीक्ष्णोरक्तपित्तकरःसरः ॥ घर्मशोषकरश्चोष्णःपा
केम्लःकटुकोमतः ॥ विदाहीतुवरोरूक्षःपित्तलश्चलघुर्मतः ॥ हि
क्काकफश्वासकासवाताश्मरिविनाशकः ॥ दृष्टिरुक्पीनसानाह
शुक्रगुल्मार्शहामतः ॥ ज्वरमेदकृमिघ्नश्चशोथघ्नश्चाप्युदाहृतः ॥

**कुळीथ** मधुर, तीक्ष्ण, रक्तपित्तकारक, सारक, घर्माला शोषण करणारा, उष्ण, पाककाळीं आंबट, तिखट, विदाही, तुरट, रूक्ष, पित्तल, लघु, व उचकी, कफ, श्वास, कास, वात, अश्मरी, दृष्टिरोग, पीनस, आनाह, शुक्र, गुल्म, अर्श, ज्वर, मेद, कृमि, आणि सूज यांचा नाश करितो.

कृष्णःकुलित्थकोग्राहीरक्तपित्तकरोमतः ॥ रसेचतुवरःपाकेकटुः
कफहरोमतः ॥ वातशुक्राश्मरीगुल्मपीनसश्वासकासजित् ॥
आनाहगुदकीलार्शमेदधातुविनाशकः ॥

**काळे कुळीथ** ग्राहक, रक्तपित्तकारक, रसकाळीं तुरट, पाककाळीं तिखट, व कफ, वायु, शुक्राश्मरी, गुल्म, पीनस, दमा, खोकला, आनाह, गुदकील, अर्श, मेद, आणि धातु यांचा नाशक आहे.

वन्योद्भवःकुलित्थस्तुकटुस्तिक्तश्चशीतलः ॥ व्रणरोपणकारीचच
क्षुष्योर्शविनाशकः ॥ कफशूलविषस्फोटकंडूहिक्काविनाशकः ॥
नेत्ररोगंमलस्तंभमाध्मानंचविनाशयेत् ॥

**वन्यकुळीथ**—रानकुळीथ तिखट, कडू, शीतल, व्रणरोपण, नेत्रांना हितावह, व अर्श, कफ, शूल, विष, विस्फोट, कंडू, उचकी, नेत्ररोग, मलस्तंभ, आणि आध्मान यांचा नाश करितात.

मधुरंचातसीबीजंस्निग्धंतिक्तंबलप्रदं ॥ पाकेकटुगुरुप्रोक्तंवातलं
कफकारकं ॥ उष्णंदृष्टिचशुक्रंचपृष्ठशूलंचनाशयेत ॥ पित्तघ्नंचा
स्यशाकानुवातेकासेकफेहिता ॥

**अतसीबीज**—अळशी—जवस मधुर, स्निग्ध, कडू, बलकारक, पाककाळीं तिखट, गुरु, वातकर, कफकारक, उष्ण, दृष्टि, शुक्रदोष, पृष्ठशूल, आणि पित्त यांचा नाश करितात, याच्या पानांची भाजी वात, कास, कफ यांवर हितकारक आहे.

तिलोबलकरःस्निग्धोगुरुश्चाग्निप्रदीपनः ॥ स्तन्यकृत्पित्तलश्चोष्णः
केश्योमूत्राल्पताकरः ॥ व्रणेपथ्योग्राहकश्चकषायोमधुरोगुरुः ॥

तिक्तःपाकेकटुःप्रोक्तःस्पर्शेशीतोमतिप्रदः ॥ दंत्योवर्ण्यःकफकरो
व्रणवातंचनाशयेत् ॥ तिलःकृष्णोगुणैःश्रेष्ठोहीनःश्वेतोमतोबुधैः ॥
रक्तस्तिलोवन्यजश्चगुणैर्हीनतरोमतः ॥

**तीळ साधारण** बलकारक, स्निग्ध, गुरु, अग्निदीपक, स्तनांत दूध वाढविणारा, पित्तल, उष्ण, केशांला हितावह, अल्पमूत्रकारक, व्रणाविषयीं पथ्यकारक, ग्राहक, तुरट, मधुर, गुरु, कडू, पाककाळीं तिखट, स्पर्शानें शीत, मतिप्रद, दंतांना हितकारक, वर्णकर, कफकारक, व व्रण, वायु, यांचा नाश करितो. काळे तीळ गुणानीं अधिक आहेत, पांढरा हीनगुण आहे, व तांबडे, आणि आरण्य तीळ हे गुणानीं हीन आहेत.

सर्षपःकटुकस्तिक्तस्तीक्ष्णश्चोष्णोग्निदीपनः ॥ किंचिद्रूक्षःपित्तल
श्चरक्तपित्तकरोमतः ॥ रुक्षोवातंकफंकंडूंकुष्टंशूलंकृमीनजयेत् ॥
ग्रहपीडांचपीडांचनाशयेदितिकीर्तितः ॥ पर्णशाकासराचाम्लापि
त्तलातुवरागुरुः ॥ स्वादुश्चोष्णाचपट्वीचकफनाशकरामता ॥

**सर्षप**—साधारण तांबडे शिरस तिखट, कडू, तीक्ष्ण, उष्ण, अग्निदीपक, किंचित रुक्ष, पित्तल, रक्तपित्तकारक, रुक्ष, व वायु, कफ, कंडू, कुष्ठ, शूल, कृमि, ग्रहपीडा, आणि पीडा यांचा नाश करितात, याच्या पानांची भाजी सारक, आंबट, पित्तल, तुरट, गुरु, स्वादु, उष्ण, खारट, आणि कफनाशक अशी आहे.

राजसर्षपकश्चोष्णःपित्तलोदाहकारकः ॥ कटुस्तिक्तोगुल्मकुष्ठ
कंडव्रणरुजापहः ॥ वातशूलंनाशयतीत्येवंपूर्वैर्निवेदितः ॥

**राजसर्षप**—काळे शिरस उष्ण, पित्तल, दाहकारक, तिखट, कडू, आहे व गुल्म, कुष्ठ, कंडू, व्रण, आणि वातशूल याचा नाश करितात.

सिद्धार्थःकटुकस्तिक्तोरुच्योष्णोवातरक्तकृत ॥
ग्रहपीडार्शत्वग्दोषशोफव्रणविषापहः ॥

**सिद्धार्थ**—श्वेत सर्षप तिखट, कडू, रुचिकर, उष्ण, व वातरक्तकारक, व ग्रहपीडा, अर्श, त्वग्दोष, सूज, व्रण, आणि विष यांचा नाशक आहे.

राजिकोष्णादाहकारीपित्तलाकटुकामता ॥ तिक्तातीक्ष्णारक्तपि
त्तकारकाग्निप्रदीपनी ॥ रुक्षागुल्मकफप्लीहाशूलवातव्रणापहा ॥
कृमिकंडुकोठकुष्ठनाशिनीतिप्रकीर्तिता ॥

**आसूरी—राजिका**—तांबड्या मोहऱ्या उष्ण, दाहकारक, पित्तल, तिखट, कडू, तीक्ष्ण,

पथ्यकृत् ॥ वर्षेतृतीयेविरसंतस्मिन्माषायवास्तिलाः ॥ गोधूमाश्च विशेषेणविरसत्वंभजंतिते ॥ अतोब्दात्पूर्वकाग्राह्यास्तेवैहितकरामताः ॥

सर्व नवीन धान्य (एक वर्षाचे आंत) गुरु, स्वादु, कफकर, मलस्तंभक, असें आहे, तें दोन वर्षांचें लघु, पथ्यकारक, असें आहे, तीन वर्षांचें धान्य विरस होतें. त्यांत उडीद, यव, तीळ, गहूं हे तर फारच विरस होतात, याकरितां हे एक वर्षापूर्वीचे घ्यावे, ते हितकारक होतात.

धूमस्तुतुवरास्तिक्तःपटूरुक्षःकटुर्मतः ॥उष्णस्त्रिदोषजनकःप्रतिश्यायकरोमतः ॥ नेत्राहितःकासकरोवर्णवैषम्यकारकः ॥

धूम— धूर तुरट, कडु, खारट, रुक्ष, तिखट, उष्ण, त्रिदोषकारक, प्रतिश्यायकारक, नेत्रांला अहित, व खोकला, वर्णवैषम्य यांना करणारा असा आहे.

डिंडिशंवातलंरूक्षंमूत्रवृद्धिकरंमतं ॥
अश्मरीनाशकंप्रोक्तंमुनिभिस्तत्वदर्शिभिः ॥

डिंडिश— भेंडशी वातल, रुक्ष, मूत्रवर्धक, अश्मरीनाशक, अशी आहे.

धत्तूरःकांतिकृच्चोष्णःकटुश्चाग्निप्रदीपकः ॥ तुवरोमधुरास्तिक्तोमदकृद्वांतिकृद्गुरुः ॥ वर्ण्यकुष्टव्रणश्लेष्मज्वरकंडूकृमीनजयेत ॥ यूकालिक्षाश्रमविषपामात्वग्दोषनाशनः ॥ एषुकृष्णोगुणैःश्रेष्ठोमुनिभिःपरिकीर्तितः ॥

धत्तूर— श्वेतादिभेदानें पांच प्रकारचा धोत्रा कांतिकर, उष्ण, तिखट, अग्निदीपक, तुरट, मधुर, कडु, मदकारक, वांतिकर, गुरु, वर्णकर, व कुष्ठ, व्रण, कफज्वर, कंडू, कृमि, उवा, लिखा, श्रम, विष, पामा, आणि त्वग्दोष यांचा नाश करितो. हा काळा गुणानीं श्रेष्ठ आहे.

नखमुष्णंसुगंधिश्चकटुमेध्यंचशुक्रलं ॥ लघुवर्ण्यंस्वादुहृद्यंकफवाताविषप्रणुत् ॥ दौर्गंध्यस्वेदकुष्ठादिज्वरालक्ष्मीव्रणापहं ॥ मुखदौर्गंध्यकंडूघ्नंभूतग्रहनिवारणं ॥ वातरक्तंचपित्तंचनाशयेदितिकीर्तितं ॥

नखला उष्ण, सुगंधि, तिखट, मेधाकर, शुक्रल, लघु, वर्णकर, स्वादु, हृद्य, व कफ, वायु, विष, दुर्गंध, स्वेद, कुष्ठ, ज्वर, अलक्ष्मी, व्रण, मुखदुर्गंध, कंडू, भूतबाधा, ग्रहपीडा, वातरक्त, आणि पित्त, यांचा नाश करितो.

व्याघ्रस्यनखरास्तिक्तोवर्ण्यश्चोष्णःकषायकः ॥ सुगंधिःकुष्ठकंडूति

कफवातग्रहान्जयेत् ॥ गुणास्त्वन्येतुनखवन्मुनिभिःपरिकीर्तिताः ॥

वाघनख कडू, वर्णकर, उष्ण, तुरट, सुगंधि, व कुष्ठ, कंडू, कफ, वायु, ग्रहपीडा, यांचा नाश करितो, वरकड गुण नखल्यासारिखे आहेत.

नलिकाकटुकातिक्तानीक्ष्णाचमधुरासरा ॥ लघ्वीशीतोष्णदाप्रो क्ताचक्षुष्यावातपित्तहा ॥ रक्तपित्तकृमिविषकफवातोदरापहा ॥ शूलाश्मरीमूत्रकृच्छ्ररक्तदोषतृषाहरा ॥ कंडूकुष्ठज्वरव्रणदुर्नामानं चनाशयेत् ॥

नलिका तिखट, कडू, तीक्ष्ण, मधुर, सारक, लघु, समधात, नेत्रांला हितकर, व वातापित्त, रक्तपित्त, कृमि, विष, कफ, वातोदर, शूल, अश्मरी, मूत्रकृच्छ्र, रक्तदोष, ताहान, कंडू, कुष्ठ, ज्वर, व्रण, अर्शरोग, यांचा नाश करिते.

नस्यंतुकंठ्यंचक्षुष्यंदेहदार्ढ्यकरंमतं ॥
हितंदंतेषुपालितवलेश्चैवविनाशकं ॥

नस्य—नय कंठाला व नेत्रांला हितावह, देहाला दृढ करणारें, दांतांला हितकारक, वली, आणि पलित यांचा नाश करणारें असें आहे.

नक्षत्रवृक्षाःक्रमशोविषमुष्टिरथामली ॥ औदुंबरोजंबूवृक्षखदि रश्चागरुर्मतः ॥ वेणुश्चपिप्पलःप्रोक्तश्चंपकश्चवटोमतः ॥ पला शःपायरीजातोबिल्वकश्चार्जुनःस्मृतः ॥ बकुलीनागपुष्पंचमो चाचरालवृक्षकः ॥ वेत्रोनिचुलश्चार्कश्चशमो चैवकदंबकः ॥ आ म्रोरिष्टोमोहवृक्षोज्ञेयाजन्मर्क्षेनरस्तमो ॥ एतेषांपालनंकार्यंनच्छेय स्करमुच्यते ॥ हननंनाशकंप्रोक्तमेतेषांपूर्वसूरिभिः ॥

नक्षत्र वृक्षनाम—नक्षत्रवृक्षांचीं नावें. १ अश्विनी— कांजरा, कुचला. २ भरणी— आंवळी, ३ कृत्तिका— उंबर, कांटेधोत्रा, दारुडी. ४ रोहिणी— जांभूळ. मृग— खैर. ६ आर्द्रा— कृष्णागरु. ७ पुनर्वसु, वेणु, बांबू. ८ पुष्य— पिंपळ. ९ आश्लेषा— नागचाफा. १० मघा— वड. ११ पूर्वा— पळस. १२ उत्तरा—पायरी. १३ हस्त— पिंवळी जाई. १४ चित्रा— बेलाचें झाड. १५ स्वाति— अर्जुनसादडा. १६ विशाखा— देवबाभूळ, वेहेकळ. १७ अनुराधा— नागकेशर. १८ ज्येष्ठा— सांवर. १९ मूळ— राळेचें झाड. २० पूर्वाषाढा— वेत. २१ उत्तराषाढा— फणस. २२ श्रवण— रुई. २३ धनिष्ठा— शमी, सवदड. २४ शततारका— कळंब. २५ पूर्वाभाद्रपदा— आंबा. २६ उत्तराभाद्रपदा— कडूनिंब. २७ रेवती— मोहाचा वृक्ष.

नागकेशरकंतिक्तंकषायंचामपाचकं ॥ किंचिदुष्णंलघुरुक्षंपित्त छर्दिकफापहं ॥ खुडवातंरक्तरुजंवातंकंडूंचहृद्व्यथां ॥ स्वेददौ र्गंध्यविषतृट्कुष्ठवीसर्पनाशनः ॥ बस्तिपीडावातरक्तकंठमस्तक शूलनुत् ॥

**नागकेशर—कबाबचिनी** कडू, तुरट, आमपाचक, किंचिदुष्ण, लघु, रूक्ष, व पित्त, वांति, कफ, खुडवात, रक्तरोग, वायु, कंडू, हृदयव्यथा, स्वेद, दुर्गंध, विष, तृषा, कुष्ठ, विसाप, बस्तिपीडा, वातरक्त, कंठरोग, आणि मस्तकशूल यांचा नाश करिते.

नागवल्लीतुकटुकातीक्ष्णारुच्याचतिक्तका ॥ अग्निदीप्तिकरीदाह कारिणीकामवर्धका ॥ सरोष्णातुवरापट्वीविशदावश्यकारिणी ॥ रक्तपित्तकराबल्यालघ्वीरुक्षास्वरप्रदा ॥ मुखशुद्धिकरीचैवमुखा भरणकारिणी ॥ स्रंसिनीपीनसंकासंकफंवातंश्रमंकृमीन ॥ वा तरक्तंमलंक्लेदकंडूंचैवविनाशयेत् ॥

**नागवेल**—पानवेल तिखट, तीक्ष्ण, रुचिकर, कडू, अग्निदीपक, दाहकारक, कामवर्धक, सारक, उष्ण, तुरट, खारट, विशद, वश्यकारक, रक्तपित्तकारक, बलकर, लघु, रूक्ष, स्वरप्रद, मुखशुद्धिकारक, मुखाला अलंकार करणारी, स्रंसिनी, पीनस, खोकला, कफ, वात, श्रम, कृमि, वातकारक, मल, क्लेद, कंडू, यांचा नाश करिते.

समुद्रतीरजानागवल्लीहृद्यारुचिप्रदा ॥
दीपनीपाचनीतीक्ष्णाकटुकाकफवातहा ॥

**समुद्र तीरच्यों पानें** हृद्य, रुचिप्रद, दीपन, पाचन, तीक्ष्ण, तिखट, व कफ, वायु यांचा नाश करितात.

वृक्षजानागवल्लीतुमुखपीडाकरामता ॥ दोषलाचजडावांतिमल स्तंभारुचीकरा ॥ दाहरक्तरुजाकारीजीर्णपर्णरुचिप्रदं ॥ अत्युत्त मंवर्णकरंत्रिदोषशमनंमतं ॥

**झाडावरच्यों ताजीं व नवीं पानें** मुखपीडाकारक, दोषल, जड, व वांतिकारक, मलस्तंभक, व अरुचि, दाह, रक्तरोग, यांना करणारीं अशीं आहेत, हीं जुनीं पानें रुचिकारक, अति उत्तम वर्णकारक आणि त्रिदोषनाशक अशीं आहेत.

कृष्णातांबूलवल्लीतुतिक्तोष्णाकटुकामता ॥ कषायाचमलस्तंभ कारिणीदाहकारिणी ॥ मुखजाड्यकराप्रोक्तामुनिभिस्तत्वदर्शिभिः ॥

काळीं पानें कडू, उष्ण, तिखट, तुरट, स्तंभकारक, दाहकारक, आणि मुखजाड्यकारक अशीं आहेत.

श्वेतानुतांबुलीपथ्यारुच्यादीपनकारणी ॥
पाचकाकफवातानांनाशिनीतिप्रकीर्तिता ॥

देठीपानें पथ्यकारक, रुचिकर, दीपनकारक, पाचक, आणि कफवातनाशक आहेत.

नागीतिक्ताचकट्व्युष्णाकफवातविषापहा ॥
योनिदोषंकृमीन्शूलंवमिंचैवविनाशयेत् ॥

नागी—नागपुष्पी कडू, तिखट, उष्ण, व कफ, वायु, विष, योनिदोष, कृमि, शूल, आणि वांति यांचा नाश करिते.

प्रोक्तानागबलाचाम्लामधुरातुवरागुरुः ॥ कटव्युष्णाचव्र
णंवातंपित्तंकुष्ठंचनाशयेत् ॥ कंडूंचनाशयत्येवंमुनिभिः
परिकीर्तिता ॥

नागबला—लैंचा (चिकण्याचा भेद) आंबट, मधुर, तुरट, गुरु, तिखट, उष्ण, व व्रण, वायु, पित्त, कुष्ठ, आणि कंडू यांचा नाश करिते.

प्रोक्तानागदमन्युष्णातिक्तालघ्वीरुचिप्रदा ॥ कोष्ठशुद्धिकरीती
क्ष्णाकटुकायोनिदोषजित ॥ लूतांसर्पविषंवातंकफंवांतिंकृमीन्
व्रणं ॥ मूत्रकृच्छ्रंचोदरंचजालगर्दभकंतथा ॥ त्रिदोषंचप्रमेहंच
कासंकंठरुजंतथा ॥ शूलंगुल्मंरक्तदोषंज्वरंसर्वविषाणिच ॥ आ
ध्मानंग्रहपीडांचनाशयेदितिकीर्तिता ॥

नागदमनी—नागदोण उष्ण, अतिकडू, लघु, रुचिकर, कोष्ठशुद्धिकारक, तीक्ष्ण, तिखट, व योनिदोष, लूता, व सर्प यांचें विष, वायु, कफ, वांति, कृमि, व्रण, मूत्रकृच्छ्र, उदर, आलगर्दभ, त्रिदोष, प्रमेह, खोकला, कंठरोग, शूल, गुल्म, रक्तदोष, ज्वर, सर्व विष, आध्मान, आणि ग्रहपीडा यांचा नाश करिते.

नारिकेलंगुरुस्निग्धंशीतंवृष्यंचदुर्जरं ॥ बस्तिशुद्धिकरंबल्यं
बृंहणंकफकारकं ॥ स्वादुविष्टंभकृत्प्रोक्तंशोषतृट्पित्तनाश
नं ॥ वातपित्तंरक्तदोषंदाहंचैवविनाशयेत् ॥ क्षतक्षयंना
शयतीत्येवमुक्तंकृपालुभिः ॥

नारळ साधारण गुरु, स्निग्ध, शीत, वृष्य, दुर्जर, बस्तिशोधक, बलकर, बृंहण, कफ-

कारक, स्वादु, विष्टंभकारक, व शोष, तृषा, पित्त, वातपित्त, रक्तदोष, दाह, आणि क्षतक्षय यांचा नाश करितो.

कोमलंनारिकेलंतुविशेषात्पित्तनाशनं ॥
पित्तज्वरहरंप्रोक्तंविशेषज्ञैःकृपालुभिः ॥

शहाळें— कोंवळा नारळ विशेषें करून पित्तनाशक, पित्तज्वर, यांचा नाश करितो.

पक्वंचनारिकेलंतुदाहकंपित्तलंगुरु ॥ वृष्यंमलस्तंभकरंरुचिदंमधुरंमतं ॥ दीपनंबलकृत्प्रोक्तंवीर्यस्यचाविवर्धकं ॥

पिकलेला नारळ दाहक, पित्तकारक, गुरु, वृष्य, मलस्तंभक, रुचिप्रद, मधुर, दीपन, बलकारक, आणि वीर्यवर्धक असा आहे.

नारिकेलफलंशुष्कंदुर्जरंदाहकंगुरु ॥
स्निग्धंमलस्तंभकरंबलवीर्यरुचिप्रदं ॥

नारळाचा सुका गोटा दुर्जर, दाहक, गुरु, स्निग्ध, मलस्तंभक, बलकर, वीर्यप्रद, आणि रुचिकारक, असा आहे.

दुग्धंतुनारिकेलस्यबल्यंरुच्यंगुरुस्मृतं ॥ पाकेस्वादुसमुद्दिष्टंस्निग्धंवृष्यंचदाहकं ॥ किंचिदुष्णंवातकफगुल्मकासविनाशकं ॥

नारळाचें दूध (रस) बलकर, रुचिकर, गुरु, पाककाळीं स्वादु, स्निग्ध, वृष्य, दाहक, किंचित् उष्ण, व वायु, कफ, गुल्म, आणि खोकला यांचा नाश करितें.

रसंतुमृत्तिकाभांडेनारिकेलभवंक्षिपेत् ॥ मुखंपिधायवस्त्रेणरात्रौस्थाप्यंगृहाद्बहिः ॥प्रातःकालेतुनिर्मथ्यनवनीतंतुकारयेत् ॥ तत्पक्वातद्घृतंनामबृंहणंबलवर्धनं ॥ केश्यंरसेचपाकेचमधुरंचरुचिप्रदं ॥ हृद्यंचवातपित्तघ्नंतज्जीर्णंगुरुवातहं ॥

नारळाचें तूप—हिंवतेल नारळाचा रस काढून मातीच्या भांड्यांत भरून त्याचें तोंड वस्त्रानें बांधून, रात्रीं हवांत ठेवावा, प्रातःकाळीं घुसळून त्याचें लोणी काढावें त्याचें तूप करावें तें बृंहण, बलवर्धक, केशांना हितकर, रसकाळीं व पाककाळीं मधुर, रुचिप्रद, हृद्य, वातपित्तनाशक, असें आहे. तें जुनें झालें असतां गुरु आणि वातनाशक असें आहे.

नारिकेलस्यपुष्पंतुशीतंरक्तातिसारहं ॥रक्तपित्तंप्रमेहंचसोमरोगंचनाशयेत् ॥ मलस्तंभकरंचापिप्रोक्तंपूर्वमनीषिभिः ॥

**नारळाचीं फुलें** शीत, व रक्तातिसार, रक्तपित्त, प्रमेह, सोमरोग, यांचा नाश करितात आणि मलस्तंभक आहेत.

नारिकेलशिरोमज्जारसेपाकेमधुःस्मृता ॥
कफकृत्वातपित्तघ्नीरक्तदोषस्यशामका ॥

**माडाचा पांजरा** रसकाळीं व पाककाळीं मधुर, कफकर, वातपित्तनाशक आणि रक्तदोषशामक असा आहे.

नारिकेलपुष्पजलंगुरुवृष्यंप्रकीर्तितं ॥ तत्कालमदकृत्प्रोक्तंचा तिस्निग्धमुदीरितं ॥ तच्चेदम्लंकफकरंपित्तलंकृमिवातनुत् ॥

**माडी** गुरु, वृष्य, कामोत्पादक, अतिस्निग्ध, आंबट, कफकारक, पित्तल, व कृमि आणि वायु यांचा नाशक करिते.

मोहजातीयकंनामनारिकेलंचशीतलं॥ मधुरंपुष्टिकृत्बल्यंरुच्यंचा ग्निप्रदीपकं ॥ कांतिजंतुकरंस्निग्धंकफस्यामस्यकोपनं ॥ कामवृ द्धिकरंदेहस्थैर्यकृद्दाहनाशनं ॥ तृषापित्तश्रमंवातमतिसारंचनाशयेत् ॥

**मोहा नारळ** शीतल, मधुर, पुष्टिकर, बलकर, रुचिकारक, अग्निदीपक, कांतिकर, जंतुकारक, स्निग्ध, कफाला कोपविणारा, आमकारक, कामवर्धक, देहस्थैर्यकारक, दाहनाशक, व तहान, पित्त, श्रम, वायु, आणि अतिसार यांचा नाशक असा आहे.

तृणीवृक्षःकटुस्तिक्तःपुष्टिकृच्छीतलोलघुः ॥ वीर्यप्रदश्चमधुरस्तुव रोग्राहकोमतः ॥ वृष्यस्त्रिदोषहृत्प्रोक्तोव्रणंकुष्ठंचनाशयेत् ॥ र क्तपित्तंश्वेतकुष्ठंशीर्षपीडांविनाशयेत ॥ कंडूंपित्तंरक्तदोषंदाहंचै वविनाशयेत ॥

**तृणीवृक्ष**— नांदरुखी तिखट, कडु, पुष्टिकर, शीतल, लघु, वीर्यप्रद, मधुर, तुरट, ग्राहक, वृष्य, त्रिदोषनाशक, व व्रण, कुष्ट, रक्तपित्त, श्वेतकुष्ट, शीर्षपीडा, कंडू, पित्त, रक्तदोष, आणि दाह यांचा नाश करितो.

छिक्किनीकटुकारुच्यापित्तलाचाग्निदीपनी ॥ लघ्व्युष्णातुवराती व्रगंधात्वग्दोषनाशिनी ॥ कफवातश्वेतकुष्टकृमिरक्तरुजस्तथा ॥ ग्रहपीडांभूतबाधांदृष्टिंचैवविनाशयेत् ॥

**नाकशिंकणी**— छिकणी तिखट, रुचिकर, पित्तल, अग्निदीपक, लघु, उष्ण, तुरट, उग्रगंध, व त्वग्दोष, कफ, वायु, श्वेतकुष्ट, कृमिरोग, रक्तविकार, ग्रहांची पीडा, भूतबाधा, आणि दृष्टिदोष यांचा नाश करिते.

नागदंतीकटुस्तिक्तारुक्षारुच्याचतीक्ष्णका ॥ उष्णावातंकफंपित्तं गुल्मंशूलंतथोदरं ॥ योनिदोषंविषंवांतिंकंठदोषंकृमीन्जयेत् ॥

नागदंती–पेवें तिखट, कडू, रुक्ष, रुचिकर, तीक्ष्ण, उष्ण, व वात, कफ, पित्त गुल्म, शूल, उदर, योनिदोष, विष, वांति, कंठदोष, आणि कृमि यांचा नाश करिते.

नारिंगंकफपित्तामकारकंदुर्जरंसरं ॥ अत्यम्लंवातहरंकंचात्युष्णं चमतंबुधैः ॥ मधुरंतत्रामधुरंहृद्यमम्लंबलप्रदं ॥ विशदंगुरुरुच्यं चसरंचोष्णंसुगंधिकं ॥ स्वादुचामंकृमीन्वातंश्रमंशूलंचनाशयेत् ॥

नारिंग ( कवले गोड व आंबट दोन प्रकारचे ) कफ, पित्त, आम, यांना करणारें, दुर्जर, सारक, अतिआंबट, वातहारक, अति उष्ण, मधुर, असें आहे, तेंच आंबट असेल तर, हृद्य, आंबट, बलप्रद, विशद, गुरु, रुचिकर, सारक, उष्ण, सुगंधि, स्वादु, व आम, कृमि, वायु, श्रम, आणि शूल यांचा नाश करितें.

सेहुंडःकटुकस्तिक्तश्चोष्णस्तीक्ष्णःप्रदीपनः ॥ सरोगुरुर्वांतिकरःकुष्ठोदरविनाशकः ॥ प्लीहानंवातंप्रमेहंचशूलामकफशोथनुत् ॥ गुल्माष्ठीलाध्मानपांडुकफोदरव्रणज्वरान् ॥ उन्मादवातंमेदंचवृश्चिकस्याविषंतथा ॥ दूषीविषार्शोऽश्मरिघ्नोमुनिभिःपरिकीर्तितः ॥

निवडुंग (सावर, स्नुही, सेहुंड, निवल कांडे लहान, व थोर) तिखट, कडू, उष्ण, अग्निदीपन, सारक, गुरु, वांतिकर, व कुष्ठ, उदर, प्लीहा, वायु, प्रमेह, शूल, आम, कफ, सूज, गुल्म, अष्ठीला, आध्मान, पांडुरोग, कफ, उदर, व्रण, ज्वर, उन्माद, वायु, मेद, विंचवाचें विष, दूषिविष, अर्श, आणि अश्मरी यांचा नाश करितें.

स्नुहीदुग्धंचोष्णवीर्यंस्निग्धंकटुसरंलघु ॥ कुष्ठीगुल्मीचोदरीणुरेचनेचोत्तमंमतं ॥ विषोदराध्मानवातवातगुल्मांश्चनाशयेत् ॥

स्नुहीदुग्ध— निवडुंगाचा चीक उष्णवीर्य, स्निग्ध, तिखट, सारक, लघु, व कुष्ठी, गुल्मी, उदरी, यांला रेचाविषयीं उत्तम, विष, उदर आध्मानवायु, आणि गुल्म यांचा नाश करितो.

स्नुह्यास्तुपर्णंरुचिदंकटुकंचाग्निदीपनं ॥ कुष्ठाष्ठीलाध्मानवातशूलशोथोदराणिच ॥ अन्यानिसर्वोदराणिनाशयेदितिकीर्तितं ॥

स्नुहीपर्ण–निवडुंगाचीं पानें रुचिकर, तिखट, अग्निदीपन, व कुष्ठ, अष्ठीला, आध्मान-वातशूल शोथोदर, आणि सर्व उदरें यांचा नाश करितात.

> न्यरास्नुहीविशेषेणज्ञेयापारदबंधिनी ॥
> रंजनादेःसोद्धिकरीगुणास्त्वन्येस्नुहीसमाः ॥

निधारी निवडुंग पारदबंधक, रंजनादिकांविषयीं सिद्धि देणारें आहे, वरकड गुण निवडुंगासारिखे आहेत.

> कंथारीदीपनीरुच्याकटूष्णातिक्तकामता ॥ रक्तदोषंकफंवातं ग्रंथिरोगंचनाशयेत् ॥ स्नायुरोगंचशोफंचनाशयेदितकीर्तिता ॥

कंथारी–फणीनिवडुंग (ज्याचीं पानें मोठीं व जाड असून पानावर मोठे कांटे असतात तें) दीपन, रुचिकर, तिखट, उष्ण, कडू, व रक्तदोष, कफ, वायु, ग्रंथिरोग, स्नायुरोग, सूज यांचा नाश करितें.

> त्रिवृत्स्वमधुरंरुक्षंतुवरंस्वादुरेचकं ॥ उष्णंचपाकेकटुकंवातकोपनकारकं ॥ कफंपित्तंज्वरंप्लीहांव्रणंपांडुंविनाशयेत ॥ शोफपित्तोदरंहंतिहांतिपित्तभवंज्वरं ॥

त्रिवृत–श्वेतनिशोत्तर–पांढरें तेड मधुर, रुक्ष, तुरट, स्वादु, रेचक, उष्ण, पाककाळीं तिखट, वातकारक, व कफ, पित्त, ज्वर, प्लीहा, व्रण, पांडुरोग, शोफोदर, पित्तोदर, आणि पित्तज्वर यांचा नाश करितें.

> कृष्णांत्रिवृत्कटुस्तिक्तमुष्णंरेचनेतिप्रशस्तकं ॥ मूर्च्छादाहमदभ्रांतिकुष्ठकंडूकफव्रणान् ॥ श्लेष्मोदरंकंठरुजंकृमींश्चैवविनाशयेत् ॥ एतस्याल्पगुणंश्वेतत्रिवृतादितिकीर्तितं ॥

काळें निशोत्तर तिखट, कडू, उष्ण, रेचनाविषयीं प्रशस्त, व मूर्छा, दाह, मद, भ्रांति, कुष्ठ, कंडू, कफ, व्रण, कफोदर, कंठरोग, कृमि, यांचा नाश करितें, हें पांढऱ्या तेडाहून गुणानें कमी आहे.

> रक्तंत्रिवृत्तुमधुरंरुक्षंवातकरंमतं ॥ तुवरंचरसेतिक्तंकटुचोष्णंचरेचकं ॥ हितकृच्चमलस्तंभग्रहणींचकफोदरं ॥ शोथंपांडुकृमीन प्लीहांज्वरंपित्तंकफंतथा ॥ वातरक्तमुदावर्तंहृद्रोगंचाविनाशयेत् ॥

रक्तनिशोत्तर मधुर, रुक्ष, वातकारक, तुरट, रसकाळीं कडू, तिखट, उष्ण, रेचक, हितकारक, मलस्तंभक, व संग्रहणी, कफोदर, सूज, पांडुरोग, कृमि, प्लीहा, ज्वर, पित्त, कफ, वातरक्त, उदावर्त, आणि हृद्रोग, यांचा नाश करितें.

कतकःकटुकस्तिक्तोलेखनोरुचिकृल्लघुः ॥ चक्षुष्यस्तुवरःशीतोवि शदश्वविकासकः॥ छेदनोमधुरश्चैवतृषादाहविषापहः ॥ गुल्मशू लकृमोन्मेहंनेत्ररुकजलजंमलं ॥ नाशयेदितिचप्रोक्तःफलंतस्य चकोमलं ॥ चक्षुष्यंवातकृच्छीतंरक्तपित्तंतृषांविषं ॥ मोहंचनाश यत्येवतरुणंतत्तुदुर्जरं ॥ रुचिदंकफपित्तघ्नंतत्पक्वंपित्तलंमतं ॥ छर्देःस्वेदस्यजनकंशोफंपांडुविषंजयेत् ॥ प्रतिश्यायंकामलांचना शयेदितिकीर्तितं ॥ कनकस्यचबीजंतुचक्षुष्यंतुवरंगुरु ॥ जलप्र सादनंशीतंमधुरंचाश्मरीहरं ॥ वातंकफंमूत्रकृच्छ्रंतृषांनेत्ररुजंवि षं ॥ प्रमेहंशीर्षरोगंचनाशयेदितिकीर्तितं ॥ कनकस्यचमूलंतुस र्वकुष्ठहरंपरं ॥

कनकवृक्ष—निर्मळी वृक्ष-निवळीचें झाड तिखट, कडू, लेखन, रुचिकर, लघु, चक्षुष्य, तुरट, शीत, विशद, विकासी, छेदन, मधुर, व तृषा, दाह, विष, गुल्म, शूल, कृमि, मेह, नेत्ररोग, पाण्यांतील मळ, यांचा नाश करितें, त्याचें कोवळें फळ चक्षुष्य, वातकारक, शीत व रक्तपित्त, ताहान, विष, मोह यांचा नाश करितें. जून फळ, दुर्जर, रुचिकर व कफ, पित्त, यांचें नाशक आहे, तें पिकलें असतां पित्तकारक, वांतिकारक, घर्मजनक व सूज, पांडुरोग, विष, प्रतिश्याय आणि कामला यांचा नाश करितें. निर्मळीचें बीज नेत्रांला हितावह, तुरट, गुरु, जलाला स्वच्छ करणारें, मधुर, व अश्मरी, वायु, कफ, मूत्र-कृच्छ्, ताहान, नेत्ररोग, विष, प्रमेह, मस्तकरोग, यांचा नाश करितें. निर्मळीचें मूळ, संपूर्ण कुष्टांचा नाश करितें.

निंबूष्णंपाचकंचाम्लंदीपनंनेत्रयोर्हितं ॥ अतिरुच्यंचकटुकंतुवरं चमनंलघु ॥ कफंवातंवमिंकासंकंठरोगंक्षयंतथा ॥ पित्तंशूलंत्रि दोषंचमलस्तंभंविषूचिकां ॥ बद्धोदरंचामवातंगुल्मंचैवकृमीन् जयेत् ॥ तत्पक्वंचगुणैःश्रेष्ठंप्रोक्तंवैद्यविशारदैः ॥

निंबु व कागदी निंबु उष्ण, पाचक, आंबट, दीपन, नेत्रांला हितावह, अति रुचिकर, तिखट, तुरट, लघु व कफ, वायु, वांति, खोकला, कंठरोग, क्षय, पित्त, शूल, त्रिदोष, मलस्तंभक, विषूचिका, बद्ध गुदोदर, आमवात, गुल्म, कृमि, यांचा नाश करितें. हें पिकलें असतां गुणानीं श्रेष्ठ आहे.

शर्करानिंबुकंस्वादुमधुरंतर्पणंगुरु ॥ शीतंवृष्यंपुष्टिकृच्चग्राहकंधातु वर्धकं ॥ वातंपित्तंकफंशोषंविषदोषंश्रमंतथा ॥ विषरोगंचारुचिं चछर्दिरक्तरुजंजयेत्॥

**साकरनिंबू– राजानिंबू** स्वादु, मधुर, तर्पण, गुरु, शीत, वृष्य, पुष्टिकारक, ग्राहक, धातुवर्धक व वायु, पित्त, कफ, शोष, विषदोष, श्रम, विषरोग, अरुचि, छर्दि, रक्तरोग यांचा नाश करितें.

बृहज्जंबीरकंचाम्लंगुवरंतिक्तकंसरं ॥
उष्णंपित्तकफघ्नंचमुनिभिःपूर्वमीरितं ॥

**थोर ईड निंबू** आंबट, तुरट, कडू, सारक, उष्ण व पित्त, कफ यांचें नाशक असें आहे.

निंबवृक्षस्यपंचांगंरक्तदोषहरंमतं ॥
पित्तंकंडूंव्रणंकुष्टंदाहंचैवविनाशयेत ॥

**निंब पंचांग –निंब पंचक** रक्तदोष, पित्त, कंडू, व्रण, कुष्ट आणि दाह यांचा नाश करितें.

पारिभद्रोलघुःशीतस्तिक्तोग्राहीकटुस्मृतः ॥ अग्निमांद्यकरश्चैवव्रण शोधनकारकः ॥ शोथपक्वकरोबालेहितोहृद्योमतोबुधैः ॥ कृमि वांतिव्रणकफशोथपित्तविषापहः ॥ वातंकुष्टंचहृद्दाहंश्रमंकासंज्वरंतृषां ॥ अरुचिंरक्तदोषंचमेहंचैवविनाशयेत् ॥ कोमलःपल्लवश्चास्यग्राहकोवातकारकः ॥ रक्तपित्तंनेत्ररोगंकुष्टंचैवविनाशयेत् ॥ जीर्णपर्णंविशेषेणव्रणनाशकरंमतं ॥ निंबस्यसूक्ष्मशाखानुकासश्वासार्शगुल्महा ॥ कृमिमेहहराप्रोक्ताफलंचामंलघुस्मृतं ॥ स्निग्धंचभेदकंचोष्णंमेहकुष्टविनाशकं ॥ तत्पक्वंमधुरंस्निग्धंतिक्तंगुरुचापिच्छलं ॥ कफरोगंनेत्ररोगंरक्तपित्तंक्षतक्षयं ॥ नाशयेदितिचप्रोक्तंबीजमज्जातुकुष्ठहा ॥ कृमिनाशकरीप्रोक्तानिघंटेशुचार्कसकैः ॥

**कडूनिंब– बाळंतनिंब** शीत, कडू, ग्राहक, तिखट, अग्निमांद्यकारक, व्रणरोपण, मुळेला पिकविणारा, बाळांना हितकर, हृद्य व कृमि, वांति, व्रण, कफ, सूज, पित्त, विष, वायु, कोड, हृदयदाह, श्रम, खोकला, ज्वर, तृषा, अरुचि रक्तदोष आणि मेह यांचा नाश करितो. याचा कोंवळा पाला ग्राहक, वातकर व रक्तपित्त, नेत्ररोग यांचा नाश करितो. याचा जुन पल्लव, विशेषेंकरून व्रणनाशक आहे. निंबाच्या काड्या, खोकला, श्वास, अर्श, गुल्म, कृमि आणि मेह यांचा नाश करितात. याचें कोंवळें फळ (निंबोळ्या) स्निग्ध, भेदक, उष्ण, मेह व कुष्ट यांचें नाशक आहे. पिकलेलीं फळें मधुर, स्निग्ध, कडू, गुरु, पिच्छल व कफरोग, नेत्ररोग, रक्तपित्त, क्षतक्षय यांचा नाश करितें. याच्या बियाचे गोळे कुष्ट व कृमि यांचा नाश करितात.

महानिंबः कटुस्तिक्तः शीतश्चतुवरोमनः ॥ रुक्षोग्राहीकफंदाहं व्रणंर क्तरुजंतथा ॥ पित्तंकृमींश्चविषमज्वरंचहृदयव्यथां ॥ सर्वकुष्ठा निछर्दिंचप्रमेहंचविषूचिकां ॥ मूषिकायाविषंगुल्मंशीतपित्तंचना शयेत् ॥ कोठरोगंचार्शरोगंश्वासंचाविनिवारयेत् ॥

**महानिंब**—बकाणनिंब तिखट, कडू, शीत, तुरट, रुक्ष, ग्राहक व कफ, दाह, व्रण, रक्तदोष, पित्त, कृमि, विषमज्वर, हृदयव्यथा, सर्व कुष्टें, वांति, प्रमेह, विषूचिका, उंदराचें विष, गुल्म, शीतपित्त, कंठरोग, अर्शरोग व दमा यांचा नाश करितो.

कैडर्यः शीतलस्तिक्तः कटुश्चतुवरोलघुः ॥ दाहार्शकृमिशूलघ्नः संता पविषनाशनः ॥ शोफंकुष्ठंभूतबाधांनाशयेदीतकीर्तितः ॥

**कैडर्य—कढीनिंब—गोडानिंब** शीतल, कडू, तिखट, तुरट, लघु व दाह, अर्श, कृमि, शूल, संताप, विष, सुज, कोड, भूतबाधा यांचा नाशक आहे.

निर्गुंडीकटुकातिक्तारुक्षाचोष्णाकषायका ॥ स्मृतिप्रदानेत्रहिता केश्यालघ्व्याग्निदीपनी ॥ मेध्यावर्ण्याचसंप्रोक्तागुदवातक्षयापहा ॥ संधिवातंचवातंचशोफंचामंकृमींस्तथा ॥ कुष्ठंकफंव्रणंप्लीहांगु ल्मंकंठरुजंतथा ॥ विषंशूलंचारुचिंचज्वरंमेदोरुजंतथा ॥ गृध्र सींचप्रतिश्यायंकासंश्वासंचनाशयेत ॥ पित्तनाशकरोप्रोक्तापर्ण मस्थाल्गुस्मतं ॥ कृमिनाशकरंप्रोक्तंपूर्वैर्वैद्यैःकृपालुभिः ॥

**निर्गुंडी**—निगड पांढरें फुलांची तिखट, कडू, रुक्ष, उष्ण, तुरट, स्मृतिप्रद, नेत्राला हितावह, केशांना हित, लघु अग्निदीपक, मेधाकारक, वर्णकर व गुदवात, क्षय, संधिवात, वात, सुज, आम, कृमि, कुष्ट, कफ, व्रण, प्लीहा, गुल्म, कंठरोग, विष, शूळ, अरुचि, ज्वर, मेदोरोग, गृध्रसीवायु, पडसें, खोकला, दमा, पित्त, यांचा नाश करिते. निर्गुंडीचीं पानें लघु व कृमिनाशक आहेत.

नीलानिर्गुंडिकातिक्तारुक्षाचोष्णाकटुःस्मृता ॥ आध्मानवातंप्रद रंकासंशोथंकफंहरेत् ॥ वातनाशकरीप्रोक्तामुनिभिर्गुणपारगैः ॥

**नीलनिर्गुंडी**—नीलपुष्पा— काळी निर्गुंडी कडू, रुक्ष, उष्ण, तिखट व आध्मानवायु, प्रदर, खोकला, सुज, कफ आणि वायु यांचा नाश करिते.

निर्गुंडीकर्नरीयुक्ताकटीतिक्ताकफापहा ॥
वातंक्षयंचशूलंचकंडूंकुष्ठंचनाशयेत् ॥

काळीनिगुड तिखट, कडू, कफनाशक व वायु, क्षय, शूल, कंडू आणि कुष्ट, यांचा नाश करिते.

प्रोक्ताचारण्यनिर्गुंडीपथ्यापित्तंज्वरंहरेत् ॥ विषंचगृध्रसीवातंनाशयेद्वर्णकारिणी ॥ पर्णंचास्यास्तुकटुकंचाग्निदीप्तिकरंलघु ॥ कृमीन्कफंचवातंचनाशयेदितिकीर्तितं ॥ पुष्पंचास्याःकटुश्चोष्णं तिक्तंकृमिकफापहं ॥ प्लीहांगुल्मंचवातंचकुष्टंशोथंचनाशयेत् ॥ अरुचेर्नाशकंप्रोक्तंकंडूंचैवविनाशयेत् ॥

वर्णाई श्वेत व कृष्ण— रान निगुड पथ्यकारक व पित्तज्वर, विष, गृध्रसीवायु यांची नाशक, वर्णकारक, अशी आहे. हिचीं पानें तिखट, अग्निदीपक, लघु व कृमि, कफ, वायु यांचा नाश करितात. हिचीं फुलें तिखट, उष्ण, कडू व कृमि, कफ, प्लीहा, गुल्म, वायु, कुष्ट, सूज, अरुचि आणि कंडू, यांचा नाश करितात.

निर्विषीकटुकाशीनाव्रणरोपणकारिणी ॥
कफंवातंरक्तदोषंविषदोषंचनाशयेत ॥

निर्विषी— कचऱ्या सारखें झाड असतें ती तिखट, शीत, व्रण व कफ, वायु, रक्तदोष आणि विषदोष यांचा नाश करिते.

निद्राहितकरीपुष्टिबलारोग्यप्रदामता ॥
अग्निदीप्तिकरीचैवश्रमस्यचविनाशिनी ॥

निद्रा—झोप हितकर, पुष्टिकारक, बलप्रद, आरोग्यकारक, अग्निदीपक आणि श्रम-नाशक अशी आहे.

नीलीतुकटुकातिक्ताकेश्याचोष्णासरामता ॥ व्यंगंश्लेष्मोदरंमोहंहृद्रोगंचभ्रमंतथा ॥ वातरक्तमुदावर्तमामवातंकफंजयेत् ॥ मदंकासंविषंचामवातंगुल्मंज्वरंतथा ॥ कुष्ठंकृमीन्चोदरंचप्लीहां चैवविनाशयेत् ॥

नीली—गुळीचें झाड—जिचा काळा रंग होतो ती तिखट, कडू, केशांना हितावह, उष्ण, सारक व वांग, श्लेष्मा, उदर, मोह, हृद्रोग, भ्रम, वातरक्त, उदावर्त, आमवात, कफ, मद, खोकला, विष, आमवात, गुल्म, ज्वर, कुष्ट, कृमि, उदर आणि प्लीहा यांचा नाश करिते.

नीलांजनंतुकटुकंतिक्तंचमधुरंगुरुः ॥ चक्षुष्यंतुवरंस्निग्धंसुवर्णस्य
चमारकं ॥ रसायनंचलोहस्यमृदुताकारकंमतं ॥ कफंवातंविषं
गुल्मंवमिंनेत्ररुजंतथा ॥ रक्तपित्तं चातिसारंनाशयेदितिकीर्तितं ॥

**नीलांजन**—काळ्या सुरम्याचा भेद तिखट, कडू, मधुर, गुरु, चक्षूंना हितावह, तुरट, स्निग्ध, सुवर्णमारक, रसायन, लोहाला मृदु करणारें व कफ, वायु, विष, गुल्म, वांति, नेत्ररोग, रक्तपित्त व अतिसार यांचा नाश करितें.

करीरस्तुवरश्चोष्णःकटुश्चाध्मानकारकः॥ रुच्योभेदकरःस्वादुःकफ
वातामशोथजित् ॥ विषार्शव्रणशोथघ्नःकृमिपामाहरोमतः ॥ अरो
चकंसर्वशूलंश्वासंचैवाविनाशयेत् ॥ फलंचास्यकटुस्तिक्तमुष्णंच
तुवरंमतं ॥ विकासिमधुरंग्राहिमुखवैशद्यकारकं ॥ हृद्यंरुक्षंकफंमे
हंदुर्नामानंचनाशयेत् ॥ पुष्पंवातकरंप्रोक्तंतुवरंकफपित्तनुत् ॥

**करीर**-नेबती तुरट, उष्ण, तिखट, आध्मानकारक, रुचिकर, भेदक, स्वादु व कफ, वायु, आम, सूज, विष, अर्श, व्रणशोथ, कृमि, खरूज, अरुचि, सर्व शूल आणि श्वास यांचा नाश करितें. हिचें फळ तिखट, कडू, उष्ण, तुरट, विकासि, मधुर, ग्राहक मुखाला स्वच्छ करणारें, हृद्य, रुक्ष व कफ, मेह, अर्शरोग यांचा नाश करितें. हिचें फूल वातकारक, तुरट व कफ, पित्त यांचें नाशक आहे.

नेवालीकटुकातिक्ताशीताचसुरभिर्लघुः ॥ त्रिदोषनेत्ररोगघ्नीक
र्णाननरुजापहा ॥ सर्वरोगहराप्रोक्तागुणज्ञैःपूर्वकोविदैः ॥

**नेवाळी**—रान मोगरी तिखट, कडू, शीतल, सुरभि, लघु व त्रिदोष, नेत्ररोग, कर्णरोग, मुखरोग आणि सर्व रोग यांची नाशक आहे.

पत्रांगस्तिक्तकःशीतोरुक्षोम्लोमधुरःकटुः ॥ व्रणशुद्धिकरोवर्ण्यः
सुगंधिःपित्तवातहृत ॥ उन्मादज्वरविस्फोटमूत्रकृच्छ्रव्रणानजये
त ॥ कफाश्मरीरक्तदोषभूतबाधानिवारणः ॥

**पतंग** कडू, शीत, रुक्ष, आंबट, मधुर, तिखट, व्रणशुद्धिकारक, वर्णकर, सुगंधि व पित्त, वायु, उन्माद, ज्वर, विस्फोट, मूत्रकृच्छ्र, व्रण, कफ, अश्मरी, रक्तदोष आणि भूतबाधा यांचा नाशक असा आहे.

पद्मकंशीतकंतिक्तंगर्भस्थैर्यकरंलघु ॥ वातलंतुवरंरुच्यंरक्तपित्त ज्वरौजयेत् ॥ मोहदाहभ्रांतिकुष्ठविस्फोटविषतृट्प्रणुत् ॥ रक्तदोषंव्रणंवांतिदद्रुपित्तंविसर्पकं ॥ कफंचनाशयेदेवंपूर्वाचार्यैरुदीरितं ॥

**पद्मकाष्ठ** शीतल, कडू, गर्भाला स्थिर करणारें, लघु, वातुल, तुरट, रुचिकारक व रक्तपित्त, ज्वर, मोह, दाह, भ्रांति, कुष्ठ, विस्फोट, विषदोष, तृषा, रक्तदोष, व्रण, वांति, दद्रु, पित्त, विसर्प आणि कफ यांचा नाश करितें.

शैलेयंकटुकंशीतंसुगंधिलघुहृद्यकं ॥ रुच्यंचकफपित्तघ्नंदाहतृष्णावमिप्रणुत् ॥ श्वासंव्रणंचकंडूंचकुष्ठाश्मरिविषज्वरान् ॥ रक्तदोषंवातरोगंरक्तार्शंचैवनाशयेत् ॥

**शैलेय-दगडफूल** तिखट, शीतल, सुगंधि, लघु, हृद्य, रुचिकर व कफ, पित्त, दाह, तृष्णा, वांति, दमा, व्रण, कंडू, कुष्ट, अश्मरी, विष, ज्वर, रक्तदोष, वातरोग आणि रक्तार्श यांचा नाश करितें.

पर्पटीशीतलावर्ण्यातुवरातिक्तकालघुः॥ अग्निदीप्तिकरारुच्यारक्तपित्तकफान्जयेत ॥ पित्तंचरक्तदोषंचकुष्टंदाहंवमितृषां ॥ कुष्टरोगंविषंकंडूंव्रणंचैवविनाशयेत् ॥

**पर्पटी**-रंग बांशा-जंतुकार-पापडी शीतल वर्णकारक, तुरट, कडू, लघु, अग्निदीपक, रुचिकर व रक्तपित्त, कफ, पित्त, रक्तदोष, कुष्ट, दाह, वांति, तृषा, कुष्टरोग, विष, कंडू आणि व्रण यांचा नाश करिते.

उष्णःपलाशस्तुवरोवृष्योदीप्तिकरःसरः ॥ तिक्तःस्निग्धोग्राहकश्च भग्नसंधानकारकः ॥ व्रणगुल्मकृमिप्लीहासंग्रहण्यर्शवातहा ॥ कफंयोनिरुजंपित्तंनाशयेदितिकीर्तितः ॥ पुष्पभेदादयंरक्तपीतशुभ्रकनीलकः ॥ पुष्पाणिस्वादुतिक्तानिउष्णानितुवराणिच ॥ वातलानिग्राहकाणिशीतलान्यूषणानिच ॥ तृषादाहपित्तकफान् रक्तदोषंचकुष्ठकं ॥ मूत्रकृच्छ्रंघातयंतिफलंरूक्षंलघुस्मृतं ॥ उष्णंचकटुकंपाकेकफवातोदरकृमीन् ॥ कुष्ठगुल्मप्रमेहार्शःशूलानां चैवनाशकं ॥ फलबीजंचस्निग्धोष्णंकटुःकफकृमीन्जयेत् ॥ नूतनाश्चपल्लवाश्चास्यकृमिवातविनाशकाः ॥

पळस उष्ण, तुरट, वृष्य, अग्निदीपक, सारक, कडू, स्निग्ध, ग्राहक, भग्नसंधानकारक व व्रण, गुल्म, कृमि, प्लीहा, संग्रहणी, अर्श, वायु, कफ, योनिरोग आणि पित्तरोग यांचा नाश करितो. हा रक्त, पीत, शुभ्र, नील, या भेदानें चार प्रकारचा. याचीं फुलें स्वादु, कडु, उष्ण, तुरट, वातळ, ग्राहक, शीतल, तिखट व तृषा, दाह, पित्त, कफ, रक्तदोष, कुष्ट आणि मूत्रकृच्छ्र यांचा नाश करितात. याचीं फळें रुक्ष, लघु, उष्ण, पाककाळीं तिखट व कफ, वायु, उदर, कृमि, कुष्ट, गुल्म, प्रमेह, अर्श आणि शूल यांचा नाश करितात. याच्या फळांतील बिया स्निग्ध, उष्ण, तिखट व कफ, कृमि यांचा नाश करितात. याचा कोंवळा पाला कृमि आणि वायु यांचा नाशक आहे.

परूषकोम्लस्तुवरोलघुश्चकफवातहा ॥ पित्तलंचामफलकंलघूष्णंतुवराम्लकं ॥ वातनाशकरंप्रोक्तंपक्वमस्यफलंमधु ॥ स्वादुरुच्यंतर्पणंचशीतंमलविबंधकृत् ॥ हृद्यंधातुकरंचाम्लंवातपित्ततृषापहं ॥ रक्तरुग्दाहशोफांश्चपित्तज्वरक्षतक्षयान् ॥ नाशयेदितिनेब्रुयुर्गुणविद्याविशारदाः ॥

परूषक वृक्ष–फालसा तुरट, आंबट, लघु व कफ, वायु यांचा नाशक व पित्तकर असा आहे. याचें हिरवें फळ लघु, उष्ण, तुरट, आंबट, वातनाशक, असें आहे. याचें पिकें फळ मधुर, स्वादु, रुचिकर, तर्पण, शीतळ, मलबध्दताकारक, हृद्य, धातुकर, आंबट व वात, पित्त, तृषा, रक्तरोग, दाह, शोफा व पित्तज्वर, क्षतक्षय यांचा नाश करितो.

पट्टशाकस्तुविष्टंभीरक्तपित्तहरोध्रुवं ॥
वैद्यैर्भावप्रकाशेचसंप्रोक्तावातकोपना ॥

पट्टशाक–पटियाशाक विष्टंभकारक, रक्तपित्तनाशक आणि वातकोपन असें आहे.

पर्णंरंपाचनंहृद्यंवृष्यंवन्हिकरंलघु ॥ दीपनंस्निग्धमुष्णंचकासरक्तत्रिदोषहं ॥ कृमिजन्मदनंप्रोक्तंवैद्यैर्विद्याविचक्षणैः ॥ कफनाशकरीवल्लीपत्रंपित्तस्यनाशकं ॥ मूलंतुरेचकंचास्यमुनिभिःपरिकीर्तितं ॥

पर्णें पाचन, हृद्य, वृष्य, अग्निदीपक, लघु, दीपन, स्निग्ध, उष्ण व खोकला रक्तदोष, त्रिदोष, कृमिरोग यांचा नाश करितात. याची वेल कफ नाशक. पानें पित्त नाशक आणि मूळ रेचक असें आहे.

पटोलीवल्कृतस्वादुपथ्यादीपनपाचनी ॥ रुच्यापुष्टिकरीज्ञेयाकासपित्तज्वरापहा ॥शोषांत्रिदोषशमनीफलंवृष्यंरुचिप्रदं॥ मधुरंस्वादुपथ्यंचपाचकंलघुदीपकं ॥ हृद्यंस्निग्धंचउष्णंचकफरक्तत्रिदोष

नुत् ॥ कासज्वरकृमीन्हंतिपर्णंवैपित्तनाशकं ॥ मूलंरेचकंप्रोक्तं वल्लीचैवकफापहा ॥

**पटोली**–पडवळ, (लाहान व थोर), बलकर, स्वादु, पथ्य, दीपन, पाचन, रुचिकर, पुष्टिकर व वात, पित्त, ज्वर, शोष आणि, त्रिदोष यांचा नाश करिते. पडवळफळ, वृष्य, रुचिकर, मधुर, स्वादु, पथ्य, पाचक, लघु, दीपक, हृद्य, स्निग्ध, उष्ण व कफ, रक्तदोष, त्रिदोष, खोकला, ज्वर, कृमि यांचा नाश करितें. याचीं पानें पित्तनाशक, मूळ रेचक, वेल कफनाशक अशीं आहे.

तिक्तापटोलीकटुकासारकोष्णाकटुःस्मृता ॥ भेदनीपाचनीचैवअग्निदीपकरापरा ॥ पित्तंकफंचकंडूंचकुष्टंरक्तविकारकं ॥ ज्वरं दाहंतृषांकोष्ठरोगंकृमिचनाशयत्यलं ॥ फलमस्याःकटुस्तिक्तंपाके स्वादुलघुस्मृतं ॥ दीपनंपाचनंवृष्यंमललोमनकारकं ॥ वातपित्तकफानांतुयथास्थानेनिवेशकं ॥ सारकंश्वासज्वरहृत्त्रिदोषकृमिनाशकं ॥ पित्तनाशकरंपर्णंमूलंकफविनाशकं ॥ कफनाशकरीवल्लीतैलंवातकफापहं ॥

**तिक्ता पटोली**– कडु पडवळ तिखट, सारक, उष्ण, तिखट, भेदक, पाचक, अग्निदीपक व पित्त, कफ, कंडू, कुष्ट, रक्तविकार व ज्वर, दाह, तृषा, कोठरोग, कृमि यांचा नाश करिते. हिचें फळ तिखट, कडू, पाककाळीं गोड, लघु, दीपन, पाचन, वृष्य, मलानुलोमन व वायु, पित्त, कफ यांना यथास्थानीं ठेवणारें, सारक व श्वास, ज्वर, त्रिदोष, कृमि याचा नाश करितें. हिचीं पानें पित्तनाशक, मूळ कफ नाशक, वल्ली कफ नाशक आणि हिचें तेल, कफ नाशक असें आहे.

हिज्जुलःकटुरुष्णश्चतुवरस्तिक्तशोफहृत ॥ मेदमेहकफान्वायुमुदरंभूतदोषकं ॥ कृमीन्ग्रहाणांपीडांचाविषंनाशयतेध्रुवं ॥

**हिज्गुल**– जल कण्हेर– परेळ तिखट, उष्ण, तुरट, कडू व सूज, मेद, मेह, कफ, वायु, उदररोग, भूतदोष, कृमि, ग्रहपीडा आणि विष यांचा नाश करितो.

पलाशीमधुराम्लाचमुखदोषविनाशिनी ॥
अरोचकहरापथ्यापित्तकोपकरीचसा ॥

**पलाशी**– पळशी मधुर, आंबट व मुखदोष, अरोचक यांचा नाश करणारी आणि पित्ताला कोपविणारी अशी आहे.

पटवासोरुचिकरस्तुवरोदीपनोलघुः॥शीतोरुक्षोग्राहकश्चवस्त्ररंजन
कारकः ॥ पित्तवातकफानांचनाशकःसमुदाहृतः ॥

पटवास– सावरंड रुचिकर, तुरट, दीपन, लघु, शीतळ, रुक्ष, ग्राहक, वस्त्राला रंग-
विणारा व पित्त, वायु आणि कफ यांचा नाशक आहे.

परेणीरुचिरातृष्णादाहभ्रमहल्लीमकान् ॥ कामलापांडुरुक्पित्तर
क्तदोषविषज्वरान ॥ मूत्रकृछ्रंचकंडूंचकासंचैवविनाशयेत् ॥

परेणी (हस्तपरिमित बारीक पानाचें झाड गोरखवनांत उत्पन्न होतें तें). रुचिकर
व ताहान, दाह, भ्रम, हलीमक, कामला, पांडुरोग, पित्त, रक्तदोष, विषज्वर, मूत्रकृछ्र,
कंडू, खोकला यांचा नाश करिते.

पाठातिक्ताकटूष्णाचभग्नसंधानकारका ॥ तीक्ष्णालघुःपित्तदाहशू
लातीसारनाशिनी ॥ वातपित्तज्वरछर्दिविषाजीर्णत्रिदोषकान् ॥
हृद्रोगछर्दिकुष्टानिकंडूश्वासकृमीनजयेत् ॥ गुल्मोदरव्रणकफ
वातनाशकरीमता ॥

पाठावली– पहाडमूळ कडू, तिखट, उष्ण, भग्नसंधानकारक, तीक्ष्ण, लघु व पित्त,
दाह, शूळ, अतिसार, वात, पित्त, ज्वर, वांति, विषदोष, अजीर्ण, त्रिदोष, हृद्रोग, वांति,
कुष्ट, कंडू, श्वास, कृमि, गुल्म, उदर, व्रण, कफ आणि वायु यांचा नाश करिते.

पत्तूरस्तिक्तकःपित्तजीर्णज्वरविनाशकः ॥
दृग्विकारेभुजेधार्यःशीतोष्णोऋषिभिःस्मृतः ॥

पत्तूर– पाचोंदा कडू व पित्त, जीर्णज्वर यांचा नाश करितो. व हा हाताला बांधावा,
ह्मणजे नेत्रविकारनाशक व समधात असा आहे.

मंचकोबलकृन्निद्राप्रदस्तनुविकारनुत ॥

मंचक– माचा– पलंग बलकर, निद्राकारक व शरीराचे विकार घालविणारा असा
आहे.

## पानीयवर्ग.

जलंचमधुरंशीतंरुचिदंपाचकंमतं ॥ तृप्तिकृद्वीर्यबलदंबुद्धिदृष्टिप्र
दंमतं ॥ हृद्यंहितावहंस्वच्छंपौष्टिकंजीवदंलघु ॥ शोषमोहभ्रांति
निद्राविषालस्यविनाशनं ॥ पित्तंचाजीर्णकंग्लानिदाहंमूर्छांतृषांत

था ॥ तंद्रांछर्दिमदंवातंश्रमंचैवमदात्ययं ॥ रक्तरुक्तमकश्वास रक्तदोषविनाशनं ॥ दिव्यंभौमंजलंद्वेधादिव्यंज्ञेयंचतुर्विधं ॥ धारंकारंचहैमंचतौषारंतत्रकीर्तितं ॥ भौमंतुकौपंताडागंसारसं चौद्भिदंमतं ॥ चौड्यंप्रास्त्रवणंवाप्यंनादेयंवसुसंख्यकं ॥

जल—पाणी मधुर, शीत, रुचिप्रद, पाचक, तृप्तिकारक, वीर्यप्रद, बलकारक, बुद्धिप्रद, दृष्टिदायक, हृद्य, हितावह, स्वच्छ, पौष्टिक, जीवन, लघु, व शोष, मोह, भ्रांति, निद्रा, विष, आलस्य, पित्त, अजीर्ण, ग्लानि, दाह, मूर्छा, तृषा, तंद्रा, छर्दि, मद, वायु, श्रम, मदात्यय, रक्तदोष, तमकश्वास, रक्तविकार, यांचा नाश करितें— हें दिव्य, व भौम असे दोन प्रकारचें, त्यांत दिव्य चार प्रकारचें— तें धार, कार, हैम, तौषार, असें आहे, व भौम तें कौप, ताडाग, सारस, उद्भिद, चौड्य, प्रास्त्रवण, वाप्य आणि नादेय असें आठ प्रकारचें आहे.

पर्जन्यजंजलंबल्यंलघुचैवरसायनं॥समधातकरंप्रोक्तंतृप्तिकृत्पाच कंमतं ॥ आनंदजनकंपथ्यंमतिदंजीवनंमतं ॥ त्रिदोषमूर्छा तंद्राघ्नंदाहश्रमतृषाहरं ॥ ग्लानिहंतुविशेषेणप्रशस्तंवर्षकालजं ॥ तत्तुधारोदकंद्वेधागांगंसामुद्रकंमतं ॥ गांगंतुचाश्विनेमासिस्वात्तिजंसर्वदोषनुत् ॥ सामुद्रंमृगशीर्षादिनक्षत्रेपतितंधृतं ॥ तच्छी तंवातलंक्षारंकफकृद्गुरुदोषलं ॥ विस्रंसिकटुकंप्रोक्तंसर्वकर्मसुनिंदितं ॥ दृष्टिशुक्रबलानांतुनाशकंपरिकीर्तितं ॥

धारोदक—पावसाचें पाणी बलकर, लघु, रसायन, समधात, तृप्तिकारक, पाचक, आनंददायक, पथ्य, मतिप्रद, जीवन, व त्रिदोष, मूर्छा, तंद्रा, दाह, श्रम, ताहान ग्लानि, यांचा नाश करितें. हें वर्षा ऋतूंतलें प्रशस्त आहे, हें धारोदक गांग, व सामुद्र या भेदानें दोन प्रकारचें, त्यांतून गांग म्हणजे आश्विनमासीं स्वातीच्या पावसाचें धरून ठेवावें तें सर्वदोष नाशक आहे; आणि मृगादि नक्षत्राच्या पावसाचें पाणी धरावें तें सामुद्र; तें शीतल, वातल, खारट, कफकारक, गुरु दोषल, विस्रंसि, तिखट, असें आहे. याचा उपयोग करूं नये. हें दृष्टि, शुक्र आणि बल यांचा नाश करितें.

कारोदकंतुविशदंगुरुरुक्षंस्थिरंघनं ॥
कफकृद्वातलंचातिशीतंपित्तविनाशकं ॥

कारोदक — गारांचें पाणी विशद, गुरु, रुक्ष, स्थिर, घन, कफकर, वातल, अतिशीत आणि पित्तनाशक असें आहे.

हैमंशीतंगुरुर्धातुवर्धकंपित्तनाशकं ॥
वातवृद्धिकरं चैवमुनिभिःपरिकीर्तितं ॥

**हैमोदक**– पर्वतापासून बर्फ पाघळून येतें तें शीत, गुरु, धातुवर्धक, पित्तनाशक, वातवर्धक, असें आहे.

नीहारजंजलंशीतंरुक्षंवातकरंमतं ॥ कफंपित्तमुरस्तंभंकंठरोगं
विनाशयेत् ॥ जठराग्निमेदरोगंगलगंडादिकंजयेत् ॥

**तौषारोदक**–दवाचें पाणी शीत, रुक्ष, वातकारक व कफ, पित्त उरस्तंभ, कंठरोग, जठराग्नि, मेदरोग आणि गलगंड यांचा नाश करितें.

कौपोदकंपित्तलंचदीपनंचपटुर्मतं ॥ लघुस्वादुत्रिदोषघ्नंकफवा
तहरंपरं ॥ वसंतग्रीष्मयोर्मध्येप्रशस्तमितिचस्मृतं ॥

**भौमोदक**– भूमिसंबंधी उदक कौपोदक–आडाचें पाणी पित्तल, दीपन, खारट; लघु, स्वादु व त्रिदोष, कफ, वायु यांचा नाश करितें. हें वसंत व ग्रीष्मकाळ यामध्यें अतिप्रशस्त आहे.

सारसोदंबलकरंमधुरंतृप्तिकृल्लघु ॥
तुवरंपित्ततृष्णाघ्नंहेमंतेचहितावहं ॥

**सारसोदक**–सरोवराचें पाणी बलकारक, मधुर, तृप्तिकर, लघु, तुरट व पित्त, तृष्णा यांचा नाश करणारें असें आहे.

तडागजंजलंस्वादुवातलंतुवरंमतं ॥ मलमूत्रस्तंभकंच
पाकेचकटुकंमतं ॥ रक्तरुक्कफपित्तघ्नंहेमंतेसुखकारकं ॥

**तडागोदक**–तळ्याचें पाणी स्वादु, वातल, तुरट व मल, मूत्र यांचें स्तंभक, पाककाळीं तिखट व रक्तरोग, कफ, पित्त यांचा नाश करणारें, हेमंतऋतूंत सुखकारक, असें आहे.

चौंड्योदकंस्वादुशीतंरुक्षंचाग्निप्रदीपनं ॥ पाचकंमधुरंरुच्यंविश
दंचलघुस्मृतं ॥ कफपित्तंज्वरंहिक्कांनाशयेदितिकीर्तितं ॥ प्रावृ
ट्काले हितकरंमुनिभिःपरिकीर्तितं ॥

**चाड्योदक**–आडवेलाचें पाणी गोड, शीत, रुक्ष, अग्निदीपक, पाचक, मधुर, रुचिकर विशद, लघु व कफ, पित्त, ज्वर, उचकी यांचा नाश करितें. हें प्रावृट्काळीं हितावह होतें.

नैर्झरंचोदकंहृद्यंमधुरंचाग्निदीपनं ॥ पाकेकटुर्वातलंचकफपित्त
हरंलघु ॥ वसंतग्रीष्मयोःशस्तंमुनिभिःपरिकीर्तितं ॥

**प्रस्रवणोदक**—झऱ्याचें पाणी हृद्य, मधुर, अग्निदीपन, पाककाळीं तिखट, वातुल व कफ, पित्त यांचें नाशक, लघु असें आहे व वसंत आणि ग्रीष्म यांमध्यें हित करितें.

नादेयंशीतलंस्वादुवातलंसारकंहिमं ॥ लघुरुक्षंचाग्निदीप्तिकारकं
विशदंमतं ॥ लेखनंकटुपित्तघ्नंकफहृच्छरदोहितं ॥

**नादेय**—सर्व नद्यांचें पाणी स्वादु, वातल, सारक, हिम, लघु, रुक्ष, अग्निदीपक, विशद, लेखन, तिखट, पित्तनाशक, कफनाशक व शरत्काळीं हितावह असें आहे.

भागीरथीजलंशीतंस्वच्छंस्वादुनिपथ्यकृत् ॥ पवित्रंचातिरुच्यं च
पाचकंचामृतोपमं ॥ लघुप्रज्ञाकरंप्रोक्तंत्रिदोषघ्नंरुजाहरं ॥ देश
भेदैश्चसंप्रोक्तागुणभेदामनीषिभिः ॥

**भागीरथीचें पाणी** शीत, स्वच्छ, स्वादु, अतिपथ्यकारक, पवित्र, अतिरुचिकर, पाचक, अमृतोपम, लघु, प्रज्ञाकारक व त्रिदोष, रोग यांचें नाशक आहे. याचे देशभेदानें गणभेद होतात.

यामुनंतुजलंस्वादुवातलंगुरुरोचनं॥ अग्निदीप्तिकरंरुक्षंबलदंपावनं
मतं ॥ पित्तदाहश्रमंचैवनाशयेदितिकीर्तितं ॥

**यमुनेचें पाणी** स्वादु, वातल, गुरु, रोचन, अग्निदीपक, रुक्ष, बलप्रद, पावन व पित्त, दाह, श्रम यांचा नाश करितें.

जांगलंतुजलंरुक्षंलघुसूक्ष्मंपटुर्मतं ॥
अग्निदीप्तिकरंपथ्यंकफादिबहुरोगनुत ॥

**जांगलदेशज जल**—जंगलांतलें पाणी रूक्ष, लघु, सूक्ष्म, खारट, अग्निदीपक, पथ्यकर व कफादि अनेक व्याधि यांचा नाश करितें.

आनूपंतुजलंस्निग्धंघनंस्वादुगुरुर्मतं ॥
कफाग्निमांद्यकृत्प्रोक्तंनानारोगकरंमतं ॥

**अनूपदेशांतलें पाणी** स्निग्ध, घन, स्वादु, गुरु व कफ, अग्निमांद्य व अनेकव्याधि यांना उत्पन्न करितें.

प्रणाल्यास्तुजलंप्रोक्तंत्रिदोषाणांचकारकं ॥
अन्येगुणाःसमुद्दिष्टाःकेदारजलवत्बुधैः ॥

**प्रणालीजल**— पाटाचें पाणी त्रिदोषकारक, आहे वरकड गुण केदारोदकासारिखे आहेत.

क्षारोदकंपित्तलंस्यात्सरंचाग्निप्रदीपनं ॥
कफवातहरंप्रोक्तंपूर्वैर्वैद्यचिकित्सकैः ॥

क्षारोदक पित्तल सारक, अग्निदीपक व कफ, वायु यांचें नाशक असें आहे.

सामुद्रंदोषजनकंदाहकंरक्तदोषकृत् ॥
अग्निमांद्यंश्लीपदंचत्वक्‌दोषंचकफंजयेत् ॥

समुद्राचें पाणी दोषजनक, दाहक व रक्तदोषकारक व अग्निमांद्य, श्लीपद, त्वक्‌दोष आणि कफ यांना जिंकितें.

ज्वरेकुष्टेनेत्ररोगेउदरेचाग्निमांद्यके ॥ अरोचकेप्रतिश्यायेलाला।
स्रावेक्षयेत्रणे ॥ मधुमेहेचशोथेचजलंचाल्पंप्रदापयेत् ॥

कोणत्या रोगास थोडें पाणी द्यावें ते रोग. ज्वर, कुष्ट, नेत्ररोग, उदर, अग्निमांद्य, अरुचि, पडसें, लालास्राव, क्षय, व्रण, मधुमेह, सूज, या व्याधि झाल्याअसतां पाणी प्राशनार्थ थोडें द्यावें.

तृषितेनाधिकंपीतंजलंपित्तकफप्रदं ॥
ज्वरिणाचातिपीतंतत्कफपित्तप्रकोपकृत्॥

तृषितानें फार पाणी प्यालें असतां काय होतें तें. तृषितानें फार पाणी प्यालें असतां पित्त व कफ यांना उत्पन्न करितें. आणि ज्वरितानें फार पाणी प्यालें असतां कफ व पित्त यानां अति कोपवितें.

पार्श्वशूलेप्रतिश्यायेसद्यःशुद्धेनवज्वरे ॥ गलग्रहेवातरोगेचाध्माने
चकफेरुचौ ॥ संग्रहण्यांविद्रधौचगुल्मेश्वासेचाहिक्केषु ॥ कासेच
स्नेहपीतेचजलंशीतंनदापयेत । नत्तप्तंचकृतंशीतंदेयंनैवविवर्जयेत् ॥

थंड पाणी कोणत्या रोगांवर देऊं नये ते. पार्श्वशूल, पडसें, सद्यःशुद्धि केली असतां, नवज्वर, गलग्रह, वातरोग, आध्मान, कफ, अरुचि, संग्रहणी, विद्रधि, गुल्म, श्वास उचकी, खोकला, यावर आणि स्नेहपान केल्यानंतर, थंड पाणी देऊं नये, तेंच तापवून, गार करून द्यावें. मुळीं । वर्ज करूंनये.

उष्णंजलंवातकफज्वरघ्नंदत्तंतृषायांयदिचाग्निदीपनं ॥ श्लेषस्वना
डेश्चमदुत्वकारीस्याच्छोधनंपित्तकफानुलोमनं ॥ वातापित्तकफ
स्वेदमलनिःसारणंपरं ॥ मूत्रनिःसारणकरंकफतृट्‌ज्वरनाशनं ॥
वातांपनंचकासंचमेदोघ्नंहितथात्रामे ॥ एतत्त्र्यंशंचतुर्थांशंपक्वंदो
षत्रयापहं ॥

उष्णोदक– आधण येईतों तापविलेलें पाणी वातकफज्वरी मनुष्यास दिलें असतां अग्निदीपक करितें. व दोष, नाडी, यांना मृदुत्व देतें, शोधन करितें. व पित्त, कफाला अनुमन करितें. व वायु, पित्त, कफ, घाम आणि मल यांचें निःसारण करितें. व वायु, पित्त, खोकला, मेदोवृद्धि, वात, कफ, तृषा, ज्वर यांचें नाशक, व मूत्रनिःसारक आहे. हें तृतीयांश, चतुर्थांश राही तों आटविलें असतां त्रिदोष नाश करितें.

प्राशनार्थंचरात्रौतुतप्तंचार्धविशिष्टकं ॥ चतुर्थांशंचाष्टमांशंगुणैरुत्तरतोधिकं ॥ साधारणंचाग्निदीपिकरंबस्तिविशोधनं ॥ कफवातश्वासकासमेदामाजीर्णजूर्तिनुत् ॥ रात्रौचोष्णंजलंपीतंलघुचाग्निप्रदीपकं ॥ बस्तिशुद्धिकरंचैवपार्श्वपीडांचपीनसं ॥ आध्मानेतृषिहिक्कायांकफेवातेनवज्वरे ॥ रेकेश्वासेचशोथेचहितमुक्तंमनीषिभिः ॥

रात्रीं प्यावयाचें उष्णोदक तापवून निमे, चतुर्थांश किंवा अष्टमांश करून प्यावें. तें उत्तरोत्तर गुणानीं अधिक आहे. व साधारण अग्निदीपन व बस्तिशुद्धिकारक आणि कफ, वायु, दमा, खोकला, मेद, आम, अजीर्ण, ज्वर यांचा नाश करितें. रात्रीं ऊन पाणी प्यालें असतां तें लघु, अग्निदीपक, बस्तिशुद्धिकारक व पार्श्वपीडा, पीनस, आध्मान, ताहान, उचकी, कफ, वायु, नवज्वर, रेच, श्वास, शोक यांवर हितकारक होतें.

चतुर्थांशावशिष्टंचआरोग्यांबुमतंबुधैः ॥ पाचकंग्राहकंतत्तुदीपनंसर्वदाहितं ॥ लघुश्वासंचकासंचकफंजूर्तिंचनाशयेत् ॥ आनाहवातंपांडुंचशूलंचार्शंतथोदरं ॥ गुल्मंशोथंनाशयतीत्येवमाचार्यभाषितं ॥

आरोग्यांबु (तीन भाग आटवून एक भाग राहिलेलें चतुर्थांश शेष राखावें तें) पाचक, ग्राहक, दीपन, सर्व कालामध्यें हित, लघु व दमा, खोकला, कफ, ज्वर, आनाहवात, पांडुरोग, शूल, अर्श, उदर, गुल्म, शोथ यांचा नाश करितें.

चतुर्थांशावशिष्टंचपेयंग्रीष्मेशरद्यपि ॥
हेमंतवर्षाशिशिरवसंतेष्वर्धशेषितं ॥

ऋतु भेदानें पाणी आटवून पिण्याचा प्रकार. ग्रीष्म व शरदृतु यांमध्यें चतुर्थांश राखून तें प्यावें आणि हेमंतऋतु, वर्षाऋतु शिशिरऋतु आणि वसंतऋतु यांमध्यें अर्धें आटवून तें प्यावें.

तप्तशीतंजलंचैवदाहेवातातिसारके ॥ पित्तेचरक्तदोषेच मूर्छायांचमदात्यये ॥ विषेपित्तेमूत्रकृच्छ्रेपांडुरोगेतृषारुजि ॥ वमौभ्रमेमदेचैवपित्तजन्यरुजौतथा ॥ सन्निपातेचपेयंस्यादितिप्रोक्तंचिकित्सकैः ॥

पाणी तापवून थंड करून पिण्याचे रोग. तापवून निवालेलें पाणी दाह, वातातिसार, पित्त, रक्तरोग, मूर्छा, मदात्यय, विष, पित्त, मूत्रकृच्छ्र, पांडुरोग, तृषारोग, वांति, भ्रम, मद, पित्तजन्य रोग आणि सन्निपात यांवर प्यावें म्हणजे हितकारक होतें.

ज्वरेवातातिसारेचसंग्रहण्यांव्रणेतथा ॥ कफातिसारेशोथेचप्रमेहे चामवातके ॥ श्वासेकासेविसर्पेचअग्निमांद्येकफोदरे ॥ वातोदरेनेत्ररुजिकुष्ठरोगेगलग्रहे ॥ मसूरिकायांशूलेचनवसूतौक्षयेतथा ॥ अर्दितेगृध्रसीवातेहिक्कायांचभगंदरे ॥ वांतौचसन्निपातेचप्रत्याध्माने तथाहितं ॥ आध्मानेचैवपेयंस्यादुष्णंनीरंहितंमतं ॥ रात्रौतप्तं चशीतंचनपेयंदिवसेजनैः ॥ दिवातप्तंचशीतंचनपेयंनिशिसर्वदा ॥ पीतंचेदंगजडतांकरोतीतिबुधैर्मतं ॥

गरम पाणी कोणत्या रोगांवर द्यावें तें ज्वर, वायु, अतिसार, संग्रहणी, व्रण, कफातिसार सूज, प्रमेह, आमवात, दमा, खोकला, विसर्प, अग्निमंद्य, कफोदर, वातोदर, नेत्ररोग, कुष्टरोग, गलग्रह, मसूरिका, शूल, नूतनबाळंत, क्षयी, अर्दितवायु, गृध्रसीवायु, उचकी, भगंदर, वांति, सन्निपात, प्रत्याध्मान आणि आध्मान यांवर द्यावें ते हितकारक होतें. रात्रीं तापलेले पाणी कधींहि दिवसामध्यें पिऊं नये आणि दिवसास तापविलेलें रात्रीं पिऊं नये, यालें असतां अंगाला जडता करितें.

द्विःपाचितंजलंपीतंविषतुल्यंभवेत्सदा ॥
घृतंतैलंकषायश्चशाकाद्यन्नंतथास्मृतं ॥

द्विःपाचित जल.— दोनवेळ तापविलेलें पाणी विषतुल्य होतें, तें प्राशन करूं नये, तसेंच घृत, तेल, कषाय आणि शाकादि अन्न हेंही द्विःपाचित भक्षण करूं नये. तें भक्षण केलें असतां विषतुल्य होतें.

रक्तदोषेचमूर्छायांदाहेपित्तेश्रमेभ्रमे ॥ ऊर्ध्वगामीरक्तपित्तेवमौच तमकेतथा ॥ मुखकंटजशोषेचविदग्धाजीर्णकेतथा ॥ विदग्धे चतथोद्गारेदेयंशीतंजलंबुधैः ॥ एतेषुज्वरयुक्तेषुनतशीतंहितंमतं ॥

वाजें शीतोदक कोणत्या रोगावर द्यावें तें. तापवून थंड झालेलें पाणी रक्तदोष, मूर्छा, दाह, पित्त, श्रम, भ्रम, ऊर्ध्वगामी रक्तपित्त, वांति, तमकश्वास, मुखशोष, कंठशोष विदग्धाजीर्ण, करपट ढेंकरा आणि ज्वरित यांना द्यावें तें हितकारक होतें.

शीतंपयामाप्रतितरः शीतार्थग्रामकात् ॥

तदेवोष्णंमुहूर्तेनपचतीत्येवमीरितं ॥

**जलपचनकाल.** थंड पाणी एक प्रहरानें पचन होतें, व तापवून निवालेलें चार घटकांत पचतें, आणि गरम पाणी मुहूर्तानें पचन होतें.

वल्लिपाटलिकाचोष्णावातारोचकपित्तहा ॥
रक्तदोषंचशोफंचनाशयेदितिकीर्तितं ॥

**वल्ली पाटला**— पाडळ उष्ण व वायु, अरुचि, पित्त, रक्तदोष आणि सूज यांचा नाश करिते.

श्वेतानुपाटलाचोष्णातिक्तागुर्वीसुगंधिका ॥ रक्तदोषारुचीशोफ
श्वासतृट्छांतिनाशिनी ॥ हिक्कांकफंचवातंचनाशयेदितिकीर्तितं ॥

**श्वेत पाडळ** उष्ण, कडू, गुरु, सुगंधि व रक्तदोष, अरुचि, सूज, दमा, ताहान, वांति, उचकी, कफ आणि वायु यांचा नाश करिते.

क्षुद्रानुपाटलाश्वेतास्निग्धाचव्रणशोधिनी ॥
कफमेदकुष्ठविषमंडलानिविनाशयेत ॥

**क्षुद्र श्वेत पाडळ** स्निग्ध, व्रणशोधक व कफ, मेद, कुष्ठ, विष आणि मंडळें यांचा नाश करिते.

रक्तपाटलिकातिक्ताकट्वीचोष्णाकफापहा ॥
सन्निपातश्वासवमिशोफाध्मानानिनाशयेत् ॥

**रक्तपाडळ**— रसगुणी कडू, तिखट, उष्ण, कफनाशक व सन्निपात, दमा, वांति, सूज आणि आध्मान यांचा नाश करिते.

भूपाटलाकटूष्णाचबल्यावीर्यविवर्धिनी ॥

**भूपाडळ**—भूपाडळ तिखट, उष्ण, बलकर आणि वीर्यवर्धक अशी आहे.

पुष्पाणिपाटलायास्तुस्वादूनितुवराणिच ॥ हृद्यानिशीतवीर्याणि
रक्तदोषहराणिच ॥ दाहंकफंपित्तरोगंपित्तातिसारहाणिच ॥

**पाडळीचीं फुलें** स्वादु, तुरट, हृद्य, शीतवीर्य व रक्तदोष, दाह, कफ, पित्तरोग, पित्तातिसार यांचा नाश करितात.

फलानिपाटलायास्तुशीतानिचगुरूणिच ॥ तुवराणिचतिक्तानि

मधुराणिबुधाजगुः ॥ मूत्रकृच्छ्ररक्तपित्तहिक्कावातहराणिच ॥

**पाडळीचीं फळें** शीतल, गुरु, तुरट, कडू, मधुर व मूत्रकृच्छ्र, रक्तपित्त, उचकी आणि वायु यांचा नाश करितात.

पाषाणभेदोमधुरोवर्ण्यस्तिक्तश्चशीतलः॥ तुवरोभेदकोबस्तिशोधनो भेदकःस्मृतः ॥ मेहतृड्दाहगुल्मार्शमूत्रकृच्छ्राश्मरींजयेत ॥ योनिरुक्प्लीहशूलांश्चत्रिदोषव्रणहृद्रुजः ॥ नाशयेच्चापिएतस्यहानाजोडी निर्वैजगुः ॥

**पाषाणभेद** मधुर, वर्णकर, कडू, शीतल, तुरट, भेदक, बस्तिशोधक, रेचक, व मेह, तृषा, दाह, गुल्म, अर्श, मूत्रकृच्छ्र, अश्मरी, योनिरोग, प्लीहा, शूल, त्रिदोष व्रण, हृद्रोग यांचा नाश करितो. यालाच हातजोडी पाषाणभेद ह्मणतात. कोणी दुसरे प्रकारचा आहे असें ह्मणतात.

शिलावल्कंहिमंस्वादुचोष्णंमेहहरंतथा ॥
मूत्ररोधाश्मरीशूलापित्तक्षयहरंनृपे ॥

**श्वेत, पाषाणभेद**—पाषाणचाकु हिम, स्वादु, उष्ण व मेह, मूत्ररोध, अश्मरी, शूल आणि पित्त, क्षय यांचा नाशक असा आहे.

वटपत्र्यश्माभितृशीतोमधुरस्तुबलप्रदः॥ किंचिदग्निदीपिकरोव्रणकृच्छ्र प्रमेहाजत ॥ अश्मरींमूत्रघातंचभगंदरंविनाशयेत् ॥

**वटपत्रीपाषाणभेद** शीत, मधुर, बलप्रद, किंचित् अग्निदीपक व व्रण, कृच्छ्र, प्रमेह, अश्मरी, मूत्राघात आणि भगंदर यांचा नाश करितो.

गोजिव्हाकटुकातिक्ताशीतलाव्रणरोपणी ॥
पित्तंसर्वविषंहंतिकासारुचिविनाशिनी ॥

**गोजिव्हा**—पाथरी तिखट, कडू, शीतल, व्रणरोपण व पित्त, सर्व प्रकारचीं विषें, खोकला आणि अरुचि यांचा नाश करिते.

गोधमीकटुकातिक्ताशीताचग्राहिणीपरा ॥ वातलापाचकाचाग्नि दीपनीतुवरालघुः ॥ स्वादुहृद्यामृदुकफपित्तदोषत्रयापहा ॥ कासारुचिश्वासमेहरक्तदोषव्रणज्वरान् ॥ अर्शांसिनाशयत्येषाव्यंज नंकुष्ठमेहहन् ॥ रक्तदोषहरंचैवतृषाघ्नंज्वरनुल्लघु ॥

**गोधूमीपाथरीचा भेद–** तिक्त, कडु, शीतल, ग्राहक, वातल, पाचक, अग्निदीपक तुरट, लघु, स्वादु, हृद्य, मृदु व कफ, पित्त, त्रिदोष, खोकला, अरुचि, दमा, मेहे, रक्तदोष व्रण, ज्वर, अर्शोरोग यांचा नाश करिते. हिची भाजी कुष्ट, मेह, रक्तदोष, तृषा आणि ज्वर यांचा नाश करणारी व लघु अशी आहे.

पालकंमधुरंपथ्यंकिंचित्कटुचशीतलं ॥ रुक्षंक्षारंवातलंचग्राहिभे
दकतर्पणं ॥ पिच्छलंगुरुविष्टंभिस्वादुश्वासकफान्जयेत् ॥ रक्तपि
त्तंमदंचैवविषदोषंचनाशयेत् ॥

**पालक्य–** पालख भाजी मधुर, पथ्यकर, किंचित् तिखट, शीतल, रुक्ष, क्षार, वातल, ग्राहक, भेदक, तर्पण, पिच्छल, गुरु, विष्टंभकारक, स्वादु व श्वास, कफ, रक्तपित्त, मद, विषदोष यांचा नाश करिते.

पाचीकटूष्णातिक्ताचकषायावातरोगहा ॥ ग्रहभूतव्रणघ्नी
तित्वग्दोषापहरातृपे ॥ दाहतृष्णाविषघ्नीतिद्रव्यरत्नाकरेस्मृता ॥

**पाच–** मरकतपत्री पाच येतो ती तिखट, उष्ण, कडु, तुरट, सुगंधी, वायु, ग्रहदोष, भूतबाधा, व्रण, त्वग्दोष, दाह, तृष्णा आणि विष यांचा नाश करिते.

पारिभद्रःकटूष्णश्चपथ्यश्चाग्निप्रदीपकः ॥ अरोचकःकफक्रमिमेद
शोफहरःस्मृतः ॥ पुष्पंपित्तरुजंहंतिकर्णव्याधींश्चनाशयेत् ॥

**पारिभद्र–** पांगारा तिखट, उष्ण, पथ्य, अग्निदीपक, अरुचिकारक व कफ, क्रमि, मेद, शोफा यांचा नाश करितो. याचीं फुलें पित्तरोग व कर्णव्याधि यांचा नाश करितात.

पर्जन्यस्यागमेशीतंमूत्रोत्सर्गःपुनःपुनः ॥
निद्रालस्योजृंभणंचरोमांचश्चैवजायते ॥

**पाऊस पडतांच काय होतें तें.** पाऊस पडतांच थंडी वाजते. पुनः पुनः लघवीला होतें, निद्रा, आलस्य, जांभया आणि रोमांच, हे होतात.

प्लक्षस्तिक्तःकटुःशीतस्तुवरोव्रणनाशनः ॥ योनिदोषंविसर्पंचदाह
पित्तकफान्हरेत् ॥ रक्तदोषंरक्तपित्तंमेदोरोगंचनाशयेत् ॥ प्रलापशो
षमूर्छाश्चभ्रमशोफातिसारहा ॥ लघुप्लक्षोगुणैश्चैवाधिकःप्रोक्तोम
नीषिभिः ॥

**प्लक्ष–** पिंपरी तिखट, शीत, तुरट, व्रणनाशक, व योनिदोष, विसर्प, दाह, पित्त, कफ, रक्तदोष, रक्तपित्त, मेदोरोग, प्रलाप, शोष, मूर्छा, भ्रम, सूज, अतिसार, यांचा नाश करिते. लघुपिंपरी गुणानीं अधिक आहे.

पांडुःफलीतुमधुराबल्यावृष्याचशीतला ॥
मूत्राघातंपित्तरोगंमूत्रकृच्छ्रास्रुक्जयेत् ॥

**पांडुरफळीवृक्ष**– पांढरफळी मधुर, बलकर, वृष्य, शीतल, व मूत्राघात, पित्तरोग, मूत्रकृच्छ्र आणि रक्तदोष यांचा नाश करिते.

पिप्पलीस्निग्धकटुकाचोष्णावृष्याचदीपनी ॥ तिक्तारसायनीभेदी लघुहृद्याचसारका ॥ पाचकापित्तलानीरुणावातश्वासकफापहा ॥ क्षयंकासंज्वरंकुष्ठमरुचिंगुल्ममामवच ॥ अर्शप्रमेहंप्लीहांचउदरंचै वनाशयेत् ॥ त्रिदोषंचतृषांचैवकृम्यजीर्णामपांडुहृत ॥ कामलाशू लहर्त्रीचसैवार्द्रास्निग्धशीतला ॥ मधुराकफदाचैवपित्तनाशकरीगुरुः ॥

**पिप्पली** स्निग्ध, तिखट, उष्ण, रतिकाली हितकारक, अग्निदीपन करणारी, कडू, रसायन, सारक, लघु, हृदयप्रिय, रेचक, पचनकारक, पित्तकर्त्री, दुःसह, वात, दमा, कफ यांची नाशक; क्षय, खोकला, ज्वर, कुष्ट, अरुचि, गुल्म, मुळव्याधि, प्रमेह, कौल, उदर आणि, त्रिदोष, तहान, कृमिरोग, अजीर्ण, आमांश, पांडुरोग, कावील आणि शूल यांची नाशक आहे. आणि ही ओली असतां स्निग्ध, शीत करणारी, मधुर, कफकर, पित्तनाशक, गुरु, अशी आहे.

सैंहलीपिप्पलीचोष्णादीपनीकटुकामता ॥ कोष्ठशुद्धिकरीचवजं तुपीडाविनाशिनी ॥ कफवातश्वासहरामुनिभिःपरिकीर्तिता ॥

**सैंहली पिप्पली** उष्ण, अग्निदीपक, तिखट, कोष्ठशुद्धिकारक व कृमि, कफ, वात आणि श्वास यांची नाशक आहे.

मर्कटीपिप्पलीतिक्तातुवरासुरसामता ॥
मूत्रकृच्छ्राश्मरीयोनिशूलविस्फोटकानजयेत् ॥

**मर्कट पिंपळी**– वानर पिंपळी कडू, तुरट, गोड व मूत्रकृच्छ्र, अश्मरी, योनिशूल, विस्फोटक यांचा नाश करिते.

वनस्थापिप्पलीरुच्याकटूष्णादीपनीतथा ॥ आर्द्राभावेगुणाढ्यातु शुष्काम्वल्पगुणास्मृता ॥ तीक्ष्णातिभिषजांनाथैःप्रोक्तारजानिघंटके ॥

**वनपिंपळी** रानपिंपळी रुचिकर, तिखट, उष्ण, दीपन, अशी आहे, ही ओली गुणानी आहे, शुष्क अल्पगुण आहे, व अतितीक्ष्ण अशी आहे.

पीप्पलीमूलकंचाग्निदीपकंरुचिरंमतं ॥ पित्तलंपाचकंरुक्षंभेदकं

तीक्ष्णातिक्तकं ॥ लघूष्णं चामशूलघ्नं प्लीहागुल्मोदरापहं ॥ कफवा
तश्वासकासक्रम्यानाहक्षयप्रणुत् ॥ कफवातोदरं चैव नाशयेदिति कीर्तितं ॥

**पिप्पलीमूल—** पिंपळीमूळ अग्निदीपक, रुचिकर, पित्तल, पाचक, रूक्ष, भेदक, तीक्ष्ण, कडू, लघु, उष्ण व आम, शूल, प्लीहा, गुल्म, उदर, कफ, वायु, दमा, खोकला, कृमि, आनाह, क्षय, कफ, वातोदर यांचा नाश करितें.

अश्वत्थोमधुरःशीतःकषायोदुर्जरोगुरुः ॥ रूक्षोवर्ण्यस्तिक्तकश्चयो
निशोधनकारकः ॥ योनिदोषंरक्तदोषंदाहपित्तकफान्जयेत् ॥
व्रणंचनाशयत्येवफलंपक्वंचशीतलं ॥ हृद्यंरक्तरुजांपित्तंविषदोषंच
नाशयेत् ॥ दाहंवांतिंचशोषंचअरुचिंचैवनाशयेत् ॥

**अश्वत्थ—** पिंपळ मधुर, शीत, तुरट, दुर्जर, गुरु, रूक्ष, वर्णकर, कडू, योनिशुद्धिकारक व योनिदोष, रक्तदोष, दाह, पित्त, कफ, व्रण यांचा नाश करितो. याचें पिकें फळ शीतळ, हृद्य व रक्तदोष, पित्त, विषदोष, दाह, वांति, शोष, अरुचि यांचा नाश करितो

ब्रह्मवृक्षस्तुमधुरोवृष्योम्लस्तुवरोमतः ॥ दुर्जरःकफकृत्स्निग्धःशुक्र
लोजंतुकारकः ॥ वातंपित्तंचहृद्रोगंदाहंकंठरुजंतथा ॥ नाशयेदि
तिसंप्रोक्तःफलमम्लंमधुरंमतं ॥ मूलंतुतुवरंज्ञेयंमज्जास्वाद्वीस्मृताबुधैः ॥

**ब्रह्मवृक्ष** - पारोसा पिंपळ मधुर, वृष्य, आंबट, तुरट, दुर्जर, कफकारक, स्निग्ध, शुक्रल, जंतुकारक व वात, पित्त, हृद्रोग, दाह, कंठरोग यांचा नाश करितो. याचें फळ मधुर, मूळ तुरट, गर गोड असा आहे.

पर्पटःशीतलस्तिक्तःसंग्राहीवातकोपनः ॥ लघुःपाकेचकटुकोहरेत्
पित्तकफज्वरान् ॥ रक्तदोषारुचिदाहग्लानिभ्रममदान्जयेत् ॥
प्रमेहवांतितृड्रक्तपित्तानांचविनाशकः ॥ अस्यशाकंतुसंग्राहिशी
तंवातकरंलघुः ॥ तिक्तंरक्तरुजंपित्तंज्वरंतृष्णांचनाशयेत् ॥
कफंभ्रमंचदाहंचनाशयेदितिकीर्तितं ॥

**पर्पट—** पित्तपापडा शीतळ, कडू, ग्राहक, वातकारक, लघु, पाककाळीं तिखट, व पित्त, कफ, ज्वर, रक्तदोष, अरुचि, दाह, ग्लानि, भ्रम, मद, प्रमेह, ओकारी, तृषा, आणि रक्तपित्त, यांचा नाश करितो. याची भाजी संग्राही, शीतल, वातकारक, लघु, कडू, व रक्तविकार, पित्तज्वर, ताहान, कफ, भ्रम, दाह, यांचा नाश करिते.

क्षीरिणीसारकाशीतातिक्ताकृमिहरापरा ॥ रुचिहीनाशोफतापकफ
पित्तज्वरंतथा ॥ वातरक्तंविषंकंडूमानाहंपित्तरक्तकं ॥ कुष्ठंव्रणं
त्रिदोषंचरक्तपित्तंचकामलां ॥ नाशयेदतिसंप्रोक्तावैद्यैःशास्त्रविशारदैः ॥

**क्षीरिणी**–खिरणी सारक, शीतळ, कडू, कृमिनाशक, रुचिहीन व सूज, ताप, कफ, पित्त, ज्वर, वातरक्त, विष, कंडू, आनाह, पित्तरक्त, कुष्ट, व्रण, त्रिदोष, रक्तपित्त, कावीळ, यांचा नाश करित्ये.

स्वर्णक्षीरीहिमातिक्तासराकंडुविनाशका ॥ वातरक्तंकृमीनपित्तंक
फंकृच्छ्रंचनाशयेत् ॥ जूर्त्यश्मरीशोफदाहज्वरकोठावनाशिनी ॥ मू
लंचास्याचोखइतिगुणाःपूर्वोक्तवत्स्मृताः ॥

**स्वर्णक्षीरी**–कांटधोत्री, दारुहळी, कडुसरा, पिसोळ्याचा भेद हिम, कडू, सारक, व कंडू, वातरक्त, कृमि, पित्त, कफ, मूत्रकृच्छ्र, ज्वर, अश्मरी, सूज, दाह, ज्वर, कोठ, यांचा नाशक आहे. याच्याच मुळाला चोख म्हणतात, त्याचे गुण वर सांगतल्या प्रमाणेंच आहेत.

पित्तंतुतिक्तमम्लंस्यात्तीक्ष्णंतेजोमयंसरं ॥ ज्वरपाकतृषाशोषकार
कंविशदंमतं ॥ उष्णंद्रवंनीलवर्णंहस्तपादगतिप्रणुत् ॥ तिक्तंनि
शीथेशरदिमध्यान्हेचप्रकुप्यति ॥

**पित्त** कडू, आंबट, तीक्ष्ण, तेजोमय, सारक, व ज्वरपाक, तहान, व शोष, यांना करणारें, विशद, उष्ण, द्रवरूप, नीलवर्ण, हात पाय मोडल्यासारखे करणारें, कडू, व मध्यरात्रीं, शरदृतुमध्यें, आणि मध्यान्ह या समयीं कोप पावतें.

निकोचकंगुरुस्निग्धंवृष्योष्णंधातुवर्धकं ॥ रक्तप्रसादनंस्वा
दुबल्यंपित्तकरंमतं ॥ तिक्तंसरंचकफहृत्वातगुल्मत्रिदोषजित् ॥

**निकोचक**–पिस्ते गुरु, स्निग्ध, वृष्य, उष्ण, धातुवर्धक, रक्ताला स्वच्छ करणारे, स्वादु, बलकारक, पित्तकर, कडू, सारक, व कफ, वायु, गुल्म, आणि त्रिदोष, यांचे नाशक आहेत.

नीलाम्लीमधुरारुच्याकफवातज्वरापहा ॥
ग्राहकाचैवसंप्रोक्ताराजनामानिघंटके ॥

**नीलाम्ली** मधुर, रुचिकर, व कफ, वायु, ज्वर, यांचा नाश करणारी आणि ग्राहक अशी आहे.

पृष्ठिपर्णीकटुस्तिक्ताचाम्लोष्णामधुरालघुः ॥ वृष्याकासमतीसारं रक्तातीसरणंपरं ॥ वातरोगंतृषांदाहंत्रिदोषंचवमितथा ॥ उन्मादंच ज्वरंश्वासंव्रणंचैवविनाशयेत् ॥

पृष्ठिपर्णी—पिठवण, रानभाल, सेंवरा तिखट, कडु, आंबट, उष्ण, मधुर, लघु, वृष्य, व कास, अतिसार, रक्तातिसार, वातरोग, तृषा, दाह, त्रिदोष, वांति, उन्माद, ज्वर, दमा, व्रण यांचा नाश करिते.

लघुपीलुस्तुकटुकःकषायोमधुरोम्लकः ॥ सरःस्वादुर्दीपनश्चतिक्तस्तीक्ष्णश्चभेदकः ॥ रक्तपित्तकरश्चोष्णोविदाहीचार्शगुल्मनुत् ॥ स्निग्धःकफवातरक्तंप्लीहानाहरुजंतथा ॥ उदरंविषबाधांचनाशयेदितिकीर्तितं ॥

लघुपिलु—पिलुवृक्ष तिखट, तुरट, मधुर, आंबट, सारक, स्वादु, दीपन, कडु, तीक्ष्ण, भेदक, रक्तपित्तकारक, उष्ण, विदाही व अर्श, गुल्म, यांचा नाशक, स्निग्ध, व कफ, वातरक्त, प्लीहा, आनाह, उदर, आणि विषबाधा यांचा नाश करितो.

बृहत्पीलुस्तुमधुरोवृष्यःपित्तविषापहः ॥ आमहादीपनोरुच्यस्तैलंचास्यलघुस्मृतं ॥ कफवातरुजंहंतिइतिपूर्वगुणैःस्मृतं ॥

महापीलु—थोर पीलु मधुर, वृष्य, व पित्त, विषनाशक, आमदोषनाशक, दीपन, आणि रुचिकर, असा आहे, याचें तेल, लघु, व कफ, वायु याचें, नाशक असें आहे.

अथपुष्करमूलंतुकटूष्णंभेदितिक्तकं ॥ कफंवातंज्वरंशोथंकासंश्वासमरोचकं ॥ हिक्कांपांडुंपार्श्वशूलंनाशयेदितिकीर्तितं ॥

पुष्करमूळ तिखट, उष्ण, भेदक, कडु व कफ, वायु, ज्वर, सूज, खोकला, दमा, अरुचि, उचकी, पांडुरोग, आणि पार्श्वशूल, यांचा नाश करितें.

श्वेतापुनर्नवातिक्ताचोष्णाकटुश्चतुवरा ॥ रुच्याग्निदीपनीरूक्षा मधुराकटुसारका ॥ हृद्याशोफकफवातंकासमर्शव्रणंजयेत् ॥ पांडूनविषोदरंशूलंद्रोगंउरःक्षतपाहा ॥ मूलंनमूलकंचास्याह्यंजितं हंतिपुष्पकं ॥ मधुनासहमूलंतुह्यंजितंस्रावनाशकं ॥ अंजितंमार्कवरसेनैवकंडुनिवारणं॥केवलेनजलेनैवअंजितंतिमिरापहं॥जलेनगोःक्षकृताचपिप्पल्याचांजितंयदा ॥ रात्र्यांध्यंनश्यतेतेनचोष्णःज्वरंरसःस्मृतः ॥

पांढरा पुनर्नवा कडु, उष्ण, तिखट, तुरट, रुचिकर, अग्निदीपक, रूक्ष, मधुर, खारट, सारक, हृद्य, व सूज, कफ, वायु, खोकला, अर्श, व्रण, पांडुरोग, विष, उदर, शूल, हृद्रोग, उरक्षत, यांचा नाश करितो, याच्या मुळीचें तुपाशीं अंजन केलें असतां नेत्रांतील फुलाचा नाश करितें. मधाशीं अंजन केलें असतां स्रावाचा नाश करितें, माक्याच्या रसाशीं अंजन केलें असतां नेत्रांचा कंडू दूर करितें, केवळ पाण्याशीं अंजन केलें असतां तिमिररोग जातो, आणि गाईच्या शेणाच्या रसांत पिंपळी व हें मूळ उगाळून अंजन केलें असतां रातांधळें जातें. पुनर्नव्याच्या पाल्याचा रस उष्ण आहे.

रक्तापुनर्नवा तिक्ता सारका शीतला लघुः ॥ वातला ग्राहका चैव पाके कटु रसायनी ॥ कफपित्तरक्तदोषप्रदरशोफपांडुनुत ॥

रक्त पुनर्नवा कडु, सारक, शीतल, लघु, वातल, ग्राहक, पाककाळीं तिखट, रसायन, व कफ, पित्त, रक्तदोष, पांडुरोग, प्रदर, सूज यांचा नाश करितो.

कृष्णापुनर्नवा तिक्ता कटुश्चोष्णा रसायनी ॥
हृद्रोगपांडुश्वयथुश्वासवातकफापहा ॥

काळा पुनर्नवा कडु, तिखट, उष्ण, रसायन, व हृद्रोग, पांडुरोग, सूज, दमा, वायु, आणि कफ यांचा नाश करितो.

पौनर्नवीपर्णशाका चाग्निकृत्ताक कफापहा ॥
वातान्निमांद्यगुल्मप्लीहशूलविनाशिका ॥

पुनर्नव्याची भाजी अग्निकर, कफनाशक, व वायु, अग्निमांद्य, प्लीहा, आणि शूल, यांचा नाश करिते.

पुन्नागः कफकृत्स्निग्धो गर्भदो हिमः ॥ वृष्यो वातकरो रूक्षः स्वादुः कषायो ग्राहकः ॥ मूत्रलश्च मलस्तंभी पित्तदाहतृषापहः ॥

पुन्नागवृक्ष कफकारक, स्निग्ध, गर्भप्रद, हिम, वृष्य, वातकारक, रूक्ष, स्वादु, खारट, ग्राहक, मूत्रल, मलस्तंभक, व पित्त, दाह तृषा यांचा नाश करितो.

पुष्पद्रवः सरः शीतस्तुवरः श्रमदाहहा ॥
वांतिनृट्पित्तरोगघ्नो मुखरोगविनाशकः ॥

पुष्पद्रव- फुलांचें पाणी सारक, शीत, तुरट, व श्रम, दाह, वांति, तृषा, पित्तरोग, आणि मुखरोग यांचा नाश करितें.

लक्ष्मणासुरभिश्चोष्णाचोषणापथ्यकारका ॥
वातंकफंचैवंध्यात्वंनाशयेदितिकीर्तितं ॥

लक्ष्मणा—पुत्रदात्री सुरभि, उष्ण, तिखट, पथ्यकारक, व वायु, पित्त, कफ आणि वंध्यात्व, यांचा नाश करिते.

पुत्रदामधुराशीतानारीपुष्पादिदोषहा ॥
पित्तदाहार्तवंदोषंश्रमंचैवविनाशयेत् ॥

पुत्रदा मधुर, शीतल, स्त्रियांचे पुष्पादि दोषांना दूर करणारी व पित्त, दाह, ऋतुदोष आणि श्रम यांचा नाश करिते.

पुष्पादित्रितयंचैतत्पुष्पंचैवैकभागिकं ॥ एकस्तुचांदनोभागःकुंकुमंचत्रिभागिकं ॥ एतद्धातुत्रयंवातमुष्णतांचविनाशयेत ॥

पुष्पादित्रय एक भाग लवंगा, एक भाग चंदन आणि केशर तीन भाग मिळून करावें तें धातुत्रय, वायु आणि उष्णता यांचा नाश करितें.

पुदिनस्तुगुरुःस्वादूरुच्योहृद्यःसुखावहः ॥ मलमूत्रस्तंभकरःकफकासमदापहः ॥ अग्निमांद्यविषूचिघ्नःसंग्रहण्यतिसारहा ॥ जीर्णज्वरंकृमींश्चैवनाशयेदितिकीर्तितं ॥

पुदिना गुरु, स्वादु, रुचिकर, हृद्य, सुखावह व मल, मूत्र यांना स्तंभ करणारा आणि कफ, खोकला, अग्निमांद्य, विषूचि, संग्रहणी, अतिसार, जीर्णज्वर, आणि कृमि यांचा नाश करितो.

पुन्नागोमधुरःशीतःसुगंधीरक्तदोषहा ॥ देवप्रसादजनकोरक्तरुकृरक्तपित्तजित ॥ कफंपित्तंभूतबाधांनाशयदितिकीर्तितं ॥ पुष्पंवृष्यंवातशूलकफदोषानजयत्यलं ॥

पुन्नाग— कडवी उंडीण—उंडीण वृक्ष मधुर, शीतल, सुगंधि, रक्तदोषनाशक, देवप्रसादकारक व रक्तदोष, रक्तपित्त, कफ, पित्त, भूतबाधा यांचा नाश करितो. यांचीं फुलें वृष्य, वातशूल, व कफदोष यांचा नाश करितात.

नमेरुस्तिक्तपुन्नागादधिकश्चगुणैःस्मृतः ॥

नमेरु—सुरपुन्नाग—सुरंगीचें झाड कडू व उंडिणीहून गुणानीं अधिक आहे.

पुष्परथधारणंकांतिवर्धनंकामकारकं ॥
ओजःश्रीवर्धकंचैवपापग्रहविनाशनं ॥

पुष्पधारण कांतिवर्धक, कामोत्पत्तिकारक व ओज, श्री यांना वाढविणारें आणि पाप-ग्रह यांची पीडा दूर करणारें असें आहे.

रीतिपुष्पंतु चक्षुष्यंशीतंपित्तकफापहं ॥
हिक्कांदाहंविषंकासंनेत्ररोगंचनाशयेत् ॥

रीतिपुष्प–पुष्पांजन– पितळीचें फूल चक्षूंना हितावह, शीत व पित्त, कफ, उचकी, दाह, विष, खोकला, नेत्ररोग यांचा नाश करितें.

प्रपौंडरीकोमधुरोवर्ण्यश्चव्रणरोपणः ॥ तिक्तःशीतश्चचक्षुष्यःशुक्रलःपित्तनाशनः ॥ रक्तदोषंव्रणंदाहंकफंतृष्णांज्वरंजयेत् ॥

प्रपौंडरीक–पुंडरीकवृक्ष मधुर, वर्णकर, व्रणरोपण, कडु, शीत, नेत्राला हितावह शुक्रल, पित्तनाशक व रक्तदोष, व्रण, दाह, कफ, ताहान आणि ज्वर यांचा नाश करितो.

ततोमृतफलंस्वादुतुवरंचातिशीतलं ॥ तीक्ष्णंगुरुकफकरं वातलंमादनाशकं ॥ वृष्यंरुचिशुक्रकरंत्रिदोषघ्नंप्रकीर्तितं ॥

अमृतफळ– नासपाती–पेढ स्वादु, तुरट, अतिशीतल, तीक्ष्ण, गुरु, कफकारक ,वातल, उन्मादनाशक, वृष्य, रुचिकर, शुक्रकारक आणि त्रिदोषनाशक असा आहे.

पिण्याकंमधुरंरुच्यंतीक्ष्णंनेत्रविकारकृत् ॥ मलावष्टंभकंरूक्षंकफवातप्रमेहनुत् ॥ पित्तास्त्रबलपुष्टिंचददातीतिभिषक्मतं ॥

तिलपिण्याक–तिळांची पेंड मधुर, रुचिकारक, तीक्ष्ण, नेत्रांला विकार करणारी, मलावष्टंभक, रुक्ष व कफ, वायु, प्रमेह, पित्तरक्त, बळ आणि पुष्टि यांना देतें.

पिंडीरंतुवरंग्राहिवातलंशीतलंमधु ॥ बल्यंरुचिकरंरूक्षंविषचर्मरुजापहं ॥ रक्तदोषंकफंपित्तंत्रिदोषंचविनाशयेत् ॥

पिंडीर–तुप केळें– पेंढें तुरट, ग्राहक, वातनाशक, शीतळ, मधुर, बलकर, रुचिकर, रूक्ष व विष, चर्मरोग, रक्तदोष, कफ, पित्त आणि त्रिदोष यांचा नाश करितात.

पद्मबादारकोधातुवर्धकःसर्वमेहजित् ॥ विषंकफंपित्तरोगंनेत्रमेदोरुजापहं ॥ वातशूलहरंतत्रकस्तूरीकुंकुमान्वितं ॥ घृतमाक्षिकसंवाथ यथायोग्यंप्रकल्पयेत् ॥ अथवापिप्पलीमद्यजातीफलसमन्वितं ॥ भक्षयेत्सपुमानदृढोप्यबलस्तरुणायते ॥

पद्मबादार (बकरीचे मस्तकांत खडा उत्पन्न होतो तो.) धातुवर्धक, संपूर्णमेह, विष,

कफ, शिररोग, नेत्ररोग, मेदोरोग, वातशूल यांचा नाश करितो. हा कस्तूरी, केशर, तूप, आल्याचा रस किंवा यथायोग्य अनुपानाशीं अथवा पिंपळी, मद्य, जातीफळ यांशीं भक्षण केला असतां म्हातारा मनुष्य तरुण पुरुषाप्रमाणें होईल.

शाकिनीशीतलाबल्यासारकारुचिकारिका ॥
मधुराज्वरहृद्धावातपित्तकफापहा ॥

**शाकिनी**— पोकळ्याची भाजी शीतल, बलकारक, सारक, अरुचिकारक, मधुर, ज्वरनाशक, हृद्य व वात, पित्त, कफ यांचा नाश करिते.

वातकुंभफलंग्राहिकफवातप्रकोपनं ॥
तत्पक्वंमधुरंरुच्यंपित्तनाशकरंगुरु ॥

**वातकुंभफल**— पोपया ग्राहक व कफ, वायु यांना कोपविणारा असा आहे. तो पिकला असतां मधुर, रुचिकर, पित्तनाशक आणि गुरु असा आहे.

स्वसानिलंलघुशीतंचग्राहितिक्तंकषायकं ॥ वातकृत्कफकासघ्नंधातुशोषकरंध्रुवम ॥ रूक्षंमदकरंचैववन्हिकृन्मुहुर्मोहकृत ॥ रुच्यं पुंस्त्वविनाशंचप्रोक्तंभावप्रकाशके ॥

**स्वसखसीचे फळावरची त्वचा**— पोस्त लघु, शीतळ, ग्राहक, कडू, तुरट, वातकारक, व कफ, खोकला, यांचें नाशक, धातुशोषकारक, रूक्ष, मदकर, अग्निवर्धक, वारंवार मोहोत्पादक, रुचिकर, आणि पुंस्त्वनाशक असें आहे.

व्यजनंश्रमतृट्घर्ममूर्छानाशकरंमतं ॥ तालजंतुत्रिदोषघ्नंवंशजंरक्तकोपनं ॥ उष्णंपित्तकरंप्रोक्तंचामरंवस्त्रपैच्छिकं ॥ वेत्रजंव्यजनंप्रोक्तंत्रिदोषघ्नंप्रियंमतं ॥ स्निग्धंचैवप्रशस्तंचमुनिभिःपरिकीर्तितं ॥

**व्यजन**— पंखा श्रम, तृषा, घाम, मूर्छा यांचा नाश करितो, ताडाचा पंखा त्रिदोषनाशक आहे, वेळूचा रक्तकोपन, उष्ण, पित्तकारक आहे, व चंवरी, वस्त्र, पिसें, आणि वेत यांचा पंखा त्रिदोषनाशक, प्रिय, स्निग्ध, असा आहे.

पंचकोलंरुक्षमुष्णंरुच्यंदीपनपाचनम ॥ रसेपाकेचकटुकंचगुल्मप्लीहोदरंजयेत् ॥ आनाहंकफशूलंच्चयानापचीत्रिदोषनुत ॥ स्वरभेदारुचीविषनाशकंमुनयोजगुः ॥

**पंचकोल** रूक्ष, उष्ण, रुचिकर, दीपन, पाचन, रसकाळीं व पाककाळीं तिखट, व गुल्म, प्लीहा, उदर, आनाह, कफ, शूल, वायु, अरुचि, त्रिदोष, स्वरभेद, अरुचि, आणि विष यांचा नाश करितें.

पंचमूलंलघुस्वादुबल्यंचधातुवर्धकं ॥ किंचिदुष्णंलघुप्रोक्तंग्राहकं
तिक्तकंतथा ॥ वातपित्तंकफंपित्तंवातंश्वासंज्वरंजयेत ॥ कासाश्म
रीत्रिदोषघ्नंशूलारुच्यग्निमांद्यहं ॥

**लघुपंचमूल** स्वादु, बलकर, धातुवर्धक, किंचित उष्ण, लघु, ग्राहक, कडू, व वातपित्त, कफ, पित्त, वायु, दमा, ज्वर, खोकला, अश्मरी, त्रिदोष, शूल, अरुचि, आणि अग्निमांद्य, यांचा नाश करितें.

सिद्धानांचौषधीनांतुपंचकंरोगनाशकं ॥
रसस्यभस्मकरणेप्रोक्तंपूर्वंभिषग्वरैः ॥

**सिद्धौषधिपंचक** रोग नाशक, पारदादिकाचें भस्म करणारें असें आहे.

पंचमूलंबृहत्प्रोक्तंतीक्ष्णंचाग्निप्रदीपकं ॥ तुवरंमधुरंचोष्णंपाकेल
घुचतिक्तकं ॥ मेदोवृद्धिकफंवातंश्वासंकासंचनाशयेत ॥

**बृहत्पंचमूळ** तीक्ष्ण, अग्निवर्धक, तुरट, मधुर, उष्ण, पाककाळीं लघु, कडू व मेदोवृद्धि, कफ, वायु, दमा आणि खोकला यांचा नाश करितें.

जीवनंपंचकंवृष्यंचक्षुष्यंधातुवर्धकं ॥
बल्यंदाहंकफंपित्तंज्वरंतृष्णांचनाशयेत ॥

**जीवनपंचक** वृष्य चक्षूंना हितावह, धातुवर्धक, बलकर व दाह, कफ, पित्त, ज्वर आणि तृष्णा यांचा नाश करितें.

शतावर्यादिपंचानांमूलंस्मृत्यंगुरुस्मृतं ॥
वृष्यंबल्यंचशीतंचमेध्याग्निकांतिकारकं ॥

**शतावर्यादिपंचमूळ** गुरु, वृष्य, बलकर, शीतल, मेधाकर, अग्निवर्धक व कांतिकारक असें आहे.

तृणादिपंचमूलंतुपित्तज्वरतृषापहं ॥ रक्तदोषाम्लपित्तघ्न
स्त्रीरोगरक्तपित्तकं ॥ प्रमेहंनाशयेदितिदानिमुनिभिर्निरूपितं ॥

**तृणपंचमूळ** पित्त, ज्वर, ताहान, रक्तदोष, अम्लपित्त, स्त्रीरोग, रक्तपित्त आणि प्रमेह यांचा नाश करितें.

बलापुनर्नवैरंडशूर्पपर्णीद्वयंतथा ॥ बलाख्यपंचमूलंतुभेद
कंचप्रकीर्तितं ॥ शोफज्वराणांशमनंपूर्वाचार्यैरिहोदितं ॥

**बलापंचमूळ**—चिकणा, पुनर्नवा, एरंडमूळ आणि शूर्पपर्णीचें द्वय, मिळून होतें तें भेदक व सूज, ज्वर यांचें नाशक असें आहे.

निशामृतामेषशृंगीगोपवल्लीविदारिका ॥
एतासांचैवमूलंतुबल्याख्यंदोषनाशकं ॥

**बल्याख्यपंचमूळ** हळद, गुळवेल, मेषशृंगी, गोपवल्ली आणि विदारी यांचीं मुळें एकत्र करावीं तें बल्याख्यपंचमूळ दोषनाशक आहे.

पंचगव्यंदेहशुद्धिकरंकफविनाशनं ॥
अजीर्णापस्मृतिज्वरंभूतबाधांचनाशयेत् ॥

**पंचगव्य** देहाला शुद्ध करणारें व कफ, अजीर्ण, अपस्मार, ज्वर आणि भूतबाधा यांचा नाश करितें.

पंचचोपविषंप्रोक्तंमादकंवांतिकारकं ॥
प्राणहानिकरंप्रोक्तंभावाधिकनिघंटके ॥

**उपविषपंचक** मादक, वांतिकारक व प्राणहानिकारक आहे.

पंचानिंबंतुतुवरंतिक्तंशीतंमधुरस्मृतं॥लघुज्वरहरंकुष्ठपित्तनाशकरंम
तं ॥ वातरक्तंचकंडूनिदाहंमेहंविषंज्वरं ॥ वातंचनाशयेदेनदितिपू
र्वैर्निरूपितं ॥

**निंबपंचक**-निंबाचें पंचांग तुरट, कडू, शीतळ, मधुर, लघु, ज्वर, कुष्ट, पित्त, वातरक्त, कंडू, दाह, मेह, विष, ज्वर आणि वायु यांचा नाश करितें.

तृणानांपंचमूलंतुपित्तनाशकरंमतं ॥

**तृणपंचमूळ** पित्तनाशक आहे.

फलाम्लपंचकंरुच्यंकफकृत्कासकारकं ॥ तिक्तंजाड्यकरंचैववि
ष्टंभिशूलवातनुत् ॥ शुक्रगुल्मार्शसांनाशंकरोतीतिबुधाजगुः ॥

**फलाम्लपंचक** रुचिकर, कफकारक, खोकला करणारें, कडू, जाड्यकारक, विष्टंभकारक व शूल, वायु, शुक्र, गुल्म, अर्श यांचा नाश करितें.

पंचकंचफलानांतुशूलगुल्मकृमीहरं ॥

वातपीनसहृद्रोगमलकासविनाशनं ॥

फलपंचक शूल, गुल्म, कृमि, वायु, पडसें, हृद्रोग, मल आणि खोकला यांचा नाश करितें.

सुगंधपंचकंशीतंरक्तपित्तकफान्जयेत् ॥
पीनसंमुखदौर्गंध्यंकफंरक्तरुजंजयेत् ॥

पंचसुगंध शीत व रक्तपित्त, कफ, पीनस, मुखाचा दुर्गंध, कफ आणि रक्तविकार यांचा नाश करितें.

पंचभृंगकषायस्तुरोगिस्नानेप्रशस्यते ॥

पंचभृंग तुरट व रोग्याच्या स्नानाविषयीं व पानाविषयीं देण्यास प्रशस्त आहे.

फलाम्लपंचकंचान्यच्छोफकृन्मदकारकं
विष्टंभशूलगुल्मार्शशुक्रवातविनाशकं ॥

दुसरें फलाम्लपंचक सूज करणारें, मादक व विष्टंभ, शूल, गुल्म, अर्श, शुक्र आणि वायु यांचा नाश करितें.

लवणानांपंचकंतुशोषकंचारुचिप्रदं ॥ मलानुलोमकंदाहिनेत्र्यं
वातंकफंहरेत् ॥ शूलंचनाशयत्येवमुक्तंपूर्वैर्महर्षिभिः ॥

पंचलवण शोषक, अरुचिकारक, मलानुलोमन, दाहक, नेत्राला हित व वायु, कफ आणि शूल यांचा नाश करणारें असें आहे.

पंचामृतंतुष्टिपुष्टिबलदंचप्रकीर्तितं ॥

पंचामृत तुष्टि, पुष्टि व बल यांला देणारें असें आहे.

मांसरोहिणिकाव्रण्याचोष्णारक्तपित्तजित ॥
सर्वासंग्रहणींहंतिनात्रकार्याविचारणा ॥

मांसरोहा–प्रहारवल्ली व्रणाला हितावह, तिखट व रक्तपित्त, संपूर्ण संग्रहणी यांची नाशक अशी आहे.

निचुलस्यफलंचाममलावष्टंभकृन्मतं ॥ मधुरंदोषलंबल्यंतुवरंगु
रुवानलं ॥ कोमलंतत्रसमधुरंगुरुवल्यंकफप्रदं ॥ मेदोवृद्धिकरंचै
वदाहवातप्रपित्तनुत् ॥ तत्पक्वंशीतलंदाहिस्निग्धंचैवतृप्तिकारकं ॥ धा
तुवृद्धिकरंस्वादुमांसलंचकफप्रदं ॥ बल्यंपुष्टिकरंशुक्रकारकंदुर्जरं

वृषं ॥ शीतंक्षतक्षयंरक्तपित्तं वाशुव्यपोहाने ॥ तस्यबीजंतुमधुरंवृ
ष्यंविष्टंभकंगुरु ॥ तस्यपुष्पंगुरुस्तिक्तंमुखशुद्धिकरंमतं ॥ पाऊतु
मधुरावृष्यास्त्रिदोषशमनीमता ॥

**निचुलफल**– फणस तो हिरवा असतां मलावष्टंभक, मधुर, दोषल, बलकर, तुरट, गुरु, वातल, असा आहे. तोच कोंवळा असतां मधुर, गुरु, बलकारक, कफप्रद, मेदोवृधिकारक व दाह, वायु, पित्त यांचा नाश करितो. तो पिकला असतां शीतळ, विदाही, स्निग्ध, तृप्तिकारक, धातुवर्धक, स्वादु, मांसल, कफप्रद, बलकर, पुष्टिकर, जंतुकारक, दुर्जर, वृष्य व वायु, क्षतक्षय, रक्तपित्त, यांचा नाश करितो. फणसाच्या आंठ्या मधुर, वृष्य, विष्टंभक, गुरु, अशा आहेत. फणसाचें बीज गुरु, तिक्त, मुखशुद्धिकारक आहे. याची पाव मधुर वृष्य आणि त्रिदोषनाशक अशी आहे.

मध्यमंपंचमूलंतुवृष्यंवातककापहं ॥
किंचित्पित्तकरंप्रोक्तंपूर्वाचार्यैश्वसूरिभिः ॥

**मध्यमपंचमूळ** वृष्य व वायु, कफ यांचें नाशक, किंचित् पित्तकारक आहे.

गोक्षुरादिमपंचानांमूलंकुष्ठार्शनाशकं ॥
वृष्यंवातंककंगुल्मंव्रणंचामंचनाशयेत् ॥

**गोक्षुरादिकांचेमूळ** कुष्ट, अर्श यांचें नाशक, वृष्य व वायु, कफ, गुल्म, व्रण आणि आम यांचा नाश करितें.

अर्शोघ्नपंचकंसर्वार्शानांचैवविनाशनं ॥

**मुळव्याधपंचक** सर्व मुळव्याधींचा नाश करितें

वल्लीजंपंचमूलंतुदोषनाशकरंमतं ॥

**वल्लीपंचमूळ** दोषनाशक आहे.

गणानांपंचकंप्रोक्तंप्लीहानाहप्रमेहजित् ॥
भगंदरंपांडुरोगंकुष्ठशूलोदरंजयेत ॥

**पंचगण** प्लीहा, आनाह, प्रमेह, भगंदर, पांडुरोग, कुष्ट, शूल, आणि उदर यांचा नाश करितो.

कंटकीनांपंचमूलंत्रिदोषशमनंपरं ॥

**कंटकपंचमूळ** त्रिदोषनाशक असें आहे.

पिप्पलोदुंबरःप्लक्षोवेतसःपंचमोवटः ॥ एषांमूलंहिमंरुक्षंवर्ण्यंरक्त

न्यविशोधकं ॥ तुवरंयोनिरोगघ्नंव्रणमेदविसर्पजित् ॥ शोफपित्तक
फरक्तदोषंदाहंचनाशयेत् ॥

**क्षीरवृक्षपंचक** (पिंपळ, उंबर, प्लक्ष, वेत आणि वट यांचे मूळ) हिम, रूक्ष, वर्णकर, स्तन्यशोधक, तुरट व योनिरोग, व्रण, मेद, विसर्प, सूज, पित्त, कफ, रक्तदोष आणि दाह यांचा नाश करितें.

पंचक्षीरीवल्कलंतुशीतलंग्राहकंलघु ॥ तुवरंव्रणजिद्वर्ण्यंशोफवीसर्प
दाहनुत ॥ तृष्णांकफंयोनिदोषंनाशयेदितिकीर्तितं ॥

**पंचक्षीरीवृक्षवल्कल** शीतल, ग्राहक, लघु, तुरट व व्रणनाशक, वर्णकारक व सूज, विसर्प, दाह, तृष्णा, कफ आणि योनिदोष यांचा नाश करितें.

पंचक्षीरद्रुपत्रंतुशीतंस्वादुचतिक्तकं ॥ तुवरंस्तंभकंग्राहिलेखनंक
फवातनुत् ॥ वातरक्तंमलस्तंभमाध्मानंचातिसारकं ॥ नाशयेत्पित्त
रोगंचलघुप्रोक्तंमनीषिभिः ॥ तेषांफलंतुविष्टंभिग्राहकंगुरुतूवरं ॥
अम्लंचमधुरंवृष्यंरक्तपित्तविनाशनं ॥ कफंवातंचहृल्लासंशोषंवा
तंचगुल्मकं ॥ अरुचिंश्वासकासौचनाशयेदितिकीर्तितं ॥ पक्वंगु
णाधिकंज्ञेयमितिपूर्वैर्निवेदितं ॥

**पंचक्षीरीवृक्षपल्लव** शीतळ, स्वादु, कडु, तुरट, स्तंभक, ग्राहि, लेखन व कफ, वायु, वातरक्त, मलस्तंभ, आध्मान, अतिसार आणि पित्तरोग यांचे नाशक, लघु असे आहेत. यांचीं फळें विष्टंभकारक, ग्राहक, तुरट, आंबट, मधुर, वृष्य व रक्तपित्त, कफ, वायु, हृल्लास, शोष, वायु, गुल्म, अरुचि, दमा, खोकला यांचा नाश करितात. तीं पिकलीं असतां गुणानीं अधिक आहेत.

महाविषाणिपंचैवमादकानितथापुनः ॥
सद्यःप्राणहराण्येवशुद्धानिह्यमृतंजगुः ॥

**पंचमहाविषें** मादक, सद्यः प्राणनाशक आहेत. तीच शुद्ध केलीं असतां अमृतासारखीं आहेत.

उपपूर्वंपंचविषंमादकंप्राणहारकं ॥
शोधितंतत्तुबलदंवीर्यंवृद्धिकरंमतं ॥

**पंचोपविषें** मादक, प्राणहारक आहेत. व शुद्ध केलीं असतां बलप्रद आणि वीर्यवर्धक अशीं आहेत.

पंचमूत्रंपटूष्णंचशोधनंवृष्यमीरितं ॥

मेढा, कुणज, आणि त्रिपुट, यांचा पाला मिळवून भाजी केली असतां, दीपन, पाचन, हृद्य, बलकर, वर्णकारक, पथ्यकर, ग्राहक, सुखप्रद, आणि त्रिदोषशामक असें आहे.

ब्राह्मीशीनाकषायाचतिक्ताबुद्धिप्रदामता ॥ मेधायुरग्निजननी सारकास्वादुलालघुः ॥ कंठशुद्धिकरीहृद्यास्मृतिदाचरसायना ॥ हृद्यामेहंविषंकुष्ठंपांडुकासंज्वरंजयेत ॥ शोफकंडूप्लीहवातरक्तपित्तारुचीर्जयेत ॥ श्वासंशोषंसर्वदोषंकफवातामयानजयेत् ॥ सर्वेप्येतेगुणाब्रह्ममंडूक्यामपिसंस्थिताः ॥

ब्राह्मी ( कारिवना, आणि ब्रह्ममंडूकी ) शीतळ, तुरट, कडू, व बुद्धि, मेधा, आयुष्य आणि अग्नि यांना वाढविणारी, सारक, स्वादु, लघु, कंठशोधक, हृद्य, स्मृतिप्रद, रसायन, हृद्य, व मेह, विष, कुष्ठ, पांडुरोग, खोकला, ज्वर, सूज, कंडू, प्लीहा, वातरक्त, पित्त, अरुचि, दमा, शोष, संपूर्णदोष, कफ, वायु, यांचा नाश करिते, ब्रह्ममंडूकीचेहि असेच गुण आहेत.

ब्रह्मदंडीभवेदुष्णातिक्ताकफविनाशिनी ॥
वातरोगंचशोफंचनाशयेदितिकीर्तितं ॥

ब्रह्मदंडी उष्ण, कडू, व कफ, वायु, सूज, यांचा नाश करिते.

बकुलःशीतलोहृद्योमधुरश्चकषायकः ॥ हर्षप्रदोमदाढ्यश्चपाके कटुचग्राहकः ॥ बलप्रदोगुरुश्चैवविषंदंतरुजंतथा ॥ कफपित्तोश्वित्रकुष्ठंकृमीननाशयतेतथा ॥तत्फलंमधुरंस्निग्धंगुरुशीतंकषायकं ॥ वातलंग्राहकंदंतहितकारिनिगद्यते ॥ तत्पुष्पंरुचिरंशीतंसाराढ्यं मधुरंमतं ॥ सुगंधिस्निग्धंकाषायंदंतरोगप्रशमनकं ॥

बकुळ ( ओंवळी-बेंसाड ) शीतळ, हृद्य, मधुर, तुरट, हर्षप्रद, मदाढ्य, पाककाळीं तिखट, ग्राहक, बलप्रद, गुरु, व विषदोष, दंतरोग, कफ, पित्त, श्वित्रकुष्ठ, कृमि, यांचा नाश करिते, हिचें फळ मधुर, स्निग्ध, गुरु, शीत, तुरट, वातल, ग्राहक, दंतहितकारक आहे. हिचीं फुलें, रुचिकारक, शीत, क्षाराढ्य, मधुर, सुगंधि, स्निग्ध, तुरट, आणि दंतरोग यांचा नाश करितात.

स्थूलपुष्पश्चबकुलोदीपनोमधुरःकटुः ॥ पित्तदाहकफश्वासमूत्रकृच्छ्रविषभ्रमान् ॥ अश्मरींनाशयत्येवमदगंधिश्चविद्यते ॥

स्थूलपुष्प– थोरबकुळ दीपन, मधुर, तिखट, पित्त, दाह, कफ, श्वास, मूत्रकृच्छ्र, विष, भ्रम, अश्मरी यांचा नाश करितो. व मदगंधि आहे.

बादामःसारकश्चोष्णोगुरुरम्लःकफप्रदः ॥ स्निग्धःस्वादुस्तुवरश्चशु
क्लोवातनाशनः ॥ उष्णवीर्यंचामफलंसारकंगुरुपिच्छलं ॥ कफ
पित्तकरंचैववातनाशकमुत्तमं ॥ तत्पक्वंमधुरंवृष्यंसुस्निग्धंपौष्टिकं
मतं ॥ शुक्लकफकारीचरक्तपित्तंव्यपोहति ॥ शामकंवातपित्त
स्यपूर्ववैद्यैरुदीरितं ॥ शुष्कंचतत्फलंप्रोक्तंमधुरंधातुवर्धकं ॥ स्निग्धं
वृष्यंचबल्यंचपौष्टिककफकारिच ॥ वातपित्तस्यशमनंप्रोक्तंगुण
विशारदैः ॥

**बदाम** सारक, उष्ण, गुरु, अम्ल, कफकारक, स्निग्ध, स्वादु, तुरट, शुक्ल, वातनाशक, उष्णवीर्य असा आहे. याचें हिरवें फळ सारक, गुरु, पिच्छल, व कफ, पित्तविकार आणि वायु यांचा नाश करितें, तें पिकलें असतां मधुर, वृष्य, स्निग्ध, पौष्टिक, शुक्ल, कफकारक, व रक्तपित्त, वातपित्त यांचा नाश करितें. तें सुकें असतां मधुर, धातुवर्धक, स्निग्ध, वृष्य, बलकर, पौष्टिक, कफकारक, आणि वातपित्तनाशक असें आहे.

आरग्वधोतिमधुरःशीतलोमृदुरेचकः ॥ कटुर्भेदकरःप्रोक्तोगुरुः
स्रंसनकारकः ॥ शूलज्वरंचकुष्टंचकंडूंमेहकफंतथा ॥ वातोदा
वर्तहृद्रोगान्बद्धविट्कंक्रिमिव्रणं ॥ कफोदरमूत्रकृच्छ्रगुल्मपीडांच
नाशयेत् ॥ पर्णानिरेचकानिस्युःकफमेदोहराणिच ॥ पुष्पाणि
स्वादुशीतानितिक्तानिग्राहकाणिच ॥ तुवराणिचजानीयात्शिम्य
श्चापिगुणान्शृणु ॥ पाकेकटूचमधुराबल्यास्रंसनकारिणी ॥ रेच
कारुचिदाकोष्ठशुद्धिकृत्कफपित्तजित् ॥ मलदोषंज्वरघ्नाचकीर्ति
तामुनिभिःसदा ॥ मज्जाचमधुरापाकेस्निग्धाचाग्निविवर्धिनी ॥ रेच
कापित्तवातानांनाशकासमुदाहृता ॥

**बाहवा** अतिमधुर, शीतल, मृदु, रेचक, तिखट, भेदक, गुरु, स्रंसन, व शूल, ज्वर, कुष्ट, कंडू, मेह, कफ, वायु, उदावर्त, हृद्रोग, बद्धविट्कता, कृमि, व्रण, कफोदर, मूत्रकृच्छ्र, गुल्म, यांचा नाश करितो. याचीं पानें रेचक, व कफ, मेद, यांचीं नाशक आहेत. त्याचीं फुलें स्वादु, शीत, कडू, ग्राहक, तुरट, अशीं आहेत, याची शेंग पाककाळीं तिखट, मधुर, बलकर, स्रंसनकारक, रेचक, अरुचिप्रद, कोष्टशुद्धिकारक व कफ, पित्त, मलदोष, ज्वर यांचा नाश करिते. याचा गर पाककाळीं मधुर, स्निग्ध, अग्निवर्धक, रेचक व पित्त, वायु यांचा नाश करितो.

कर्णिकारःसरस्तिक्तःकटूष्णःकफशूलहा ॥
उदरक्रिमिमेहघ्नोव्रणगुल्महरोनृपे ॥

लघुवाहवा सारक, कडु, तिखट, उष्ण व कफ, शूल, उदर, कृमि, मेह, व्रण आणि गुल्म यांचा नाश करितो.

> बाकुचिपाकेकटुकातिक्ताशीनारसायनी ॥ मधुरारुचिदारुक्षाहृद्याग्राह्यग्निदीपनी ॥ बल्याचतुवरालघ्वीमेध्यावैरक्तपित्तजित ॥ कफकुष्ठकृमिश्वासकासमेहज्वरव्रणान् ॥ त्रिदोषवातत्वग्दोषविषकंडूश्चनाशयेत ॥ फलंचास्याःकटुस्तिक्तंकेश्यंत्वच्यंचसारकं ॥ पित्तलंकफवातानांपांडुशोथार्शसामपि ॥ सश्वासकासकुष्ठानांकृच्छ्राणांनाशनंमतं ॥

बाकुची-बावचांचें झाड पाककाली तिखट, कडु, शीत, रसायन, मधुर, रुचिप्रद, रुक्ष, हृद्य, ग्राहक, अग्निदीपक, बलकर, तुरट, लघु, मेध्य व रक्तपित्त, कफ, कुष्ठ, कृमि, श्वास, कास, मेह, ज्वर, व्रण, त्रिदोष, वायु, त्वग्दोष, विष, कंडू यांचा नाश करते. हिचें फळ तिखट, कडु, केश्य, त्वचेला हितकर, सारक, पित्तल व कफ, वायु, पांडुरोग, सूज, मूळव्याध, श्वास, खोकला, कुष्टें आणि कृच्छ्र यांचा नाश करते.

> हिंगुपत्रीकटुस्तीक्ष्णातिक्तोष्णापाचकामता ॥ रुच्यापथ्यादीपनीचहृद्यासुगंधकारिणी ॥ तुवराकफवातामवस्तिपीडाश्चनाशयेत ॥ बद्धविट्कार्शगुल्माढिप्लीहामदोपचाविषान ॥

हिंगुपत्री-बाफळी तिखट, तीक्ष्ण, अतिकडु, उष्ण, पाचक, रुचिकर, पथ्यकारक, दीपन, हृद्य, सुगंध, तुरट व कफ, वायु, आमदोष, बस्तिपीडा, मलबद्धता, अर्श, गुल्म, प्लीहा, मद, अपाच आणि विष यांचा नाश करते.

> बब्बुलस्तिक्तमधुरस्निग्धःशीतोष्णतुवरः ॥ आमरक्तातिसारघ्नोग्राहकोमतः ॥ कफकासंचपित्तंचदाहरक्तातिसारकं ॥ वातंप्रमेहंशमयेत्पर्णंतुग्राहकंमतं ॥ रुच्यंकटूष्णकासघ्नंवातपुंस्त्वकफार्शनुत् ॥

बाभूळ कडु, मधुर, स्निग्ध, शीत, उष्ण, तुरट व आम, रक्तातिसार यांचा नाशक, ग्राहक व कफ, खोकला, पित्त, दाह, रक्तातिसार, वायु, प्रमेह यांचा नाश करिते. हिचीं पानें ग्राहक, रुचिकर, तिखट, उष्ण व खोकला, वायु, पुंस्त्व, कफ, आणि अर्श यांचा नाश करितात.

> जलबब्बुलकश्चोष्णस्तुवरःपित्तदाहकृत् ॥
> वातरोगकफव्याधिनाशनःपरमोमतः ॥

कुष्टनाशिनी ॥ विवर्णतानाशिनीचइंद्रियाणांप्रसादनी ॥ शिरोरोगंनेत्ररोगंवैस्वर्यंविषमज्वरं ॥ पुराणंचज्वरंपांडुंहृद्रोगंकामलांतथा ॥ शोषंशोथंमूत्रघातंग्रहणींचातिसारकं ॥ अश्मरींचवमिंमेहंकृमिंश्वासंविषोदरं ॥ कासंघर्मंमलस्तंभमानाहंकर्णरोगकं ॥ अर्शःप्लीहांत्रिदोषंचगुल्मंहिक्कांव्रणंनथा ॥ ऊरुस्तंभंचशूलंचनाशयेदरुचिंनथा ॥ अम्लत्वान्मधुरत्वाच्चवातनाशकरीमता ॥ तिक्तत्वान्मधुरत्वाच्चकषायत्वाच्चपित्तहा ॥ तिक्तत्वात्कटुकत्वाच्चतुवरत्वात्कफापहा ॥ ग्रीष्मेगुडेनवर्षासुसैंधवेनसमाहिता ॥ शरदतौशर्करयाहेमंतेविश्वयासह ॥ शिशिरेकृष्णयासार्धंवसंतेमधुनाहिता ॥

**अर्थ—** हरीतकी ही पांच रसानीं युक्त आहे, व हींत लवण रस नाहीं; व योगवाहक, रसायन, अग्निदीपक, लघु, सारक, मेधाकर, लेखन, वातानुलोमनी, हृद्या, चक्षुष्य, स्मृतिकारक, वयःस्थापक, बलकर, कुष्ठनाशक, विवर्णनाशक, इंद्रियांना प्रसन्न करणारी, व शिरोरोग, नेत्ररोग, स्वरभंग, विषमज्वर, पुराणज्वर, पांडु, हृद्रोग, कामला, शोष, सूज, मूत्राघात, ग्रहणी, अतिसार, अश्मरी, वांति, मेह, कृमि, श्वास, विष, उदर, खोकला, घाम, मलस्तंभ, आनाह, कर्णरोग, अर्श, प्लीहा, त्रिदोष, गुल्म, हिक्का, व्रण, उरुस्तंभ, शूल, आणि अरुचि याचा नाश करिते. ही आंबट, व मधुर आहे म्हणून वातनाशक, व कडू, गोड, आणि तुरट आहे याकरितां पित्तनाशक, व तिखट, कडू, तुरट अशी आहे म्हणून कफनाशक आहे, ही ग्रीष्मऋतूंत गुळाशीं, वर्षाऋतूंत सैंधवाशीं, शरदृतूंत साखरेशीं, हेमंतांत सुंठीशीं, शिशिरऋतूंत पिंपळीशीं, आणि वसंतऋतूंत मधाशीं घ्यावी तीं हितकारक आहे.

लंघितेदुर्बलेश्रांतेकृशेतृष्णातुरेनथा ॥ गलग्रहेहनुस्तंभेशोषिक्षीणेनवज्वरे ॥ गर्भिण्यांरक्तमोक्षेचनचदेयाहरीतकी ॥

**अर्थ—** हरीतकीचा निषेध लंघनकेलेला, दुर्बल, श्रमी, कृश, फार तहान लागणारा, गळा धरलेला, हनुस्तंभ झालेला, शोषयुक्त, क्षीण, नवज्वरी, गर्भिणी, आणि रक्त काढलेला, यांला हरीतकी देऊं नये.

हरीतक्याःस्मृतंबीजंचक्षुष्यंगुरुवातनुत् ॥
पित्तनाशकरंचैवमुनिभिःपरिकीर्तितं ॥

**अर्थ—** हरीतकीच्या बीचा गीर नेत्रांला हितावह, गुरु, वातनाशक, आणि पित्तनाशक असा आहे.

विकंटकःकषायश्चकटुरुष्णोरुचिप्रदः ॥ अग्निदीप्तिकरश्चैवचस्वरंजनकारकः ॥ कफघ्नश्चैवसंप्रोक्तःमुनीः पूर्वाचार्यैः ॥

**अर्थ**– हाथाभृक्ष तुरट, तिखट, रुक्ष, रुचिकर, अग्निदीपक, वस्त्ररंजक, आणि कफघ्न, असा आहे.

> बाल्हीकंपित्तलंचोष्णंहृद्यंतिक्तंसरंकटु ॥ लघुतीक्ष्णंरुचिकरंपाचकंचाग्निदीपकं ॥ स्निग्धंमलस्तंभकरंश्वासकासकफापहं ॥ आनाहाध्मानगुल्मघ्नंशूलहृद्रोगनाशनं ॥ वातंचाजीर्णकंजंतूनुदरंचैवनाशयेत् ॥

**अर्थ**–हिंग–रामठ पित्तल, उष्ण, हृद्य, कडू, सारक, तिखट, लघु, तीक्ष्ण, रुचिकर, पाचक, अग्निदीपक, स्निग्ध, मलस्तंभक, दमा, खोकला, कफ, आनाह, आध्मान, गुल्म, शूल, हृद्रोग, वायु, अजीर्ण, जंतु व उदर यांचा नाश करितो.

> हिमंशैत्यकरंस्निग्धंवैवर्ण्यस्यचकारकं ॥
> दाहपित्तहरंचैवप्रोक्तंपूर्वंचिकित्सकैः ॥

**अर्थ**–हिम शैत्यकारक, स्निग्ध, विवर्णताकारक व दाह, आणि पित्त यांचें नाशक असें आहे

> इंगुदीनामकोवृक्षोमदगंधिःकटुर्लघुः ॥ तिक्तश्चोष्णःफेनिलश्चप्रोक्तश्चैवरसायनः ॥ कृमीन्वातंविषंशूलंश्वित्रंकुष्ठंव्रणंकफं ॥ ग्रहपीडांभूतबाधांनाशयेदितिकीर्तितः ॥ अस्यपुष्पंतुमधुरंस्निग्धंचोष्णंचातिक्तकं ॥ वातंकफंनाशयतीत्येवमाचार्यभाषितं ॥

**अर्थ**–हिंगणबेट मदगंधि, तिखट, लघु, कडू, उष्ण, फेनिल, रसायन, व कृमि, वायु, विष, शूल, श्वित्र, कुष्ट, व्रण, कफ ग्रहपीडा, भूतबाधा, यांचा नाश करितें. याचीं फुलें मधुर, स्निग्ध, उष्ण, कडू, व वायु, कफ, यांचा नाश करितात.

> हेरंबवृक्षःकफहावातनाशकरोमतः ॥
> हेरंबवृक्षमूलंतुप्रोक्तंवांतिकरंबुधैः ॥

**अर्थ**–हेरंबवृक्ष कफ, वायु यांचा नाशक आहे आणि याचें मूळ वांतिकारक आहे.

> हंसपादीतुसंप्रोक्तारक्तलज्जालुसंज्ञया ॥

**अर्थ**–हंसपादी ही रक्तलाजाळूसंज्ञेनें पूर्वी सांगितली आहे.

> सुहागीटंकणश्चैवपूर्वंमुक्तौटवर्णके ॥

**अर्थ**–सुहागी, टांकणखार हे पूर्वी टवर्णांत लिहिले आहेत.

लोणारक्षारश्चात्युष्णस्तीक्ष्णःपित्तकरोमतः ॥
वातगुल्मादिरोगाणांनाशकःपरिकीर्तितः ॥

**अर्थ**—लोणखार अतिउष्ण, तीक्ष्ण, पित्तकर, व वात, गुल्म इत्यादि रोगांचा नाश करितो.

जवर्णेलिखितःपूर्वंतत्रज्ञेयागुणाबुधैः ॥

**अर्थ**—जवखार हा पूर्वी जवगांत लिहिला आहे.

सर्जिक्षारःकटुश्चोष्णस्तीक्ष्णोगुल्मविनाशकः ॥ शूलंवातंकफंचैवकृमीनाध्मानवातकं ॥ उदरस्थंचवातंचनाशयेदितिकीर्तितः ॥

**अर्थ**—सर्जिखार तिखट, उष्ण, तीक्ष्ण, व गुल्म, शूल, वायु, कफ, कृमि, आध्मानवायु, पोटांतील वायु यांचा नाश करितो.

औखरंलवणंपूर्वंलवणेप्राकनिरूपितं ॥

**अर्थ**—औखरलवण पूर्वी लवणांत सांगितलें आहे.

सर्वक्षारोबस्तिशुद्धिकारकोमलशोधनः ॥ वस्त्रशुद्धिकरश्चैवचक्षुष्यःकृमिनाशकः ॥ उदावर्तहरश्चैवमुनिभिःपरिकीर्तितः ॥

**अर्थ**—साबुण बस्तिशुद्धिकारक, मलशोधक, वस्त्रशुद्धिकारक, नेत्रांना हित, कृमिनाशक व उदावर्त, यांचा नाश करितो.

नवसागरकस्तीक्ष्णःसरोव्रणविदारणः ॥ रसजारणकारीस्यादतिचोष्णश्चगुल्मनुत ॥ मलस्तंभंचोदरंचशूलंप्लीहांचनाशयेत् ॥

**अर्थ**—नवसागर तीक्ष्ण, सारक, व्रणाला फाडणारा, रसजारण, अतिउष्ण, व गुल्म, मलस्तंभ, उदर, शूल, आणि प्लीहा यांचा नाश करितो.

अपामार्गार्कसेहुंडपलाशतिलमुष्ककान् ॥ कदलीदंष्ट्रकानांचक्षारश्चाग्निप्रदीपकः ॥ प्रभावार्दाग्नितुल्यःस्यात्पाचकश्छेदनोलघुः ॥ रक्तपित्तकरस्तीक्ष्णःशुक्रानाहबलापहः ॥ पीनसंयकृतंदृष्टिंकफं प्लीहाकृमीनपि ॥ गुल्मंसंग्रहणींवातमामंचार्शश्चनाशयेत् ॥

**अर्थ**—सर्वखार आघाडा, निवडुंग, पळस, तिळ, इत्यादिकांची कांडी, व केळी व दाढे, इत्यादिकांचा खार अग्निदीपक, प्रभावानें अग्नीसारिखा, पाचक, छेदन, लघु, रक्तपित्तकारक, तीक्ष्ण, व शुक्र, आनाह, बल, पीनस, यकृत, दृष्टि, कफ, प्लीहा, कृमि, गुल्म, संग्रहणी, वायु, आम, आणि अर्श, यांचा नाश करितो.

क्षारस्तुगोक्षुराणांतुमधुरःशीतलोमतः ॥
स्रोतोविशोधनश्चैवमुनिभिःपरिकीर्तितः ॥

अर्थ–गोखरूचा खार मधुर, शीतल, स्रोतोविशोधन, असा आहे.

क्षाराष्टकंक्षारषट्कंमिश्रवर्गेचलेखितं ॥

अर्थ–क्षाराष्टक, क्षारषट्क हीं मिश्रवर्गांत लिहिलीं आहेत.

सर्जिक्षारयवक्षारौक्षारयुग्मंप्रकीर्तितं ॥ टंकणेनचसंयुक्तंक्षारत्रय मितीरितं ॥ तत्तिक्तंबलशुक्रामकांतिशूलोदरापहं ॥ वातंगुल्मं कफंचैवनाशयेदितिकीर्तितं ॥

अर्थ–साजीखार व यवखार हें युग्म सांगितलें. यांत टांकणखार मिळवला असतां त्याला क्षारत्रय म्हणतात. तें कडू व बल, शुक्र, आम, कांति, शूल, उदर, वायु, गुल्म, आणि कफ, यांचा नाश करितें.

क्षारःपर्पटकःप्रोक्तोयवक्षारसमोगुणैः ॥

अर्थ—पापडखार हा गुणांनीं यवक्षारासारिखाच आहे.

## क्षीरवर्ग.

### दुग्ध साधारण.

दुग्धंतुमधुरंस्निग्धंसद्यःशुक्रकरंमतं ॥ सरंशीतंपौष्टिकंचसर्वेषांच हितावहं ॥ बलप्रदंजीवनंचधातुवृद्धिकरंमतं ॥ वयसःस्थापकंचै ववाजीकरणमुत्तमं ॥ रसायनंकांतिकरंक्षुधितेबालवृद्धयोः ॥ अ तिव्यवायक्षीणेचक्षतक्षीणेहितावहं ॥ मधुरंतंतुलंसूक्ष्मंतृप्तिमेधाकरं मृदु ॥ स्तन्यंवर्णंकफंचैववर्धयेदाविहन्मतं ॥ जीर्णज्वरेभ्रमेशोषेगुल्म मूर्छातृषासुच ॥ ग्रहण्यांपांडुरोगेचदाहेशूलेगुदांकुरे ॥ उदावर्तेबस्ति रोगेरक्तपित्तेश्रमेतथा ॥ गर्भस्रावेयोनिरोगेग्लानौचैवातिसारके ॥ हृद्रोगेष्वानिशस्तंस्यादितिवैद्यविदांमतं ॥

अर्थ—दुध मधुर, स्निग्ध, सद्यःशुक्रकारक, सारक, शीत, पौष्टिक, संपूर्णांला हितावह, बलप्रद, जीवन, धातुवर्धक, वयःस्थापक, उत्तम वाजीकरण, रसायन, कांतिकारक, व क्षुधित, बाल, वृद्ध, अतिमैथुन करणारा, आणि क्षतक्षीण यांला हितावह, व मधुर, बुळबुळीत, सूक्ष्म, तृप्तिकारक, मेधाकर, मृदु व स्तन्य, वर्ण, कफ, आणि मेद यांला वाढविणारें, आपिनाशक,

आणि जीर्णज्वर, भ्रम, शोष, गुल्म, मूर्छा, ताहान, संग्रहणी, पांडुरोग, दाह, शूल, मूळव्याध, उदावर्त, बस्तिरोग, रक्तपित्त, श्रम, गर्भस्राव, योनिरोग, ग्लानि, अतिसार आणि हृद्रोग, यांवर अतिप्रशस्त आहे.

गोक्षीरंचमतंस्वादुरुच्यंस्निग्धंबलप्रदं ॥ अतिपथ्यंकांतिबुद्धिप्रज्ञा मेधाकफप्रदं ॥ तुष्टिपुष्टिवीर्यवृद्धिशुक्रंचैवकरोतिवदं ॥ वयसःस्था पकंहृद्यंरसायनकरंगुरु ॥ पुंस्त्वप्रदंचमधुरंवातंपित्तंविषंतथा ॥ वातरक्तंरक्तपित्तंदाहंचैवातिसारकं ॥ उदावर्तंभ्रमंकासंमदंश्वासं मनोव्यथां ॥ जीर्णज्वरंचहृद्रोगंपिपासामुदरंतथा ॥ अपस्मारं मूत्रकृछ्रंगुल्मंचार्शःप्रवाहिकां ॥ पांडुशूलंचाम्लपित्तंक्षयरोगमति श्रमं ॥ विषमाग्निगर्भपातंयोनिरोगंविनाशयेत् ॥ नेत्ररोगंवातरोगं नाशयेदितिकीर्तितं ॥ गोःकृष्णायाविशेषेणवातनाशकरंमतं ॥ पी तायास्तुविशेषेणपित्तवातविनाशनं ॥ श्वेतायास्तुविशेषेणश्लेष्मक फकरंगुरु ॥ रक्तायाश्चित्रवर्णायादुग्धंवातविनाशनं ॥ मृतवत्सावा लवत्साभवंदोषत्रयापहं ॥ वष्कयिण्याघनंबल्यंतर्पणंकफवर्धकं ॥ त्रिदोषनाशकंचैवमुनिभिःपरिकीर्तितं ॥ पिण्याकाम्लान्नभोक्तृणां गवांदुग्धंकफप्रदं ॥ गुरुचैवसमुद्दिष्टंपलालादनशालिनां ॥ गवां दुग्धंसमुद्दिष्टंसर्वरोगहितावहं ॥

अर्थ–गाईचें दूध स्वादु, रुचिकर, स्निग्ध, बलकर, अतिपथ्य, कांतिकारक, बुद्धि, प्रज्ञा, मेधा, कफ, तुष्टि, पुष्टि, वीर्य, शुक्र, यांना वाढविणारें, वयःस्थापक, हृद्य, रसायन, गुरु, पुंस्त्वप्रद, मधुर, व वात, पित्त, विष, वातरक्त, रक्तपित्त, दाह, अतिसार, उदावर्त, भ्रम, कास, मद, श्वास, मनोव्यथा, जीर्णज्वर, हृद्रोग, पिपासा, उदर, अपस्मार, मूत्रकृछ्र, गुल्म, अर्श, प्रवाहिका, पांडु, शूल, आम्लपित्त, क्षयरोग, अतिश्रम, विषमाग्नि, गर्भपात, योनिरोग, नेत्ररोग, आणि वातरोग, यांचा नाश करितें. काळ्या गाईचें दूध विशेषेंकरून वातनाश करितें. पिंवळ्या गाईचें वातपित्तनाश करितें. श्वेतगाईचें दूध विशेषेंकरून कफकारक आहे, आणि रक्त व चित्रवर्ण गाईचें दूध, वातनाशक आहे, व मृतवत्सा आणि बालवत्सा गाईचें दूध दोषत्रयनाश करितें, पाडशागाईचें दूध घन, बलकर, तर्पण, कफवर्धक, आणि त्रिदोषनाशक असें आहे, आणि पेंड आंबोण खाणाऱ्या गाईचें दूध कफकर, गुरु, असें आहे, आणि कडबा, गवत, सरक्या इत्यादि खाणाऱ्या गाईचें दूध सर्व रोगांवर हितकारक आहे.

तरुणीनांगवांदुग्धंमधुरंचरसायनं ॥ त्रिदोषनाशकंचैवकृशायादुग्ध कंमतं ॥ सगर्भायाःसमुद्दिष्टंत्रिमासोर्ध्वंचपित्तलं ॥ क्षारंचमधुरं चैवमतंवैशोषकारकं ॥

**अर्थ**--नवीन गाईचें दूध मधुर, रसायन, त्रिदोषनाशक, असें आहे, व ह्यातान्या गाईचें दूध, दुर्बल, आहे आणि गाभण्या गाईचें तीन महिन्या उपरांतचें पित्तकर, खारट, मधुर, आणि शोषकारक असें आहे.

प्रथमंचप्रसूतायानिःसारंगुणहीनकं ॥

**अर्थ**—पहिल्यानें व्यालेल्या गाईचें दूध निःसार आणि गुणहीन असें आहे.

नूतनप्रसूतगोदुग्धंरुक्षंदाहकरंमतं ॥

रक्तदोषस्यजनकंपित्तलंचमतंबुधैः ॥

**अर्थ**—नूतन व्यालेल्या गाईचें दूध रुक्ष, दाहकारक, रक्तदोषकारक आणि पित्तल असें आहे.

चिरप्रसूनादुग्धंतुमधुरंदाहकंपटु ॥

**अर्थ**—चिरप्रसूता—विऊन फार दिवस झालेल्या गाईचें दूध मधुर, दाहक, व खारट, असें आहे.

धारोष्णंतुमतंदुग्धंवृष्यंधातुविवर्धकं ॥ निद्राकरंकांतिकरंपथ्यंस्वा द्वग्निदीपकं ॥ अमृतेनसमंचैवसर्वामयहरंपरं ॥ ॥ यामोषितंतुन ष्टंस्यात्रिदोषजनकंबुधैः ॥

**अर्थ**—धारोष्णदूध वृष्य, धातुवर्धक, निद्राकारक, कांतिकर, पथ्य, स्वादु, अग्निदीपन, अमृतासारिखें, सर्व रोग दूर करणारें असें आहे, शिळें दूध—काढून एक प्रहर झालेलें दूध त्रिदोषकारक आहे.

धाराशीतंमाहिष्यास्तुधारोष्णंगोःप्रशस्तकं ॥ शृतोष्णदुग्धंमेष्यास्तु शृतशीतमजाभवं ॥ प्रशस्तंशृतशीतंतुदुग्धंपित्तहरंमतं ॥ शृतोष्णं कफहृत्प्रोक्तमतप्तंदोषलंमतं ॥ अपाचकंमलस्तंभकारकंपरिकी र्तितं ॥ गवांदुग्धंतुपूर्वाण्हेमाहिष्याश्चापराण्हके ॥ नत्तुशर्करयायुक्तं हितंचानिमतंबुधैः ॥

**अर्थ**—दुग्धविशेषाचे गुण धाराशीत म्हशीचें, धारोष्ण गाईचें, तापविलेलें उष्ण असें मेंढीचें, व तापवून निवालेलें शेळीचें, असें घ्यावें, तापवून निवालेलें दूध, पित्तनाश करितें, कढत प्याल्यें असतां कफाचा नाश करितें, आणि तापविल्यावांचून निरसें दूध, दोषकर, अपाचक, मलस्तंभक, असें आहे, व पूर्वाण्हीं गाईचें दूध साखर घालून घ्यावें, अपराण्हीं म्हशीचें साखर घालून घ्यावें तें हितकारक होतें.

दुग्धंमाहिष्यामधुरंपाकेशीतंचपौष्टिकं ॥ स्निग्धंबल्यंगुरुवृष्यंशुक्रनि ष्ठकरंमतं ॥ कफालस्यरुचिकरंपित्तदाहभ्रमापहं ॥ जठराग्निहरं

प्रोक्तमतोमंदानलेऽहितं ॥ तीव्राग्निभिस्तुतत्पीतंचेद्बलपुष्टिकृत् ॥ सर्वधातुपुष्टिकरंमुनिभिःपरिकीर्तितं ॥

अर्थ—म्हशीचें दूध मधुर, पाककाळीं शीत, पौष्टिक, स्निग्ध, बलकर, गुरु, वृष्य व शुक्र, निद्रा, कफ, आळस, आणि रुचि यांना करणारें, व पित्त दाह, श्रम, जठराग्नि, यांचें नाशक, व मंदाग्नीला अपथ्य असें आहे, हें तीव्राग्नि पुरुषांनीं तापवून प्यालें असतां बळ, पुष्टि, आणि सर्व धातूंची पुष्टि यांना करितें.

अजादुग्धंतुतुवरंमधुरंग्राहकंलघु ॥ शीतंज्वरंक्षयंकासंरक्तपित्तं विनाशयेत् ॥ सर्वव्याधिंचातिसारंनाशयेदितिकीर्तितं ॥

अर्थ—शेळीचें दूध तुरट, मधुर, ग्राहक, लघु, शीत, व ज्वर, क्षय, खोकला, रक्तपित्त, सर्व व्याधि व अतिसार याचा नाश करितें.

अविदुग्धंगुरुस्निग्धंवातसंभवकासके ॥ वातप्रकोपेपथ्यंस्यात्क्षारं शुक्रकरंमतं ॥ अहृद्यंपित्तकफहृच्चाश्मरीनाशकंमतं ॥

अर्थ—एडकीचें दूध गुरु, स्निग्ध, व वातकास, वातकोप, यांवर पथ्यकर, खारट, शुक्रकर, अप्रिय, व पित्त, कफ, आणि अश्मरी यांचें नाशक आहे.

मेषीदुग्धंतुमधुरंस्निग्धंकेश्यंचपुष्टिकृत् ॥
गुरुवातहरंप्रोक्तंकफमेदोविवर्धकं ॥

अर्थ—मेंढीचें दूध मधुर, स्निग्ध, केश्य, पुष्टिकर, गुरु, वातनाशक, कफकर, आणि मेद-वर्धक असें आहे.

प्रोक्तंतुहस्तिनीदुग्धंमधुरंचाग्निमांद्यकृत् ॥ शीतलंचगुरुवृष्यं चक्षुष्यंवीर्यवर्धकं ॥ मेदोवृद्धिकरंस्निग्धंतुवरंचबलप्रदं ॥ कफकृत्तृप्तिकृच्चैवपित्तनाशकरंमतं ॥

अर्थ—हत्तिणीचें दूध मधुर, अग्नीला मंद करणारें, शीतल, गुरु, वृष्य, चक्षुष्य, वीर्यवर्धक, मेदवर्धक, स्निग्ध, तुरट, बलकर, कफकर, तृप्तिकर, आणि पित्तनाशक असें आहे.

अश्वन्यास्तुस्मृतंदुग्धंलवणंचाग्निदीपनं ॥ रुक्षमुष्णंकांतिकरंदेहस्थैर्यकरंलघु ॥ बल्यंचाम्लंसरंप्रोक्तंसंधिवातविनाशकं ॥ निद्रीषमुदरंवातंकुष्टंश्वासंचनाशयेत् ॥ एतेगुणास्त्वेकशफप्राणिनां पयसिस्मृताः ॥

अर्थ—घोडीचें दूध खारट, अग्निदीपक रुक्ष, उष्ण, कांतिकर, देहस्थैर्यकर, लघु, बल-

कफ, आंबट, सारक, व संधिवात, त्रिदोष, उदर, वायु, कुष्ट, दमा, यांचा नाश करितें. असे सर्व एकशफ प्राण्यांच्या दुधाचे गुण आहेत.

गर्दभ्यास्तुस्मृतंदुग्धंमधुरंबलकारकं ॥ रुक्षंचाम्लंदीपनंचबुद्धिमांद्यकरंमतं ॥ पथ्यंरुचिप्रदंक्षारंकफवातविनाशकं ॥ बालरोगंच कासंचश्वासंचैवविनाशयेत् ॥

अर्थ—गाढवीचें दूध मधुर, बलकर, रुक्ष, आंबट, दीपन, बुद्धिमांद्यकारक, पथ्य, रुचिप्रद, खारट, व कफ, वायु, बालरोग, कास, आणि दमा यांचा नाश करितें.

औष्ट्रीदुग्धंतुमधुरंकटुरुक्षंविशोधनं ॥ किंचित्क्षारंदीपनंचभेदकंचसरंमतं ॥ नाशयंचोष्णंशोथकुष्ठकफानाहप्रमेहनुत् ॥ नलवातक्रमीनगुल्मंकासंचार्शानथोदरं ॥ शूलंनाशयतीत्येवंप्रोक्तंपूर्वचिकित्सकैः ॥

अर्थ—उंटिणीचें दूध मधुर, तिखट, रुक्ष, शोधक, किंचित् खारट, दीपन, भेदक, सारक, तीक्ष्ण, उष्ण, व सूज, कुष्ठ, कफ, आनाहवायु, प्रमेह, नलवात, कृमि, गुल्म, कास, अर्श, उदर, आणि शूल यांचा नाश करितें.

प्रोक्तंतुमानुषीदुग्धंमधुरंशीतलंलघु ॥ चक्षुष्यंतुवरंपथ्यंदीपनंपाचकंमतं ॥ धातुवृद्धिकरंरुच्यंजीवनंलेहनंतथा ॥ रक्तपित्तेचनस्यार्थंनेत्रशूलेक्षिपूरणे ॥ उत्तमंनेत्ररोगघ्नमभिघातविनाशकं ॥ वातंपित्तंनाशयतीत्येवमुक्तंचिकित्सकैः ॥

अर्थ—मानुषी दूध, मधुर, शीतल, लघु, चक्षुष्य, तुरट, पथ्यकर, दीपन, पाचक, धातुवर्धक, रुचिकर, जीवन, व लेहन, असें आहे. हें रक्तपित्तावर, नस्याकरितां नेत्रशूलावर डोळ्यांत ओतण्यास, उत्तम आहे. व नेत्ररोग, अभिघात, वात, व पित्त, यांचा नाश करितें.

दुग्धसंतानिकाशीतास्निग्धावृष्याबलप्रदा ॥ शुक्लातर्पणीरुच्याकफधातुविवर्धनी ॥ पित्तंवातंरक्तपित्तंदाहंरक्तरुजंहरेत् ॥

अर्थ—दुधाची मलई शीतल, स्निग्ध, वृष्य, बलकर, शुक्ल, तर्पण, रुचिकर, कफवर्धक, धातुवर्धक व पित्त, वायु, रक्तपित्त, दाह, आणि रक्तरोग यांचा नाश करिते.

मोरटंपुष्टिकृद्बल्यंरुचिदंतर्पणंमतं ॥ मधुरंपुष्टिकृत्वृष्यंविष्टंभिकफकृद्गुरु ॥ निद्रावृद्धिकरंहृद्यंप्रोक्तंचामकरंबुधैः ॥ वाताग्निनाशनंप्रोक्तंगुणज्ञैस्तुचिकित्सकैः ॥

अर्थ—पीयूष पुष्टिकर, बलकर, रुचिप्रद, तर्पण, मधुर, पुष्टिकर, वृष्य, विष्टंभकारक, गुरु, निद्रावर्धक, हृद्य, आमकारक, वातनाशक, अग्निनाशक, असें आहे.

## दधिवर्ग.

### दहीं साधारण.

दधिसाधारणंचोष्णंतुवरंदीपनंगुरु ॥ स्निग्धंरुच्यंग्राहकंचपाकेम्लं शोथवर्धकं ॥ पित्तंरक्तंशुक्रधातुंबलंमेदंचवर्धयेत् ॥ मूत्रकृच्छ्रप्रतिश्यायंकार्श्यंचविषमज्वरं ॥ शीतपूर्वज्वरंवातमरुचिंचविनाशयेत् ॥अतिसारहरंचैवतत्तुपंचप्रकारकं ॥ मंदंस्वादुश्चस्वाद्वम्लमम्लंचात्यम्लमेवच ॥ मंदंदधिघनंचैवदुग्धवच्चरुचौमतं ॥ मूत्रलंचसरंदाहित्रिदोषजनकंमतं ॥ दधिस्वादुघनंप्रोक्तंवनंचमधुरंमतं ॥ वृष्यंपाकेचमधुरमत्यभिष्यंदकारकं ॥ मेदवातकफध्वंसिरक्तापित्तप्रसादनं ॥ स्वाद्वम्लंचप्रसंप्रोक्तंतद्घनंमधुरंमतं ॥ किंचिदम्लंचतुवरंगुणास्त्वन्येतुपूर्ववत् ॥ यदम्लंदधितत्प्रोक्तंरक्तपित्तकफप्रदं ॥ दीपनंचसमुद्दिष्टंयदत्यम्लंतुदीपनं ॥ कंठदाहकरंचैवरोमांचोद्भवकारकं ॥ रक्तपित्तकरंप्रोक्तंदंतानांचाम्लनाकरं ॥

अर्थ—दहीं उष्ण, तुरट, दीपन, गुरु, स्निग्ध, रुचिकर, ग्राहक, पाककाळीं आंबट, व सूज, पित्त, रक्त, शुक्रधातु, बल, आणि मेद यांना वाढविते व मूत्रकृच्छ्र, प्रतिश्याय, कार्श्य, विषमज्वर, शीतपूर्वज्वर, वायु, आणि अरुचि, आणि अतिसार, यांचा नाश करितें. हें दहीं मंद, स्वादु, स्वाद्वम्ल, अम्ल, अत्यम्ल असें पांच प्रकारचें त्यांत मंद दहीं हें दाट, रुचीनें दुधासारिखें, मूत्रल, सारक, दाहक, व त्रिदोषजनक, आहे. स्वादु दहीं घन, मधुर, वृष्य, पाककाळीं मधुर, अभिष्यंदकारक, मेद, वात, कफ, यांचे नाशक, रक्ताला स्वच्छ करणारें, पित्तशामक, असें आहे. स्वाद्वम्ल दहीं तें घन, मधुर, किंचित आंबट, तुरट, आहे. बाकीचे गुण स्वादु दह्यासारिखेच आहेत, आंबट दहीं रक्त, पित्त, कफ यांना करणारें, व दीपन असें आहे. अत्यम्ल दहीं दीपन, कंठाला दाह करणारें, आंगावर रोमांच उभारणारें, रक्तपित्तकारक, आणि दातांना आंबविणारें असें आहे.

गवांदधिस्वादुबल्यंरुच्यंस्निग्धंचदीपनं ॥
पुष्टिकृन्मधुरंग्राहिशीतंवाताशैनाशनं ॥

अर्थ—गाईचें दहीं स्वादु, बलकर, रुचिकारक, स्निग्ध, दीपन, पौष्टिक, मधुर, ग्राहक, शीतल, आणि वातार्शाचें नाशक असें आहे.

महिष्यास्तुदधिप्रोक्तं रक्तपित्तप्रसादनं ॥ वृष्यं स्निग्धं च मधुरं शोधनं कफकारकं ॥ गुर्वभिष्यंदि बल्यं स्याच्छुक्रलं च प्रकीर्तितं ॥ पित्तं वातं श्रमं चैव नाशयेदिति कीर्तितं ॥

अर्थ— म्हशीचें दहीं रक्तपित्त, प्रसादन, वृष्य, स्निग्ध, मधुर, शोधन, कफकारक, गुरु, अभिष्यंदि, बलकर, शुक्रकारक व पित्त, वात, श्रम यांचा नाश करितें.

अजादधि समुद्दिष्टं दीपनं पाचनं लघु ॥ रुच्यं चोष्णं ग्राहकं च नेत्ररोगक्षयापहं ॥ अर्शकार्श्यं त्रिदोषं च श्वासं कासं कफं तथा ॥ वातनाशकरं चैव मुनिभिः संप्रकीर्तितं ॥

अर्थ— शेळीचें दहीं दीपन, पाचन, लघु, रुचिकर, उष्ण, ग्राहक, व नेत्ररोग, क्षय, अर्श, कार्श्य, त्रिदोष, श्वास, कास, आणि वायु यांचा नाश करितें.

अवीनां दधि सुस्निग्धं पाके च मधुरं गुरु ॥ कफपित्तकरं चैव कोपनं तुवरं मतं ॥ वातरक्तं व्रणं शोथं वातं चैव विनाशयेत् ॥

अर्थ —मेंढीचें दहीं स्निग्ध, पाककालीं मधुर, गुरु, कफकर, पित्तकारक, कोपन, तुरट, व वातरक्त, व्रण, शोथ, आणि वायु यांचा नाश करितें.

हस्तिन्यास्तु दधि प्रोक्तं तुवरं कांतिकारकं ॥ रुच्यं पाके च कटुकं लघु चोष्णं बलप्रदं ॥ वीर्यवृद्धिकरं चैव परिणामरुजाहरं ॥ कफवातनाशनीत्येवमाचार्यभाषितं ॥

अर्थ —हत्तिणीचें दहीं तुरट, कांतिकारक, रुचिकर, पाककालीं तिखट, लघु, उष्ण, बलप्रद, वीर्यवर्धक, व परिणामशूल, कफ, आणि वायु, यांचा नाश करितें.

अश्विन्यास्तु दधि प्रोक्तं मधुरं तुवरं मतं ॥ अल्पवातकरं रुच्यं चक्षुष्यं दीपनं मतं ॥ कफमूर्छानेत्रदोषकुष्ठार्शोदरजंतुनुत ॥

अर्थ—घोडीचें दहीं मधुर, तुरट, किंचित वातकर, रुचिकर, नेत्रांना हितावह, दीपन, व कफ, मूर्छा, नेत्रदोष, कुष्ट, मूळव्याध, उदरांतील जंतु, यांचा नाश करितें.

गर्दभ्यास्तु दधि प्रोक्तं रुक्षं चोष्णं च दीपनं ॥ पाचकं मधुरं चाम्लं रुच्यं वातहरं मतं ॥

अर्थ—गाढवीचें दहीं रुक्ष, उष्ण, दीपन, पाचक, मधुर, आंबट, रुचिकर, आणि वातनाशक असें आहे.

औष्ट्रंदधिसमुद्दिष्टंकटुकंपटुभेदकं ॥ रसेम्लंमधुरंस्वादुवातार्शःकृमि नाशनं ॥ कुष्ठशूलंचोदरंचनाशयेदितिकीर्तितं ॥

अर्थ—उंटिणीचें दहीं तिखट, खारट, भेदक, रसकाळीं आंबट, मधुर, स्वादु, व वातार्श, कृमि, कुष्ट, शूल, उदर, यांचा नाश करितें.

मानुष्यास्तुदधिप्रोक्तंबल्यंसंतर्पणंगुरु ॥ पाकेचमधुरंचाम्लंचक्षुष्यं तुवरंमतं ॥ पाकेलघुसमुद्दिष्टंरुक्षंचोष्णंकफापहं ॥ परिणामभवं शूलंमलस्तंभंत्रिदोषकं॥ मूत्रदोषंनाशयतीत्येवमाहुश्चिकित्सकाः॥

अर्थ—मानुषीचें दहीं बलकर, तर्पण, जड, पाककाळीं मधुर, आंबट, नेत्राला हितकर, तुरट, पाककाळीं लघु, रूक्ष, उष्ण, कफनाशक, व परिणामशूल, मलस्तंभ, त्रिदोष, मूत्रदोष, यांचा नाश करितें.

तप्तदुग्धोद्भवंप्रोक्तंदधिस्निग्धंरुचिप्रदं॥ सर्वधातुबलाग्नीनां वर्धकंचगुणोत्तमं ॥ वातपित्तहरंचैवप्रोक्तंपूर्वचिकित्सकैः ॥

अर्थ—तापविल्या दुधाचें दहीं स्निग्ध, रुचिप्रद, व सर्वधातु, बल, अग्नि यांना वाढविणारें, गुणानीं उत्तम, वातपित्तनाशक असें आहे.

हीनसारानिकोष्णंदधिशीतंलघुस्मृतं ॥ विष्टंभिवातलंग्राहिदी पनंमधुरंमतं ॥ रुच्यंकिंचित्पित्तकरंप्रदिष्टंचचिकित्सकैः ॥

अर्थ—तापवून साय काढलेल्या दुधाचें दहीं शीतल, लघु, विष्टंभकारक, वातल, ग्राहक, दीपन, मधुर, रुचिकर, आणि किंचित् पित्तकारक असें आहे.

सितायुक्तंदधिप्रोक्तंपित्तदाहतृषाहरं ॥ रक्तदोषहरंचैवमुनिभिःपरिकीर्तितं ॥

अर्थ— साखरमिश्रित दहीं पित्त, दाह, तृषा, रक्तदोष यांचें नाशक असें आहे.

गुडमिश्रंदधिप्रोक्तंतर्पणंधातुवर्धकं ॥ गुरुवातहरंचैवमुनिभिःपरिकीर्तितं ॥

अर्थ—गुडमिश्रित दहीं तर्पण, धातुवर्धक, गुरु, वातनाशक असें आहे.

दधिमस्तुसमुद्दिष्टंबल्यंचतुवरंमतं ॥ पित्तप्रदंसरं चोष्णंरुच्यंचाम्लं लघुस्मृतं ॥ स्रोतसांशोधकंचैवप्लीहोदरतृषाहरं ॥ कफार्शवातवि ष्टंभपांडुशूलहरंपरं ॥ गुल्मंश्वासंनाशयतीत्येवमाहुश्चिकित्सकाः॥

अर्थ–दह्यांवरची निवळी बलकर, तुरट, पित्तकर, सारक, उष्ण, रुचिकर, आंबट, लघु स्रोतःशोधक व प्लीहोदर, तृषा, कफार्श, वायु, विष्टंभ, पांडुरोग, शूल, गुल्म, श्वास, यांचा नाश करिते.

दधिस्नेहश्चसंप्रोक्तःसारकश्चगुरुर्मतः ॥ रक्तंपित्तंकफंशुक्रंवर्धयेदि तिकीर्तितः ॥ अग्निमांद्यकरश्चैववातनाशकरोमतः ॥ गुणाश्च न्येतुविज्ञेयाबुधैश्चदधिनासमाः ॥

अर्थ– दह्यांवरची साय सारक, गुरु, व रक्त, पित्त, कफ, शुक्र, यांना वाढविणारी, आणि अग्निमांद्यकारक, वातनाशक अशी आहे. बाकीचे गुण दह्यासारिखे आहेत.

नवनीतंलघुग्राहिशीतलंकफकारकं ॥ अग्निदीप्तिकरंवृष्यंमेधाकृ च्चप्रियंमतं ॥अतीवमधुरंस्वादुरुच्यंमदोविवर्धकं ॥ धातुवृद्धिकरं बल्यंवर्ण्यंतर्पणकारकं ॥ सौकुमार्यकरंचैवाविदाहिमुनिभिर्मतं ॥ किंचित्तक्रेणसंमिश्रमनरसंतुवरंमतं ॥ बालवृद्धहितंचाम्लंरक्तदो षतृषाहरं ॥ वातंपित्तंक्षयंकासंदुर्नामाननथार्दितं ॥ संतापंचश्रमं शोषंनेत्ररोगंचनाशयेत ॥ शूलंसंग्रहणींश्वासंकृमींश्चैवविनाशयेत् ॥

अर्थ–नवनीत लघु, ग्राहक, शीतल, कफकारक, अग्निदीपक, वृष्य, मेधाकारक, प्रिय, अतिमधुर, रुचिकर, मेदवर्धक, धातुवर्धक, बलकर, वर्णकारक, तर्पण, सौकुमार्यकारक, अविदाहि, आहे, तेंच किंचित तक्रयुक्त असलें तर, तुरट, बाल व वृद्ध यांना हितकर, आंबट, रक्तदोष, ताहान, वायु, पित्त, क्षय, खोकला, मूळव्याध, आर्दितवायु, संताप, श्रम, शोष, नेत्ररोग, शूल, संग्रहणी, दमा, आणि कृमि यांचा नाश करितें.

नवनीतंचिरोत्पन्नंबल्यंशुक्रकरंगुरु ॥ कफमेदोवर्धकंचचक्षुष्यंधा तुवर्धकं ॥ अरुच्यमनभिष्यंदिद्वित्र्यहोत्पन्नंयदि ॥ तदाक्षारंकटु स्वाम्लमनोवांत्यर्शकुष्ठकृत् ॥ विनाशोफंनेत्ररोगंसर्वरोगस्यकारकं ॥

अर्थ–शिळें लोणी बलकर, शुक्रकारक, गुरु, कफकर, मेदवर्धक, नेत्रांला हितकर, धातुवर्धक, अप्रिय, अनभिष्यंदि आहे, तेंच दोन तीन दिवसांचे असतां खारट, तिखट, आंबट, व वांति, अर्श, कुष्ठ, शोथासंयुक्त नेत्ररोग, आणि सर्व रोग यांचा नाश करितें.

नवनीतंगवांनूत्नंशीतलंधातुवर्धकं ॥ तेजोविवर्धनंवृष्यंवर्ण्यंग्राहि
बलप्रदं ॥ बालवृद्धाहितंरुच्यंमधुरंसुखकारकं ॥ चक्षुष्यंपुष्टिकृच्चै
ववातपित्तकफार्शनुत् ॥ क्षयरक्तविकारंचअर्दितंचाविनाशयेत् ॥
सर्वांगशूलंचतथाश्रमंकासंविनाशयेत् ॥

अर्थ—गाईचें नवें लोणी शीतल, धातुवर्धक, तेजोवर्धक, वृष्य, वर्णकर, ग्राहक, बलप्रद, बाल व वृद्ध, यांना अहित, रुचिकर, मधुर, सुखकारक, चक्षुष्य, पुष्टिकारक, व वायु, पित्त, कफ, अर्श, क्षय, रक्तविकार, अर्दितवायु, सर्वांगशूल, श्रम, आणि खोकला, यांचा नाश करितें.

नवनीतंमाहिष्यास्तुकषायंचानलंगुरु ॥ कफमेदोविवर्धकंचचक्षुष्यंधा
तुवर्धकं ॥ वृष्यंचमधुरंशीतंबल्यंदाहकरंमतं ॥ ग्राहकंश्रमपित्तघ्नं
नत्तूत्नंधातुवर्धकं ॥ बालवृद्धहितंबल्यंमुनिभिःपरिकीर्तितं ॥

अर्थ— म्हशीचें लोणी तुरट, वातुल, गुरु, कफकर, मेदवर्धक, नेत्रांला हित, धातुवर्धक, वृष्य, मधुर, शीत, बलकर, दाहकारक, ग्राहक, व श्रम, पित्त, यांचें नाशक आहे. हेंच ताजें असतां धातुवर्धक, बाल व वृद्ध यांना हितकारक, आणि बलकर असें आहे.

नवनीतमजायास्तुमधुरंतुवरंलघु ॥ चक्षुष्यंदीपनंबल्यंहितकृत्क्ष
यकासनुत् ॥ गुल्मंप्रमेहंशूलंचकंडूंनेत्ररुजंज्वरं ॥ पांडुंचश्वित्र
कुष्टंचनाशयेदितिकीर्तितं ॥

अर्थ— शेळीचें लोणी मधुर, तुरट, लघु, नेत्रांला हित, दीपन, बलकर, हितकर, व क्षय, खोकला, गुल्म, प्रमेह, शूल, कंडू, नेत्ररोग, ज्वर, पांडुरोग, पांढरें कोड, यांचा नाश करितें.

नवनीतंस्मृतंचाव्याःपाकेशीतंसरंलघु ॥ योनिशूलेकफेवातेशोफे
चार्शसिचोदरे ॥ जठराग्निसदाशमनंकृमिज्वरकरंपरं ॥ कंडूंवांति
चारुचिंचकरोतीतिनबुधाजगुः ॥

अर्थ— मेंढीचें लोणी पाककाळीं शीत, सारक, लघु, व योनिशूल, कफ, वायु, सूज, अर्श, उदर, आणि जठराग्नि यांवर उत्तम, व कृमि, ज्वर, यांना करणारें कंडू; वांति, अरुचि, यांना करितें.

नवनीतंस्मृतंचाव्यादुर्गंधंशीतलंगुरु ॥ अग्निदीपिकरंचैवपुष्टिकृ
न्मेदवर्धकं ॥ मेधाकारिसमुद्दिष्टंतृष्णायाजनकंमतं ॥

**अर्थ-** एडकीचें लोणी दुर्गंध, शीतल, गुरु, अग्निदीपक, पुष्टिकर, मेदवर्धक, मेधाकारक, आणि तृष्णाजनक असें आहे.

हस्तिन्यानवनीतंतुतुवरंदीपनंलघु ॥
तिक्तंमलस्तंभकरंकृमिपित्तकफापहं ॥

**अर्थ-** हत्तिणीचें लोणी तुरट, दीपन, लघु, कडु, मलस्तंभक, व कृमि, पित्त, आणि कफ, यांचें नाशक असें आहे.

अश्विन्यानवनीतंतुतुवरंकटुकंमतं ॥
अचक्षुष्यंस्मृतंचोष्णंकफवातविनाशकं ॥

**अर्थ—** घोडीचें लोणी तुरट, तिखट, नेत्राला अहित, उष्ण, आणि कफ, वायु, यांचें नाशक आहे.

गर्दभ्यानवनीतंतुबल्यंचतुवरंलघु ॥ उष्णंचदीपनंचैवकफवातंवि
नाशयेत ॥ मूत्रदोषंनाशयत्येवमाचार्यभाषितं ॥

**अर्थ-** गाढवीचें लोणी बलकर, तुरट, लघु, उष्ण, दीपन, व कफ, वायु, मूत्रदोष यांचा नाश करितें.

नारीस्तन्यभवंज्ञेयंनवनीतंबलप्रदं ॥
दीपनंचक्षयंकासंकफंनेत्ररुजंहरेत ॥

**अर्थ-** स्त्रीच्या दुधाचें लोणी बलकर, दीपन, क्षय, खोकला, कफ, व नेत्ररोग, यांचा नाश करितें.

उष्ट्रिजंनवनीतंतुपाकेशीतंलघुस्मृतं ॥ अग्निदीपि व्रणघ्नं
कृमिनाशनं ॥ वातघ्नंचकफघ्नंचपूर्वमुक्तंचिकि ॥

**अर्थ-** उंटिणीचें लोणी पाककाळीं शीत, लघु, अग्निदीपक, व व्रण, कृमि, वायु, कफ, यांचें नाशक आहे.

स्त्रीजन्यंनवनीतंतुपाकेलघुचप्रदं ॥
चक्षुष्यंदीपनंचैवसर्वरोगविषंहरेत ॥

**अर्थ-** स्त्रीचें लोणी पाककाळीं लघु रुचिकर, नेत्राला हितकारक, दीपन, संपूर्ण रोग, सर्व विषें, यांचा नाश करितें.

घृत नवनीत सांगितलें आहे.

अनानसमपक्कं तु रुच्यं हृद्यं गुरु मतं ॥ कफपित्तकरं चैव प्रोक्तं [illegible]
मरोचकं ॥ श्रमं क्लमं नाशयति तत्पक्कं स्वादु पित्तहृत् ॥ रसान[illegible]
कारं च नाशयेदिति कीर्तितं ॥

**अर्थ**- हिरवें अनानस रुचिकर, हृद्य, गुरु, कफपित्तकारक, अरोचक, श्रम, क्लम यांचें नाशक आहे, तेंच पिकलें असतां गोड, पित्तनाशक, रसविकार, आलपविकार, यांचें नाशक आहे.

कोशातकी तु मधुरा स्निग्धा शीता बलप्रदा । रुचिप्रदा रुचिकरा गुरु
पथ्याग्निदीपना ॥ किंचिद्वातकरी कफं चैव कोशातकीति कीर्तिता ॥ श्वा
सकासं ज्वरं चैव कफं पित्तं कृमीं स्तथा ॥ गुल्मोदरं त्रिदोषं च मलब
धं च नाशयेत ॥

**अर्थ**- दोडकी- शिराळी मधुर, स्निग्ध, [illegible], बलकर, रुचिप्रद, रुचिकर, गुरु, पथ्यकर, अग्निदीपक, किंचित् वातकर, कफकर, [illegible], [illegible], [illegible], कफ, पित्त, कृमि, गुल्म, उदर, त्रिदोष, आणि मलबंध यांचा नाश करिते.

गुणदोष समाप्त.

